हिंदी लोकशाहीचे अनभिषिक्त राजे

# कै. लो. बाळ गंगाधर टिळक

## यांचें चरित्र.

लेखक— श्रीयुत अ. न. कोल्हटकर, बी. ए., एल्‌एल्. बी.

कै. लो. बाळ गंगाधर टिळक यांचीं मराठी भाषेंत जितकीं होतील तितकीं चरित्रें हवींच आहेत. कारण त्यांचें चरित्र म्हणजे हिंदी लोकशाहीच्या अंतःकरणभूमींत स्वराज्यरूपी बीजांचें अंकुरारोपण होय. हें कार्य जितकें वाकबगार लेखक करतील तितकें करून व्हावयास पाहिजे व म्हणून आम्ही त्या निधड्या छातीच्या वीरांचें अथांग चरित्र शक्य तितक्या विस्तृत प्रमाणांत लिहलेलें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे. कारण कै. लो. टिळक हे हिंदी राजकीय चळवळीचे आत्मा असून त्या आत्म्याचीं तेजस्वी किरणें जनतेच्या मनस्तमोपटलांत शिरतील तितकीं तीं भावी पिढीला मार्ग दर्शविण्यास हवींच आहेत. वाल्मिकीनें जसें रामायण लिहीलें, व्यासांनीं भारत वर्णिलें, तद्वत कै. लो. टिळकांचें चरित्रहि रा. कोल्हटकरासारख्या तेजस्वी ग्रंथकाराच्या सुंदर लेखणीनें वर्णिलेलें प्रसिद्ध केलें जाणार आहे. दीड ते दोन हजार पृष्टांत ४—५ भागांत टिळक चरित्र पूर्ण करावयाचा तूर्त लेखकाचा संकल्प आहे. तरी महाराष्ट्र भाषाभिमानी व राष्ट्रीय पक्षाभिमानी अखिल राष्ट्र बांधव या कार्यास साह्यता देतील अशी आम्हांस आशा आहे. या संबंधीं विशेष खुलासा पुढील अंकीं किंवा जाहिरातीच्या द्वारें लौकरच करूं तथापि ग्राहकांनीं तूर्त पत्र पाठवूनच खालील पत्त्यावर नांवें नोंदवावींत.

तात्या नेमिनाथ पांगळ, गिरगांव—मुंबई.

( किंवा ) रविवार पेठ, पुणें—शहर.

सरसवाङ्मयरत्नमाला.

एक रुपया प्रवेश फी भरून या ग्रंथमालेचे ' कायम ग्राहक होतां येतें. कायम ग्राहकांस मालेचीं सर्व पुस्तकें खालील आकारणीनें निम्मे किंमतीस मिळतात. ट. ह. निराळे. पुढील पुस्तकें निम्मे कि. नें वेळो-वेळीं ग्राहकांकडे पाठविलीं जातात. इतरांस भर किंमत पडेल. खालील पत्त्यावर नांवें नोंदवा.

| | रु. आ. | | रु. आ. |
|---|---|---|---|
| ( १ ) गांधींचा बंदीवास. | ०—१२ | (१७) सैतानी चक्कर... | ३—० |
| ( २ ) स्वर्गीय प्रेम... | २ | (१८) व्रतपालन रंग० | २—१२ |
| (३) वनज्योत्स्ना—सुभेदार | २—४ | (१९) अस्तनीतील नि. | ३—० |
| ( ४ ) जीवनलता... | १—१२ | (२०) राष्ट्रगुरु—बाळब्रह्म. | २—० |
| ( ५ ) गृहलक्ष्मी—शरयू | ३—० | (२१) अमृतशोध=इं. जय | २—० |
| ( ६ ) रणरंग बंड सौ० | २—८ | (२२) सौभाग्यतिलक... | ३—० |
| ( ७ ) ताजमहाल—काव्य. | २—० | (२३) शापित राजवंश | ३—० |
| ( ८ ) पतित—जर्मन० | ३—० | (२४) कर्मविपाक प्रसुप्त. | २—० |
| ( ९ ) रत्नकंकण—कुपण | ३—० | (२५) राजसंसार पातिव्र. | ३—० |
| (११) तीन शिलेदार | ४—० | (२६) प्रेमविनोद-दैवविल. | ३—० |
| (२१) दुर्गादास—प्रेम० | २—८ | ( २७ ) तिरंगी सामना | ३—१२ |
| (१३) अल्ला हो अकबर | २—८ | ( २८ ) अधिकारी—जनता | ३—४ |
| (१४) प्रेमळ सवत... | ३—० | ( २९ ) खलीफत ... | ३—८ |
| (१६) साठ वर्षांपूर्वी | २—१२ | | |

लाख्यावारगीर, चारुगात्री, योगसामर्थ्य, लो. टिळकांचें चरित्र, रा. ब. वारदांचें चरित्र रत्नखचित सिंहासन हीं लौकरच प्रसिद्ध होतील.

लंडन येथील बड्या लोकांचीं गुप्त कृत्यें गोष्ट ३ री कि. रु. ९ पण ग्राहकांस सवलतीनें ट. ह. सह ३। रु. (१५) गुर्जरवीर कि. ४ रु.

(१) विहंगवृंद २ रु. (१०) शापित महाराष्ट्र ४रु. (१५) गुर्जर वीर शिल्लक नाहींत. व वरील प्रती थोड्या शिल्लक आहेत. तरी नवीन ग्राह-कांनीं वरील पुस्तकें लौकर मागवावीत. निम्मे कि.स पाठकं. ट. ख. वेगळा. महागाईमुळें पुस्तकांच्या निम्मे किंमतींत ६४, ६८ ची वाढ करणें भाग पडलें. व तूर्त पुनरावृत्त्या छापणेंहि अशक्य आहे. खालील पत्त्यावर नेहमीं मागणी करावी. कापडी प्रतीस सहा आणे अधिक पडतात.

सेक्रेटरी—सरसवाङ्मयप्रसारक मंडळी, गिरगांव-मुंबई.

सुवाङ्मयेन गीतेन युवतीनां च लीलया । [illegible] दुर्बोधना वृथा:

सरसवाङ्मयरत्नमालेचें २९ वें ऐतिहासिक रम्य रत्न

# खलीफतीची स्थापना

अथवा

## मुसलमानांचा विजय.

ग्रंथकार

**श्रीयुत—भिकाजी गोपाळ भिडे.**

" शम्भू, सौदामिनी, रत्नकंकण, कृपण कन्या, सैतानी चक्कर, ब्रह्मचारिणी, अमृतबोध, कर्मविपाक " इ. इ. ग्रंथकर्ते.

---

संपादक व प्रकाशक

**तात्या नेमिनाथ पांगळ,**

प्रोप्रायटर, सरसवाङ्मयप्रसारक मंडळी

नं. ४ चर्नी रोड, गिरगांव, मुंबई व पुणें शहर.

---



---

मुद्रक

रा. रा. केशव रावजी गोंधळेकर, ' जगद्धितेच्छु प्रेस '

५०७ शनवार पेठ, पुणें.

---

इ. स. १९२०. जुलैच्या अंक. } किंमत रुपये ३—८ आणे. { वर्ष सहावें. आवृत्ति पहिली.

# प्रकाशकाचे दोन शब्द.



भगवत्कृपेनें मालेचें २९ वें रत्न प्रस्तुत आम्ही ग्राहकांनीं सादर करीत आहोंत. गेले २८ वें रत्न—अधिकारी आणि जनता हें लोकशाहीचा विजय व नोकरशाहीच्या पराजयात्मक कथानकानें रंगविलें होतें, तद्वत आतांचें हें २९ वें रत्नहि " खिलाफत ! खिलाफत " म्हणून जी चळवळ, महात्मा गांधी हे आज मुसलमान बांधवांच्या साह्यानें करीत आहेत, त्या खिलाफतीची मूळ स्थापना, कधीं, कोणीं, कशा परिश्रमानें केली व युरोपखंडांत 'मुसलमानी सत्तेचा ध्वज' कशा रीतीनें कॉन्स्टॉटिनोपल शहरावर उभारिला त्या रम्य, वीररसप्रधान ऐतिहासिक कथानकानें रंगऊन, तें महाराष्ट्र जनतेस सादर करीत आहोंत. प्रस्तुतची कादंबरी सुप्रसिद्ध आंग्ल आदंबरीकार डॉ० जॉन नील यांच्या " Fall of Constontinople " म्हणजे कॉन्स्टाटिनोपलचें पतन, या रम्य कादंबरीवरून लिहिलें असून, आज देशांत महात्मा गांधीच्या नेतृत्वाखालीं खिलाफतीची चळवळ सुरू असल्यामुळें, हें पुस्तक हिंदी जनतेस अत्यंत उपयुक्त वाटल्यावांचून राहणार नाहीं, असा आम्हांस पूर्ण भरंवसा आहे. प्रस्तुत कथानकांत, रोमनलोक बलिष्ट असतांहि केवळ धर्माच्या व धर्माध्यक्षाच्या धार्मिक समजुतीवर विसंबून राहिल्यामुळें कसे कर्तव्यच्युत झाले, आणि अशा रीतीनें ते कर्तव्यपराङ्मुख झाल्यामुळें त्यांची सत्ता, त्यांचें राज्य कसें नष्ट झालें; तसेंच शेवटचा रोमन पादशहा कान्स्टंटाईन यानें देशभक्तीनें शेवटपर्यंत शत्रूशीं लढत स्वराज्यसंरक्षणार्थ कसा प्राण सोडला व अखंड कीर्ति मिळविली; मुसलमानांनीं रोमनसाम्राज्यावशेष धुळीस मिळविल्यावर इस्तंबूलवर आपलें अर्धचन्द्रांकित महमदी धर्माचें निशाण रोवून मुसलमानांचा मुख्य पादशहा जो खलीफ त्याची गादी म्हणजेच खलीफत, तेथें कशी स्थापन केली, इत्यादि अनेक अन्या ऐतिहासिक प्रसंगाचें चित्र, या कादंबरींत रेखाटलें असल्यामुळें

आज जें वाचकांना हवें तेंच पुस्तक आम्हीं दिलें आहे हें पाहून त्यांस पूर्ण समाधान वाटल्यावांचून राहणार नाहीं.

पुढील खेपेस लाख्याबारगीर व योगसामर्थ्य हीं पुस्तकें सप्टेंबर-मध्यें प्रसिद्ध होतील. कदाचित् तीं तयार होण्यास विलंब लागल्यास त्या ऐवजीं चारुगात्री हें ऐतिहासिक रम्य कथानक सादर केलें जाईल. तसेंच कै. लो. टिळक यांचें अथांग व मौल्यवान चरित्रही शक्यतों सुप्रसिद्ध पुढाऱ्याकडून लिहवून लौकरच आम्ही प्रसिद्ध करणार आहोंत.

प्रिय वाचक, आजकाल महर्गतेनें तर ताळच सोडला आहे. लढाईच्या वेळेपेक्षांहि कागदाच्या किंमती अधिक वाढल्या असून कागद दुर्मिळहि झाला आहे. त्यामुळें पुस्तकाच्या किंमतींत किंचित वाढ करणें प्राप्तच झालें आहे. तथापि आम्ही किंमतीची वाढ कागदाच्या ७।८ पटीप्रमाणें न करतां फारच अल्प केली आहे. तरी प्रस्तुतच्या महागाईच्या बिकट प्रसंग लक्षांत घेऊन या वाढीकडे अलक्ष कराल अशी आशा आहे. दुसऱ्या कोणत्याहि आज काल प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकापेक्षां आमच्या किंमती पुष्कळच माफक आहेत, असेंच आपणास आढळून येईल. सारांश, या ग्रंथमालेस आपण आपला आश्रय असाच कायम ठेवावा व नूतन ग्राहकांचें साह्य पाठवून मालेस साह्य देत जावें, ही विनंति आहे,

गेले २८ व्या रत्नाबद्दल केसरीप्रभृति पत्रांनीं प्रशंसनीय उद्गार काढले याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. उत्तरोत्तर मालेंतून उत्कृष्टच पुस्तकें प्रसिद्ध करण्याची आमची जारीनें खटपट चालू असून २०३ रु. पेक्षां अधिक व्ही. पी. नें कोणतेंहि पुस्तक प्रस्तुतच्या प्रसंगीं पाठविलें जाणारच नाहीं. असें आम्ही वाचकांना आश्वासन देतों,

गेल्या महिन्यांत आपल्या महाराष्ट्रांतील ललित वाङ्मयाचे कट्टे सेवक, पुरस्कर्ते व ' मनोरंजन ' मासिकाचें संपादक श्रीयुत काशिनाथ रघुनाथ मित्र हे स्वर्गस्थ झाले हें नमूद करण्यास अत्यंत वाईट वाटतें. काशिनाथपंतांनीं ललितवाङ्मयाची केलेली सेवा अपूर्व आहे व त्यांच्या निधनानें झालेली साहित्यसेवकाची उणीव लौकर भरून येणें अशक्य आहे, परमात्मा त्यांचें आत्म्यास शांति देवो !

लो. बाळ गंगाधर टिळक—यांचीही निधन वार्ता नमूद करण्याचा कटुतर प्रसंग आम्हांवर आला आहे. लो. टिळक म्हणजे हिंदी स्वराज्य-विषयक चळवळीचा आत्मा, राजकीय वाङ्मयाचे कर्ते पुरस्कर्ते व आद्य प्रवर्तक: हिंदी राष्ट्रीय अद्वितीय पुढारी, व सरकारशीं हिंद देशाच्या चिरकल्याणार्थ झगडणारे कर्ते लढवय्ये होते. हातांत शस्त्र घेऊन शत्रूचा पाडाव करणें एखादे वेळीं सोपें ठरेल पण निःशस्त्र असतां, कायद्यांच्या शृंखलांनीं अखिल देश, अखिल प्रजा बद्ध झालेली असतां त्यांतूनहि वाट काढून कायदेशीर मार्गानें सरकारशीं स्वराज्यप्राप्तीसाठीं झगडणारे जर आज-च्या काळीं कोणी महाराष्ट्रीय वीर असते तर ते लो. टिळकच होते. ह्यांच्या हितासाठीं त्यांनीं तुरुंगवास पत्करला, तत्वाच्या सत्यतेसाठींच [illegible] [illegible] मानहि त्यांनीं भरसभेंत झुगारून दिला व स्वराज्याच्या प्राप्तीसाठीं त्यांनीं आमरणान्त देह झिजविला! वाहवा लोकमान्य धन्य तुमची! तुमची [illegible] हिंददेवीच काय पण स्वर्गातून देवसुद्धां [illegible]. आतां तुमच्या सारखा स्वराज्य मिळावें म्हणून झगडणारा वीर—भांडणारा वकील, हिंदुस्थानास लोकर लाभणें मुष्किल! परमात्मा तुमच्या आत्म्यास [illegible] करो व चिर:शांति देवो!!!

[illegible], आमच्या बंधूच्या व कन्येच्या आजारीपणामुळें हल्लीं काहीं दिवसांपुरता आमचा मुक्काम पुण्यास असून येथेंच आम्ही तात्पुरतें एक ब्रँच ऑफिसहि उघडलें आहे. तरी पत्रव्यवहार गिरगांव मुंबई, किंवा पुणें येथें केला तरीसुद्धां चालेल. मात्र ग्राहकांनीं र. नं. पत्रव्यवहार करतांना अवश्य कळवावा. कळावें, या वाङ्मयसेवेस, नवीन ग्राहक वाढवून प्रोत्साहन देत असावें ही विनंति आहे.

आपला,

गिरगांव—मुंबई
किंवा पुणें शहर.
ता. ४–८–२०

तात्या नेमिनाथ पांगळ
संपादक—सरस्वाङ्मयरत्नमाला

# खलीफत कादंबरींतील पात्रांची सूचि.



ड्यूक लियॉनशियस---कॉन्स्टांटिनोपल येथील एक रोमन सरदार.

लॉर्ड फ्रांझा---रोमन बादशहांचे मुख्य प्रधान.

सर एडवर्ड डी रस्टन---रोमन बादशहांच्या हुजुरातीचे सेनापति.

लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास---रोमन सरदार, लॉर्ड फ्रांझाच्या मदत मित्राचा मुलगा.

रिचर्ड बर्स्टो---सर एडवर्डच्या सैन्यांतील एक हुशार नाईक.

निसिटस कॉनिएटीस---रोमन राज्यांतील सिलिव्हरी गांवचा कोतवाल

मेरिया बाई---कॉनिएटिसची पत्नी.

युफ्राशिया---कॉनिएटिसची कन्या.

थियोडोरा---लॉर्ड फ्रांझाची कन्या.

कार्डिनल इसिडोर---रोम येथील पोपकडून आलेला धर्माधिकारी.

कॉन्स्टंटाइन---कॉन्स्टांटिनोपलचा शेवटचा रोमन बादशहा.

डेमिट्रियस---कोतवाल कॉनिएटिसचा नोकर.

युडेशिया---इस्कीबाबा गांवाजवळच्या शेतकऱ्याची मुलगी.

जोसफ---कॉन्स्टांटिनोपलचा धर्माधिकारी.

कॉटारी---सर एडवर्डच्या सैन्यांतील एक कामगार.

खलीफ सुलतान महमद---तुर्की सुलतान-खलीफ.

अहमद्‌पाशा---इस्कीबाबा येथील तुर्की लष्करावरील सरदार.

रसीद्‌पाशा---तहाची वाटाघाट करणारा तुर्की सरदार.

[illegible]यॉफेटस---रोमन ॲडमिरल ( आरमारावरील सेनापति. )

बालथा ओगली---तुर्कांच्या मदतीस आलेला बल्गेरियन सेनापति.

जस्टीनियन---रोमन लोकांच्या मदतीस आलेले जिनोवी सेनापति.

कालीलपाशा---तुर्कांकडील मुख्य सेनापति.

निसेफोरस---रोमन एंजीनियर.

झोशीमस---लॉर्ड फ्रांझाच्या वाड्यांतील फितुरी नोकर.

बलारम---लॉर्ड फ्रांझाचा इमानी वृद्ध नोकर.

सरसवाङ्मयरत्नमाला-खिलाफत

# हिंदीलोकशाहीचे अनभिषिक्त राजे !

जन्मः—२३।७।१८५६



मृत्यु:—१।८।१९२०

कै० लो० टिळक यांच्या स्मृत्यर्थ समर्पण !

-प्रकाशक-



# मुसलमानांचा विजय

अथवा

# खिलाफतीची स्थापना.



## प्रकरण १ लें.

## मेजवानीचा थाट.



इसवी सन १४५२ तील नवेंबरच्या अखेरीस एके दिवशीं सायंकाळीं कॉन्स्टांटिनोपल शहरांतील एका राजप्रासादतुल्य भव्य वाड्यांतील सुसज्जित दिवाणखान्यांत बड्या बड्या मुत्सद्दी मंडळींच्या मेजवानीचा समारंभ अगदीं रंगांत आला होता. दिवाणखान्याच्या सर्व भिंती पांढऱ्या शुभ्र संगमरवरी दगडाच्या असून, छताच्या भव्य कमानी व सुंदर स्तंभ हिरव्या चकचकीत गारेचे असल्यामुळें, दिव्यांच्या चकचकीत प्रकाशांत त्या दोन्ही रंगांच्या किरणांचें मिश्रण होऊन एक अपूर्व चमक चोहोंकडे पसरली होती. रोमन राज्याचे केवळ आधारस्तंभ असे थोर थोर वीस पाहुणे मेजवानीस आलेले होते. चंदनी मेजावर चांदीची

ताटें व सोन्याचे चमचे अस्तरांच्या दिव्यांच्या मधुर प्रकाशांत चमकत होते. सुवासिक पुष्पांच्या व आगरबत्त्यांच्या सुगंधांतच उंची पक्वान्नांचा घमघमाट दरवळून गेला होता. राजवाड्यांतील मुख्य पाकाचार्यास आजच्या समारंभाकरितां सरकारच्या परवानगीनें मुदाम आणविलें असून, पाकनिष्पत्तीची व वाढण्याची सर्व व्यवस्था त्याच्या नजरेखालीं चालली होती. वरच्या सज्जांत बँडचें कर्णमधुर संगीत सारखें सुरू होतें. घरचे मालक आपल्या सन्मान्य पाहुण्यांना पक्वान्नांचा व सरबताचा आग्रह एकसारखा करीतच होते. ह्याप्रमाणें दिवाणखान्यांत मेजवानीची नुसती दंगल उडून गेली होती.

दिवाणखान्याच्या आंत असा मेजवानीचा रंग चालला होता, पण बाहेर गार वारा, पाऊस आणि गारा यांचें भयंकर वादळ शहरांतील इमारतींना, राजवाड्यांना आणि बुरुजांना जोराजोरानें धक्का देत होतें. राजवाड्यापासून बॉसफरसच्या किनाऱ्यापर्यंत बांधलेला संगमरवरी दगडाचा घाट भिजून चिंब झाला असून त्यावर ओलीनें निसरडें झालें होतें. हिंवाळ्यामुळें अगोदरच शुष्क व हीनपर्ण झालेल्या पुराट वृक्षांचीं उरलीं सुरलीं पानेंही ह्या वादळानें भराभर गळून पडत होतीं. आणि तीं वाऱ्याच्या जोरानें दर्‍यादिशांना उडत होतीं, दिवाणखान्याच्या गवाक्षांनो खिडक्यांतून आंतील तेजस्वी प्रकाश बाहेरील बगीचांत पडलेला होता, व वादळाच्या सोसाट्यांत देखील दिवाणखान्यांतील मुत्सद्दीमंडळाचें संभाषणही मधून मधून ऐकूं येत होते.

संभाषणाच्या ओघांत वाड्याचे मालक पाहुणे मंडळीकडे वळून उत्तेजित स्वरानें म्हणाले—" परराष्ट्रीय मंत्री लॉर्ड फ्रांझा यांचे रोमन साम्राज्यावर अत्यंत उपकार झाले आहेत ! आपल्या ह्या प्राचीन साम्राज्याच्या आबादानीकरितां त्यांनीं अविश्रांत श्रम केले आहेत ! त्यांच्या वकिलीला यश येवो, आणि आपल्या परमपूज्य बादशहांचा विजय असो, अशी माझी परमेश्वराजवळ अनन्य प्रार्थना आहे, त्याचप्रमाणें आपली सर्वांचीही असावी ! "

यजमानांचे हे उद्गार कानीं पडतांच सर्व पाहुणे मंडळीनीं उच्चस्वरानें रोमन बादशहांचा व परराष्ट्रीय मंत्री लॉर्ड फ्रांझा यांचा जयजय-

कार केला. तो गोंगाट शांत झाल्यावर. परराष्ट्रीय मंत्री लॉर्ड फ्रांझा गंभीर स्वरानें म्हणाले—" मित्रहो, तुमच्या ह्या सदिच्छेबद्दल मी तुमचे सर्वांचे मनःपूर्वक आभार मानितों, आणि आपले मनोरथ परमेश्वर पूर्ण करो व हें अत्यंत प्राचीन रोमन साम्राज्य चिरकाल राहो अशी मीही प्रार्थना करितों ! माझ्या पूर्वींच्या श्रमांचा आपल्या साम्राज्याला किंवा आपल्या परमपूज्य बादशहांनाही तादृश उपयोग झाला नाही हें खरें, तथापि ईश्वर कृपेनें यंदाच्या खटपटीस बरेंच यश येईल व येत्या वसंतऋतूंत आपल्याला सार्वजनिक आनंदोत्सव करण्याचा सुप्रसंग लाभेल, अशी मला आशा आहे ! त्याचप्रमाणें आजच्या मेजवानीच्या प्रसंगानें आपल्या सर्वांना परस्परांत सदिच्छा कळविण्याचा सुयोग लॉर्ड लियॉन्शियस यांनीं आणून दिल्याबद्दल त्यांचेही आपण सर्वांनीं आभार मानिले पाहिजेत. "

लॉर्ड फ्रांझांच्या सूचनेप्रमाणें सर्व पाहुण्यांनीं लॉर्ड लियॉन्शियस यांचे मनःपूर्वक आभार मानिले. लॉर्ड फ्रांझा यांनीं जरी ती आभारप्रदर्शक सूचना उच्च स्वरानें पुढें मांडली होती, तरी त्यांच्या अंतःकरणांतील खरी भावना त्यांच्या मुद्रेवरून, कोणाही सूक्ष्मदृष्टि मनुष्याच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नसती; इतकेंच नव्हे पण, ह्या समारंभांत लॉर्ड फ्रांझा कसे सामील झाले, ह्याविषयीं त्याला आश्चर्यच वाटलें असतें. त्यांच्या रुक्ष स्वरावरून व तीक्ष्ण दृष्टीवरून, ह्या प्रसंगीं ते अगदीं जिवाच्या करारावर ह्या मेजवानींत सामील झाले असावे, असें उघड दिसत होतें. वरील सूचना केल्यानंतर, लॉर्ड फ्रांझा आपल्या जवळ बसलेल्या पाहुण्याशीं हळू हळू पुनः संभाषण करूं लागले. त्यांचें संभाषण कांहीं तरी महत्त्वाच्या बाबीसंबंधानें चाललें असावें असें त्या उभयतांच्या गंभीर मुद्रेवरून दिसत होतें.

लॉर्ड फ्रांझा यांच्याशीं बोलत असलेला गृहस्थ त्याच्या पाणीदार चेहऱ्यावरून बराच थोर दर्जाचा मुत्सद्दी दिसत होता. त्याचा वर्ण तेजस्वी गोरा असून, त्याचा बांधा उंच मजबूत व पीळदार दिसत होता त्याच्या गंभीर मुखचर्येवरून, सभ्य वर्तनावरून व तेजस्वी दृष्टीवरून तो जातीचा इंग्रज असल्याचें स्पष्ट दिसत होतें. त्यांचें नांव सर एडवर्ड डी रस्टन असून, तो कॉन्स्टँटिनोपल येथील हुजुरातीच्या सैन्यावरील सेनापति

होता. शिवाय, बादशहांच्या शरीरसंरक्षकांचाही अधिकार त्याच्याकडेच असे.

सर एडवर्डकडे वळून लॉर्ड फ्रांझा हळूच म्हणाले—" आतां हे खुळ-सट लोक आपल्याकडे मुळींच लक्ष देणार नाहींत ! ते बहुतेक समोरच्या पक्वान्नांमध्यें व निरर्थक गप्पागोष्टींमध्यें गुंग होऊन गेले आहेत. आतां आपण पुढील हकीकत सांगा, मला ती समजून घेण्याची अत्यंत उत्कंठा लागली आहे. मी नुकताच कामगिरीवरून परत आलों असल्यामुळें, बऱ्याच बड्या मंडळींच्या गांठी घेण्यांत व भेटी देण्यांत माझा सगळा वेळ निघून गेला. त्यामुळें, आपली स्वस्थपणानें गांठ घेऊन, ही महत्वाची गोष्ट समजून घेण्यास मला फुरसदच झाली नाहीं ! आतां काय असेल तें स्पष्ट सांगा ! मग तें आजपर्यंत प्रसृत झालेल्या लोकवार्तेहूनही भयंकर असलें तरी हरकत नाहीं ! "

" होय, प्रधानसाहेब, " सर एडवर्ड गंभीरस्वरानें उद्गारले—"बातमी खरोखरच चिंताजनक आहे ! ह्या बॉसपरसच्या सामुद्रधुनीच्या पैल-तीरावर सुलतान महमुदानें 'रुमुराय' नांवाचा एक मजबूत किल्ला बांधला असून, त्याच्या शेजारींच एक मशीदही उभारली आहे ! हीं दोन्ही कामें त्यानें इतकीं भक्कम केलीं आहेत कीं, कित्येक पिढ्या त्यांना धक्काहि लागणार नाहीं ! त्या किल्ल्याच्या योगानें बास्परसची सामुद्रधुनी बहुतेक यांच्या ताब्यांत गेल्यासारखी आहे ! ह्याप्रमाणें मुसलमानांचा अंमल आपल्या कॉन्स्टांटिनोपल राजधानीपासून पांच सहा मैलांवर येऊन ठेपला आहे ! अर्थात् राजधानीवर केव्हां काय प्रसंग येईल, याचा भरंवसा नाहीं ! सुलतान महमूद इतके दिवस तरी कां स्वस्थ बसला आहे, हें त्याचें त्यालाच माहीत, पण पुढील वर्ष मात्र असेंच शांततेंत जाईल, असा रंग दिसत नाहीं ! "

लॉर्ड फ्रांझा—" आणि इतक्या पल्ल्याला गोष्टी आल्या असून देखील, हे तोंडपुजे लोक बादशहांची अशी समजूत करून देत आहेत कीं, त्या इमारती तात्पुरत्या व हंगामी असून, दोन्ही राष्ट्रांमध्यें तह होऊन तंटा मिटला म्हणजे त्या तत्काळ नष्ट होऊन जातील ! इतकेंच नव्हे पण, ह्या घोर संकटाकडे काडीभर देखील लक्ष न देतां, हे मूर्ख लोक आपापसांतीलच द्वेषबुद्धीच्या व चढाओढीच्या नादांत गुंग आहेत !

हें केवढें आश्चर्य ! ”

सर एडवर्ड—“ आपल्याला बाहेरून भरपूर मदत मिळेल अशी कांहीं तरी तजवीज अगोदर पासून करून ठेवली पाहिजे; नाहीं तर ऐन-प्रसंगीं मुसलमानांना मुकाट्यानें शरण जाण्यावांचून गत्यंतर उरणार नाहीं ! बरें, धर्माधिकारी इसिडोर अगदीं जवळ म्हणजे सेलिंब्रियापर्यंत येऊन पोंचला आहे असें ऐकतों, तें खरें का ? ”

लॉर्ड फ्रांझा—“ हो, आजच जासुदांनीं तशी खबर आणिली आहे ! पण त्याच्यामुळें फारसें बिघडेल असें आज तरी दिसत नाहीं ! तो सेंट-सोफायाच्या मंदिरांत प्रार्थना चालवील, आणि येथील लोकांमधील मतभेद मोडून समेट घडवून आणील, अशी मला आशा वाटत आहे ! तथापि पोपसाहेबांकडून विशेष कांहीं मदत होण्याचा मात्र संभव दिसत नाहीं ! ”

सर एडवर्ड—“ प्रधानसाहेब, स्पष्ट बोलण्याबद्दल माफी असावी, पण ह्याचा दोष सर्वस्वीं पोपसाहेबांकडे नसून, आपल्याच लोकांकडे बहुतांशीं आहे, असें म्हणणें भाग पडतें ! कारण, दोनतीन दिवसांपूर्वींच एक बडे गृहस्थ उघड उघड असें म्हणाले कीं, आमच्या मंदिरांत हे परकी धर्माधिकारी येऊन शिरण्यापेक्षां सुलतानाचा काजी येऊन शिरलेला काय वाईट ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ जाऊं द्या ! कोणाकडे किती दोष आहे, ह्याचा तपशीलवार हिशेब काढीत बसण्यांत कांहीं फायदा नाहीं ! धर्माधिकारी इसिडोर हे जसे परस्थ आहेत, तसेंच तुम्हीही परस्थच आहां ! तेव्हां तुम्हांला एवढीच सूचना आहे कीं, इसिडोरसाहेब आपल्या भाषणानें किंवा वर्तनानें येथील लोकांमध्यें अधिक तेढ वाढवून फूट पाडण्यासारखें कांहीं न करितां, असलेले मतभेद शांत करून समेट घडवून आणतील, अशी शक्य तितकी खटपट करा ! धर्मसंबंधानें जें त्यांचें कर्तव्य असेल, तें त्यांनीं बरोबर बजावलेंच पाहिजे; त्याविषयीं आमचें कांहीं म्हणणें नाहीं; पण इतर बाबतींत मात्र त्यांनीं विनाकारण भलती ढवळाढवळ करून गोंधळ माजवूं नये, एवढी खबरदारी घेण्याबद्दल त्यांना तुम्ही विनंति करा ! धार्मिक बाबतींतही येथील लोकांच्या हातून पुष्कळ चुका झाल्या असल्याचा संभव आहे, तथापि सांप्रतच्या बिकट प्रसंगाकडे लक्ष

देऊन त्यांनीं आपला धार्मिक अधिकारही शक्य तितका दयार्द्र बुद्धीनेंच चालवावा, आणि लोकांना ह्या वेळीं नाखुष व नाउमेद करूं नये, अशी आमची इच्छा आहे ! "

सर एडवर्ड—" ठीक आहे, मी होईल तितकी खटपट करावयास बिलकूल कसूर करणार नाहीं. तथापि ईसिडोसाहेब माझें ऐकतील, किंवा माझ्या खटपटीनें आपला उद्देश बदलतील, अशी मला खात्री वाटत नाहीं. माझ्या रदबदलीचा इष्ट परिणाम दिसून आला नाहीं तर, मजवर दोष येऊं नये, म्हणून मी हें अगोदरच सांगून ठेवतों ! पण प्रधानसाहेब, आपल्या स्थानिक लष्करांत आणीबाणीच्या प्रसंगीं जिवावर उदार होऊन आपल्या साम्राज्याकरितां लढण्यास पुढें सरसावणारा एक तरी सैनिक आहे का ? एखाद्या मिरवणुकीच्या समारंभांत शिपाईगिरीची पोकळ ऐट आणणारे लोक शेंकडों आहेत, पण खरोखरच सुलतान महमुदाच्या मुसलमानी लष्करानें कॉन्स्टांटिनोपल शहराला वेढा दिला तर, तुमच्या शहरांतील बायकांचा जितका उपयोग होईल, तितका तरी ह्या समशेरबहादरांचा होईल कीं नाहीं, याची मला शंकाच आहे ! "

लॉर्ड फ्रांझा खिन्न स्वरानें म्हणाले " होय, तुम्ही म्हणतां तशी स्थिती आहे खरी ! आमचे लोक बहुतेक बेइज्जत व स्वाभिमानशून्य बनले आहेत ! आणि विशेषतः आजच्या मेजवानीच्या रंगांत गुंग होऊन, पक्वान्नांच्या घमघमाटानें धुंद झालेल्या ह्या नामर्द मूर्खांच्या अंगांत तर अब्रू किंवा स्वाभिमान मुळींच उरलेला नाहीं, हें मोठ्या दिलगिरीनें कबूल करणें भाग आहे ! "

लॉर्ड फ्रांझा व सर एडवर्ड यांचें मेजवानीकडे लक्ष नाहीं, ही गोष्ट घरचे यजमान लॉर्ड लियॉन्शियस यांच्या लक्षांत येऊन, ते उत्तेजित स्वरानें म्हणाले—" प्रधानसाहेब व सेनापतीसाहेब, माझ्या गरिबाच्या पाहुणचाराचा अंतःकरणपूर्वक आदर करण्याचें सोडून, आपण आपसांतच कसली वाटाघाट चालविली आहे ? ह्या द्राक्षासवाची आपण रुचि पाहिली का ? माझ्या स्वतःच्या द्राक्षाच्या मळ्यांतील उत्तम व अस्सल द्राक्षांचें हें घरीं तयार केलेलें सरबत आहे ! पहा, पहा तर खरी याची लज्जत ! कोण आहे रे ? डेमेट्रियस, सुरई प्रधानसाहेबांच्या पुढें

नेऊन ठेव ! "

लॉर्ड फ्रांझा नाइलाजास्तव सरबताचा एक घोट घेऊन म्हणाले—"खरो-खरच, लॉर्ड साहेब, हें सरबत फारच रुचिकर व लज्जतदार बनलें आहे!"

इतक्यांत बॉस्परसच्या सामुद्रधुनीवर तोफेचा आवाज झाला, तो ऐकतांच लॉर्ड फ्रांझा एकदम चमकून म्हणाले—" ओहो! हें काय ? "

मेजवान मंडळीपैकीं एक गृहस्थ निष्काळजीच्या स्वरानें उद्गारले—"हां, आपण ऐकत होतां, ती ही नवी तुर्की तोफ असेल ! "

सर एडवर्ड—" ही अमुराय किल्ल्यावरची तोफ आहे ! सर्व मुसलमानांनीं नमाजाकरितां मशिदींत जमण्याची हीं इषारत असावी ! त्या किल्ल्यावरची तोफ म्हणजे कॉन्स्टांटिनोपल शहराचा काळच, असें मला वाटूं लागलें आहे ! परवां नुकतेंच त्या तोफेच्या गोळ्यानें सामुद्रधुनींतील एक जहाज फुटून समुद्राच्या तळास गेलें ! "

लॉर्ड फ्रांझा—" तर्की सुलतानानें प्रत्यक्ष आमच्या राजधानीच्या तोंडावर हा किल्ला खुशाल बांधला, त्या वेळीं आमच्यापैकीं कोणींच कशी हरकत घेतली नाहीं. याचें मला मोठें आश्चर्य वाटतें ! येथील सगळ्या लोकांमध्यें शहाणा, दूरदर्शी व धैर्यवान् असा मला एकच मनुष्य दिसतो, आणि आपले ते परमपूज्य बादशहा होत ! ईश्वरकृपेनें त्यांचा विजय असो ! पण ते देखील ही आपत्ति सहन करण्याऐवजीं लढाईला कसे तयार झाले नाहींत, हें कळत नाहीं ! "

सर एडवर्ड—' त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणें करूं दिलें असतें तर, त्याच वेळीं त्यांनीं युद्ध पुकारलें असतें ! पण भोंवतालची सर्वच मंडळी त्या गोष्टीच्या विरुद्ध असल्यामुळें, त्यांचा नाइलाज झाला ! माझें त्यांना पूर्ण अनुमोदन होतें, पण माझें एकट्याचें काय चालणार, आणि कोण ऐकून घेणार ? येथील धर्माधिकाऱ्यांनीं तर मंदिरांत सर्व लोकांना उघडपणें असा उपदेश केला कीं, लोकांच्या मर्जीविरुद्ध कोणतीही गोष्ट करण्याचा बादशहाला मुळींच अधिकार नाहीं ! "

लॉर्ड फ्रांझा—" त्या वेळीं मी येथें हजर असतों तर, इतक्या पल्ल्याला गोष्ट सहसा येऊं दिली नसती ! बरें असो. आड्रियानेपलकडील काय विशेष खबर ? सुलतान महमूद तेथें कांहीं स्वस्थ बसून

राहिला नसेल ! ”

सर एडवर्ड—“ सुलतान येथें स्वतःकरितां एक नवीन राजवाडा बांधीत आहे असें ऐकलें आहे. मग तो नुसता राजवाडाच आहे कीं, लढाऊ किल्ला आहे, कोण जाणे ! त्याचप्रमाणें नवीन तऱ्हेच्या तोफखान्याचेही तेथें कांहीं प्रयोग चालले आहेत, असें समजतें. तथापि निश्चित बातमी कांहीं कळत नाहीं ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ छे छे, असें उपयोगी नाहीं ! विश्वसनीय खबर आपल्याला तातडतोब मिळविलीच पाहिजे ! तुमच्या हुजुरातींत हेराचें काम करण्यालायख कोणी हुषार व विश्वासू माणूस आहे का ? माझा तर ह्या रोमन लोकांपेक्षां तुमच्या हुजुरातींतील लोकांवरच अधिक भरंवसा आहे ! ”

सर एडवर्ड कांहीं वेळ विचार करून म्हणाले—“ हो, एक मनुष्य ह्या महत्त्वाच्या कामगिरीला पूर्ण लायख दिसतो आहे ! त्याचा बाप इंग्रजच होता, पण आई आशियामायनरमधील स्मर्ना शहरची होती. आणि त्याचें स्वरूप विशेषतः आईच्या वळणावर गेलेलें आहे. त्यामुळें त्याला तुर्की वेष बेमालुम साधण्यासारखा आहे. शिवाय तो हुशार व बलाखही आहे. त्याचा विशेष गुण हा आहे कीं, तो अत्यंत विश्वासू आहे, तो जरी कदाचित् शत्रूच्या हातीं सांपडला, आणि त्यांनीं त्याचा वाटेल तितका छळ केला, किंबहुना त्याचा प्राणही घेतला, तरी त्याच्या तोंडांतून एक अक्षरही बाहेर पडण्याची भीति बाळगावयास नको ! ”

लॉर्ड फ्रांझा—वाहवा ! आपल्याला असाच एकनिष्ठ माणूस पाहिजे ! बरें त्याचें नांव काय ? ”

सर एडवर्ड—“ त्याला रिचर्ड बर्टो ह्मणतात. ”

लॉर्ड फ्रांझा—“ ठीक आहे. त्याला तुम्ही एकदां माझ्याकडे घेऊन याल का ? ”

सर एडवर्ड—“ हो हो, उद्यांच पाहिजे तर आणीन ! केव्हांसा घेऊन येऊं ? ”

लॉर्ड फ्रांझा—“ उद्यां सकाळीं कांहीं सवड नाहीं. कारण, सकाळी मंदिरांत धर्माधिकाऱ्यांची ह्या समेटाबद्दल सभा भरणार आहे, आणि

बादशहांची स्वारीही त्या सभेला जाईल असें वाटतें. त्यांच्याबरोबर मग मलाही तिकडे जावें लागेल. तेव्हां तुम्ही दुपारीं दोन वाजतां त्याला घेऊन आमच्या वाड्यांत या. तोंपर्यंत मी कदाचित् परत आलों नसलों तरी माझी वाट पहात बसा."

सर एडवर्ड इकडे तिकडे पहात म्हणाले—"फार उत्तम! ते पहा, आमचे मित्र क्रिसोलरासही मेजवानीला कंटाळलेले दिसतात! घरचे यजमान लॉर्ड लियॉशरियस तर सरबताच्या अतिरेकानें बहुतेक बेहोष झाल्यासारखे दिसत आहेत! तेव्हां आतां आपल्याला येथून मुकाट्यानें निसटून जाण्यास काय हरकत आहे?"

लॉर्ड फ्रांझा—"आणखी क्षणभर थांबा. क्रिसोलरासची दृष्टि आपल्याकडे वळली म्हणजे मी त्यालाही नेत्रसंकेत करितों; मग आपण तिघेही येथून निघून जाऊं! हा तरुण मात्र एक तेजस्वी, पाणीदार व धैर्यशील वीर आहे! पराक्रमांत तर तो केवळ सिंह आहे!"

सर एडवर्ड—"होय, प्रधानसाहेब, आणि त्याच्यासारखे आणखीही पांच चार शूर तेजस्वी व विश्वासू गृहस्थ निघतील! तथापि असे गृहस्थ फारच थोडे असून, बहुतेक निर्लज्ज व अभिमानशून्य लोकांचाच भरणा फार आहे, ही गोष्ट खरी!"

लॉर्ड फ्रांझा—"थोडे तरी असे अभिमानी थोर गृहस्थ आहेत, हेंच आपलें महद्भाग्य समजा! विशेषतः लॉर्ड क्रिसोलरासबद्दल तर मला मोठें कौतुक वाटतें! त्याच्यावर माझें पुत्रवत् प्रेम जडलें आहे! आणि ईश्वर करील तर, लवकरच त्याला माझ्या पुत्रस्थानीं स्थापन करण्याचें माझ्या मनांत आहे! तें पहा, तो आमच्याकडे पहात आहे! हं, चला, सेनापतीसाहेब, उठा आतां, येथून मुकाट्यानें झटकन् अदृश्य झालें पाहिजे!"

लॉर्ड फ्रांझा यांचा नेत्रसंकेत लॉर्ड क्रिसोलरास ह्यांस समजला. तिघेही कोणाच्या लक्षांत न येतां, हळूच आपल्या जाग्यांवरून उठून दिवाणखान्यांतून बाहेर पडून, बाहेरच्या व्हरांड्यांत जमले. पितृदिशेचा तीक्ष्ण वारा जरी अद्यापि राहून राहून वहात होता, तरी आकाश ह्या वेळीं निरभ्र व स्वच्छ झालें होतें. चंद्र आकाशमध्यावर आला असल्या-

मुळें, त्याच्या तेजस्वी पण सौम्य व अमृतमय किरणांनीं अखिल प्रदेश प्रकाशित झालेला होता. विशेषतः सेंटसोफाया मंदिराचें धवल शिखर शुभ्र चंद्रप्रकाशांत अधिकच स्वच्छ व रजतमय भासत होतें. उद्यानांतील वृक्षवाटिकांमधून वर डोकीं काढणारीं प्रासादशिखरें व हर्म्यतलें शुभ्रचंद्रिकेंत डौलानें चमकत होतीं. यास्परसच्या सामुद्रधुनींतही चंद्रकिरण चौत शुभ्रलाटा रजतरसाशीं स्पर्धा करीत होत्या. पण सामुद्रधुनीच्या पैलतीरावर ठिकठिकाणीं पाजळलेल्या मशाली तुर्की छावणीचें सांनिध्यही स्पष्ट दर्शवीत होत्या.

लॉर्ड फ्रांझा व त्यांचे दोघे मित्र दिवाणखान्यांतील उकाड्यानें गुदमरल्यासारखे झाले असल्यामुळें, क्षणभर बाहेरची मोकळी व गार हवा घेत उभे राहिले. नंतर लॉर्ड क्रिसोलरास शहराकडे अभिमानपूर्वक अवलोकन करीत, उत्तेजित स्वरानें म्हणाले—"खरोखर प्रधान साहेब कोणीही, हौसेनें जिवावर उदार होऊन संरक्षण करण्यासारखें हें कॉन्स्टांटिनोपल शहर आहे! पण मला वाटतें, ह्या शहरांतील हजारों लोकांपैकीं फारच थोड्यांची अशी कल्पना असेल किंवा थोडेच लोक ह्या शहराच्या बचावा करितां जिवावर उदार होतील!"

लॉर्ड फ्रांझा खिन्न स्वरानें म्हणाले—"होय मॅन्युअल; तुमचा आजमास फारसा चुकणार नाहीं, हें मोठ्या दिलगिरीनें कबूल करणें भाग आहे!" ठीक आहे, मित्र हो, आतां आपण येथूनच परस्परांचा निरोप घेऊं या. सर एडवर्ड, तुम्हांला राजवाड्यांत जावयाचें असेल ना?"

मॅन्युअल क्रिसोलरास विनीत स्वरानें म्हणाले—"प्रधानसाहेब, आपली कांहीं हरकत नसेल तर, मीही आपल्याबरोबर वाड्यापर्यंत येतों! धर्माधिकारी इसिडोर यांचें पहिलें व्याख्यान उद्यांच होणार आहे का?"

लॉर्ड फ्रांझा—"हो! तुमचा त्यांचा कांहीं विशेष निकट स्नेहसंबंध असण्याचा संभव नाहीं, तथापि सध्यांच्या प्रसंगीं सर्वांनींच शक्य तितकी त्यांची मैत्री संपादन केली पाहिजे! सेनापती साहेब, ते आपले स्नेही आहेत म्हणून, माझ्या स्पष्ट बोलण्याचा राग मानूं नका, पण मला प्रामाणिकपणानें असें वाटतें कीं, ह्या वेळीं त्यांनीं आपलीं विलक्षण मतें येथील लोकांवर जबरीनें लादण्याचा प्रयत्न करणें ह्या प्रसंगीं अन्यायाचें

व गैर मुत्सद्दीपणाचें होईल ! ”

सर एडवर्ड—“ मग ह्यांत मला राग येण्याचें कांहींच कारण नाहीं! कारण, माझेंही मत अगदीं आपल्या मतासारखेंच आहे ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ पण त्यांनीं जर तसा प्रयत्न केला, तर पुढें आपण काय करावयाचें व कसें वागावयाचें, हाच काय तो अद्भुत बिकट प्रश्न आहे ! बाहेरची मदत मिळाल्यावांचून आपला निभाव लागावयाचा नाहीं, हें तर उघडच आहे. ”

मॅन्युअल—“ पण त्यांच्या मार्फत तरी मदत मिळेल अशी खात्री आहे कां ? ”

लॉर्ड फ्रांझा—“ खात्री कशाची? बराच संभव आहे इतकेंच ! पण माझें तर मत असें आहे कीं, ते म्हणतील त्या गोष्टीला मुकाट्यानें मान वांकवून त्यांची मदत घेण्यापेक्षां, स्वतःच्या हिंमतीवर राजधानीचें संरक्षण करणेंच बरें, मग त्यांत मरण आलें तरी बेहत्तर ! ”

मॅन्युअल—“ माझें मत असें आहे कीं, सर्वांच्या एकमतानें जसें ठरेल तसें करावें. पण हें काय? ऐका ! कोणी तरी मोठमोठ्यानें बोलत आहे ! ”

सर एडवर्ड—( लक्षपूर्वक ऐकून ) “ होय होय ! सेंट ऐरनीच्या मंदिराजवळ कोणाचें तरी व्याख्यान चाललें असावेंसें वाटतें ! चला, आपण तिकडूनच जाऊं या ! ”

तिघेही त्या मंदिराजवळ आले. ह्या वेळीं रात्र बरीच झालेली होती, तथापि मंदिराच्या पश्चिमेकडील पटांगणांत लोकांचा बराच मोठा जमाव जमलेला होता, आणि एक धर्मोपदेशक मंदिराच्या उंच पायऱ्यांवर उभा राहून, लोकांना समेटाविरुद्ध जोराजोरानें उपदेश करीत होता, असें त्यांच्या दृष्टीस पडलें.

तो उपदेशक उत्तेजित स्वरानें सांगत होता—“ बांधव हो, ईश्वरावर, स्वतःच्या विजयी समशेरीवर आणि राजधानीच्या संरक्षक परमपूज्य ग्रामदेवतांवर पूर्ण भरंवसा ठेवा ! आपली वडिलार्जित वहिवाट सोडूं नका, आपलीं धर्ममतें पायाखालीं तुडवूं नका, आणि आपलीं पवित्र मंदिरें परकीयांच्या संसर्गानें विटाळूं देऊं नका ! “ जो परक्यावरी

विश्वासला, त्याचा कार्यभाग नासला" हें तत्व विसरूं नका! पोप निकोलस याच्या मृदु भाषणाला किंवा त्याच्याकडून आलेला धर्माधिकारी इसिडोर याच्या गुळचट थापांना भुलून, आपली प्राचीन परंपरा मिघडूं देऊं नका! सुलतान महमदानें कितीही जय्यत तयारी केली असली, तरी परमेश्वर त्याच्यापासून आपलें संरक्षण खचित करील, हा पूर्ण भरंवसा ठेवा! त्याच्यावरच तुमच्या संरक्षणाचा भार घाला! तो दीनदयाळ, अनाथांचा नाथ असल्यामुळें, ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं आपली उपेक्षा कधींही करणार नाहीं, ही खात्री असूं द्या! तुर्क लोक कान्स्टां-टिनोपल शहराला वेढा घालतील, आपल्या सर्व घातक शस्त्रास्त्रांचा मारा शहराच्या तटावर करतील, कदाचित् तटाला खिंडारें पाडतील, किंब-हुना शहरांतही प्रवेश करतील; कारण, ह्या शहराच्या रस्त्यावर मुसल-मानांच्या रथचक्रांचा खडखडाट, शस्त्रास्त्रांचा खणखणाट, घोड्यांच्या टापांचा थडथडाट व तुर्क सैनिकांचा गडगडाट, अल्पकाळ लोकांच्या कानाळ्या बसतील, असें पूर्वीच भविष्य प्रसिद्ध झालें आहे, इतकेंच काय, पण हे मुसलमान लोक कॉन्स्टंटाइन बादशहाचा राजवाडा देखील सर कर-तील, पण त्यांच्या विजयाची मजल तेथेंच थांबेल! त्यापुढें एक पाऊलही त्यांच्यानें टाकवणार नाहीं! कारण, त्याच वेळीं स्वर्गांतील एक देवदूत प्रगट होईल आणि तो आपल्या हातांतील नंगी समशेर एका गरीब ईश्वरभक्ताच्या हातीं देऊन, त्याला येथील धार्मिक लोकांचें संरक्षण करण्याची आज्ञा करील. ती दैवी समशेर चमकूं लागतांच तुर्क लोक घाबरून पळूं लागतील, आणि आमचे देवभक्त धर्मनिष्ठ बांधव त्यांचा पाठलाग करीत त्यांना शहराच्या बाहेर हाकून देतील! बासपर-सच्या सामुद्रधुनीच्या पलीकडे तुर्क लोक पळून जाईपर्यंत आपल्याला एक-सारखा विजयच मिळत जाईल! इतकेंच नव्हे, पण सर्व अनाटोलिया देश रोमन बादशहाच्या चरणीं लीन होईल!"

इतकें बोलून उपदेशक दम घेण्याकरितां क्षणभर थांबला, तेव्हां लॉर्ड फ्रांझा आपल्या दोघां मित्रांस हळूच म्हणाले—"आतां मात्र हें प्रकरण मर्यादेबाहेर चाललें! हें असेंच चालूं दिलें तर आपलें सर्व कारस्थान निष्फळ होईल! आतां उपेक्षा करण्याची सोय नाहीं!"

नंतर लॉर्ड फ्रांझा पुढें होऊन गंभीर स्वरानें मोठ्यानें म्हणाले—"मित्र हो, ऐका ! अशा अपरार्थी एखाद्या बेजबाबदार माणसाची अप्रयोजक बडबड ऐकून घेऊन आपलीं डोकीं तापवून घेणें शहाणपणाचें नव्हे. त्यापेक्षां, ह्या गोष्टी ज्यांना अधिक समजतात, ज्यांनीं ह्याबद्दल पूर्ण विचार केला आहे, आणि ज्यांच्या शिरावर जबाबदारी आहे, त्यांच्याकडेच ह्या बिकट प्रश्नाचा निकाल सोंपविणें, व ते सांगतील तो निर्णयच आपल्याला श्रेयस्कर समजून मान्य करणें, हेंच न्यायाचें व हिताचें आहे ! उद्यांच्या सभेंत ह्या सनेटाच्या गोष्टीचा पूर्ण विचार होणारच आहे, त्यांत ही गोष्ट सर्वानुमतें अयोग्य किंवा अव्यवहार्य ठरली तर—"

"बहिष्कार ! बहिष्कार !" उपदेशक मध्येंच ओरडला—"लॉर्ड फ्रांझा प्रधानजी, तुम्ही जर आमच्या धार्मिक अधिकाराचा असा उपमर्द कराल तर, तुमच्यावर आणि तुमच्या मंत्रिमंडळावरही बहिष्कार घालण्यास आम्ही कमी करणार नाहीं ! धर्मबांधवहो, ह्याच लोकांनीं आपणावर आज हा असा बिकट प्रसंग आणिला आहे ! परमेश्वराचा आपणांवर कोप होण्यास हें धर्मभ्रष्ट मंत्रीमंडळच कारण झालें आहे ! हेच लोक परकीयांना सामील होऊन आपले अधिकार गमावीत आहेत !"

"परकीयांवर पूर्ण बहिष्कार घाला !" श्रोतृसमाज एकस्वरानें ओरडला.

मॅन्युअल क्रिसोलरास लॉर्ड फ्रांझाचा हात धरून नम्र स्वरानें म्हणाले—"प्रधानसाहेब, ह्या वेळीं ह्या मूर्ख लोकांना बुद्धिवाद करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे आपल्या तोंडाची वाफ दवडण्यासारखेंच निष्फळ आहे ! ह्या वेळीं हा धर्मोपदेशक जेनाडिस हाच ह्या खुळ्या लोकांना ईश्वर वाटलो आहे ! ते ह्या वेळीं इतके त्याच्या नादीं लागले आहेत कीं, त्यानें जर ह्यांना राजवाड्याला आग लावावयास सांगितलें तर, हे अविचारी लोक एका क्षणांत राजवाड्याची देखील राखरांगोळी उडवून टाकतील !"

लॉर्ड फ्रांझा मागें सरून खिन्न स्वरानें उद्गारले—"होय मॅन्युअल, तुम्ही म्हणतां तें कांहीं खोटें नाहीं ! हा लोकांचा दोष नव्हे, कारण, त्यांची पात्रताच तितकी आहे ! पण असले विघातक उपदेश ताबडतोब

बंद करण्याची आपल्याला कांहीं तरी तजवीज करणें भाग आहे. ह्या अडाणी लोकांचा ज्यांच्यावर अंधविश्वास आहे, असे ह्या उपदेशकासारखे लोक म्हणजे भयंकर प्राणघातक. असेच होत ! असो, आज हा एक प्रसंग प्रत्यक्ष पहावयास सांपडला हें बरें झालें. चला आतां येथून जाऊं या ! ”

तिघेही त्या गर्दीतून मोठ्या खटपटीनें वाट काढीत मंदिराच्या आवारांतून बाहेर पडले, व राजवाड्याकडे निघाले.

कांहीं वेळ मुकाट्यानें वाट चालल्यावर, सर एडवर्ड लॉर्ड फ्रांझाकडे वळून म्हणाले--“ प्रधानसाहेब, जर कदाचित् राजधानीला तुर्कांचा वेढा पडलाच, तर आपल्या खचित उपयोगीं पडतील असे रोमन सैनिक वीर शहरांत किती निघतील, हें शक्य तितकें नक्की सांगतां येईल कां ? ”

लॉर्ड फ्रांझा साशंक दृष्टीनेंआसपास अवलोकन करून हळूच म्हणाले “मी नक्की अजमास सांगितला तर तो तुम्हीं दोघे फोडणार नाहीं ना ?”

“ छे छे, त्याबद्दल मुळींच काळजी नको ! ” मॅन्युअल व सर एडवर्ड दोघेही एकदमच उद्गारले–“ ही गोष्ट आमच्या तोंडून केव्हांही बाहेर पडणार नाहीं, हें आम्ही आपल्याला शपथपूर्वक सांगतों ! ”

लॉर्ड फ्रांझा खिन्न स्वरानें म्हणाले–“ काय सांगूं, मित्रहो, मीं ह्या गोष्टीची पूर्ण चौकशी केली आहे; त्यावरून जो नक्की आंकडा मला कळून आला आहे, तो जर तुमच्या कानावर आला तर, राजधानीच्या बचावाच्या बाबतींत तुमची पूर्ण निराशाच होईल, अशी मला भीति वाटते ! ”

सेनापति सर एडवर्ड–“ काय असेल तें स्पष्ट सांगावें, तें कितीही निराशाजनक असो ! ”

लॉर्ड फ्रांझा–“ सर्व लष्कर मिळून फक्त चार हजार नऊशें सत्तर सैनिकांची काय ती भरती आहे ! ”

मॅन्युअल–“ हंः अगदींच अशक्य ! माझा तर अजमास असा आहे कीं, निदान ह्याच्या दसपट तरी संख्या सहज भरेल ! ”

लॉर्ड फ्रांझा हंसून म्हणाले, “ मॅन्युअल तुमचा अंदाज खरा ठरता तर

आम्हांला आनंदच झाला असता, पण दुर्दैवानें तुमचें अनुमान सपशेल चुकलें आहे; माझी माहिती निश्चित आहे ! "

सर एडवर्ड अडखळत म्हणाले—" बादशहांना ही गोष्ट विदित आहे का ? "

लॉर्ड फ्रांझा—" होय, त्यांनाही मींच ती कळविली ! "

सर एडवर्ड—" मग ? त्यावर ते काय म्हणाले ? "

लॉर्ड फ्रांझा—" त्यावर सरकार नेहमींप्रमाणें आपल्या गंभीर वाणीनें म्हणाले—" हे लोक जर नामर्द असतील, तर चार हजार काय आणि चाळीस हजार काय सारखेच ! कितीही असले तरी, त्यांचा आपल्याला कांहींच उपयोग नाहीं ! पण जर ते शूर व अभिमानी असतील तर, शहराच्या बचावाला चार हजार वीर कांहीं थोडे नाहींत !

मॅन्युअल—" पण सरकारच्या सभोंवतालच्या मंडळींचें काय मत आहे ? त्यांना हा आंकडा कळला आहे का ? "

लॉर्ड फ्रांझा—" छे छे, त्यांना ही गोष्ट मुळींच माहीत नाहीं, आणि शहराला प्रत्यक्ष वेडा पडेपर्यंत कळूं देणेंही इष्ट नाहीं ! नाहीं तर ते अगोदरच हात पाय गाळून मुकाट्यानें शत्रूच्या स्वाधीन व्हावयास तयार होतील ! परकीयांशीं आपला जर समेट झाला, तर बाहेरून बरीच मदत मिळण्याची अद्यापि आशा आहे. शिवाय, हा समेट होवो किंवा न होवो जिनोवाहून तरी आपल्याला शक्य तितकी कुमक होईल, अशी माझी बहुतेक खात्री आहे. "

सर एडवर्ड—" हो ! जिनावाच्या श्रीमान् व्यापाऱ्यांचें भांडवल येथें बरेंच गुंतलेलें आहे; शिवाय, गलाटा शहरांत तर बहुतेक त्याच लोकांची वस्ती आहे. अर्थात् आपल्या लोकांचें व संपत्तीचें संरक्षण करण्याकरितां तरी त्यांना मदतीला येणें भागच आहे; आणि ते लोकही चांगले शूर लढवय्ये आहेत ! "

तिघेही ह्याप्रमाणें बोलत राजवाड्याच्या दरवाजाजवळ येऊन पोंचले. दरवाज्यावर हुजुरातीच्या चार शिपायांचा सशस्त्र खडा पहारा होता. शिवाय देवडीवर आणखी पुष्कळ शिपाई हजर होते. दरवाज्याच्या दोहों बाजूस दोन मशाली जळत होत्या. वरील तिघे अधिकारी दर-

दाराजवळ येतांच, पाहऱ्यावर असलेल्या शिपायांनीं त्यांना सलामी दिली.

लॉर्ड फ्रांझा मॅन्युअलचा हात धरून म्हणाले—" ठीक आहे मॅन्युअल, तुम्ही आतां परत जा, उद्यां सकाळीं गांठ पडेलच ! "

मॅन्युअल लॉर्ड फ्रांझाचा निरोप घेऊन परत गेला. सर एडवर्ड पाहरेवाल्याकडे वळून म्हणाले—" कसें काय ? पहाऱ्यावर कांहीं कम-जास्त नाहींना ? "

नाईक—" कांहीं नाहीं साहेब, सर्व ठीक आहे !"

सर एडवर्ड—" कोण, रिचर्ड बर्स्टो ? तूं आहेस का पाहऱ्यावर ? ठीक आहे. दुसऱ्या कोणाला तरी तुझा चार्ज दे आणि माझ्याबरोबर चल. तुझ्याकडे थोडें काम आहे. "

नंतर ते लॉर्ड फ्रांझाकडे वळून म्हणाले—" बरें तर प्रधान साहेब, मी आपली आतां रजा घेतों. आपल्या आज्ञेप्रमाणें उद्यां दोन प्रहरीं आपल्या दर्शनास येईनच ! "

दरवाजांतून आंत गेल्यावर लॉर्ड फ्रांझा आपल्या बंगल्याकडे वळले व सर एडवर्ड आपल्या बिऱ्हाडाकडे निघाले. उभयतांचेंही वास्तव्य किल्ल्याच्या कोटाच्या आवारांतच असे. आपल्या खोलीजवळ गेल्यावर सर एडवर्डनीं आपल्या जवळच्या किल्लीनें कुलूप काढून दार उघडलें. कारण, आपल्या नोकरांनीं आपली वाट पहात जागत बसूं नये, अशी त्यांची सर्वांना नेहमीं ताकीद असे, आपल्या डामडौलाकरितां दुसऱ्याला त्रास देणें त्यांना मुळींच आवडत नसे.

सेनापति सर एडवर्ड यांचा बैठकीचा दिवाणखाना चांगला प्रशस्त असून तेथें जमिनीवर उत्तम गालिचा पसरलेला होता. भिंतींना साधाच पण स्वच्छ रंग दिलेला असून, ठिकठिकाणीं अनेक प्रकारचीं शस्त्रास्त्रें व चिलखतें व्यवस्थेनें लावून ठेवलेलीं होतीं. मध्यभागीं एक प्रशस्त मेज असून त्यावर एक चकचकीत दिवा तेवत होता. मेजासभोंवतीं कांहीं खुर्च्या व बाजूला चार कोचें होतीं, एका भिंतीशीं दोन मोठमोठीं कपाटें असून एकांत पुस्तकें व दुसऱ्यांत कपडे वगैरे सामान भरलेलें होतें. मेजासमोर भिंतीला एक मोठा आरसा, व मागील बाजूस रामन बादशहांची भव्य तसबीर टांगलेली होती. ह्याशिवाय तेथें चैनीचें

किंवा ऐषआरामाचें असें कांहींच चिन्ह नव्हतें. सर एडवर्ड हे अद्यापि अविवाहित असून लष्करी अधिकारी होते व त्यांना साध्या राहणीची फार आवड असे, त्यामुळें चैन किंवा ऐषआराम यांजकडे त्यांचें मुळींच लक्ष नसे.

सेनापति दिवाणखान्यांत येऊन मेजाशीं एका खुर्चीवर विचार करीत बसले. थोड्याच वेळानें त्यांच्या सूचनेप्रमाणें रिचर्ड वस्टों तेथें आला व नम्रपणें प्रणाम करून आदबीनें उभा राहिला. त्याच्या उंच सुदृढ व पीळदार बांध्यावरून, तो इंग्रज रक्ताचा असल्याचें उघड दिसत होतें. तथापि त्याचा फिकट वर्ण, काळे भोर केंस, घारे डोळे चंचल दृष्टि व तरतरीत नाक इत्यादि चिन्हें त्याच्या आईच्या स्वरूपांतून त्याच्या ठिकाणीं उतरलेलीं होतीं. तो शांत असे तेव्हां त्यांची मुद्रा इंग्रज गृहस्थाप्रमाणें गंभीर व निर्विकार दिसे, परंतु त्याच्या अंतःकरणांत हर्षाची, क्रोधाची किंवा खेदाची भावना उद्भूत झाली म्हणजे मात्र त्याच्या चेहऱ्यावर त्याच्या मनोविकाराची विलक्षण छटा दृग्गोचर होई.

सर एडवर्ड हे जरी मोठे अधिकारी होते, तरी ते आपल्या हाताखालच्या लोकांशीं सभ्यतेनें व ममतेनें वागत. रिचर्ड आंत येतांच ते त्याला मृदु स्वरानें म्हणाले—" रिचर्ड, मी तुला ज्या कामाकरितां आतां मुद्दाम बोलावलें, तें काम अत्यंत महत्त्वाचें, विश्वासाचें व जबाबदारीचें आहे ! तें तुझ्या हातून जर बरोबर पार पडलें तर तुझें जन्माचें कल्याण होईल. पण जर फसलें तर—तर—"

" तर काय साहेब ? " रिचर्ड स्मितपूर्वक म्हणाला—" मी प्राणास मुकेन, एवढेंच ना ? "

सर एडवर्ड- " हो ! पण जिवाच्या भीतीनें तूं मागें सरणारा नामर्द मनुष्य नाहींस, अशी माझी खात्री आहे ! "

रिचर्ड- " त्याबद्दल शंकाच नको ! कसलेंही जिवावरचें काम असलें तरी, तें जर तितक्या योग्यतेचें असेल तर मी कधींच मागें सरणार नाहीं ! सांगा काय तें ? "

सर एडवर्ड—" काम एवढेंच आहे कीं, ॲड्रियानोपल येथें सुलतान महमद हल्लीं काय करीत आहे, याची नक्की माहिती आपल्या सरका-

रांना पाहिजे आहे. त्यांचा आपल्या हुजुरातीच्या सैन्याइतका दुसऱ्या कोणावरही भरंवसा नाहीं, म्हणून त्यांनीं लायक मनुष्याची निवड करण्याचें काम मजकडे सोंपविलें आहे. आणि आमच्या हुजुरातीच्या मंडळीमध्यें तुझ्याइतका विश्वासू व लायक मनुष्य मला दुसरा कोणी दिसत नाहीं. म्हणून तुलाच मीं मुद्दाम बोलावलें. तेव्हां जिवावर उदार होऊन ही अत्यंत महत्त्वाची जबाबदारीची व विश्वासाची कामगिरी पतकरण्याची तुझी तयारी आहे का ? ”

रिचर्ड उल्हसित स्वरानें म्हणाला—“ होहो, साहेब, आपली आज्ञा होत असेल तर, माझी आतां तयारी आहे, आणि हें काम माझ्या हातून यशस्वी रीतीनें पार पडावें, अशी मी ईश्वराची प्रार्थना करितों ! ”

सर एडवर्ड—“ ठीक आहे ! तुला त्यांत विशेषतः एक अशी सोय आहे कीं, तुझें स्वरूप तुर्की वेषाला बरोबर साजेसें आहे ! त्याचप्रमाणें तुला त्यांची भाषाही आपल्या भाषेसारखीं, किंबहुना कांकणभर जास्तच सफाईनें बोलतां येते ! शिवाय सुलतानाच्याच काय, पण सैतानाच्याही डोळ्यांत धूळ टाकण्याइतकी अक्कलहुशारीही तुझ्या अंगीं आहे ! ”

रिचर्ड हंसून म्हणाला—“ पण इतकी अक्कल खर्च करण्यासारखा प्रसंगच फार करून येणार नाहीं, अशी मला उमेद आहे ! असो. प्रसंगाप्रमाणें काय घडेल तें घडेल ! मग, निघण्याची तयारी केव्हां करावयाची, त्याविषयीं आज्ञा व्हावी ! ”

सर एडवर्ड—“ छे छे, हें काम माझ्या अधिकारांतलें नाहीं. तें ठरविण्याचा अधिकार सरकारचा व प्रधानसाहेबांचा आहे. ते अगोदर उद्यां तुझी समक्ष भेट घेणार आहेत. उद्यां दुपारीं दोन वाजतां तुला आपल्याकडे घेऊन येण्यास त्यांनीं मला सांगितलें आहे. त्याप्रमाणें उद्यां दोन प्रहरीं आपण उभयतां त्यांच्या भेटीस जाऊं, मग काय तें ठरेल. ”

रिचर्ड—“ ठीक आहे, साहेब, आपल्या हुकमाप्रमाणें मी उद्यां दुपारीं दोन वाजण्याच्या आंत आपल्या जवळ हजर होतों ! ”

“ फार उत्तम आहे जा तर आतां ! ” असें म्हणून सेनापतीनीं रिचर्ड नाइकास निरोप दिला, तेव्हां तो प्रणाम करून निघून गेला. सर एडवर्डही थोड्या वेळानें विचार करीत बिछान्यावर पडले.

## प्रकरण २ रें.

# वाग्निश्चय.



वाचकहो, आतां आपण क्षणभर शहरांतील थाटमाट, गडबड व धांदल सोडून देऊन, दुसऱ्या एका साध्या, गरीब, पण विशेष रमणीय स्थानाकडे वळूं. सिलिव्हरी नांवाच्या गांवाच्या पूर्वेस सुमारें अर्ध्या मैला-वर मार्मोराच्या समुद्राकडे उतार असलेल्या एका मैदानांत एक प्राचीन जीर्ण वाडा होता. अद्यापिही त्याचे थोडे अवशेष त्या ठिकाणीं दृष्टीस पडतील. हा वाडा कॉन्स्टांटिनोपलच्या एका श्रीमान् सरदाराचें उन्हाळ्यांत राहण्याचें स्थान होतें. परंतु अलीकडे त्या सरदार घराण्याचा निर्वंश झाल्यामुळें, तो वाडा एका सामान्य मनुष्याच्या ताब्यांत आला होता. त्या वाड्याचा सध्यांचा मालक निसिटस कॉनिएट नांवाचा एक वृद्ध गृहस्थ असून, तो आपल्याला सिलीव्हरीचा कोतवाल म्हणवीत असे. हल्लीं मोठमोठ्या शहरांत जसे मेयर किंवा शेरीफ असतात, तशाच प्रका-रचा तो रोमन साम्राज्यांतील एक अधिकारी होता, असें म्हटलें तरी चालेल.

सकाळच्या वेळीं आकाश निरभ्र व हवा स्वच्छ असल्यामुळें, आल्हा-दकारक सूर्यप्रकाशांत बागेंतील सुवासिक फुलांच्या ताटव्यांवरून भुंगे व मधमाशा मंजुळ गुंजारव करीत आनंदानें उडत होत्या. ह्या वेळच्या आल्हादकारक हवेचा उपभोग घेण्याची उत्कंठा उत्पन्न झाल्यामुळें, दोघी स्त्रिया बागेंतील एका शीतल कुंजांत येऊन बसल्या. तेथील सृष्टिसौंदर्य खरोखरच त्यांचें मन वेधण्यासारखें होतें. त्या स्त्रिया मार्मोराच्या समुद्राची शोभा सहज अवलोकन करीत होत्या. समुद्राच्या शांत पृष्ठभागावर कोठें तरी एखाद्या गलबताचें पांढरें शुभ्र शीड केव्हां केव्हां चमकत होतें; सामुद्रधुनीच्या पैल तीरावरील बिथीनियाचे डोंगर नील मेघांप्रमाणें अस्पष्ट दिसत होते; आणि युरोपाच्या बाजूच्या किनाऱ्यावरील उद्योगी व मेहेनती कोळी लोक आपापल्या मच्छीमार बोटी हाकारण्याच्या

धांदलींत गुंतले होते, आणि कित्येकजण रात्रीच्या वादळानें नादुरस्त झालेल्या बोटी दुरुस्त करण्यांत गुंतले होते.

उद्यानकुंजांत बसलेल्या दोघी स्त्रियांपैकीं एक सतरा आठरा वर्षांची तरुण कुमारिका होती, आणि दुसरी पस्तीस छत्तीस वर्षांची पोक्त स्त्री होती. त्या दोघींच्या स्वरूपसादृश्यावरून, त्या मायलेकी असल्याचें सहज दिसून येत होतें. पोक्तबाईचे बहुतेक दिवस सिलोन्हरीच्या साध्या राहणींत गेले असल्यामुळें, तिचा पोषाखही अगदीं साधा होता. ती एका लहानशा रहाटावर सूत कातीत बसली होती. तिच्या रहाटाची बारीक घरघर आसपासच्या भ्रमर गुंजारवांत मिसळून जात होती. तिच्या जवळ बसलेली तिची तरुण कन्या एका रेशमी रुमालावर कशीदा काढीत होती. त्या रुमालाचा बागेंतील छोटया मंदिराच्या दारावर पडदा करण्याचा तिचा उद्देश होता. तिच्या अंगावरील पोषाख जुनाच पण रेशमी कापडाचा व सभ्य तऱ्हेचा असून, त्याला खालच्या बाजूस गुलाबी झालर लावलेली होती. ती आपल्या कशीद्याच्या कामांत अगदीं गढून गेली असल्यामुळें, तिचा चेहरा त्या रुमालाकडे खालीं वळलेला होता. तथापि ती मध्यें‌च केव्हां तरी वर मान करून बागेकडे, समुद्राकडे किंवा आपल्या आईकडे पाही, त्या वेळीं मात्र तिचें सुंदर स्वरूप स्पष्टपणें दृग्गोचर होई. तिच्या कृष्णवर्ण व तेजस्वी केशकलापानें व पाणीदार दृष्टीनें तिच्या लावण्यांत विशेषच भर पडली होती. तिचा विशाल भालप्रदेश, सरळ व बारीक नासिका, बिंब फलाप्रमाणें लाल ओंठ आणि वर्तुलाकार हनुवटी यांतच तिच्या बारीक दंतपंक्तीचें मौक्तिकसमान तेज व कोमल कपोलावरील गुलाबी छटा यांची भर पडल्यामुळं तिचें सौंदर्य अप्रतिम खुलत होतें.

ह्या वेळीं ह्या लावण्यवती तरुण कुमारिकेची मुद्रा किंचित् सचिंत व खिन्न दिसत होती. गृहसौख्याच्या दृष्टीनें तिला कोणत्याहीं प्रकारची काळजी असण्याचें कारण नव्हतें. कारण, तिचे आईबाप अद्यापि हयात असून त्यांचें तिच्यावर निःसीम प्रेम होतें. त्यांना ह्या एका मुलीवांचून दुसरें कांहीं अपत्यच नव्हतें. घरची स्थितिही सुखासमाधानाची व मान्यतेची होती. ह्याप्रमाणें सर्व बाजूंनीं जरी सुस्थिति होती, तथापि सध्यांचा

काळच असा आलेला होता कीं, अस्तोन्मुख झालेल्या रोमन साम्राज्यांतील आबालवृद्धस्त्रीपुरुषांचीं अंतःकरणें त्याच्या योगानें रात्रंदिवस चिंताकुल असत. कांहीं तरी विशेष महत्त्वाची राज्यांत उलटापालट लवकरच होणार, असें प्रत्येकाच्या मनाला वाटूं लागलें होतें. ह्या जुन्या व मोडकळीस आलेल्या रोमन साम्राज्यावर कांहीं तरी भयंकर आपत्ति कोसळणार, ह्या काळजीनें सर्वांचीं अंतःकरणें खिन्न व उदास झालेलीं होतीं. आपलीं पवित्र मंदिरें तुर्क लोक भ्रष्ट करणार, आपलीं वडिलार्जित घरें आणि इतक्या मेहेनतीनें तयार केलेलीं, उपवनें मुसलमानांच्या ताब्यांत जाणार, आणि शेवटीं ग्रीक व रोमन लोकांना तुर्कांचे गुलाम व्हावें लागणार, ही कल्पना देखील त्या स्वाभिमानी लोकांना असह्य होऊं लागली होती. वर सांगितलेल्या कुमारिकेच्या अंतःकरणांतही ह्या वेळीं कोणते विचार चालले होते, हें तिच्या आईशीं झालेल्या पुढील संभाषणावरून आपणांस स्पष्टपणें कळणार आहे.

त्या मायलेकी आपलें काम करीत असतां मधून मधून एकमेकींशीं बोलत होत्या, बोलतां बोलतां ती कुमारिका उत्तेजित स्वरानें म्हणाली, " छे छे, आई, त्यांच्याविषयीं अशी भलतीच शंका तुझ्या मनांत तरी कशी येते ? ते खरोखरच फार प्रामाणिक व थोर गृहस्थ आहेत. तुला देखील त्यांचा अनुभव आहे. माझा तर त्यांच्यावर पूर्ण भरंवसा आहे. तथापि तुला कांहीं शंका असली तर, ते लवकरच येथें येणार आहेत, त्यांना समक्ष विचारून खुलासा करून घे. आपल्याशींच एकतर्फी कांहीं तरी कल्पना करून त्यांच्या संबंधानें गैरसमजूत करून घेणें रास्त आहे का ? "

पोक्त स्त्री कळकळीच्या स्वरानें म्हणाली—" बाळ, त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल किंवा योग्यतेबद्दल मला तरी कोठें शंका आहे ? तुम्हां उभयतांचें परस्परांवर शुद्ध प्रेम जडलें असलें तर, मी मोठ्या आनंदानें तुला त्यांच्या हवालीं करीन आणि तुझे वडीलही त्या गोष्टीला खुषीनें संमति देतील. त्यांना माझ्यापेक्षां पुरुषांच्या स्वाभावाची अधिक परीक्षा आहे. योग्य वेळ आली म्हणजे ह्या सर्व गोष्टी घडून येतीलच, तथापि त्यांची ही मागणी घालण्याची आणि वाग्निश्चयाची तऱ्हा मात्र मला

मुळींच पसंत नाहीं. तुझ्याशीं होणारा वाग्निश्चय त्यांनीं दरबारापासून इतका गुप्त काय म्हणून ठेवावा ? त्यांत इतकी चोरी कसली ? ह्या चोरट्या व्यवहाराबद्दलच मला काय ती शंका आहे ! आम्ही त्यांच्या तोलाचे नसल्यामुळें, बरोबरीची मंत्री मंडळी आपल्या ह्या हीन शरीर-संबंधाबद्दल आपल्याला हंसतील व आपली बेअब्रू होईल, अशी जर त्यांची कल्पना असेल तर, मी म्हणतें, पुनः आम्हांला त्यांचें दर्शन-सुद्धां न होईल तर बरें ! "

मुलगी—" छे छे, आई, असली हीन कल्पना त्यांच्या मनांत मुळींच येणें शक्य नाहीं, अशी माझी पक्की खात्री आहे. तसा कांहीं संशय मला आला असता, तर तुझ्यापेक्षां मलाच त्यांचा अधिक राग आला असता. मी त्यांच्या स्वरूपाला, संपत्तीला किंवा थोर पदवीला भुललें आहें असें मनांत देखील आणूं नको. आमचें घराणें त्यांच्यापेक्षां कमी दर्जाचें आहे अशी माझी कल्पनाच नाहीं. किंबहुना, आमच्या कुळाशीं शरीरसंबंध करण्यांत कोणालाही अभिमानच वाटेल, इतकें आमचें घराणें शुद्ध व उच्च आहे अशी माझी खात्री आहे. तथापि हा संबंध तूर्त गुप्त ठेवण्याची आवश्यकता असण्यास तशींच कांहीं तरी महत्वाचीं कारणें असलीं पाहिजेत; आणि तूं त्यांना विचारलेंस तर, ते तुला तीं स्पष्ट-पणें सांगतीलही ! "

आई—" बाळ युफ्रेशिया, विनाकारण कुशंका काढीत बसण्याची मला हौस का आहे ? पण तुझी आई ह्या नात्यानें मजवर जी जबाब-दारी आहे, ती मला योग्य रीतीनें पार पाडल्याशिवाय स्वस्थ कसें राह-वेल ? ते ह्या गोष्टीचा समाधानकारक खुलासा करतील, ह्यांत मुळींच संशय नाहीं; तथापि, बाळ, तूं ह्या सिसिलीच्या खेड्यांत लहानाची मोठी झालीस, तुझे आजपर्यंतचे सर्व दिवस येथील खेडवळ पण साध्या व प्रामाणिक तरुणांच्या सहवासांत गेले, तुला शहरगांवच्या दरबारी पुरुषांच्यासारखा थाटमाट व डावपेंच कसे साधतील ? मॅन्युअल क्रिसो-लरास यांच्यावर जितका तुझा भरंवसा आहे, तितकाच माझाही आहे, तथापि तरुण लोकांच्या चंचल स्वभावाचा तुला फारसा अनुभव नाहीं, तो मला पुराच आहे. हे लोक बाह्य सौंदर्यासारख्या गोष्टींनीं सकृद्दर्शनीं

भुलून हुरळून जातात, आणि अविचाराच्या भरांत भलतेंच कांहीं तरी करून, मग पस्तावतात, म्हणून म्हणतें कीं, एकदां हा वाङ्निश्चय प्रसिद्ध झाला, म्हणजे कटकट मिटली. ”

युफ्रेशिया मानेला किंचित् हेलकावा देऊन म्हणाली—“ ठीक आहे ! ते आतां आले म्हणजे तूं समक्षच ह्या गोष्टीचा निकाल करून घे, म्हणजे झालें. माझी कांहीं हरकत नाहीं. ते पहा ! ते पहा ! ”

युफ्रेशियानें कॉन्स्टांटिनोपलच्या दिशेला बोट करून दाखविलें. तिच्या आईनें पाहिलें तों एक घोडेस्वार टेकडी उतरून वेगानें सिलिव्हरीकडे येत असलेला तिच्या दृष्टीस पडला. राऊत अजून बराच दूर असल्यामुळें, त्याचें स्वरूप अद्यापि स्पष्ट ओळखतां येणें शक्य नव्हतें. तथापि त्याच्या घोड्याचें चकचकीत सामान व त्यावरील ठिकठिकाणीं बसविलेले चांदीचे बिल्ले सायंकालीन सूर्यकिरणांत चमकत होते, त्यांवरून व रोजच्या वेळेच्या अंदाजावरून, तो आपला प्रियकर मॅन्युअलच असल्याचें युफ्रेशियानें तत्काळ ओळखलें.

पांच मिनिटांच्या आंतच घोडा बागेच्या फाटकाशीं येऊन दाखल झाला, आणि मॅन्युअल क्रिसोलरास खालीं उतरून बागेंत आले. त्यांनीं रोजच्या संवयीप्रमाणें घोड्याचा लगाम शेजारच्या झाडास गुंतविला आणि ते चौकस व उत्सुक दृष्टीनें इकडे तिकडे पहात निघाले, तों मेरिया व युफ्रेशिया लताकुंजांत असल्याचें त्यांच्या दृष्टीस पडलें. ते झटकन कुंजाकडे आले. त्यांना पाहतांच दोघीही उठून उभ्या राहिल्या. मेरिया बाईनीं त्यांचें प्रेमपूर्वक स्वागत केलें. मॅन्युअलनीं मेरियाबाईंना प्रणाम केला, प्रेमभरानें युफ्रेशियाचा हात धरून, ते तिजकडे अतृप्त दृष्टीनें पाहूं लागले. त्यांचा वाङ्निश्चय विधिपूर्वक झाला असल्यामुळें, ती आतां त्यांची बहुतेक धर्मपत्नीच झाली होती, फक्त विवाहविधिच काय तो व्हावयाचा राहिला होता. प्रथमचे औपचारिक सामान्य कुशल प्रश्न झाल्यावर, मेरियाबाई आपला निश्चय अमलांत आणण्याचें ठरवून, कोमल स्वरानें म्हणाल्या—“ मॅन्युअलसाहेब, आपण आमच्याशीं मोकळ्या मनानें वागतां त्या अर्थी मीही आपल्याशीं मोकळेपणानेंच बोलण्याचें धैर्य करीत आहें ! आपण माझ्या मुलीला मागणी घातली

व ती आम्हींही आनंदानें मान्य केली. त्याप्रमाणें आपला वाग्निश्चयही झाला, पण असा गुप्तपणा आणि चोरटा व्यवहार कां? युफ्रोशियाची माता ह्या नात्यानें मला ह्या गोष्टीचा विचार करणें अवश्य आहे, हें आपल्यालाही मान्य असेलच! त्या अर्थी हा वाग्निश्चय ह्यापुढें गुपचुप राहूं नये, इतकेंच नव्हे, पण आजपर्यंत तरी ह्या बाबतींत इतकें रहस्य राखण्याचें काय प्रयोजन होतें, ह्याचा आपण खुलासा करावा अशी माझी इच्छा आहे."

मॅन्युअल नम्र स्वरानें म्हणाले—"मेरियाबाई, आपल्याला मला खुलासा विचारण्याचा पूर्ण अधिकार आहे व आवश्यकताही आहे ह्यांत मुळींच शंका नाहीं आणि आपण ही गोष्ट आज स्पष्टपणें विचारली नसती तरी मी ती आजना उद्यां आपल्याला सांगणारच होतों. लॉर्ड जॉर्ज फ्रांझा यांची आपल्याला माहिती आहेच! परराष्ट्रीय मंत्री या नात्यानें त्यांचा अधिकार व वजन आपल्याला विदितच असेल आणि मींही आजपर्यं संभाषणाच्या ओघांत त्यांच्या संबंधाच्या कित्येक गोष्टी आपल्याला सांगितल्या आहेत."

मेरियाबाई—"हो हो, आम्हांला त्यांची पुष्कळ माहिती आहे! आज आमच्या रोमन साम्राज्यांत राजकार्याची सर्व जबाबदारी त्यांच्यावरच आहे; आणि आमच्या परमपूज्य बादशहांचाहि त्यांच्यावर पूर्ण भरंवसा आहे!"

मॅन्युअल—"बरोबर! माझ्या परलोकवासी वडिलांचा व लॉर्ड फ्रांझा ह्यांचा अत्यंत स्नेह होता. ते उभयतां परस्परांशीं सख्या भावाप्रमाणें वागत असत. अर्थात् मजवरही लॉर्ड फ्रांझा यांचें लहानपणापासून पुत्रवत् प्रेम जडलें व तें अद्यापिही कायम आहे! माझा व लॉर्ड फ्रांझा यांची कन्या थियोडोरा यांचा एकमेकांशीं बाळपणापासून दीर्घ काळ सहवास झाला असल्यामुळें, आमचाही परस्परांशीं अकृत्रिम स्नेह जडला. माझे वडील हयात असतांना एकदां त्यांचें व लॉर्ड फ्रांझांचें असें बोलणें झालें होतें कीं, मी व थियोडोरा सज्ञान झाल्यावर जर आमचें परस्परांवर प्रेम जडलें तर आमचा उभयतांचा परस्परांशीं विवाह व्हावा. परंतु आम्हां दोघांपैकीं एकाच्याही अंतःकरणांत आजपर्यंत परस्परांविषयीं खऱ्या प्रेमाचा उदय झाला नाहीं. किंबहुना, आपल्या युफ्रोशियाची भेट होईपर्यंत खऱ्या प्रेमाची कल्पनाही माझ्या हृदयास कधीं शिवली नव्हती.

त्याप्रमाणें थियोडोराचें प्रेमही अन्यत्र गुंतलेलें असावें असेंही मला वाटतें."

मेरियाबाई—"पण ह्या सगळ्या भाकडकथेचा माझ्या प्रश्नाशीं काय संबंध आहे, हें मला कांहीं कळत नाहीं !"

मॅन्युअल—"तेंच आतां सांगतों ! लॉर्ड फ्रांझा हे गेलीं दोन वर्षें बादशहांच्या महत्वाच्या कामगिरीवर बाहेर देशीं गेले होते, आणि ते नुकतेच परत आले आहेत. हें आपल्याला माहितच आहे; ते प्रवासांत असतांना त्यांना इकडील हकीगत पत्रानें कळवितां येणें शक्य नव्हतें. कारण, पत्रें त्यांना पोंचतील कीं नाहीं, ह्याविषयीं खात्री नव्हती. आणि माझी तर अशी इच्छा होती कीं, माझ्या ह्या वाग्निश्चयाचें वर्तमान त्यांना प्रथम माझ्या तोंडूनच कळावें. कारण, माझ्या वडिलांचा स्नेहसंबंध लक्षांत आणून, त्यांनीं मला आपली मुलगी देण्याचा निश्चय केला होता, आणि तसें मला पर्यायानें अनेक प्रसंगीं सुचविलेंही होतें. लॉर्ड फ्रांझा कालच परत आले, पण कामांच्या गर्दीमुळें अद्यापि त्यांची माझी एकांतीं गांठच पडली नाहीं. मी आतां परत गेल्यावर मुद्दाम त्यांना माझ्या वाग्निश्चयाचें सर्व वर्तमान सांगणार आहें. तत्काळ ती गोष्ट दरबारच्या मंडळींत प्रसिद्ध होईल, आणि मीं किती सन्मान्य कुळाशीं शरीरसंबंध जोडला आहे, हे सर्वांना कळून येईल !"

"होय का ?" मेरियाबाई संतोषानें स्मितपूर्वक उद्गारल्या—"आपल्या ह्या खुलाशानें माझें पूर्ण समाधान झालें, आणि युक्रेशियाच्या वडिलांचेंही तसेंच समाधान होईल अशी माझी खात्री आहे. पण आतां असेंच उपाशीं मात्र मी जाऊं देणार नाहीं ! भोजनास राहण्याइतकी सवड नसेल तर फराळाची तजवीज होईल आणि आपल्या घोड्यालाही तितका विसावा मिळेल !"

मॅन्युअल हंसून म्हणाले—"आपली ही प्रेमाची आज्ञा कशी मोडवेल ? पण मला फार वेळ थांबावयास सवड होणार नाहीं, याबद्दल दिलगिरी वाटते !"

"ठीक आहे, मी फराळाचीच तजवीज करतें, त्याला कांहीं विलंब नाहीं. असें म्हणून मेरियाबाई उठून घरांत गेल्या. तेव्हां मॅन्युअल युक्रेशियाकडे वळून म्हणाले—"जिवलगे, तुला देखील माझ्या वर्तन

शंका आली होती का ? "

" छे छे, " युफ्राशिया आपल्या प्रियकराकडे स्निग्ध दृष्टीनें अवलोकन करीत म्हणाली, " मला एक क्षणभर देखील अशी भलती शंका आली नाहीं ! तथापि हा खुलासा झाला हें उत्तम झालें ! आतां माझ्या प्रेमामुळें आपल्याला लॉर्ड फ्रांझा यांच्या जुन्या स्नेहास मुकावें लागेल कीं काय एवढीच मला काळजी वाटत आहे ! "

" छे छे, " मॅन्युअल निश्चित स्वरानें म्हणाले--" त्याविषयीं काळजी नको ! लॉर्ड फ्रांझा हे फार विचारी व न्यायी गृहस्थ आहेत. खऱ्या प्रेमावांचून नुसत्या भिडेनें विवाह करणें त्यांना कधींच पसंत पडणार नाहीं. त्यांचे हेतु निष्फळ झाल्यामुळें, त्यांना प्रथम थोडा खेद होईल हें खरें, तथापि माझ्या व थियोडोराच्या अंतःकरणांची खरी स्थिति त्यांना कळल्यावर, मीं केलें तेंच योग्य केलें अशी त्यांच्या मनाची खात्री होईल, आणि त्यांचें मजवरील प्रेम कायम राहील. इतकेंच नव्हे, पण ते तुजवर देखील आपल्या कन्येप्रमाणें ममता करूं लागतील ! असो, आतां आपण सांप्रतच्या आपल्या परिस्थितीचा विचार करूं. हें ठिकाण यापुढें तुला किंवा तुझ्या आईबापांना राहण्यास सुरक्षित दिसत नाहीं. तुर्क लोकांचा ह्या प्रांतांत धुमाकूळ चालला आहे, आणि ते प्रत्यक्ष कॉन्स्टांटिनोपलवरही केव्हां छापा घालतील, ह्याचा भरंवसा नाहीं ! तुझा माझा लवकरच विवाह झाला म्हणजे तूं तर कॉन्स्टांटिनोपल शहरांत माझ्या वाड्यांत येशीलच, पण तुझ्या आईबापांना ह्या बिनबंदोबस्ताच्या ठिकाणीं सोडून जाणें आपल्याला श्रेयस्कर नाहीं ! येथेंच काय पण सिलिव्हरी गांवांत देखील त्यांनीं राहणें सुरक्षित नाहीं ! माझें तर असें ठाम मत आहे कीं, ह्या अस्वस्थतेच्या काळांत त्यांनीं राजधानीच्या तटाबाहेर कोठेंही राहणें बिनधोक्याचें होणार नाहीं !"

" खरेंच का इतकी चिंताजनक वेळ आली आहे ? " युफ्राशिया एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाली—" बाबांना तर शहर गांवांत क्षणभर देखील चैन पडणार नाहीं ! त्यांचा बहुतेक काळ डोंगराळ मुलुखांत व मोकळ्या हवेंत गेला असल्यामुळें, त्यांना ती संवयच लागली आहे, आणि त्यांची प्रकृतिही तदनुकूलच बनली आहे. शहरांत जाऊन राहणें

म्हणजे त्यांना पिंजऱ्यांत पडल्यासारखें दुःख वाटेल तेव्हां ते आपली विनंति मान्य करतील कीं नाहीं कोण जाणे! ”

मॅन्युअल—“पण आड्रियानोपलच्या किल्ल्यांतील तुर्कांच्या कैदखान्यापेक्षां, आपल्या राजधानीचा पिंजरा बरा नव्हे का? बरें, तुझें स्वतःचें मत कसें काय आहे? तुलाही तसेंच वाटेल का?”

युफ्राशिया—“हें काय भलतेंच? मला तसें कसें वाटेल? आपण जेथें असाल, तेथेंच मला स्वर्गलोक वाटेल! पण माझ्या आणि बाबांच्या कल्पना सारख्याच कशा असूं शकतील! त्यांना......”

इतक्यांत युफ्राशियाचे वडील समोरून येतांना त्या उभयतांच्या दृष्टीस पडले, त्यामुळें त्यांचें संभाषण तितकेंच राहिलें. मिस्टर कॉनियॅटिस यांचें वय जरी पन्नास वर्षांचें झालें होतें, तथापि त्यांचें शरीर अद्यापि मजबूत दिसत होतें. त्यांचा चेहरा उत्साहपूर्ण व आनंदी असून, त्यांच्या अंगीं अजून तारुण्यांतील चपलता कायम होती. त्यांच्या अंगावर अगदीं जुन्या रोमन तऱ्हेचा पोशाख होता.

लताकुंजाजवळ येतांच, तेथें उभ्या असलेल्या प्रेमी दंपत्याच्या प्रणामांचा स्वीकार करून, कॉनियॅटिस हंसत म्हणाले—“काय? लॉर्ड क्रिसोलरास, वायफळ गप्पांमध्यें तुम्ही आपला व आमच्या युफ्राशियाचा आणखी किती काळ घालविणार आहां? आपल्याला परत राजधानीला जावयाचें आहे ना? दिवस मावळण्याची वेळ आली, हें आपल्या लक्षांत तरी आहे कां? बाकी मीही तरुण असतांना असाच बेशुद्ध वागत होतों म्हणा! वयपरत्वें ह्या गोष्टी व्हावयाच्याच! असो. चला, घरांत फराळाचीं पानें वाट पहात आहेत! थोडा फराळ करा आणि चालूं लागा!”

मॅन्युअलनीं स्मितपूर्वक त्यांना कांहीं तरी उत्तर दिलें. नंतर ते युफ्राशियाकडे वळून हळूच म्हणाले-“लाडके, तूं अंमळ पुढें हो, आणि मागोमाग मी आलोंच! मला त्यांच्याशीं कांहीं बोलावयाचें आहे!”

युफ्राशिया मुकाट्यानें पुढें निघून गेल्यावर, मॅन्युअल क्रिसोलरास कॉनियॅटिसकडे वळून गंभीर स्वरानें म्हणाले—“निसिटससाहेब, आपल्या कन्येशीं माझा विधिपूर्वक वाग्निश्चय झाल्याला चार महिने झाले. ईश्व-

राच्या व उपाध्यायांच्या समक्ष ती आतां माझी पत्नी झाली आहे. मग विवाहाला आतां विनाकारण विलंब कां लावावा ? किंबहुना तो विधि ह्या प्रसंगीं शक्य तितका लवकर उरकून घेणेंच अधिक श्रेयस्कर आहे ! आणि आपण उभयतांनीं देखील कांहीं दिवस हें स्थान सोडून, राजधानींत रहावयास आलें पाहिजे, अशी माझी आग्रहपूर्वक विनंति आहे ! ”

कॉनियॅटिस क्षणभर विचार करून म्हणाले—“ लॉर्ड मॅन्युअल, आपल्या दृष्टीनें आपलें म्हणणें सयुक्तिक ठरेल, यांत शंका नाहीं. किंबहुना विवाह लवकर उरकून घेण्याची आपली सूचना मलाही नाकारतां येणार नाहीं ! पण आम्हांला आमचें घरदार सोडून राजधानींत येऊन राहण्याची काय आवश्यकता आहे, हें मात्र माझ्या ध्यानांत अद्यापि नीटसें आलें नाहीं ! ”

मॅन्युअल—“ निसिटससाहेब, तुर्कांच्या दंग्यासंबंधीं कॉन्स्टांटिनोपल शहरांत किती भयप्रद बातम्या प्रसिद्ध झाल्या आहेत, ह्याची येथें आपल्याला कल्पनाही नाहीं ! तुर्क लोक यंदाच्या हिंवाळ्यांत राजधानीच्या आसपासच्या सर्व मुलखांत सारखा धमाकूळ चालविणार आणि उन्हाळ्यांत खुद्द राजधानीला दाह देणार, अशी तेथें निश्चित बातमी आहे ! तेव्हां तुर्कांची एखादी टोळी जर येथें तुमच्यावर आली, तर तुम्ही आपला बचाव कसा करूं शकणार ? सिलिव्हरी गांवांत जाऊन राहिलां, तरी देखील तुमचें संरक्षण होणें शक्य नाहीं. म्हणून माझें म्हणणें असें आहे कीं, आपण तूर्त राजधानीचा आश्रय करणेंच सोईचें आहे. विवाह झाला म्हणजे माझ्या वाड्यांतच येऊन राहण्यास आपल्याला कोणत्याही प्रकारची हरकत नाहीं ! आणि आपण तेथें येऊन राहिलां म्हणजे, सध्यांच्या प्रसंगीं स्वसंरक्षणाची जितकी तजवीज करितां येणें शक्य होतें, तितकी केल्यासारखें होईल आणि संकटें येण्याचा संभवही बाहेरच्यापेक्षां तेथें बराच कमी आहे ! ”

कॉनियॅटिस—“ लॉर्ड मॅन्युअल, आपल्या ह्या कळकळीच्या सूचनेबद्दल मी आपला फार आभारी आहें. संकटें येण्याचा संभव आहे ही गोष्ट मी नाकबूल करीत नाहीं, तथापि प्रेमामुळें भीति वाढत असते, हेंही कांहीं खोटें नाहीं ! सिलिव्हरी गांवांतही माझा मजबूत वाडा आहे हें

तुम्हांला माहीतच आहे. त्या स्थानाचा आश्रय देखील घेतां न येण्या इतकें आकस्मिक संकट एकदम कोसळेल असें मला वाटत नाहीं. तथापि मी ह्या बाबतींत पुन्हां एकदां शांतपणें विचार करून काय तें निश्चित ठरवीन ! सध्यां तुमच्या विवाहाचा मुहूर्त तरी ठरवून टाकूं ! "

दोघेही बोलत बोलत दिवाणखान्यांत आले. तेथें मेजावर उपहाराची सर्व तयारी करून, मेरियाबाई व युफ्राशिया त्यांची वाटच पहात होत्या, सर्व मंडळी फराळास बसल्यावर बरीच वाटाघाट होऊन विवाहाचा मुहूर्त पंधरा दिवसांनंतर सर्वानुमतें निश्चित झाला.

फराळ आटोपल्यावर मॅन्युअल सर्वांचा निरोप घेतां घेतां उत्तेजित स्वरानें म्हणाले. " कॉन्स्टांटिनोपलला जाऊन हें आनंदाचें वर्तमान लॉर्ड फ्रांझांना व इतर मित्रमंडळींना केव्हां सांगेन असें मला होऊन गेलें आहे !

---

## प्रकरण २ रें.

## खुलासा.

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास हे सिलिव्हरीहून युफ्राशियाचा निरोप घेऊन राजधानीकडे परत निघाले त्याच वेळीं इकडे सर एडवर्ड डी रस्टन, लॉर्ड फ्रांझा ह्यांना वचन दिल्याप्रमाणें, त्यांच्या बंगल्याकडे त्यांना भेटावयास आले. अर्थात् रिचर्ड बर्स्टो त्यांच्याबरोबर होताच. त्याच्यावांचून दुसरा कोणीही सेवक ह्या वेळीं त्यांच्या बरोबर नव्हता.

लॉर्ड फ्रांझा ह्यांचा बंगला राजवाड्याच्या आवारांतच एका बाजूला होता. त्याच्या पुढील बाजूला एक विस्तृत पटांगण असून, त्यांत हिरवीगार हरळी कापून सारखी गालिच्याप्रमाणें राखलेली होती. बंगल्याच्या दोहों बाजूंस उंच व भरदार अशीं दोन सुरूचीं झाडें होतीं, तीं बंगल्याच्या इमारतीच्याही वर डोकीं काढून मोठ्या डौलानें वाऱ्याच्या झुळकीबरोबर

डुलत होतीं. ह्या मैदानाच्या दोहों बाजूंस खासगीकडील नोकर लोकांचीं घरें असून, तीं सर्व पांढऱ्या शुभ्र दगडांचीं व एका नमुन्याचीं बांधलेलीं होतीं. ह्या इमारती म्हणजे प्राचीन रोमन शिल्पकलेचें प्रदर्शनच होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

बंगल्याच्या मुख्य दिवाणखान्यांत जातांच, येथें असलेल्या चार पांच सेवकांनीं सर एडवर्ड यांस अदबीनें प्रणाम केला. कारण, ते हुजुरातीच्या लष्कराचे सेनापती असून, आपल्या धन्याशीं त्यांचा चांगला स्नेह आहे, हें त्या सेवकांस माहीत होतें. त्या सेवकांचा हवालदार पुढें येऊन नम्र स्वरानें म्हणाला—" प्रधान साहेबांची स्वारी अद्यापि सभेहून परत आली नाहीं ! तथापि ते परत येण्यापूर्वींच आपलें आगमन झाल्यास, त्यांनीं जातांना असें सांगून ठेविलें आहे कीं, आपण परत न जातां, ते येईपर्यंत येथेंच क्षणभर थांबावें, अशी आपल्याला विनंति करावी. प्रधान साहेब दोन वाजतांच परत यावयाचे होते, पण आतां तर अडीच वाजले ! "

सर एडवर्ड—" कांहीं हरकत नाहीं ! प्रधान साहेब परत येईपर्यंत मी त्यांची वाट पहात बसतों ! "

हवालदारानें पुनः प्रणाम केला, आणि लॉर्ड फ्लांझाच्या खासगी मुलाखतीच्या खोलीचें दार उघडलें; तेव्हां सर एडवर्ड त्या खोलींत जाऊन बसले. ही खोली मोठ्या थाटानें सजविलेली होती. खोलीचें छत रेशमी असून भिंतींना सोनेरी रंग दिलेला होता. तेथील सर्व खुर्च्या कोचें, मेजें वगैरे सामान, उंची मखमलीनें मढविलेलें होतें. मध्यभागीं एक चांदीची शेगडी असून त्यांत सुगंधी कोळसे पेटविलेले होते, एका भिंतीला मेरी देवतेची तसबीर लावलेली असून, तिच्या दोहों बाजूंस दोन रोमन सत्पुरुषांच्या तसबिरी लावलेल्या होत्या आणि देवतेच्या मूर्तीपुढें सुवासिक तेलाचा सौम्य नंदादीप जळत होता. कोणताही धर्मनिष्ठ ग्रीक किंवा रोमन गृहस्थ ह्या मूर्तीला प्रणाम केल्यावांचून पुढें जात नसे. ह्या खोलीच्या पिछाडीला एक सुंदर बाग असून, तिकडे जाण्यायेण्यास खोलीला एक लहानसें दार होतें. बागेंतील झाडी इतकी गर्द होती कीं, तींतून खालच्या पदपथापर्यंत सूर्याचे किरण फारसे

पोंचूं शकत नसत. पण त्यामुळें खालची हवा नेहमीं गार व हिंवाळ्याच्या दिवसांत बरीच सर्द असे. हें स्थान इतकें थंड, शांत व स्तब्ध होतें कीं, तें अक्षय उलाढालीच्या कॉन्स्टांटिनोपल शहरांत नसून, एखाद्या निर्मनुष्य अरण्यांत आहे कीं काय असा भास होई.

सर एडवर्ड यांच्या मनांत अनेक विचार घोळत असल्यामुळें, ते अस्वस्थ चित्तानें त्या खोलींत कांहीं वेळ इकडे तिकडे फेऱ्या घालीत राहिले. ह्याच बंगल्यांत पूर्वी अत्यंत आनंदानें घालविलेल्या काळाचें त्यांना स्मरण झालें. कामगारीवर जाण्यापूर्वी लॉर्ड फ्रांझा येथें किती खुल्या अंतःकरणानें व आनंदानें आपल्याशीं वागत असत, व आपणही त्यांच्या कुटुंबापैकींच असल्यासारखे कसे निष्कपट मनानें येथें वागत होतों, हेंही त्यांच्या मनांत आलें. थियोडोरा आपल्या सहवासांत जसजशी लहानाची मोठी होत चालली, तसतसें आपलें तिजवर कसें प्रेम जडत चाललें, आणि आपण जरी परकी असलों तरी, रोमन बादशहाकरितां व रोमन साम्राज्याकरितां कांहीं तरी महत्त्वाची व पराक्रमाची कामगिरी करून दाखवून, थियोडोराची मागणी करण्याची आपली पात्रता सिद्ध करण्याचा आपण कितीदां संकल्प केला, ह्याचीही त्यांना आठवण झाली. परंतु लॉर्ड फ्रांझा कामगिरीवर निघून गेल्यामुळें, त्यांच्या बंगल्यांत आपलें जाणें येणें बंद झालें, अर्थात् थियोडोराचें दर्शनही दुर्लभ झालें. पुढें लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास यांच्याशीं तिचा विवाह निश्चित झाला असल्याची वार्ता आपल्या कानावर आली, आणि शेवटीं काल रात्रीं तर लॉर्ड फ्रांझांनीं आपला तसा हेतु असल्याचें स्पष्टच सुचविलें, ह्या सर्व गोष्टी क्रमाक्रमानें त्यांच्या अंतःश्चक्षूपुढें उभ्या राहिल्या. गेल्या दोन वर्षांत क्वचित् प्रार्थनामंदिरांतील किंवा दरबारांतील प्रसंग खेरीजकरून सर एडवर्डची थियोडोराशीं कधीं भेट झाली नव्हती; त्यामुळें ह्या निश्चित झालेल्या विवाहासंबंधानें तिचें स्वतःचें काय मत आहे, हें त्यांना कळण्यास कांहीं मार्ग नव्हता. त्यांची स्वतःची आशा व महत्त्वाकांक्षा तर त्यांनीं अगदींच सोडून दिली होती. थियोडोराचा विवाहसमारंभ थोड्याच दिवसांत होणार असें सर एडवर्डना वाटत होतें, व त्याबरोबरच आपल्या सर्व आशा व महत्त्वाकांक्षा धुळीस मिळून जाणार

ही त्यांची खात्री होती. तथापि मानवी अंतःकरणांतील अशातंतु जरी सूक्ष्म असला तरी, तो अत्यंत चिवट असतो. तो एकाएकीं तुटत नाहीं. त्याप्रमाणें सर एडवर्ड यांच्या अंतःकरणांतही अद्यापि आशातंतु कायम असून त्या आशेच्या आनंदांत ते केव्हां केव्हां गर्क होऊन जात असत.

सर एडवर्ड यांच्या मनांत वारंवार असे विचार येत असत कीं, लॉर्ड फ्रांझा यांच्या संपत्तीपेक्षां जरी आपली संपत्ति कमी असली तरी, रोमन साम्राज्याच्या कामगिरीच्या दृष्टीनें आपली किंमत कांहीं अगदींच कमी नाहीं. विशेषतः सध्यांच्या आणीबाणीच्या प्रसंगीं तर साम्राज्य संरक्षणाची जबाबदारी लॉर्ड फ्रांझा यांच्यापेक्षां आपल्यावरच अधिक असल्यामुळें, ह्या वेळीं आपली योग्यता त्यांच्याहूनही अधिक आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मग राष्ट्रहिताच्या दृष्टीनें, ह्या प्रसंगीं लॉर्ड फ्रांझांनीं आपल्या सर्व कुशंका बाजूस सारून, माझें अंतःकरण संतुष्ट करण्याकरितां व तेणेंकरून मला अधिक हुरूप आणण्याकरितां, आपली कन्या मला कां देऊं नये ? लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास हे शूर, धाडसी, उत्साही व प्रामाणिक आहेत यांत शंका नाहीं, तथापि सध्यांच्या प्रसंगीं मांझ्या इतकी त्यांच्यावर जबाबदारी नाहीं, अर्थात् महत्त्वही नाहीं. अशा दृष्टीनें थियोडोराची प्राप्ति होण्याचा अद्यापि संभव आहे खरा, पण यांत थियोडोराच्या प्रेमाचा विचार करावयास नको का ? तिचें प्रेम जर आपल्यावर नसेल तर, ह्या वार्धक्यांत लॉर्ड फ्रांझाचा मनोभंग तरी मी कां करावा, आणि लॉर्ड मॅन्युअलच्या ओंठाशीं आलेला अमृताचा पेला तरी मीं कां विनाकारण उडवून द्यावा ? अर्थात् ह्या कामीं थियोडोराचें अंतःकरण प्रथम समजून घेणें अवश्य आहे. तें समजल्याशिवाय, आपल्याला ह्या गोष्टीचा कांहींच विचार करितां येत नाहीं. थियोडोराचें प्रेम जर आपल्याला संपादन करितां आलें, तर कोणत्याही सरळ मार्गानें वागण्यास हरकत नाहीं. कांहीं असलें तरी जोंपर्यंत आपला हेतु साध्य होण्याचा थोडा तरी संभव आहे तोंपर्यंत निराश होण्याचें कारण नाहीं, किंवा प्रयत्न सोडण्याचीही आवश्यकता नाहीं.

सर एडवर्ड यांच्या मनांत ह्याप्रमाणें विचार चालले असतां, बाहे-

ऱ्या दिवाणखाण्यांत गडबड सुरू झालेली त्यांच्या कानावर आली, त्यावरून लॉर्ड फ्रांझा परत आले असावे, असें त्यांना वाटलें. म्हणून त्यांना प्रणाम करण्याकरितां सर एडवर्ड खोलीच्या दाराशीं आले, तों दार उघडून लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास आंत आलेले त्यांच्या दृष्टीस पडले.

मॅन्युअल पुढें येऊन स्मितपूर्वक आनंदित स्वरानें म्हणाले-" नमस्कार सर एडवर्ड सेनापतिसाहेब. प्रधानसाहेबांची स्वारी अद्यापि परत आली नाहीं म्हणतात ! "

सर एडवर्ड किंचित् तुटक स्वरानें म्हणाले-" हो ! मला वाटतें, अद्यापि सभेचें काम आटोपलें नसावें ! तेथून मोकळीक झाल्याशिवाय त्यांना परत यावयास कशी सवड होणार ! "

लॉर्ड मॅन्युअल एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाले-" इलाज नाहीं ! माझें त्यांच्याकडे फार जरूरीचें काम होतें.

सर एडवर्ड-" त्यांना कांहीं आतां फारसा विलंब लागणार नाहीं असें वाटतें ! कारण, मीही त्यांच्याकडे एका महत्त्वाच्या सरकारी कामाकरितां आलों आहें, आणि त्यांनींच मला ही वेळ नेमून दिली आहे ! आपलेंही कांहीं सरकारीच काम असेल ? "

लॉर्ड मॅन्युअल हंसून म्हणाले-" छे छे, माझें काम सरकारी नाहीं. तें अगदींच खासगी आहे, पण मला जसें त्याचें अत्यंत महत्त्व आहे, तसेंच दुसऱ्या एका व्यक्तीलाही आहे. तथापि आम्हां उभयतांशिवाय तिसऱ्याचा मात्र त्यांत कांही संबंध नाहीं !

लॉर्ड मॅन्युअलच्या ह्या उत्तरावरून सर एडवर्ड यांनीं असें अनुमान काढलें कीं, मॅन्युअलनें थियोडोराचें प्रेम संपादन केलें असावें, व ते आतां तिच्याबद्दल रीतसर मागणी घालावयास व लॉर्ड फ्रांझाचा रुकार मिळवावयास आले असावे. अर्थात् हें त्यांचें खासगी काम असून त्यांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे, व त्यांत त्या उभयतांवांचून तिसऱ्या कोणाचाही त्यांत संबंध नाहीं. म्हणून ते तुटक स्वरानें म्हणाले, " असेल कदाचित् ! "

सर एडवर्ड आज आपल्याशीं मोकळ्या मनानें बोलत नाहींत, व नेहमींप्रमाणें त्यांची मुद्राही आनंदी दिसत नाहीं, हें मॅन्युअलच्या लक्षांत

आल्यावांचून राहिलें नाहीं. तथापि त्याचें कारण हल्लींचा बिकट प्रसंग व त्यांच्यावर असलेली मोठी जबाबदारी हेंच असावें, अशी कल्पना करून ते म्हणाले—" आपली सांप्रतची स्थिति कांहीं समाधानकारक नाहीं, असेंच प्रधान साहेबांचेंही मत असेल ? "

सर एडवर्ड—" हो, तें खरें, पण प्रधान साहेब परत आले ही गोष्ट त्यांतल्या त्यांत फायद्याचीच झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांच्या आगमनानें पूर्व स्थितींत कांहीं तरी सुधारणाच होईल. कारण, राष्ट्राचा त्यांच्यावर जितका विश्वास आहे, तितका दुसऱ्या कोणा-वरही नाहीं, अशी माझी खात्री आहे ! "

मॅन्युअल—"हो, आणि बादशहासरकारांचाही त्यांच्याइतका दुसऱ्या कोणावर भरंवसा असेल असें मला वाटत नाहीं ! आपल्या कामाला फार वेळ लागेल का ? "

सर एडवर्ड—" छे, तेव्हांच होऊन जाईल ! माझें काम दुसरें कांहीं नाहीं, अॅड्रियानोपलला एक विश्वासू हेर पाठविण्यासंबंधानें काल प्रधान साहेबांनीं गोष्ट काढली होतीना ? त्यासंबंधानेंच नक्की करावयाचें आहे ! "

मॅन्युअल—" तर मग आपलेंच काम अगोदर होऊन जाऊं द्या, तोंपर्यंत मी थांबेन, सर एडवर्ड, माझेंही काम कांहीं गुप्त नाहीं ! आपण मित्रत्वाच्या नात्यानें माझें अभिनंदन केलें पाहिजे ! "

सर एडवर्ड हंसून म्हणाले—" पण सरदारसाहेब, कशाबद्दल अभि-नंदन करावयाचें, हें तरी समजावयास नको का ? "

मॅन्युअल आपल्याच नादांत उद्गारले—" मी राजधानींतून बाहेर गेल्याबद्दल फारसा कोठें बोभाटा झालेला दिसत नाहीं, हें एकापरी ठीक झालें ! "

लॉर्ड मॅन्युअलचे हे उद्गार ऐकून सर एडवर्ड यांच्या मनांत एक निराळीच कल्पना येऊन, ते एकदम म्हणाले—" काय ? सरदार-साहेब ! आपण.........."

त्यांचें वाक्य पुरें होऊं न देतां, लॉर्ड मॅन्युअल मध्येंच म्हणाले—"होय, होय ! दोस्त, मी माझ्या हृदयदेवतेचें प्रेम संपादन करण्याच्या कामीं

गुंतलों होतों, आणि ईश्वरकृपेनें त्यांत मला पूर्ण यश आलें! तिची योग्यता माझ्या बरोबरीची नाहीं, असें प्रथम लोकांना वाटण्याचा संभव आहे, तथापि माझी अशी खात्री आहे कीं, ती लोकांच्या दृष्टीस पडल्यावर, तिच्यासारखी सकल गुणालंकृत पत्नी लाभणें हें महद्भाग्य होय, असेंच सर्व कबूल करतील!"

"शाबास सरदारसाहेब," सर एडवर्ड मॅन्युअलचा हात धरून आनंदानें म्हणाले—"मी खरोखरच अंतःकरणपूर्वक आपलें अभिनंदन करितों! पण मला आपल्या प्रिय पत्नीचें नांव गांव कळेल का?"

मॅन्युअल—"तिचें नांव युफ्राशिया कॉनिॲटिस. तिचे वडील सिलिव्हरी येथें राहतात. ते कुलीन, अब्रूदार व समान्य गृहस्थ आहेत!"

"कोण?" सर एडवर्ड चकित स्वरानें म्हणाले—"सिलिव्हरीचे कोतवाल कीं काय? ते माझ्या माहितीचे आहेत! खरोखरच ते फार शूर व प्रामाणिक गृहस्थ आहेत! सिलिव्हरीच्या बंदोबस्ताच्या बाबतींत एकदां त्यांची माझी प्रत्यक्ष भेट होऊन बराच वेळ बोलणें चालणेंही झालें आहे! सरदार साहेब, मी आपलें पुनः एकदां अभिनंदन करितों! पण आपल्या विवाहासंबंधानें आजपर्यंत लोकवार्ता अगदीं वेगळ्या प्रकारची होती!"

मॅन्युअल हंसून म्हणाले—"हां, कुमारी थियोडोरा संबंधानेंच ना? आमच्या लहानपणीं आमच्या वडिलांचें व प्रधान साहेबांचें त्या बाबतींत कांहीं बोलणें झालें होतें म्हणतात, पण त्या योगानें आम्ही उभयतां सज्ञान झाल्यावर कितपत बांधले जाऊं, याचा तुम्हीच विचार करा! लोक कांहींहि म्हणोत, पण तुम्हाला तरी त्यांत कांहीं तथ्य वाटणार नाहीं, अशी माझी खात्री आहे!"

सर एडवर्ड—"कां बरें! सरदार साहेब, कां तथ्य वाटूं नये?"

"आहा!" लॉर्ड मॅन्युअल हंसून उद्गारले—"सेनापति साहेब, आपलें प्रेमरहस्य अत्यंत गुप्त आहे, किंवा तें मलाच एकट्याला माहीत आहे, असें समजूं नका! आपल्याला त्यांत पूर्ण व सत्वर यश यावें अशी माझी ईश्वरापाशीं अंतःकरणपूर्वक प्रार्थना आहे! आणि खरें पाहिलें असतां, कुमारी थियोडोराला आपल्या इतका योग्य पति दुसरा कोणीही

नाहीं ! आपण उभयतांच परस्परांस सर्वथैव अनुरूप आहां !"

सर एडवर्ड स्मितपूर्वक म्हणाले—" आपण ज्या अर्थीं मोकळ्या मनानें ही गोष्ट बोलत आहां, त्या अर्थीं मीही उघड सांगतों कीं, माझी तशी उत्कट इच्छा आहे, ही गोष्ट खरी ! ती आपल्याला कशी कळली असेल, हें मात्र माझ्या ध्यानांत येत नाहीं, पण माझ्या प्रयत्नांची मजल अद्यापि नुसत्या इच्छेच्या मर्यादे पलीकडे मुळींच गेलेली नाहीं !"

लॉर्ड मॅन्युअल—" सेनापतिसाहेब, त्याविषयीं आपण निश्चित असा ! थियोडोरा आपला अव्हेर करणार नाहीं, अशी माझी खात्री आहे ! आतां तिच्या वडिलांविषयीं म्हणाल तर त्यांनीं आपली कन्या आमच्या स्थानिक सरदारांपैकींच कोणास तरी देण्याचें मनांत आणल्यास, येथील सरदार-मंडळींची स्थिति किती पोकळ झालेली आहे हें स्वानुभवानेंच त्यांच्या लक्षांत येऊन चुकलें असलें पाहिजे ! जीर्ण झालेल्या झाडाला जशीं फळें लागेनाशीं होतात, तशी तेथील सरदारघराण्यांची स्थिति झालेली आहे !"

सर एडवर्ड—" तें मला मान्य आहे, आणि इंग्लंडांत माझें घराणेंही प्रधानसाहेबांच्या घराण्याइतकेंच उच्च दर्जाचें मानलें जातें, पण येथें जी माझी योग्यता आहे, ती केवळ बादशहा सरकारच्या मर्जीवर अवलंबून आहे ! त्यांची कदाचित् खपा मर्जी होऊन त्यांनीं मला नोकरीवरून दूर केलें, तर माझी तरवार आणि माझी अक्कल यांशिवाय मजजवळ काय शिल्लक उरणार ? मला येथें कांहीं जहागीर नाहीं कीं इनाम वतन नाहीं ! येथें मी नुसता उपरी आहें !"

लॉर्ड मॅन्युअल—" जोंपर्यंत येथें रोमन साम्राज्य आहे, तोंपर्यंत तर तुमच्या नोकरीला धक्का लागण्याचा मुळींच संभव नाहीं ! आणि जर दुर्दैवानें हें साम्राज्य नष्ट झालें, तर लॉर्ड फ्रांझांचें तरी काय उरणार आहे ?"

सर एडवर्ड—" शिवाय मी लॅटिन धर्मपंथानुयायी आहें ! आणि कोणत्याही लाभाच्या, किंबहुना थियोडोराच्या लोभानें देखील मी आपला धर्म सोडून नरकाचें साधन कधीं करणार नाहीं, हेंही विसरतां कामा नये ! आणि तुम्ही रोमन व ग्रीक लोक आह्मां लॅटिन लोकांचा किती तीव्र

द्वेष करीत असतां, हें तुम्हांला माहीतच आहे ! "

लॉर्ड मॅन्युअल—" पण मला वाटतें, ही द्वेषबुद्धि उभय पक्षींही सारखीच तीव्र आहे ! तथापि ह्या समेटाच्या वाटाघाटींचा परिणाम काय होईल, हें कोणीं सांगावें ? ऐका, ऐका ! शिंगें वाजत आहेत ! त्यावरून बादशहांची स्वारी सभास्थानाहून राजवाड्याकडे परत येत असावी असें वाटतें ! प्रधानसाहेबही सरकारांबरोबर असावयाचेच ! ते इतक्यांत येथें येतील ! मग कसें काय, सेनापतिसाहेब ? आपण कृपा करून मला त्यांची प्रथम भेट घेण्याची संधि देऊं शकाल का ? ते माझे पालनकर्ते व पितृतुल्य आहेत ! माझ्या विवाहाची खरी हकीगत त्यांना प्रथम माझ्याच तोंडून कळावी, अशी माझी फार इच्छा आहे. कारण ती दुसऱ्या कोणाकडून तरी भलत्याच स्वरूपांत कळली तर, त्यांच्या मनाला विनाकारण त्रास होईल. "

सर एडवर्ड—" कांहीं हरकत नाहीं ! पण मी त्यांच्या सूचनेप्रमाणें नियमित वेळेला हजर झालों नाहीं, असें त्यांच्या मनांत येईल कीं काय ? तसेंच आपलें काम होईपर्यंत मी कोठें वेळ काढावयाचा ? "

लॉर्ड मॅन्युअल—" त्याबद्दल फिकीर नको. आपल्याला मुद्दाम विनंति करून, मीं प्रथम भेटीची संधि संपादन केली, असें मी त्यांना स्पष्टच कळवीन. मला फार तर पंधरा मिनिटें लागतील, तोंपर्यंत आपण ह्या बागेंत फिरून आलां तरी हरकत नाहीं ! माझें काम आटोपतांच मी आपल्याला सूचना करीन. "

" बरें तर, मी जातों ! " असें म्हणून सर एडवर्ड पिछाडीच्या दारानें बागेंत गेले आणि गर्द छायेच्या एका पदपथावरून विचार करीत फिरूं लागले. लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास उत्कंठित अंतःकरणानें जवळ जवळ ऐकूं येणाऱ्या शिंगाचे ध्वनि ऐकत उभे राहिले. त्यावरून बादशहांची स्वारी राजवाड्याजवळ आल्याचें त्यांना कळून आलें, व शेवटीं सलामीचें शिंग ऐकतांच, स्वारी किल्ल्यांत येऊन दाखल झाल्याचें त्यांनीं ओळखलें. त्यानंतर थोड्याच वेळांत लॉर्ड फ्रांझ आपल्या लवाजम्यासह बंगल्याकडे येत असलेले त्यांच्या दृष्टीस पडले.

प्रधानसाहेब दिवाणखान्यांत येतांच मॅन्युअलनीं त्यांना आदरपूर्वक

नाहीं! आपण उभयतांच परस्परांस सर्वथैव अनुरूप आहां!"

सर एडवर्ड स्मितपूर्वक म्हणाले—"आपण ज्या अर्थीं मोकळ्या मनानें ही गोष्ट बोलत आहां, त्या अर्थीं मीही उघड सांगतों कीं, माझी तशी उत्कट इच्छा आहे, ही गोष्ट खरी! ती आपल्याला कशी कळली असेल, हें मात्र माझ्या ध्यानांत येत नाहीं, पण माझ्या प्रयत्नांची मजल अद्यापि नुसत्या इच्छेच्या मर्यादे पलीकडे मुळींच गेलेली नाहीं!"

लॉर्ड मॅन्युअल—"सेनापतिसाहेब, त्याविषयीं आपण निश्चित असा! थियोडोरा आपला अव्हेर करणार नाहीं, अशी माझी खात्री आहे! आतां तिच्या वडिलांविषयीं म्हणाल तर त्यांनीं आपली कन्या आमच्या स्थानिक सरदारांपैकींच कोणास तरी देण्याचें मनांत आणल्यास, येथील सरदार-मंडळींची स्थिति किती पोकळ झालेली आहे हें स्वानुभवानेंच त्यांच्या लक्षांत येऊन चुकलें असलें पाहिजे! जीर्ण झालेल्या झाडाला जशीं फळें लागेनाशीं होतात, तशी तेथील सरदारघराण्यांची स्थिति झालेली आहे!"

सर एडवर्ड—"तें मला मान्य आहे, आणि इंग्लंडांत माझें घराणेंही प्रधानसाहेबांच्या घराण्याइतकेंच उच्च दर्जाचें मानलें जातें, पण येथें जी माझी योग्यता आहे, ती केवळ बादशहा सरकारच्या मर्जीवर अवलंबून आहे! त्यांची कदाचित् खपा मर्जी होऊन त्यांनीं मला नोकरीवरून दूर केलें, तर माझी तरवार आणि माझी अक्कल ह्यांशिवाय मजजवळ काय शिल्लक उरणार? मला येथें कांहीं जहागीर नाहीं कीं इनाम वतन नाहीं! येथें मी नुसता उपरी आहें!"

लॉर्ड मॅन्युअल—"जोंपर्यंत येथें रोमन साम्राज्य आहे, तोंपर्यंत तर तुमच्या नोकरीला धक्का लागण्याचा मुळींच संभव नाहीं! आणि जर दुर्दैवानें हें साम्राज्य नष्ट झालें, तर लॉर्ड फ्रांझांचें तरी काय उरणार आहे?"

सर एडवर्ड—"शिवाय मी लॅटिन धर्मपंथानुयायी आहें! आणि कोणत्याही लाभाच्या, किंबहुना थियोडोराच्या लोभानें देखील मी आपला धर्म सोडून नरकाचें साधन कधीं करणार नाहीं, हेंही विसरतां कामा नये! आणि तुम्ही रोमन व ग्रीक लोक आह्मां लॅटिन लोकांचा किती तीव्र

द्वेष करीत असतां, हें तुम्हांला माहीतच आहे!"

लॉर्ड मॅन्युअल—"पण मला वाटतें, ही द्वेषबुद्धि उभय पक्षींही सारखीच तीव्र आहे! तथापि ह्या समेटाच्या वाटाघाटीचा परिणाम काय होईल, हें कोणीं सांगावें? ऐका, ऐका! शिंगें वाजत आहेत! त्यावरून बादशहांची स्वारी सभास्थानाहून राजवाड्याकडे परत येत असावी असें वाटतें! प्रधानसाहेबही सरकारांबरोबर असावयाचेच! ते इतक्यांत येथें येतील! मग कसें काय, सेनापतिसाहेब? आपण कृपा करून मला त्यांची प्रथम भेट घेण्याची संधि देऊं शकाल का? ते माझे पालनकर्ते व पितृतुल्य आहेत! माझ्या विवाहाची खरी हकीगत त्यांना प्रथम माझ्याच तोंडून कळावी, अशी माझी फार इच्छा आहे. कारण ती दुसऱ्या कोणाकडून तरी भलत्याच स्वरूपांत कळली तर, त्यांच्या मनाला विनाकारण त्रास होईल."

सर एडवर्ड—"कांहीं हरकत नाहीं! पण मी त्यांच्या सूचनेप्रमाणें नियमित वेळेला हजर झालों नाहीं, असें त्यांच्या मनांत येईल कीं काय? तसेंच आपलें काम होईपर्यंत मी कोठें वेळ काढावयाचा?"

लॉर्ड मॅन्युअल—"त्याबद्दल फिकीर नको. आपल्याला मुद्दाम विनंति करून, मीं प्रथम भेटीची संधि संपादन केली, असें मी त्यांना स्पष्टच कळवीन. मला फार तर पंधरा मिनिटें लागतील, तोंपर्यंत आपण ह्या बागेंत फिरून आलां तरी हरकत नाहीं! माझें काम आटोपतांच मी आपल्याला सूचना करीन."

"बरें तर, मी जातों!" असें म्हणून सर एडवर्ड पिछाडीच्या दारानें बागेंत गेले आणि गर्द छायेच्या एका पदपथावरून विचार करीत फिरूं लागले. लॉर्ड मॅन्युअल किसोलरास उत्कंठित अंतःकरणानें जवळ जवळ ऐकूं येणाऱ्या शिंगाचे ध्वनि ऐकत उभे राहिले. त्यावरून बादशहांची स्वारी राजवाड्याजवळ आल्याचें त्यांना कळून आलें, व शेवटीं सलामीचें शिंग ऐकतांच, स्वारी किल्ल्यांत येऊन दाखल झाल्याचें त्यांनीं ओळखलें. त्यानंतर थोड्याच वेळांत लॉर्ड फ्रांझा आपल्या लवाजम्यासह बंगल्याकडे येत असलेले त्यांच्या दृष्टीस पडले.

प्रधानसाहेब दिवाणखान्यांत येतांच मॅन्युअलनीं त्यांना आदरपूर्वक

प्रणाम केला, व लॉर्ड फ्रांझांनीं पुत्राप्रमाणें मानलेल्या लॉर्ड मॅन्युअलला प्रेमपूर्वक आशीर्वाद दिला. नंतर ते स्मितपूर्वक म्हणाले—" लॉर्ड मॅन्युअल, इतक्यांतच तुमची गांठ पडेल अशी माझी कल्पनाही नव्हती ! तुम्ही भेटलां हें बरें झालें; कारण तुमच्याशीं मला कांहीं बोलावयाचें आहे ! पण सेनापति सर एडवर्ड येथें येऊन माझी वाट पहात होते म्हणे ! ते कोठें आहेत ? "

" होय, प्रधानसाहेब, " मॅन्युअल अडखळत बोलूं लागले—" ते बराच वेळ आपल्या भेटीकरितां येथें आले आहेत ! पण मला आपल्या भेटीची अधिक उत्कंठा असल्यामुळें, मींच त्यांना, मला प्रथम संधि देण्याविषयीं विनंति केली ! त्यांची भेट थोड्या अवकाशानें घेण्यांत जर फारसें नुकसान नसेल, आणि आपल्याला थोडी सवड असेल, तर आपण माझे दोन शब्द कृपा करून ऐकून घ्यावे, अशी माझी प्रार्थना आहे ! "

लॉर्ड फ्रांझा—" कांहीं हरकत नाहीं. बादशहांना सेनापतींची भेट घेण्यास आपखी तासभर तरी सवड होणार नाहीं, तोंपर्यंत तुमचें म्हणणें ऐकून घेतां येईल. पण त्यापूर्वीं प्रथम माझेंच म्हणणें मी तुम्हांला सांगून टाकून एकदां निश्चित होणार आहें ! मॅन्युअल, तुमच्या परलोकवासी वडिलांचा व माझा किती अकृत्रिम स्नेह होता, हें तुम्हांला ऐकून व अंशतः पाहूनही माहीत असेलच ! "

" होय, प्रधानसाहेब, " मॅन्युअल उत्कंठित स्वरानें म्हणाले—" तें मला पूर्णपणें माहीत आहे, आणि मीही आपल्याला आजपर्यंत पितृतुल्य मानीत आलों आहें ! म्हणूनच मी आपल्याला विनंति.........."

" ती मग ऐकूं ! " लॉर्ड फ्रांझा मध्येंच म्हणाले—" तुम्ही व माझी थियोडोरा लहानपणीं एकमेकांशीं खेळत असलेलीं पाहून, आमचें उभय-तांचें तुम्हां दोघांसंबंधानें असें बोलणें झालें होतें कीं,.........."

" पण प्रधानसाहेब, " मॅन्युअल अस्वस्थ स्वरानें मध्येंच उद्गारले.

" थांबा ! " लॉर्ड फ्रांझा त्यांना अडवून म्हणाले—" माझें म्हणणें एकदां पुरतें ऐकून घ्या ! आपल्या वडिलांचें व माझें असें ठरलें होतें कीं, दुसरी कांहीं आपत्ति उपस्थित झाली नाहीं, आणि बादशहांची

परवानगी मिळाली तर, माझी थियोडोरा मीं तुम्हांलाच द्यावी ! आतां........."

" पण प्रधानसाहेब, " मॅन्युअल पुनः एकदां बोलण्याचा प्रयत्न करून मध्यें म्हणाले.

परंतु लॉर्ड फ्रांझा त्यांना पुनः थांबवून म्हणाले—" थांबा ! आणखी थोडें ऐकून घ्या ! लहानपणापासून तुमच्यावर माझें सूक्ष्म व अखंड लक्ष आहे ! कारण, मला जो विश्वासार्ह वाटणार नाहीं, त्याला आपली मुलगी मुळींच द्यावयाची नाहीं, असा माझा निश्चय आहे. मी येथें नव्हतों, तेव्हां देखील तुमच्यावर नजर ठेवण्याचें काम मजकरितां माझे दुसरे मित्र करीतच होते. आणि आजपर्यंत ज्या गोष्टी मीं प्रत्यक्ष पाहिल्या आहेत व ज्या माझ्या कानांवर आल्या आहेत, त्या सर्वांवरून माझा निश्चय आतां ठाम झाला आहे. आज मीं बादशहांच्या जवळ देखील ही गोष्ट काढली होती, तेव्हां, असें घडून येईल तर आपल्याला फार आनंद होईल, असे उद्गार सरकारच्या तोंडून बाहेर पडले. ह्याप्रमाणें सर्व सिद्धता झाली आहे. आतां तुम्हांला ह्यावर काय बोलावयाचें असेल तें खुशाल बोला."

लॉर्ड मॅन्युअल—" प्रधानसाहेब, माझ्याविषयीं आपल्या अंतःकरणांत इतकी कळकळ व सद्बुद्धि वास करीत आहे, ह्याबद्दल प्रथम आपले आभार मानितों. आपल्या सकल गुणमंडित कन्यारत्नाच्या प्राप्तीकरितां मोठमोठे राजे महाराजे देखील चढाओढीनें प्रयत्न करतील; आणि माझ्यापेक्षां योग्यतेनें, कुलशीलानें, कीर्तीनें व संपत्तीनें श्रेष्ठ असा जांवई आपल्याला सहज मिळेल, अशी माझी खात्री आहे. तथापि मला आपण अगोदर थोडें बोलूं दिलें असतें तर बरें झालें असतें. म्हणजे मग, माझ्या वडिलांशीं जरी आपला अत्यंत स्नेह होता, मजवर जरी आपलें अकृत्रिम प्रेम आहे, आणि आपल्या कन्येचें पाणिग्रहण केलें असतां सर्व कॉन्स्टांटिनोपल शहर माझ्या भाग्याचा व सुखाचा हेवाच करील, ह्या सर्व गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी, आपल्या कन्येचा मला कां स्वीकार करितां येत नाहीं, ह्याचा मला थोडा तरी खुलासा करितां आला असता, आणि आपले बरेच श्रम वांचले असते !"

" म्हणजे ? " लॉर्ड फ्रांझा चकित स्वरानें उद्गारले—" लॉर्ड मॅन्युअल, आपलें म्हणणें पुरतेंसें माझ्या लक्षांत आलें नाहीं ! माझ्या ह्या अमूल्य देणगीचा तुम्ही अव्हेर करणार आहां कीं काय ? कीं माझी कांहीं गैरसमजूत झाली ? "

मॅन्युअल—" प्रधानसाहेब, आपली समजूत बरोबर आहे, माझें तसेंच म्हणणें आहे ! परंतु माझें म्हणणें प्रथम कृपा करून ऐकून घ्यावें, आणि नंतर मला काय म्हणावयाचें असेल तें म्हणावें ! चार महिन्यांपूर्वींच माझा दुसऱ्या वधूशीं वाग्निश्चय देखील विधिपूर्वक होऊन चुकला आहे ! "

" काय म्हणतां ? लॉर्ड फ्रांझा आश्चर्यचकित स्वरानें म्हणाले—" वाग्निश्चय देखील झाला आहे ? आणि तो कोणाशीं ? "

मॅन्युअल—" सिव्हिरीचे कोतवाल निसिटस कॉनियॅटिस आपल्याला माहीतच आहेत ! "

लॉर्ड फ्रांझा—" हो, माहीत आहेत ! बरें मग ? "

मॅन्युअल—" त्यांच्या कन्येशीं माझा वाग्निश्चय झालेला आहे ! "

" काय हें ! " लॉर्ड फ्रांझा खिन्न स्वरानें म्हणाले—" लॉर्ड मॅन्युअल आज तुमचे वडील हयात असते, आणि त्यांना हें पाहण्याचा प्रसंग आला असता, तर त्यांना काय वाटलें असतें ? कॉन्स्टांटिनोपलच्या प्रख्यात सरदारघराण्यांतील पुरुषानें इतकें स्वाभिमानशून्य व्हावें काय ? अशा हीन कुलांतील मुलीशीं विवाह करून आपल्या पुराणप्रसिद्ध उच्च कुळाला काळिमा लावणें तुमच्या सारख्याला तरी शोभत नाहीं ! "

मॅन्युअल—" प्रधानसाहेब, आपण आजपर्यंत मजवर पुत्रवत् प्रेम ठेवलें आहे, आणि आपली आज्ञा मला अमान्य करावी लागल्यामुळें आपला मनोभंग झाला आहे, ह्या गोष्टी लक्षांत आणून मी आपल्या ह्या अयोग्य उद्गारांची उपेक्षा करितों ! पण माझ्या वाग्निश्चित वधूच्या कुलशीलाविरुद्ध मी कोणालाही एक चकार शब्द देखील बोलूं देणार नाहीं ! आमचें कूळ आहे त्यापेक्षां दसपट अधिक उच्च दर्जाचें व पुराणप्रसिद्ध असतें, किंवा आमच्या घराण्यांत रोमन साम्राज्याच्या मूळस्थापनेपासून जरी सरदारी असती, तरी देखील युफ्रासिया कॉनियॅटि-

सर्व पाणिग्रहण आमच्या कुळाला भूषणभूतच झालें असतें ! आपल्याला तिची माहिती झाली म्हणजे, आपलेंही मत असेंच होईल, अशी माझी खात्री आहे ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ छे छे, मॅन्युअल, माझें मत कालत्रयीं बदलणार नाहीं ! तूं ही मोठी चूक केलीस, आणि त्याबद्दल तुला पश्चात्ताप झाल्या-वांचून राहणार नाहीं ! तथापि वचनभंग करण्याची वदसल्ला मी कोणास केव्हांही देणार नाहीं ! तुझा जर त्या मुलीशीं वाग्निश्चय झाला असेल, तर तिच्याशीं तुझा विवाह झाल्यासारखाच आहे. आतां तिच्याशींच तुला विवाह करणें भाग आहे ! पण एवढ्यावरून मला त्याबद्दल वाईट वाटण्याचें कारण नाहीं, असें मात्र ठरत नाहीं. तूं आपल्या उच्च कुळाचा अभिमान सोडलास, हें जसें तुला लांच्छनास्पद आहे, तसेंच तिनेंही आपल्या आटोक्याबाहेरच्या थोर कुळांत घुसण्याची हांव धरली हें तिलाही लांछनास्पदच आहे ! ”

लॉर्ड मॅन्युअल चटकन उठून क्रुद्ध स्वरानें म्हणाले—“ प्रधानसाहेब, माफ करा, असले शब्द कोणाच्याही तोंडून निघाले तरी, ते मला बिल-कुल सहन होणार नाहींत ! माझ्या स्वतःबद्दल कांहींही बोलण्याचा आपल्याला मित्रत्वाच्या नात्यानें तरी थोडासा हक्क पोंचतो असें म्हणतां येईल, पण माझ्या वाग्निश्चित वधूची निंदा करण्याचा मात्र आपल्याला कोणत्याही प्रकारें अधिकार नाहीं ! असो, नमस्कार प्रधानसाहेब, येतों मी आतां ! ”

लॉर्ड मॅन्युअल रागानें बाहेर निघून गेले, तेव्हां लॉर्ड फ्रांझा म्हणाले—“ ठीक आहे, या ! तुमच्या ह्या कृत्याबद्दल तुम्हांला पश्चात्ताप कर-ण्याचा प्रसंग येऊं नये, एवढीच माझी ईश्वराजवळ प्रार्थना आहे ! कोण आहे रे बाहेर ? सेनापतिसाहेब कोठें आहेत ? ”

एक सेवक आंत येऊन हळूंच म्हणाला—“ ते बागेंत फिरत आहेत !”

लॉर्ड फ्रांझा—“ जा ! त्यांना आणि त्यांच्याबरोबर आलेल्या इस-माला इकडे पाठवून दे ! ” सेवक पुनः प्रणाम करून मुकाट्यानें निघून गेला व लॉर्ड फ्रांझा आपल्याशींच विचार करीत स्तब्ध बसले.

## प्रकरण ४ थें.

## हेराची निवड.



मॅन्युअल क्रिसोलराज यांच्या विनंतीप्रमाणें सर एडवर्ड बागेंत निघून गेले, ह्या वेळीं त्यांच्या अंतःकरणावरील एक मोठा काळजीचा बोजा दूर झाला असल्यामुळें, त्यांचें मन आनंदित व उल्हासपूर्ण झालें होतें. आपल्या सुखप्राप्तींत असलेली मोठी अडचण आपोआप दूर झाली, असें त्यांना दिसून आलें. आतां आपण थियोडोराच्या प्राप्तीकरितां जरी उघड प्रयत्न केले, तरी त्यामुळें तिच्या मनाला दुःख दिल्यासारखें होणार नाहीं, व मित्राशीं अनुचित वर्तन केल्याचा दोषही आपल्या माथीं येणार नाहीं, अशी त्यांची खात्री झाली. तथापि लॉर्ड फ्रांझासारखे अभिमानी गृहस्थ आपल्याला कितीही कुलीन व सुशील मानीत असले, तरी आपल्याला कन्या द्यावयास खुषीनें तयार होतील असें त्यांना वाटत नव्हतें. परंतु आपल्याला आपलें सामर्थ्य व शौर्य गाजविण्याचा प्रसंग लवकरच येण्याचा संभव आहे, त्या प्रसंगानें, कालांतरानें सर्व गोष्टी शक्य होतील, अशी त्यांना आशा वाटूं लागली. एकंदरींत ह्या आकस्मिक उत्पन्न झालेल्या स्थित्यंतरामुळें, आपल्या सुखाची आशा बाळगण्यास व तत्प्राप्त्यर्थ प्रयत्न करण्यास कांहीं हरकत नाहीं, असा विचार करून, त्यांनीं तत्काळ असा नवस केला कीं, थियोडोराशीं आपला विवाह होऊन, आपण तिच्यासह इंग्लंडांतील आपल्या रस्टनच्या वाड्यांत गृहप्रवेश केल्याबरोबर, तेथील देवालयास आपल्या जहागिरीपैकीं एक जमीन इनाम करून द्यावयाची !

ह्याप्रमाणें सुखाच्या विचारांत निमग्न होऊन, सर एडवर्ड वृक्षवाटिकेंतील पदपथावरून हळुहळू फिरत होते. कांहीं वेळानें ते फिरत फिरत अंमळ पुढें एका पुष्पवाटिकेंत गेले. तेथें सभोंवतीं फुल-झाडांचे ताटवे व्यवस्थेनें लावलेले असून मध्यभागीं बसण्याकरितां एक उंच चबुथरा केलेला होता. त्यावरून सभोंवती पाहिलें असतां, डार्डानेल्सिची सामुद्र-

धुनी, त्यापलीकडील आशियाच्या किनाऱ्यावरील टेंकड्या, गोल्डनहार्न, व राजधानींतील सुंदर इमारतींचे सोनेरी कळस इत्यादिकांची अपूर्व शोभा एकदम दृग्गोचर होत असे. ह्या चबुथऱ्याच्या सभोंवतीं लतामंडप तयार केलेला असून तो ह्या हिंवाळ्याच्या दिवसांतही फुलांपानांनीं गजबजलेला राखण्याची विशेष तजवीज केलेली होती. त्यामुळें चवथऱ्यावरील ह्या लतामंडपाच्या जवळ येईपर्यंत, तेथें कोणी तरी बसलेलें असेल, अशी सर एडवर्ड यांच्या मनांत कल्पनाही आली नाहीं.

सेनापति सर एडवर्ड चबुथऱ्यावरील लतामंडपाजवळ गेले, तों तेथें थियोडोरा एकटीच विचार करीत बसलेली त्यांच्या दृष्टीस पडली. ह्या अनपेक्षित प्रिय दर्शनानें त्यांचें मन आनंदानें भरून गेलें. ते आपल्या हृदयदेवतेकडे अनिमेष दृष्टीनें अवलोकन करीत क्षणभर जागच्या जागींच थबकून उभे राहिले. ते आपल्याशींच उद्गारले—" आतां जर मला थियोडोराचें प्रेम संपादन करितां आलें नाहीं, तर तो सर्वस्वीं माझाच दोष म्हटला पाहिजे!"

थियोडोरा आपल्याच विचारांत निमग्न असल्यामुळें, सर एडवर्ड लताकुंजाजवळ आलेले तिच्याही एकदम लक्षांत आले नाहींत. थियोडोराचा भव्य भालप्रदेश, गंभीर व पाणीदार नेत्र, सरळ व उन्नत नासिका आणि तेजस्वी गौरवर्ण तिच्या उच्च कुलीनत्वाची स्पष्ट साक्ष देत होतीं. तिच्या अंगावरील तत्कालीन पद्धतीप्रमाणें प्राच्य व पौर्वात्य मिश्र तऱ्हेचा बहुमोल व सुंदर पोषाख तिच्या सौंदर्यास अधिक खुलवीत होता. तिच्या सुंदर केशकलापाच्या साध्या बुचड्यावर फक्त एक मोत्यांचा गजरा घातलेला होता. त्यांवांचून तिच्या अंगावर दुसरा कोणताही अलंकार नव्हता; आणि अलंकाराची जरूरही नव्हती.

सर एडवर्ड लतामंडपाजवळ आलेले थियोडोराच्या दृष्टीस पडतांच ती चटकन उठून बाहेर चवथऱ्यावर आली, आणि त्यांच्याशीं स्मित पूर्वक स्वागतपर दोन शब्द बोलून तशीच आपल्या महालाकडे निघाली, तेव्हां सर एडवर्ड खिन्न स्वरानें म्हणाले—" आपण येथें आहांत हें मला माहीत असतें तर, आपल्या एकांत विश्रांतीचा भंग करावयास मी इकडे मुळींच आलों नसतों! प्रधानसाहेबांच्या भेटीकरितां मी आलों होतों,

पण ते दुसऱ्या कामांत गुंतलेले असल्यामुळें, त्यांना सवड होईपर्यंत वेळ घालविण्याकरितां मी सहज इकडे फिरत आलों ! आपला हा बगीचा फारच रमणीय आहे, आणि आज हवाही स्वच्छ आहे ! ”

सेनापति सर एडवर्ड यांनीं संभाषणाचा उपक्रम केल्यामुळें, थियोडोराला, बंगल्याकडे जाण्याचा विचार तहकूब करून, त्यांच्याशीं बोलणें भाग पडलें. अर्थात् उभयतांही एका पदपथावरून हळुहळू फिरूं लागलीं.

थियोडोरा आपल्या आवडत्या पुष्पवाटिकेकडे साभिमान अवलोकन करीत म्हणाली—“ हो. हें एकांत उद्यान मला फार आवडतें ! येथें शहरांतील गोंगाट गडबड बिलकूल नसते, आणि समोरचा समुद्राचा व किनाऱ्याचा देखावाही फार मनोहर दिसतो ! ”

सर एडवर्ड—“ खरोखरच येथील शोभा अवर्णनीय आहे ! बादशहासरकारच्या बगीचाला इतका खर्च झाला आहे, आणि नेहमीं त्याची इतकी जोपासना असते, तथापि तेथें देखील अशी रमणीयता दिसत नाहीं ! दोन वर्षांपूर्वीं मी ह्या शहरांत नवीन आलों, त्या वेळीं आपली प्रथम येथेंच भेट झाली होती, त्यामुळें तर हें स्थान मला विशेषच मोहक वाटतें ! ”

थियोडोरा—“ हो, त्या वेळीं मी कांहींशी अज्ञानच होतें, आणि ह्या बागेवर आणि ह्या चबुतऱ्यावर तेव्हां देखील माझें किती प्रेम होतें, हें आपल्याला स्मरत असेलच ! ”

सर एडवर्ड—“ आपल्या कोणत्याही गोष्टीचा मला कधींच विसर पडणें शक्य नाहीं ! त्या वेळची सर्व हकीगत तर नेहमीं माझ्या डोळ्यांपुढें असते ! ”

सेनापतीच्या भाषणांतील ध्वनि थियोडोराच्या लक्षांत येऊन, ती विषय बदलण्याच्या उद्देशानें म्हणाली—“ आपल्या इंग्लंडांत अशीं रमणीय स्थळें पुष्कळ असतील नाहीं ? ”

सर एडवर्ड—“ छे छे, इतकें शांत व मनोवेधक सृष्टिसौंदर्य आमच्या इंग्लंडांत अत्यंत दुर्मिळ आहे ! तेथील समुद्र इतका शांत कधींच असत नाहीं; तसेंच ह्या दिवसांत आपण येथें वृक्षछायेंत आनंदानें फिरत आहों, जिकडे तिकडे फुलें फुललेलीं आहेत, आणि वृक्षांवर बसून

पक्षी मधुर गायन करीत आहेत, पण इंग्लंडांत ह्या वेळीं भयंकर वादळ होत असेल, बर्फाची वृष्टि होत असेल, झाडांना एक पान किंवा रानांत हिरव्या गवताची एखादी काडीही दृष्टीस पडत नसेल, आणि जिकडे तिकडे उदास व कष्टमय देखावा दिसत असेल!"

थियोडोरा—"बाबा अजून सभेहून परत आले नाहींत कीं काय?"

सर एडवर्ड—"ते नुकतेच आले आहेत, पण लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास यांचें महत्त्वाचें काम असल्यामुळें, ते अगोदर त्यांच्या भेटीस गेले!"

थियोडोरा साहजिक स्वरानें म्हणाली—"कांहीं तरी सरकारी काम असेल?"

सर एडवर्ड—"नाहीं, त्यांचें खासगीच काम आहे, आणि तेंही कांहीं गुप्त नाहीं! लवकरच ते आपल्या नवपरिणीत सुंदर पत्नीसह राजदर्शन करतील, व दरबारी मंडळींत एका नवीन सुंदर तरुणीची भर पडेल, असें वाटतें!"

थियोडोरा—"खरें कीं काय? पण त्यांत बाबांचा काय संबंध?"

सर एडवर्ड—"त्यांच्याशीं तर विशेष निकट संबंध आहे! ती गोष्ट आतां उघड सांगावयास कांहीं हरकत नाहीं! लॉर्ड मॅन्युअल यांचा सिलिव्हरीच्या कोतवालांच्या कन्येशीं वाग्निश्चय झाला आहे!"

थियोडोरा—"होय का? त्यांचा हा गृहस्थाश्रम त्यांना शुभदायक व सुखप्रद होवो, अशी माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे! लॉर्ड मॅन्युअल हे शूर, थोर, सुशील व कुलीन गृहस्थ आहेत, त्यांची निवड त्यांच्या योग्यतेला साजेशीच असेल, यांत शंका नाहीं!"

सर एडवर्ड—"आपल्या रोमन साम्राज्यांतील सर्व सरदार मंडळींत त्यांच्या तोडीचा सद्गुणी सरदार दुसरा क्वचितच सांपडेल! हें मी आतां आपल्याला मोठ्या आनंदानें व अभिमानानें सांगत आहें, पण काल मात्र इतक्या उल्हासानें माझ्यानें बोलवलें नसतें!"

थियोडोरा—"काल काय, आणि आज काय, सेनापतिसाहेब आपण आपल्या मित्रासंबंधानें मला प्रामाणिकपणें एकसारखेंच सांगितलें असतें, अशी माझी खात्री आहे! पण त्यांचा हा वाग्निश्चय कधीं झाला? आता

पर्यंत माझ्या कानावर त्यांतील एक अक्षरही कधीं आलें नाहीं !"

सर एडवर्ड—"ही बातमी आजपर्यंत त्यांनीं कोणालाच कळूं दिली नव्हती. कारण, प्रधानसाहेबांच्या कानावर ही हकीगत आपल्याशिवाय दुसऱ्या कोणाच्याही तोंडून जाऊं नये अशी त्यांची इच्छा होती. प्रधान-साहेबांचें लॉर्ड मॅन्युअलवर अत्यंत प्रेम आहे, आणि त्यांचीही प्रधान-साहेबांबद्दल तशीच आदरबुद्धि आहे ! बाकी हा वाग्निश्चय होऊन चार महिने झाले आहेत, असें त्यांनींच मला मघाशीं सांगितलें."

थियोडोरा—"अजून त्यांचें बाबांशीं बोलणें चाललेंच आहे का ?"

तिचा उद्देश लक्षांत येऊन सर एडवर्ड म्हणाले—"त्यांची मुलाखत संपली असेल, किंवा इतक्यांत संपेल ! पण आपला व ह्या मनोहर उद्यानाचा निरोप घेण्यापूर्वीं, लॉर्ड मॅन्युअलच्या वाग्निश्चयाची हकीगत ऐकल्यापासून माझ्या अंतःकरणांत जी आशा उद्भूत झाली आहे ती आपल्या कानावर घालण्याचें धाडस करूं का ?"

थियोडोरा कांहींच उत्तर न देतां खालीं पाहूं लागली. तथापि तिचें मुखकमल किंचित् आरक्त झालेलें पाहून सर एडवर्डना धैर्य आलें. ते प्रेमपूर्ण स्वरानें म्हणाले—"थियोडोरा, प्राणप्रिय थियोडोरा, तुमचे वडील कामगिरीवर गेल्या मुदतींत आपला जरी अल्प काळ वियोग झाला, तरी तत्पूर्वीं बरेच दिवसांपासून मी तुम्हांला प्राणापेक्षांही प्रिय मानितों, हें तुम्हीं पाहिलें असेल व तुमच्या लक्षांतही आलें असेलच ! आतां—"

इतक्यांत प्रधानसाहेबांचा सेवक गडबडीनें धांवत येऊन म्हणाला—"सेनापतिसाहेब, धनीसाहेब मोकळेच आहेत, आणि त्यांनीं आपल्याला भेटीस येण्याविषयीं विनंति करावयास मला आज्ञा केली आहे !"

सर एडवर्ड—"ठीक आहे, मी आलोंच ! जा तूं प्रधानसाहेबांना कळीव जा !"

सेवक निघून गेल्यावर सर एडवर्ड पुनः कांहीं बोलणार होते, इतक्यांत थियोडोरा अस्फुट स्वरानें म्हणाली—"चला, चला, सेनापति-साहेब, सरकारी कामाची हरकत होईल, आणि बाबांचा खोळंबा होईल ! आपण जें आतां सांगितलें, तें सांगण्याचें कांहीं कारण नव्हतें. सर्व

गोष्टी माझ्या ध्यानांत आहेत. पण तूर्त ह्या धांदलीच्या वेळीं तो विषय राहूं द्या. आपली पुनः केव्हां तरी भेट होईलच ! "

सर एडवर्ड आनंदानें म्हणाले--" माझ्या बोलण्याचा आपल्याला राग न येतां, आपण पुनः भेटण्याची इच्छा प्रदर्शित केली, ह्यावरून मला निराश होण्याचें कारण नाहीं, अशी माझी खात्री होऊन, मला अवर्णनीय आनंद झाला आहे ! आहाहा ! जिवलग थियोडोरा, पुनः आपली भेट लवकरच होईल ना ? "

थियोडोरा लज्जित स्वरानें म्हणाली--" हो, पण आतां आपण जा कसे ! "

आपलें प्रेमरहस्य इतक्यांतच परिस्फुट होऊं नये, अशी सर एडवर्ड यांचीही इच्छा असल्यामुळें, त्यांना अधिक वेळ तेथें राहतां येईना, म्हणून नाइलाजास्तव त्यांना तेथून परत जाणें भाग पडलें. थियोडोराही चटकन महालांत निघून गेली.

बागेंतून बंगल्याकडे परत येत असतां सर एडवर्ड आपल्याशींच म्हणाले--" हा सेवक आणखी थोड्या वेळानें आला असता, तर बरें झालें असतें ! तरी पण आरंभ कांहीं वाईट झाला नाहीं ! तिच्या मनांत माझ्याविषयीं जर अगदींच अनादर असता, तर तिनें माझें एवढेंही बोलणें मुकाट्यानें ऐकून घेतलेंच नसतें ! पुनः लवकरच भेटीची संधि आणिली पाहिजे ! पुढील भेटींत आपल्या कार्याची बरीच प्रगति होईल असें वाटतें ! "

सर एडवर्ड ह्याप्रमाणें विचार करीत लॉर्ड फ्रांझांच्या खोलींत आले, तों ते रिचर्ड बर्स्टाशीं बोलत असल्याचें त्यांच्या दृष्टीस पडलें.

" या सेनापतिसाहेब ! " लॉर्ड फ्रांझा सर एडवर्डचें स्वागत करून म्हणाले--" तुमचा हा मनुष्य बरा दिसतो आहे ! आपल्या कामाला हा पूर्णपणें लायख आहे असें वाटतें, आणि बादशहांनाही तो पसंत पडेलसें दिसतें ! "

सर एडवर्ड--" तो आपल्या पसंतीला उतरला, हें पाहून मला आनंद झाला ! बरें आपण सभेहूनच थेट इकडे आलां का ? "

लॉर्ड फ्रांझा--" होय ! सर्व गोष्टी बहुतेक जुळतील असा रंग

आहे ! ”

सर एडवर्ड—“ होय सरकार ! माझ्या पूर्ण खात्रीचा मनुष्य मिळाला आहे आणि त्याला मी येथें बरोबर घेऊन आलों आहें ! ”

बादशहा—“ होय का ? बोलवा तर त्याला इकडे, म्हणजे आम्हीही पाहूं ! ”

सर एडवर्डनीं बाहेर जाऊन एका हुजऱ्याला रिचर्ड बर्स्टोला बोलावून आणावयास पाठविलें, आणि आंत येऊन बादशहाला त्याच्या संबंधानें थोडक्यांत माहिती सांगितली. इतक्यांत रिचर्ड हळूच खोलींत येऊन बादशहास प्रणाम करून दाराशीं उभा राहिला.

बादशहा त्याच्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें अवलोकन करीत म्हणाले—“कायरे तुला आम्हीं पूर्वीं कोठें तरी पाहिलेलें आहे ! मला वाटतें, परवां व्हेनि-सचें एक व्यापारी गलबत बुडाल्याची बातमी आम्हांला सांगावयास आलेला, तो तूंच असावास ! ”

रिचर्ड लीनतेनें म्हणाला—“ सरकारची स्मरणशक्ति फार विलक्षण आहे. होय सरकार, मींच तो महाराजांचा दासानुदास ! ”

बादशहा—“ बरें, तुला तुझी कामगिरी समजली आहे का ? आड्रियानोपल येथें हल्लीं सुलतान महमदाच्या काय काय खटपटी व तजविजी चालल्या आहेत, ह्याची शक्य तितकी विश्वसनीय बातमी आम्हांला मिळावयास पाहिजे आहे ! तुला तुर्की वेष व बतावणी बेमालुम करितां येईल, अशी सेनापति खात्री सांगतात ! ”

रिचर्ड—“ होय सरकार ! त्याविषयीं माझ्या मनांत मुळींच दिक्कत नाहीं ! माझी आई तुर्कस्थानांत राहणारीच असल्यामुळें, तिच्या सह-वासानें मला तुर्की भाषा व चालीरीति यांची पूर्ण माहिती लहानपणा-पासूनच झालेली आहे.

बादशहा—“ ठीक आहे ! पण तुला ह्या कामीं सर्व अकल खर्च करावी लागेल. कारण, तुर्कांना जर तुझ्याबद्दल यत्किंचित् शंका आली तर त्याचा परिणाम काय होईल हें तुला माहीतच आहे ! असो. सध्यां सुलतान महमद तेथें काय तयारी करीत आहे, हें विशेषतः आम्हांला समजावयास पाहिजे. त्याची तोफखान्याची तयारी कशी काय आहे,

सैन्याची संख्या किती आहे, त्यांचा कॉन्स्टांटिनोपलवर—ईश्वरास प्रिय असलेल्या ह्या शहरावर—हल्ला करावयाचा बेत आहे कीं काय, त्यासंबंधानें त्यानें विशेष तजवीज काय काय केली आहे, आणि त्याला बाहेरून, कोठून किती मदत मिळणार आहे, इत्यादि सर्व गोष्टींची विश्वसनीय माहिती आम्हांला मिळाली पाहिजे. ”

रिचर्ड—“ सरकारच्या आज्ञेप्रमाणें मी ही सर्व माहिती मिळवीन.”

बादशहा—“ आणि ती शक्य तितकी लवकर मिळाली पाहिजे ! आठ दिवसांत परत येथें येऊन, आम्हांला सर्व हकीगत सांग ! ”

रिचर्ड—“ आज्ञा सरकार. ”

बादशहा सर एडवर्डकडे वळून म्हणाले—“ सेनापति, ह्याला आमच्या पागेपैकीं एक उत्तम घोडा द्या ! आणि प्रधानजी, ह्याला खर्चाकरितां शंभर मोहोरा देऊन, उद्यां सकाळींच ह्याची रवानगी करा. कायरे, उद्यां सकाळपर्यंत तुझी निघण्याची तयारी होईल ना ? ”

रिचर्ड—“ सरकारच्या आज्ञेप्रमाणें मी उद्यां सूर्योदयाच्या आंत आपल्या कामगिरीवर रवाना होईन. ”

बादशहा—“ ठीक आहे. ईश्वर तुझें रक्षण करो ! प्रधानजी, आतां फक्त तुमच्याकडे थोडेंसें काम आहे.

बादशहाची सूचना लक्षांत येऊन, सर एडवर्ड व रिचर्ड हे दोघेही तत्काळ बादशहाचा निरोप घेऊन तेथून निघाले व सर एडवर्ड रिचर्डसह आपल्या बंगल्यांत आले.

आपल्या दिवाणखान्यांत येऊन बसल्यावर सर एडवर्ड रिचर्डला म्हणाले—“ रिचर्ड, तुझ्याकडे मोठी बिकट पण फार महत्त्वाची कामगिरी आली आहे. आपल्या हुजुरातीची सर्व अब्रू आतां तुझ्या हातीं आहे. ती संभाळण्याकरितां तुला जिवावरही उदार व्हावें लागेल, हें लक्षांत ठेव, ईश्वर तुला ह्या कामीं भरपूर धैर्य देऊन साह्य करो ! ”

रिचर्ड—“ धनीसाहेब, माझ्या धैर्याविषयीं आपण बिलकुल चिंता बाळगूं नये ! स्वसंरक्षणाचा तर मी शक्य तितका प्रयत्न करीनच, पण दुर्दैवानें कठिण प्रसंग आलाच तर, माझें, हुजुरातीचें व आपलें नांव गमावण्यापेक्षां मी आनंदानें प्राण समर्पण करीन ! बरें, निघण्यापूर्वी

पुनः एकदां आपली भेट होईल ना ?"

सर एडवर्ड—"तुझ्याबद्दल माझी खात्री होती, म्हणूनच मीं प्रथम तुझीच निवड केली. फार हुषारीनें व सावधगिरीनें वाग. ह्या कामांत यश संपादन केलेंस म्हणजे तुझें जन्माचें कल्याण होईल, हें आतां तुला सांगावयास नकोच. रात्रीं दहा वाजल्यानंतर ये, म्हणजे तुला आणखी कांहीं सांगावयाचें आहे, तें सांगेन."

---

## प्रकरण ९ वें.

## सिलिव्हरीवर छापा.



लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास हे लॉर्ड फ्रांझाचा निरोप घेऊन निघाल्यावर प्रथम त्यांच्या मनांत असा विचार आला कीं, असेंच परत सिलिव्हरीला जावें; पण पुनः त्यांना स्मरण झालें कीं, आज सायंकाळीं राजवाड्यांत मेजवानी असून, आपल्याला त्या समारंभास हजर राहण्याविषयीं सरकारची आज्ञा आहे, तेव्हां तो विचार सोडून देऊन, ते आपल्या वाड्याकडे वळले. मेजवानीच्या प्रसंगीं लॉर्ड फ्रांझा व थियोडोरा यांची गांठ पडणार, तेव्हां त्यांच्याशीं कसें वागावयाचें, हेच विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले. आपण आजपर्यंत त्यांना पितृतुल्य मानिलें आहे, त्याअर्थीं त्यांच्याशीं ह्यापुढेंही तितक्याच आदरानें वागावयाचें, असा त्यांनीं निश्चय केला.

सायंकाळीं नेमल्या वेळेला लॉर्ड मॅन्युअल राजवाड्यांत हजर झाले. मेजवानीला राजधानींतील बहुतेक सर्व प्रमुख सरदार व अधिकारी आलेले होते. त्या गर्दीमुळें त्या प्रसंगीं मॅन्युअलला लॉर्ड फ्रांझाशीं बोलण्याचें फारसें कारणच पडलें नाहीं. ते बादशहांच्या आज्ञेप्रमाणें मेजवानीची सर्व व्यवस्था करण्यांत गुंतले होते. सर एडवर्डही मेजवानीस आले होते. मॅन्युअल त्यांच्याशींच बोलत बसले. त्या उभयतां मित्रांनीं आपापली हकीगत मोठ्या आनंदानें व मोकळ्या मनानें परस्परांस सांगितली.

बोलतां बोलतां लॉर्ड मॅन्युअल हंसून म्हणाले—" शंभर वर्षांपूर्वीच्या काळांत अशा स्थितींत बादशहांनीं आपल्या हुकमाच्या व सत्तेच्या जोरावर आम्हाला आपल्या मर्जीप्रमाणें वागावयास लावलें असतें! पण सुदैवानें आतां तसा काळ उरला नाहीं!"

सर एडवर्ड—" हो, आणि पुनः तसा काळ येण्याचाही संभव नाहीं! आतां तुमचा व प्रधानसाहेबांचा स्नेहसंबंध कायम राखण्याचा प्रयत्न मात्र केला पाहिजे! ह्या बाबतींत माझ्यानें होईल तितकी खटपट मी करीनच, तथापि त्यांनींही काळपरिस्थितीचा विचार करून योग्य सवलती दिल्या पाहिजेत, आणि तुम्हींही त्यांच्या मनोभंगाकडे लक्ष देऊन, त्यांच्यावर रागावतां कामा नये!"

लॉर्ड मॅन्युअल—" ठीक आहे. आपल्या सूचनेप्रमाणें वागण्यास मी तयार आहें आणि तुम्ही माझ्याकरितां ही मध्यस्थी करण्याचें मनावर घेतलें आहे, ह्याबद्दल मी तुमचा फार आभारी आहे. आतां ह्या सर्व कामाचा भार मी तुमच्यावरच सोंपवितों. मी उद्यां तुमची गांठ घेईन, म्हणजे तुम्हांला कितपत यश आलें हें समजेल!"

मेजवानीचा समारंभ खलास होण्यास मध्यरात्र उलटून गेली. नंतर लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास आपल्या उमद्या घोड्यावर स्वार होऊन आपल्या वाड्याकडे परत गेले. रात्र अगदीं काळोखी होती, पण लॉर्ड मॅन्युअलबरोबर दोन मशालीचे हुजरे असल्यामुळें, त्यांना रस्त्यांत कांहीं त्रास झाला नाहीं. ते आपल्या वाड्याजवळ येतांच दरवानानें दरवाजा उघडला व तो पुढें येऊन नम्रपणें म्हणाला—" धनीसाहेब, सिलिव्हरीहून एक हलकारा आला असून, तो आपल्या भेटीची अगदीं वाट पहात बसला आहे!"

लॉर्ड मॅन्युअल—" सिलिव्हरीहून आला आहे? कोण आहे तो? कोठें आहे? त्यानें काय बातमी आणिली आहे?"

इतक्यांत एका परकी इसमानें पुढें येऊन प्रणाम केला. मशालींच्या धगधगींत प्रकाशांत त्याला तत्काळ ओळखून लॉर्ड मॅन्युअल चकित स्वरानें म्हणाले—" कोण? डेमिट्रियस! का रे? काय वर्तमान?"

" हाय हाय! लॉर्डसाहेब!" डेमिट्रियस अडखळत म्हणाला,

पण पुढें त्याच्या तोंडून शब्दच निघेना. तो खालीं मान घालून स्तब्ध उभा राहिला.

" अरे पण झालें काय, तें लौकर सांग ! " लॉर्ड मॅन्युअल घोड्यावरून खालीं उडी टाकून त्याच्याजवळ येऊन भयभीत स्वरानें म्हणाले. पण तो कांहींच बोलेना, तेव्हां ते संतापून ओरडले—" बोल चटकन्, नाहीं तर मार खाशील ! "

डेमिट्रियस कंपित स्वरानें म्हणाला—" काय सांगूं, सरदारसाहेब ! तुर्कांनीं माझ्या धन्याच्या घरचीं सर्व माणसें धरून नेलीं ! "

लॉर्ड मॅन्युअल—" कोणी ? तुर्कांनीं ? कोणाला धरून नेलें ? गाढवा, तूं शुद्धीवर आहेस, कीं दारू प्याला आहेस ? मी तर नुकताच तेथून आलों ? "

डेमिट्रियस—" नाहीं सरकार, मी पूर्ण शुद्धीवर असून, घडलेली खरी हकीगत सांगत आहे ! आपण इकडे निघून आल्यावर तुर्कांच्या एका टोळीनें सिलिव्हरीवर छापा घातला, आणि धनीसाहेबांच्या वाड्यांत घुसून, त्यांना, बाईसाहेबांना व ताईसाहेबांनाही कैद करून नेलें ! "

हें वर्तमान ऐकून लॉर्ड मॅन्युअल अगदीं स्तंभित व हतबुद्ध होऊन गेले. कांहीं वेळानें ते म्हणाले—" राजधानीच्या इतक्या जवळ येऊन दंगाधोपा करण्याची तुर्कांची छाती तरी कशी झाली ? "

डेमिट्रियस—" आपण गेल्यानंतर थोड्याच वेळानें अशी बातमी आली कीं, शें दीडशें तुर्की स्वारांची एक टोळी, शोरलू व कारामिस्ली यांच्या दरम्यानच्या खिंडींतून सिलिव्हरीच्या रोखानें येत आहे. तत्काळ बायका माणसांना नावेंतून कॉन्स्टांटिनोपलला रवाना करण्याचें आमच्या धनीसाहेबांनीं ठरविलें, आणि आपण स्वतः सिलिव्हरीच्या कोटांत राहून त्या गांवाचें संरक्षण करावयाचा त्यांनीं निश्चय केला. त्याप्रमाणें नावाड्यांनीं नाव तयार करून आणिली; बाईसाहेब, ताईसाहेब व एक दासी यांच्यासह धनीसाहेब वाड्यांतून बाहेर पडले, पण तितक्यांत तुर्की स्वारांची टोळी टेंकडी ओलांडून एकदम त्यांच्यावर चाल करून आली, त्यांनीं तत्काळ आपल्या टोळीचे दोन भाग केले, आणि एक भाग आमच्या वाड्यावर चालून आला व दुसरा सिलिव्हरी गांवावर गेला.

वाड्यांत एकाएकीं इतका गोंधळ उडाला कीं, पुढें काय झालें हें मला कांहींच कळलें नाहीं. अखेरीस धनीसाहेब, बाईसाहेब व ताईसाहेब ह्या तिघांनाही तुर्कांनीं धरून नेल्याचें समजलें, तेव्हां मी इकडे आपल्याला ही हकीकत कळविण्यासाठीं धांवत आलों! सिलिव्हरी गांवाची तर दुर्दशा उडाली आहे म्हणतात!"

मॅन्युअल—"त्या तिघांपैकीं कोणाला कांहीं इजा, दुखापत झाली कीं काय?"

डेमिट्रियस—"नाहीं सरकार, तसें कांहीं दिसलें नाहीं! आम्ही सर्व बेसावध व निःशस्त्र असल्यामुळें, तुर्कांना तेथें आपल्या तलवारी म्यानांतून बाहेर देखील काढाव्या लागल्या नाहींत!"

मॅन्युअल—"ठीक आहे! तुर्कांचा ह्या अत्याचाराबद्दल पुरा सूड घेतल्यावांचून मी सोडणार नाहीं! डेमिट्रियस, तूं माझ्याबरोबर राजवाड्यांत चल, आणि निसिफोरस, मेथोडियस, तुम्हीही या!"

लॉर्ड मॅन्युअल पुनः घोड्यावर बसून राजवाड्याकडे निघाले, तेव्हां त्यांचे तिघे अनुचरही त्यांच्या पाठोपाठ धांवत चालले. थोड्याच वेळांत ते राजवाड्याच्या दरवाज्यांत येऊन दाखल झाले. दरवाजा बंद होता. बाहेरील पाहरेवाला चटकन् पुढें आला, आणि त्यांना ओळखून प्रणाम करून उभा राहिला. मॅन्युअल त्याला म्हणाले—"मला आतांच्या आतां सेनापतींची गांठ घ्यावयाची आहे, दरवाजा उघड!"

पाहऱ्यावरील नाईक पुढें येऊन म्हणाला—"तर मग सरदारसाहेबांना परवल माहीत असेलच!"

मॅन्युअल त्रासिक स्वरानें म्हणाले—"परवल मला कोठून माहीत असणार? मला कांहीं सेनापतींनीं भेटीस बोलावलेलें नाहीं! एक आकस्मिक भयंकर आपत्ति उत्पन्न झाल्यामुळें मला त्यांची ताबडतोब भेट घेऊन कांहीं तरी तजवीज करणें भाग आहे!"

नाईक—"माफी असावी, सरदारसाहेब, परवलशिवाय कोणताही दरवाजा उघडूं नये, असा आम्हांला सक्त हुकूम असल्यामुळें, आमचा नाइलाज आहे!"

मॅन्युअल—"तर मग सेनापतींना कळावा कीं, मी अत्यंत महत्वाच्या

कामाकरितां त्यांच्या भेटीस आलों आहे! मी कोण हे तुम्हांला ठाऊक आहे ना?"

नाईकानें आपल्या सोबत्याशीं विचार करून मॅन्युअलच्या सांगण्या-प्रमाणें करण्याचें ठरविलें. नंतर तो लॉर्ड मॅन्युअलला म्हणाला—"होय, सरदारसाहेब, आपल्या आज्ञेप्रमाणें तजवीज करितों!"

नाईक दिंडी उघडून आंत निघून गेल्यावर मॅन्युअल आपल्याशींच विचार करूं लागले. राजद्वारावर रात्रींच्या वेळीं आणि विशेषतः सध्यांच्या प्रसंगीं इतका सक्त बंदोबस्त असणें अवश्यच आहे अशी त्यांची खात्री झाल्यामुळें, त्यांना पहारेवाल्यांचा किंवा सेनापतीचा मुळींच राग आला नाहीं.

सुमारें पंधरा मिनिटांत पुनः दिंडी उघडली गेली, आणि नाइकाच्या मागोमाग खुद्द सेनापति सर एडवर्ड लॉर्ड मॅन्युअलच्या पुढें येऊन उभे राहिले.

"कां, सरदारसाहेब?" सर एडवर्ड चकित स्वरानें म्हणाले—"एकाएकीं आपली स्वारी अशी गडबडीनें परत कां आली? आपला चेहरा असा खिन्न कां दिसतो? काय भानगड आहे?"

लॉर्ड मॅन्युअल घोड्यावरून खालीं उडी टाकून सेनापतीचा हात धरून म्हणाले—"आपली कांहीं हरकत नसेल तर, आपल्या बंगल्यांत चला, म्हणजे तेथें सर्व हकीगत सांगतों! फार कठिण प्रसंग आला आहे!"

"होय का? चला तर!" असें म्हणून सर एडवर्ड आपल्या मित्रासह दरवाज्यांतून आंत गेले, आणि लॉर्ड मॅन्युअलच्या अनुचरां-सही त्यांनीं आंत सोडण्यास पाहरेवाल्यास सूचना केली. त्याप्रमाणें सर्व मंडळी आंत गेल्यावर पुनः दिंडी बंद झाली.

दोघेही मित्र आपल्या बैठकीच्या खोलींत येऊन बसल्यावर सर एडवर्ड म्हणाले—"हं, सांगा आतां काय तें! तुमच्या मुद्रेवरून कांहीं तरी विलक्षण गोष्ट घडून आली असावी, असें दिसतें!"

लॉर्ड मॅन्युअलनीं सिलिव्हरीची सर्व हकीगत थोडक्यांत सांगितली. ती ऐकून सर एडवर्ड कांहीं वेळ आपल्याशींच विचार करीत बसले.

ही आकस्मिक व अनपेक्षित वार्ता ऐकून तेही अगदीं स्तंभितच होऊन गेले. कांहीं वेळानें ते म्हणाले—" फार भयंकर! खरोखरच विकट प्रसंग! पण आतां असा विचारांत आणि खेद प्रदर्शनांत वेळ दवडणें श्रेयस्कर नाहीं! पुढें काय करावयाचें, हें चटकन निश्चित केलें पाहिजे!"

लॉर्ड मॅन्युअल खिन्न स्वरानें म्हणाले—" काय करावें असें आपलें मत आहे? मला तर कांहींच सुचेनासें झालें आहे!"

सर एडवर्ड—"ज्याना तुर्कांनीं धरून नेलें आहे, त्यांना सोडविण्याचा प्रयत्न केला पाहिजे! हें काम साहसाचें आहे खरें, पण त्यावांचून गत्यंतर नाहीं! शहरचे कोतवाल येथील लष्कराची एखादी तुकडी ह्या वेळीं बाहेर पाठविण्यास मुळींच तयार होणार नाहींत. आणि कदाचित् ते भिडेनें तयार झाले तरी, लष्कराची जुळवाजुळव होऊन तें रवाना होईपर्यंत कैदी मंडळी आड्रियानोपलला पोंचतील देखील! मग त्याचा काय उपयोग! तें कांहीं नको; आतां मी माझ्याच जबाबदारीवर तुम्हांला शक्य तितकी मदत करण्याची तजवीज करितों! एक मनुष्य आड्रियानोपलची बातमी काढून आणण्याकरितां पाठवावयाचा आहे; हें मीं आज दुपारीं आपल्याला प्रधानसाहेबांच्या बंगल्यांत सांगितलेलें आठवतच असेल. तो मनुष्य आमच्या हुजुरातीपैकींच असून, तो उद्यां पहाटेसच निघावयाचा आहे. त्याची निघण्याची सर्व तयारी झाली आहे!"

लॉर्ड मॅन्युअल—" होय का? हें नव्हतें मला समजलें! पण त्याचा आमच्या ह्या कामाशीं काय संबंध?"

सर एडवर्ड—" तो मनुष्य माझ्या अत्यंत भरंवशांतला आहे. मी माझ्या जबाबदारीवर त्याला ह्या तुर्की स्वारांच्या टोळीचा माग काढावयास सांगतों. तुम्ही त्याच्या बरोबरच चला. तुम्ही आपले कांहीं खासगी सशस्त्र नोकर बरोबर घ्यालच. शिवाय मी आणखी दहा इसम तुमच्या बरोबर देतों. ह्याचा परिणाम काय होईल हें जरी आतांच निश्चित सांगतां येणें शक्य नाहीं, तथापि ती टोळी आड्रियानोपलला पोंचण्यापूर्वीं त्यांना वाटेंत गांठतां येण्याचा संभव आहे. आणि तुम्ही आमच्या रिचर्डच्या तंत्रानें सावधगिरीनें वागाल तर, तुम्हांला यश येण्याचाही पुष्कळ संभव आहे."

" आहाहा, सेनापतिसाहेब," लॉर्ड मॅन्युअल कृतज्ञतेनें आपल्या मित्राचे हात धरून म्हणाले--"हे आपले मजवर मोठेच उपकार आहेत, ईश्वर तुमचें कल्याण करो ! पण आम्हांला केव्हां निघतां येईल ?"

सर एडवर्ड--" तुमच्या दिमतीस दहा इसम कोण द्यावयाचे, ह्याचा विचार करून, व त्यांना बोलावून आणून मी वेळ ठरवितों. एक तासाच्या आंत माझे लोक निघावयास सिद्ध होतील. पण तोंपर्यंत तुमची तयारी होईल ना ?"

लॉर्ड मॅन्युअल--" हो हो, माझी आतां देखील तयारी आहे ! माझे दोन नोकर माझ्या बरोबर आहेतच, आणखी चार सहा इसम घेतों, म्हणजे झालें."

सर एडवर्ड--" तुमच्या पूर्ण भरंवशाचे असतील तेवढेच घ्या. उगीच खोगीरभरती करून, रिकामी अडचण मात्र होईल ! बरें तर आपल्या सर्व तयारीनिशीं पुनः येथें या, तोंपर्यंत मी आपले लोक जमवून तयार करितों."

लॉर्ड मॅन्युअल--" ठीक आहे. मी माझ्या सहा सशस्त्र लोकांसह अर्ध्या तासाच्या आंत पुनः येथें येऊन हजर होतों."

लॉर्ड मॅन्युअल निघून गेले, व सर एडवर्ड आपल्या तजविजीस लागले. त्यांनीं आपल्या लष्कराचें हजेरीपत्रक घेऊन, त्यावरून खात्रीचे दहा शूर शिपाई निवडून काढले. नंतर आपल्या नोकरांकडून त्यांना तावडतोब बोलावून आणून थोडक्यांत त्यांना कामगिरी समजून दिली, आणि झटकन् तयार होऊन येण्यास फर्माविलें.

सुमारें अर्ध्या तासानें लॉर्ड मॅन्युअल पुनः सर एडवर्डच्या दिवाणखान्यांत आले व गडबडीनें म्हणाले-- " कां ? झाली का तयारी ? मी सर्व सिद्धतेनें आलों आहें !"

सर एडवर्ड--" आमचीही तयारी आहे ! तुमच्या बरोबर द्यावयाचे दहा इसम निवडून, त्यांना तयार होऊन येण्यास सांगितलें आहे. ते इतक्यांत येतील. बादशहा सरकारांनीं उद्यां विचारलें तर, मी सर्व जबाबदारी स्वतःवर घेऊन त्यांना जाब देईन ! बरें, आपण किती इसम बरोबर आणिले आहेत ?"

लॉर्ड मॅन्युअल—" फक्त चार असामी ! पण ते जिवास जीव देण्यासारखे पूर्ण विश्वासू आहेत ! "

सर एडवर्ड—" ठीक आहे. तुमचे चार नोकर, तुम्ही स्वतः, आणि रिचर्ड बर्स्टो मिळून सहा असामी झाले. शिवाय आमचे दहा शिपाई, मिळून सोळा असामींची तुकडी तयार झाली ! मलाही तुमच्याबरोबर येतां आलें असतें तर बरें झालें असतें ! "

लॉर्ड मॅन्युअल—" हो, मला देखील फार आनंद झाला असता, पण इलाज नाहीं ! बरें, आम्ही कोणत्या मार्गानें जाणें सोईचें होईल ?"

सर एडवर्ड—" संध्याकाळीं, म्हणजे काल संध्याकाळीं किती वाजतां त्यांना धरून नेलें ? "

लॉर्ड मॅन्युअल—" बहुतेक तीन वाजण्याच्या सुमारास त्यांच्यावर हल्ला झाला असावा, असे डेमिट्रियसच्या सांगण्यावरून दिसतें ! "

सर एडवर्ड—" आणि ते तुर्की स्वार शोलरूच्या बाजूनें आले नव्हे का ? म्हणजे ते आड्रियानोपलहूनच आलेले असावे ! आतां लुटीचा बोजा त्यांच्या बरोबर असल्यामुळें, ते उद्यांच आड्रियानोपलाला परत जाऊन पोंचतील असें वाटत नाहीं ! त्या अर्थीं तुम्ही त्याच रोखानें जोरानें पाठलाग करा. घोड्यांच्या जिवाकडे देखील पाहूं नका. जरूर त्यापेक्षां अधिक क्षणभर सुद्धां कोठें थांबूं नका. कारण, त्यांना आड्रियानोपलला पोंचण्यापूर्वीं गांठलें पाहिजे, तरच कांहीं तरी उपयोग होईल. एकदां किल्ल्यांत पोंचल्यावर मग तुमचा कांहीं इलाज चालणार नाहीं ! "

लॉर्ड मॅन्युअल—" तुम्ही म्हणतां तें अगदीं खरें ! पण हे तुमचे शिपाई केव्हां येतात ? एकेक क्षण ह्या वेळीं एकेका तासाच्या मोलाचा आहे ! "

सर एडवर्ड—" ते इतक्यांत येतील, त्यांची नको काळजी ! तुम्ही फारच त्वरा केली. इतक्या लवकर याल असें मला वाटलें नव्हतें ! बरें आपल्या बरोबर खर्चाची भरपूर तजवीज आहे ना ? प्रवासांत पैशाची टंचाई पडतां कामा नये ! "

लॉर्ड मॅन्युअल—" हो हो ! तीनशें मोहोरा रोख बरोबर घेतल्या

आहेत ! अधिक घेतां येईनात, त्यामुळें नाइलाज झाला, नाहीं तर आणखीही घेतल्या असत्या ! ”

सर एडवर्ड—“ तर मग आतां असें करा, मी तुर्त तुम्हांला आणखी दोनशें मोहोरा उसन्या देतों, त्या सर्व शिपायांस बक्षीस म्हणून निघण्या-पूर्वींच वांटून द्या. त्यांना बक्षीस दिलें तरच ते येतील, अशांतला भाग नाहीं, ते विश्वासू आहेत व आपलें काम बरोबर करतील अशी माझी खात्री आहेच, तथापि ह्या देणगीनें त्यांना विशेष हुरूप येईल ! ”

“ आहाहा ! खरोखरच तुमचा मी अत्यंत ऋणी आहे ! लॉर्ड मॅन्युअल सद्गदित स्वरानें म्हणाले—“ माझ्याविषयींची तुमची ही कळकळ मी जन्मभर विसरणार नाहीं ! ”

सर एडवर्ड मागील खोलींत जाऊन रक्कम घेऊन आले, आणि ती लॉर्ड मॅन्युअलच्या हातीं देऊन म्हणाले—“ ऐका, घोड्याच्या टापा वाजूं लागल्या ! माझे शिपाई तयार होऊन आलेच वाटतें ! आटपा आतां लवकर ! उद्यां मी लॉर्ड फ्रांझांची व खुद्द बादशहांचीही भेट घेऊन, त्यांना ही सर्व हकीगत कळवीन, आणि आणखी कांहीं मदत पाठविण्याचें जमल्यास, शक्य तितकी खटपट करीन ! चला आतां, ईश्वर तुम्हांला यश देवो ! ”

लॉर्ड मॅन्युअल आपल्या मित्राचा हात धरून म्हणाले—“ ठीक आहे, येतों तर आतां ! माझें जर कांहीं बरें वाईट झालें, तर विचारी युफे-शिया तुर्कांच्या तावडींत सांपडलेली आहे, हें लक्षांत ठेवून, तिला सोड-विण्याची शक्य तितकी खटपट करा, एवढीच तुम्हांला अखेरची विनंति आहे ! मी जगांत अगदीं एकाकी आहें ! तुमच्यावांचून मला दुसऱ्या कोणाचाही आधार नाहीं ! ”

सर एडवर्ड—“ अशा भलत्या कल्पना मनांत देखील आणूं नका ! तुम्ही यशस्वी होऊन खचित परत याल, आणि मीही आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावण्यास बिलकुल आळस करणार नाहीं ! ”

दोघेही खालीं दरवाज्याजवळ आले. सेनापतींच्या हुकमानें पाहरे-वाल्यांनीं दरवाजा उघडला. हुजुरातींतील दहा घोडेस्वार हजर झाले. लॉर्ड मॅन्युअलनीं त्यांना व आपल्याही स्वारांना बक्षिसें दिलीं. सर

एडवर्डनीं उत्तेजनपर भाषण करून सर्वांना निरोप दिला. मॅन्युअल आपल्या घोड्यावर स्वार झाले, आणि सर्व मंडळी राजवाड्याच्या दरवाज्यांतून बाहेर पडून सिलिव्हरी वेशीच्या मार्गाला लागली.

सर एडवर्ड ती टोळी दिसेनाशी झाल्यावर आपल्या बंगल्याकडे परत गेले आणि प्रासादद्वार पुनः बंद होऊन चोहोंकडे शांत झालें.

---

## प्रकरण ६ वें.

# प्रेमाची मागणी.



दुसरे दिवशीं सकाळीं लवकर उठून, सर एडवर्ड लॉर्ड फ्रांझ्राच्या बंगल्यांत गेले, आणि आपल्याला महत्त्वाच्या कामासंबंधानें प्रधान साहेबांना भेटावयाचें आहे अशी त्यांनीं एका नोकराकरवीं वर्दी पाठविली. काल त्यांना बागेंत बोलवावयास आलेला तोच हा नोकर होता. त्याला सर एडवर्डनीं तत्काळ ओळखलें. त्याचें नांव झोशीमस होतें. तो चमत्कारिक दृष्टीनें सर एडवर्डकडे पहात म्हणाला—“ मी आंत जाऊन पाहतों धनीसाहेब उठले आहेत का! तोंपर्यंत आपण कृपा करून येथें क्षणभर बसावें.”

झोशीमसच्या निरीक्षणाचा सर एडवर्डना राग आला, आणि कांहीं शंका आली. तथापि ते कांहीं न बोलतां मुकाट्यानें तेथें बसले, व झोशीमस आंत गेला; पण लवकरच परत येऊन म्हणाला—“ पंधरा मिनिटांच्या आंत धनीसाहेब आपली भेट घेण्यास तयार होतील! आणि ही सबब मिळाली हेंही ठीक झालें. कारण, मला आपल्याशीं एका महत्त्वाच्या गोष्टीसंबंधानें थोडेंसें बोलावयाचें आहे!”

सर एडवर्ड—“खरें कीं काय? बोल तर मग, मी रिकामाच आहें!”

झोशीमस इकडे तिकडे पहात हळूच म्हणाला—“ सेनापतिसाहेब, मी एक गरीब मनुष्य आहें, पण विश्वासू व प्रामाणिक आहें!”

सर एडवर्ड— “ असशील कदाचित्! कारण तूं गरीब आहेस कीं

श्रीमंत आहेस, हें मला मुळींच माहीत नाहीं, आणि तुझ्या प्रामाणिकपणाचा मला आजपर्यंत कधीं अनुभव नाहीं ! बरें मग ? "

झोशीमस—" आपण म्हणतां तें बरोबर आहे, पण मी सांगतों यांत एक अक्षरही खोटें नाहीं ! हल्लीं लष्करी सेक्रेटरीची जागा रिकामी आहे व ती लवकरच भरावयाची आहे, असें मीं ऐकलें आहे ! "

सर एडवर्ड—" असेल ! मग तुझें काय म्हणणें ? "

झोशीमस—" दुसरें काय ? ती जागा मला मिळावी, अशी माझी विनंति आहे ! "

सर एडवर्ड—"काय ? तुला सेक्रेटरीची जागा पाहिजे ? आणखी काय पाहिजे ? सेनापतीची जागा नको का ? "

झोशीसम—" हें काय, सेनापतिसाहेब, अशी भलतीच हांव धरावयास मी का वेडा आहें कीं काय ? सेक्रेटरीचें काम माझ्यानें होण्यासारखें आहे, म्हणून मी ती जागा मागतों ! आणि तेवढी आपण मला मिळवून दिलीच पाहिजे ! "

सर एडवर्ड रागानें म्हणाले—" चल मूर्खा ! तूं आज शुद्धीवर नाहींस, कीं तुला वेड लागलें आहे ? नीघ येथून, चालता हो, नाहीं तर तुझ्या ह्या फाजीलपणाबद्दल विचार करावा लागेल ! "

झोशीमस—" सेनापतिसाहेब, आपण माझी विनंति अशी मान्य केली नाहीं तर, मला आपल्याला तसें करावयास भाग पाडावें लागेल ! "

सर एडवर्ड ना आतां मात्र खचित वाटलें कीं, झोशीमसचें डोकें खरोखर फिरलें असावें, म्हणून दुसऱ्या कोणा तरी नोकरास बोलावून ह्याला त्याच्या स्वाधीन करावें, अशा विचारांत ते होते, इतक्यांत झोशीमस पुनः कळकळीच्या स्वरानें म्हणाला—" सेनापतिसाहेब, माझे दोन शब्द ऐकून घ्या, आणि मग मला काय शासन करावयाचें असेल तें करा ! काल दुपारीं बागेंत आपल्या आणि थियोडोरा ताईसाहेबांच्या मध्यें चाललेला सर्व प्रकार मीं पाहिला आहे व ऐकलाही आहे ! "

" अरे चोरा ! " सर एडवर्ड क्रुद्ध स्वरानें उद्गारले—" तूं चोरून ऐकण्याचें नीच कर्म केलेंस, आणि त्याचा फायदा करून घेण्यासाठीं मला धमकी घालतोस काय ? पण मला त्याची मुळींच भिती नाहीं !

तूं मात्र हा आगीचा भयंकर खेळ खेळत आहेस, हें लक्षांत आणून सावध रहा !"

झोशीमस—"ठीक आहे, सेनापतिसाहेब, आपल्याला आपलें हितानहीत कळतें, तसें मलाही थोडेंबहुत समजतें! आपण माझी विनंति मान्य केली नाहीं तर, माझ्या कानांवर आलेल्या व नजरेस पडलेल्या सर्व गोष्टी मला आमच्या धनीसाहेबांच्या कानावर घालाव्या लागतील !"

सर एडवर्ड—"कांहीं हरकत नाहीं! पण एवढें लक्षांत ठेव, जर कांहीं खोट्यानाट्या गोष्टी खोडसाळपणानें सांगत सुटशील, तर माझ्याशीं गांठ आहे; मी त्याबद्दल तुला भरपूर प्रायश्चित्त दिल्याशिवाय राहणार नाहीं !"

"बरें बरें, पाहतां येईल !" असें आपल्याशींच पुटपुटत झोशीमस तेथून दुसरीकडे निघून गेला; आणि सर एडवर्ड विचार करीत बसले. कालच्या आपल्या व थियोडोराच्या वर्तनांतील व भाषणांतील प्रत्येक गोष्टीची ते आठवण करूं लागले, आणि आपल्या हातून किंवा थियोडोराच्या हातून कांहीं गैरशिस्त वर्तन झालें आहे कीं काय, व तें ह्या हलकट सेवकाच्या नजरेस आलें असल्यास, त्याचा त्याला कितपत फायदा घेतां येईल, अगर आपल्याला किंवा थियोडोराला तें किती अपायकारक होईल, ह्याविषयीं ते स्वतःशींच विचार करूं लागले. शेवटीं त्यांनीं असा निश्चय केला कीं, कांहींही असो, झालेला सर्व प्रकार ताबडतोब प्रधानसाहेबांच्या कानांवर घालावयाचा. लॉर्ड फ्रांझांना आपलें हृद्गत निवेदन करण्यापूर्वी आणखी एकदां तरी थियोडोराची गांठ पडावयास पाहिजे असें त्यांना वाटत होतें, पण आतां त्यांनीं तो विचार अजीबात सोडून दिला. कारण, झोशीमससारख्या हलकट नोकराच्या तावडींत त्याच्या कल्पनेप्रमाणें तरी क्षणभर राहणें देखील त्यांना अगदीं असह्य वाटूं लागलें. थोड्याच वेळांत हवालदार त्यांच्या जवळ येऊन म्हणाला—"धनीसाहेब, आपल्या भेटीस तयार आहेत."

सर एडवर्ड तत्काळ उठून लॉर्ड फ्रांझांच्या खासगी बैठकीच्या खोलींत गेले. लॉर्ड फ्रांझांनीं त्यांचें आदरपूर्वक स्वागत करून आपल्या जवळ

बसवून घेतलें. नंतर प्रथम कांहीं औपचारिक संभाषण झाल्यावर सर एडवर्ड गंभीर स्वरानें म्हणाले—" प्रधानसाहेब, मी आपल्याला एक चिंताजनक बातमी कळविण्यासाठीं आलों आहें. काल सायंकाळीं तुर्कांच्या शें दीडशें स्वारांच्या एका टोळीनें शोरलूच्या बाजूनें येऊन, सिलिव्हरी गांवावर छापा घालून लूट केली, आणि जाळपोळ वगैरे अत्याचार करून, कांहीं माणसेंही कैद करून नेलीं अशी खबर आली आहे ! "

लॉर्ड फ्रांझा—" आं ! कॉन्स्टांटिनोपलच्या इतक्या नजीक येऊन त्यांनीं असा दंगाधोपा करण्याचें साहस केलें का ? प्रत्यक्ष राजधानीवर अजून त्यांची धाड आली नाहीं खरी, पण केव्हां येईल ह्याचा नियम नाहीं ! बरें, त्यांचा कोणीच प्रतिकार केला नाहीं का ? "

सर एडवर्ड—" छे, त्यांना कोण आडविणार ? त्यांना पाहिजे तितकी लूट मिळाल्यावर ते आपण होऊनच परत निघून गेले ! लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरासनीं सिलिव्हरीच्या एका कुमारिकेशीं विवाह ठरवून वाग्निश्चयही केल्याचें ऐकून आपण फार नाखुष झालां, असें ते म्हणत होते, तथापि तिच्यावर हें भयंकर संकट आल्याबद्दल, लॉर्ड मॅन्युअल-प्रमाणें आपल्यालाही खेद वाटल्यावांचून राहणार नाहीं अशी माझी खात्री आहे ! "

" काय ? तिच्यावर संकट ? " लॉर्ड फ्रांझा चकित स्वरानें उद्गारले. तिच्यावर कसलें संकट आलें ? ती हल्ल्यांत सांपडली कीं काय ? "

सर एडवर्ड—" होय, तिला आणि तिच्या आईबापांनाही त्या तुर्क लुटारू स्वारांनीं धरून नेल्याची काल रात्रीं बातमी आली ! "

" अरेरे ! " लॉर्ड फ्रांझा खिन्न स्वरानें उद्गारले—" गरीब बिचारा मॅन्युअल ! त्याच्यावर ही मोठीच आपत्ति कोसळली, ह्यांत शंका नाहीं ! पण त्याला ही बातमी समजली आहे का ? तो कोठें आहे ? "

सर एडवर्ड—" त्यांनींच काल रात्रीं मजकडे येऊन ही हकीगत मला सांगितली, आणि ते त्या मंडळींची मुक्तता करण्याकरितां तांबड-तोब तिकडे रवाना झाले, त्यांचे चार स्वार त्यांच्या बरोबर होते, शिवाय मींही आमच्या हुजुरातींतील दहा स्वार त्यांच्या मदतीस दिले आहेत; आणि आपला हेर रिचर्ड आज सकाळीं निघणारच होता, त्यालाही

त्यांच्या बरोबरच पाठवून दिलें. हें सर्व मीं स्वतःच्या जबाबदारीवर केलें असल्यामुळें, ह्यापेक्षां अधिक कांहीं मला त्या वेळीं करितां आलें नाहीं. त्या वेळीं मध्यरात्र उलटून गेली असल्यामुळें, आपली किंवा सरकारची आज्ञा घेणें शक्य नव्हतें. शिवाय अधिक मदतीची तजवीज करण्यांत वेळ दवडणेंही मला सयुक्तिक वाटलें नाहीं."

लॉर्ड फ्रांझा—"तुम्हीं केलें तेंच बरोबर! पण सेनापतिसाहेब, ह्याचा परिणाम काय होणार, हें आतां उघड दिसूं लागलें आहे!"

सर एडवर्ड—"तें खरें, पण ह्याला आतां तजवीज काय? हें तुर्कांचे अत्याचार बंद कसे होणार? लष्करी सामर्थ्याचा उपयोग करण्याची कल्पनाही मनांत आणण्याची सोय नाहीं!"

लॉर्ड फ्रांझा—"छे छे! ह्या प्रसंगीं एकेक शिपाई म्हणजे आमचा प्राण आहे! सुलतान महमदाला आपल्या पंचवीस शिपायांची जितकी किंमत वाटत असेल, त्यापेक्षां आम्हांला आपल्या एका शिपायाची किंमत ह्या वेळीं अधिक आहे! कारण, आमच्या एका शिपायाबद्दल तुर्कांचे पंचवीस शिपाई जरी युद्धांत पतन पावले, तरी देखील आमचा जय होण्याची फारशी आशा नाहीं!"

सर एडवर्ड—"बरें, तह करण्याचें मनांत आणिलें तर कांहीं जुळण्यासारखें आहे का?"

लॉर्ड फ्रांझा—"तह करावयास आपल्याजवळ मोबदला द्यावयास काय आहे? सुलतान महमदाला द्रव्याची मुळींच पर्वा नाहीं. तो खंडणी घेऊन आमचे कैदी सोडण्यास कबूल होणार नाहीं. आमच्या ताब्यांत सध्यां तुर्की कैदी एकही नाहीं. जे थोडे होते ते बादशहांनीं फाजील औदार्य दाखवून पूर्वींच सोडून दिले! अशा स्थितींत तह कसा होणार! मी ही हकीगत बादशहांच्या कानांवर घालतों, पण अगोदरच त्यांच्या अंतःकरणास जाळणाऱ्या अनेक चिंतांमध्यें ह्या एका चिंतेची भर पडेल! ह्यापेक्षां अधिक कांहीं उपयोग होईल, असें मला दिसत नाहीं!"

सर एडवर्ड—"ठीक आहे! ह्या आपल्या तसदीबद्दल मी लॉर्ड मॅन्युअलतर्फे आपले आभार मानतों! आतां आणखी एका गोष्टीबद्दल आपल्याशीं दोन शब्द बोलावयाचे आहेत!"

लॉर्ड फ्रांझा—" ठीक आहे ! लष्करी प्रधानांकडे एक निरोप पाठवितों, मग आपण आणखी बोलत बसूं ! कोण आहे रे बाहेर ? झोशीमस, लष्करी प्रधानसाहेबांकडे जा, आणि त्यांना कळीव कीं, एका महत्त्वाच्या कामासंबंधानें आपल्या भेटीची अत्यंत जरूर आहे, तेव्हां आपल्याला भेटण्यास केव्हां सवड आहे ? "

झोशीमस निघून गेल्यावर लॉर्ड फ्रांझा, सर एडवर्डकडे वळून म्हणाले—" ह्या तुर्कांच्या अत्याचाराची सविस्तर हकीगत लष्करी प्रधानांना कळवून ठेवली पाहिजे ! मात्र ते ह्या गोष्टीचा विचार करितात कीं नाहीं कोण जाणें ! कारण, बादशहांची मजवर विशेष कृपा आहे अशा समजुतीनें ते नेहमीं माझा द्वेष करीत असतात ! हा वैयक्तिक द्वेष राष्ट्रीय कामांत आड न यावा, अशी माझी इच्छा आहे ! असो, चालूं द्या आतां, सेनापतिसाहेब, आपल्याला काय सांगावयाचें असेल तें सांगा ! "

सर एडवर्ड—" प्रधानसाहेब, आपण वकिलीच्या कामगिरीवर जाण्यापूर्वींपासूनच आपण माझ्याशीं अत्यंत प्रेमानें वागत होतां, व मीही आपल्या घरांत आपल्या कुटुंबांतील माणसाप्रमाणें निःसंकोच वागत आलों, हें आपल्याला माहीतच आहे ! "

लॉर्ड फ्रांझा—" हो ! तुमच्या प्रेमळ सहवासांत मला जो अनुपम आनंद वाटत असे, तो मी कधींही विसरणार नाहीं ! त्याचप्रमाणें पर राष्ट्रांतील दरबारांची तुम्ही जी मला महत्त्वाची माहिती सांगितली, तिचा माझ्या कामगिरींत मला फारच उपयोग झाला, हें मी मोठ्या अभिमानानें कबूल करितों ! "

सर एडवर्ड—" तथापि आपण आपल्या कामगिरीवर निघून गेल्यावर माझें आपल्या घरीं जाणें येणें सहजच कमी झालें, आणि तसें वागणें शिष्टाचाराच्या दृष्टीनें मला अवश्यही होतें. तरी पण आपल्या घराकडील माझें लक्ष मात्र लेशभरही कमी झालें नाहीं, आणि केव्हांही होणें शक्य नाहीं ! आपण येथून ऐबेरियाकडे गेल्यावर थोड्याच काळांत अशी लोकवार्ता माझ्या कानांवर आली कीं, आपण आपली कन्या लॉर्ड मॅन्युअलना देण्याचें योजिलें आहे. हें समजतांच माझ्या अंतःकरणांतील

कांहीं वेडी हाव मला महत्प्रयासानें दाबून टाकावी लागली, आणि मी ती आशा सोडून दिली, तेव्हांपासून मी थियोडोराताईशीं केवळ बंधु-भावानें वागूं लागलों, आणि लॉर्ड मॅन्युअलशीं तिचा विवाह झाला असता तर माझ्या मनाची तीच भावना शेवटपर्यंत कायम राहिली असती; पण लॉर्ड मॅन्युअल यांचा दुसऱ्या एका कुमारिकेशीं वाङ्निश्चय झाला असल्याचें जेव्हां त्यांच्याच तोंडून काल ऐकलें, आपल्यालाही त्यांनीं तें कळविलें असल्याचें त्यांनींच मला सांगितलें, त्याबरोबर माझ्या अंतःकरणांतील पूर्वीची आशा व महत्त्वाकांक्षा पुनः जागृत झाली. म्हणून ती महत्त्वाकांक्षा केव्हां तरी शेवटास जाण्याची ती आशा बाळगावी का? एवढेंच आपल्याला विचारावयाचें आहे!

लॉर्ड फ्रांझा हे त्या वेळच्या रोमन सरदारांपैकीं अत्यंत अभिमानी सरदार होते. ते अगदींच जुन्या मताचे असल्यानें, नुसतें शौर्य, अधिकार, प्रामाणिक व्यवहार, बाणेदार वर्तन आणि सौजन्य ह्या गुणांची उच्च कुलीनत्वापुढें त्यांना मातब्बरी वाटत नव्हती. सर एडवर्ड यांची विनंति ऐकून ती स्वीकारावी कीं नाकारावी, स्वीकारली तर काय हित होईल आणि नाकारण्यांत काय नुकसान होईल इत्यादि गोष्टींचा ते विचार करूं लागले. सर एडवर्ड यांच्या विनंतीला एकदम संमति देण्यास त्याचें मन तयार होईना. हल्लींसारखी बिकट परिस्थिति नसती तर, त्यांना स्पष्ट नकार देण्यास त्यांनीं क्षणाचाही विलंब केला नसता.

जो गृहस्थ संपत्तीनें व कुळानें आपल्या बरोबरीचा नाहीं, इतकेंच केवळ नव्हे, पण जो परदेशस्थ व लॅटिन धर्मपंथी आहे, आणि केवळ बादशहाच्या मर्जीवर ज्याची योग्यता, अधिकार, किंबहुना जीवनही अवलंबून आहे, त्याला मुलगी देण्याची कल्पना मनांत आणणें देखील वेडेपणाचें आहे, असें लॉर्ड फ्रांझांना इतर प्रसंगीं खचित वाटलें असतें. पण हल्लींचा प्रसंगच वेगळा होता. कदाचित् आपल्या साम्राज्याची प्रस्थापित व्यवस्था थोडयाच काळांत पूर्णपणें नष्ट होण्याचाही संभव होता. इसलामी वावटळांत प्रत्यक्ष बादशाहीचाही लय होण्याचा संभव असल्यामुळें, सरदार, जहागीरदार किंवा प्रधान इत्यादिकांची मग किंमत काय? दुर्दैवानें तशी स्थिति आलीच तर आपल्या मुलीला अगदींच

निराधार सोडणें श्रेयस्कर नाहीं. बरें, तिला येथल्याच एखाद्या रोमन सरदारास द्यावें तर, त्याची तरी कोठें शाश्वती आहे ? साम्राज्यच नष्ट झालें तर त्या सरदाराचा आश्रय तरी मुलीच्या काय उपयोगी पडणार ! त्यापेक्षां ह्या सर एडवर्डला इंग्लंडांत थोडी तरी वडिलार्जित जहांगीर आहे, शिवाय तो कोठेंही गेला तरी, आपल्या पराक्रमाच्या व बुद्धिमत्तेच्या जोरावर योग्यतेनेंच राहील, हा मोठा फायदा आहे ! पण दुर्दैवानें तुर्कांनीं कॉन्स्टांटिनोपलवर इतक्यांतच स्वारी केली नाही, किंवा करूनही त्यांत त्यांना यश आलें नाहीं, तर आपली मुलगी एका परकी परधर्मी व कमी योग्यतेच्या मनुष्यास देण्यांत काय फायदा ! तैमूरलंगाच्या दंग्यापासून रोमन साम्राज्याला एकसारखी भीति असतांनाही आज पन्नास वर्षे तर्शीच गेलीं. मग आणखी पन्नास वर्षेही जाणार नाहींत कशावरून ?

ह्याप्रमाणें आपल्या मनाशीं साधक बाधक विचार करून, लॉर्ड क्रॉसांनीं शेवटीं असें ठरविलें कीं, आजच निश्चित जबाब देऊन ह्या गोष्टीचा निकाल करून टाकूं नये, ती कालावधीवर अभुक्त ठेवावी. नंतर ते म्हणाले—" सेनापतिसाहेब, आपल्यासारख्या थोर गृहस्थांनीं माझ्या मुलीची मागणी करणें हा खरोखरच माझा आणि माझ्या कन्येचा मोठाच सन्मान आहे असें मी समजतों. सध्यांसारख्या विषम परिस्थितींत देखील अचाट धैर्य व अलोट शुचर्य दाखविणारा आपल्यासारखा सुशील जामात लाभणें मोठेंच भाग्य होय. मी माझ्या कन्येचा विवाह करून देण्यास स्वतंत्र मुखत्यार असतों, तर तिला मी मोठ्या आनंदानें आपल्याच स्वाधीन केलें असतें ! पण मला तसें स्वातंत्र्य नाहीं, हें आपल्यालाही माहीत आहे. आमच्यासारख्यांना लोकमताचाही विचार करावा लागतो आणि विशेषतः आम्ही सरदार लोक म्हणजे प्राचीन बद्धमूल रूढीचे बंदे गुलाम असतों. ती पद्धति सोडून लेशमात्रही इकडे तिकडे सरण्याची आम्हांला सोय नाहीं. आपण अगोदर परदेशस्थ त्यांतून लॅटिन धर्मपंथी, तुम्हांला मुलगी द्यावयास मला लोकांची किंवा आमच्या बरोबरीच्या सरदार मंडळींची अनुमति मिळेल, अशी मला फारशी आशा नाहीं. तथापि आपल्या सारख्या थोर व सुशील गृहस्थाचे

मागणी नाकारावी असेंही मला वाटत नाहीं. म्हणून आतां असें करा, आणखी सहा महिने हा विषय तसाच राहूं द्या. त्यानंतर मी आपल्याला निश्चित जबाब देईन, आणि तो होतां होईल तों अनुकूलच देईन ! ”

सर एडवर्ड आनंदित व कृतज्ञ स्वरानें म्हणाले—“ आहाहा, प्रधान-साहेब, आपल्या ह्या सौजन्याबद्दल आपले आभार कसे मानावे, हेंच मला समजत नाहीं ! माझें कुळ जरी आपल्या कुळासारखेंच उच्च व सन्मान्य असलें, तथापि सध्यां आपण प्रधान पदावर आहां आणि मी नुसता एका सैन्यविभागाचा अधिकारी आहें, ही विषमता माझ्या लक्षांत नाहीं असें नाहीं, तथापि ती मला फारशी महत्त्वाची वाटत नाहीं. आतां लॅटिन धर्मपंथाविषयीं म्हणाल तर, हल्लीं वाटाघाट चालू असलेला समेट घडून आल्यावर तोही प्रश्न उरणार नाहीं ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ तसें झालें तर उत्तमच ! पाहूं ह्या सहा महिन्यांत काय काय होतें तें ! तोंपर्यंत आपण आपला पूर्वीचा संबंध मात्र कायम ठेवूं आणि आपलें हें संभाषण माझ्या मुलीला कळूं नये, अशीही माझी इच्छा आहे. ”

सर एडवर्ड—“तेवढें मात्र मला वचन देतां येत नाहीं ! कारण, थियो-डोराला माझा हेतु अगोदरच कळून चुकला आहे ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ हें मात्र बरें झालें नाहीं ! निदान माझ्या हेतू-प्रमाणें झाले नाहीं ! आतां आपल्याला एवढीच विनंति आहे कीं, ह्या विषायाची पुनः आपण तिच्यापुढें पुनरावृत्ति करूं नये ! आपली ठरलेली सहा महिन्यांची मुदत पुरी होऊन, आपल्याला मजकडून निश्चित जबाब मिळेपर्यंत आपण तिच्याशीं ह्या बाबतींत वाटाघाट करूं नये ! ”

सर एडवर्ड—“ कांहीं हरकत नाहीं, तसेंही मी आपल्याला वचन देईन, पण माझ्या ह्या मूकव्रताचें खरें कारण तिला कळलें पाहिजे, नाहीं तर माझें वर्तन तिला बेपर्वाईचें व अप्रामाणिकपणाचें वाटेल ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ ती तजवीज मी करीन, त्याबद्दल काळजी करूं नका ! ”

इतक्यांत खोलीच्या दारावर हळूच टिचक्या वाजल्या, तेव्हां लॉर्ड

फ्रांझा म्हणाले-" कोण आहे बाहेर ? "

झोशीमस हळूच दार उघडून आंत येऊन उभा राहिला. त्याला पाहून लॉर्ड फ्रांझा म्हणाले—" काय झालें ? काय म्हणाले लष्करी प्रधान ? "

झोशीमस—" सरकार, ते बाहेर कोठेंसे निघाले होते, पण आपला निरोप मीं कळविल्यावर त्यांनीं बाहेर जाण्याचा बेत रहित केला, आणि आपल्याला केव्हां भेट घेण्याला सवड आहे; तें कळेपर्यंत, ते वाड्यांतच थांबून राहणार आहेत ! "

लॉर्ड फ्रांझा—" ठीक आहे तर, जाऊंयाच त्यांच्याकडे ! बरें तर, सेनापतिसाहेब, मला आपला निरोप घेणें भाग आहे ! सायंकाळच्या आंत आणखी केव्हां तरी आपली गांठ पडेलच ! "

सर एडवर्ड पुनः एकवार प्रधानसाहेबांचे आभार मानून, त्यांचा निरोप घेऊन निघाले, आणि आपल्या बंगल्यांत परत आले.

---

## प्रकरण ७ वें.

## गरीब शेतकरी.



लॉर्ड मॅन्युअल व त्यांच्या बरोबरची मंडळी कॉन्स्टांटिनोपलच्या वेशींतून बाहेर पडल्यावर, घोड्यांना टांचा मारून भरवेगानें दौडत निघाली, तीं थेट सिलिव्हरीच्या माळाला येईपर्यंत क्षणभरही कोठें थांबली नाहीं. अद्यापि रात्र बरीच होती, तरी आकाश निरभ्र होतें. चंद्र मावळून मात्र बराच वेळ झाला होता. असंख्य तारे आपल्या पूर्ण तेजानें चमकत होते. जणूं काय सृष्टिदेवता आपल्या अगणित नेत्रांनीं खालील विश्वाची शांतताच अवलोकन करीत होती. लॉर्ड मॅन्युअल फ्रिसोलरास यांचें मन आपल्या प्रेमदेवतेसंबंधानें चिंताग्रस्त व प्रक्षुब्ध होतें, तथापि त्यांना देखील ही उषःकालीन अवर्णनीय शोभा पाहून आनंद झाल्यावांचून राहिला नाहीं ! त्यांच्या प्राणप्रिया युफ्राशियाचेच विचार त्यांच्या अंतः-

करणांत एकसारखे घोळत होते, तथापि तिच्या अढळ व शुद्ध प्रेमावर त्यांचा पूर्ण भरंवसा होता. अविचारी तुर्कांच्या तावडींत ती सांपडली असल्यामुळें, आणि ह्या डोंगराळ मुलखांतून तिला त्यांच्या बरोबर कैदी म्हणून जावें लागल्यामुळें, तिचे फार हाल झाले असतील खरे, तथापि अनाथांचा नाथ परमेश्वर ह्या प्रसंगीं तिचें व तिच्या पातिव्रत्याचें संरक्षण करील, असा त्याचा दृढ विश्वास होता, त्यामुळें त्यांचें धैर्य खचलें नव्हतें.

लॉर्ड मॅन्युअल आपल्या अनुचरांसह सिलिव्हरीच्या जवळ येतांच त्यांना आदल्या दिवशींची आठवण झाली. काल दुपारीं आपण कोत-वालांच्या वाड्यांत युफ्राशियाशीं किती प्रेमानें बोलत बसलों होतों, तिचा निरोप घेऊन ह्याच रस्त्यानें परत कॉन्स्टांटिनोपलला येत असतां आपल्या मनांत किती आनंदाचे व आशाजनक विचार घोळत होते, आणि त्या वेळीं आपण काय काय मनोराज्य करीत होतों, इत्यादि गोष्टींचें स्मरण होऊन, त्यांचें चित्त उद्विग्न झालें. इतक्यांत रिचर्ड बर्स्टो त्यांच्याजवळ येऊन म्हणाला—" सरदारसाहेब, आपण सिलिव्हरीच्या वेशींत अगो-दर जाऊं या, तेथें आपल्याला आणखी कांहीं तरी विश्वसनीय माहिती मिळेल असें वाटतें!"

" ठीक आहे!" असें म्हणून लॉर्ड मॅन्युअलनीं आपला घोडा सिलि-व्हरीच्या वेशीकडे वळविला, तेव्हां सर्व मंडळी त्यांच्या पाठोपाठ तिकडे निघाली. ते लवकरच वेशीजवळ येऊन थडकले.

रिचर्ड बर्स्टो पुढें होऊन वशीचें दार ठोठावीत मोठ्यानें ओरडला—" कोण आहे हो आंत? देवडीवर पाहरेवाला कोण आहे?"

थोड्याच वेळांत आंतील देवडीवर बोलाचाली सुरू झालेली बाहेर अस्पष्ट ऐकूं येऊं लागली, आणि लवकरच एक शिपाई कंदील घेऊन तटावर आलेला दिसला. तो ओरडून म्हणाला—" कोण आहे बाहेर?"

" बादशाही हुजुरातीचें पथक!" रिचर्ड जोरानें म्हणाला—" आम्हांला आंत यावयाचें नाहीं, फक्त कालच्या तुर्की स्वारांच्या टोळीसंबंधानें आम्हांला कांहीं माहिती मिळाल्यास पाहिजे आहे! सेनापतिसाहेबांच्या हुकुमानें आम्ही त्यांच्या पाठलागास निघालों आहों!"

तो शिपाई तत्काळ तटावरून खालीं उतरला, आणि त्यानें आपल्या

नायकास ती हकीगत कळविली, तेव्हां नाईक आपल्या एक दोघां शिपायांसह वेशीची दिंडी उघडून बाहेर आले.

हातांतील कंदिलाच्या उजेडानें बाहेरील सर्व मंडळीकडे निरखून पाहून व लॉर्ड मॅन्युअलना ओळखून नाईक आदबीनें प्रणाम करून म्हणाले—" ओहो, सरदारसाहेब, खुद्द आपली स्वारी आली आहे का ! आपली काय आज्ञा आहे ? "

लॉर्ड मॅन्युअल—" काल तुर्की स्वारांच्या एका टोळीनें तुमच्या गांवची लूट व जाळपोळ करून तुमच्या कोतवाल साहेबांस व त्यांच्या घरच्या मंडळीस कैद करून धरून नेलें, असें आम्हीं ऐकलें, तेव्हां त्यासंबंधानें शक्य तितकी सविस्तर माहिती आम्हांला पाहिजे आहे ! "

नायकानें सांगितलेल्या माहितीचें तात्पर्य असें होतें—" काल दोन प्रहरीं दोन वाजतां शोरलूहून एक शिपाई धांवत आला, आणि त्यानें प्रथम तुर्की स्वार येत असल्याची खबर सांगितली. तेव्हां कोतवाल साहेबांना आपल्या मंडळीसह ताबडतोब सिलिव्हरी गांवांत निघून येतां यावें म्हणून आमच्या जमादारांनीं त्यांच्याकडे अगोदर वर्दी पाठविली. पण त्यानंतर पंधरा मिनिटांच्या आंतच तुर्की स्वार येऊन धडकले. आम्ही बेसावध असल्यामुळें, आमचें त्यांच्यापुढें कांहीं चाललें नाहीं. त्यांच्यापैकीं कांहीं गांवांत शिरले व कांहीं कोतवाल साहेबांच्या बंगल्यावर गेले. पुढें सर्वच गोंधळ उडाल्यामुळें, कोणाचा कोणाला पत्ताही लागला नाहीं. तुर्की स्वार लुटालूट व जाळपोळ करून निघून गेल्यावर मग आम्हांला समजलें कीं, कोतवाल साहेबांस व त्यांच्या घरच्या मंडळीस तुर्कांनीं धरून नेले, आणि ते शोरलूकडेच पुनः परत गेले. मात्र ते आलेल्या रस्त्यानें न जातां डोंगराच्या बाजूनें हेलपाट्याच्या आड रस्त्यानें गेले.

रिचर्ड वर्स्टोनें विचारलें—" तुर्कांचे एकंदर किती स्वार होते ? "

नाईक—" आमच्या अंदाजानें शंभरापासून दीडशेंपर्यंत असावेत. "

रिचर्ड—" ठीक आहे, आमचें काम झालें ! " नंतर तो लॉर्ड मॅन्युअलकडे वळून म्हणाला—" चला, सरदारसाहेब, आपल्याला असेंच शोरलूला गेलें पाहिजे. ते कोणत्याही रस्त्यानें गेले असले तरी

शोरलूवरूनच जाणार. त्यावांचून आड्रियानोपलला जावयास त्यांना दुसरा मार्ग नाहीं. आणि शोरलू येथें आपलें लष्करी ठाणें असल्यामुळें, तेथें आपल्याला खरी बातमीही लागेल, आणि कांहीं मदतही मिळेल. चला दोस्तहो, शोरलूकडेच चला!"

सर्व मंडळी शोरलूच्या रोखानें झपाट्यानें निघाली. उंचवट्यावर आल्यावर त्यांना अतिशय गार वारा लागूं लागला व पहाट झाल्यामुळें थंडीही पडली. रस्ता बहुतेक ओसाड माळावरूनच होता. कोठें तरी क्वचित एखाद दुसरें बोडकें झुडूप होतें. पूर्वेकडील जोराच्या वाऱ्यानें त्यांच्या जीर्ण पानांचा आवाज, दूर कोणी बोलत असल्यासारखा अस्पष्ट ऐकूं येत होता. पूर्वेकडील आकाशांत ढग व धुकें दिसूं लागलें, आणि घोडयांच्या आयाळांवर व स्वारांच्या शिरस्त्राणावर दंवाचे बिंदू जमूं लागले. अद्यापि गडद काळोख होता. रिचर्ड बर्स्टो रस्त्याचा माहितगार असल्यामुळें, सर्वांच्या पुढें झपाटयानें चालला होता. जातां जातां त्याचा घोडा एकाएकीं मध्येंच थबकला. त्यामुळें वर बसलेल्या रिचर्डलाही एकदम असा हिसका बसला कीं, तो पडतां पडतां थोडक्यांत सांवरला. मागील सर्व स्वारांनींही घोडयांचे लगाम एकदम ओढून धरल्यामुळें त्यांचा वेग न आवरून, ते उपायीं आल्यासारखे झाले.

घोडा कशाला बुजला हें रिचर्ड बारीक दृष्टीनें पाहूं लागला, तों रस्त्यावरच कांहीं पडलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यानें एका शिपायाला तें काय आहे हें पाहण्यास सांगितलें. शिपाई घोड्यावरून उतरून जवळ जाऊन पाहून म्हणाला—" हें प्रेत पडलें आहे, साहेब!"

" पाहूं कोणाचें आहे तें!" रिचर्ड खालीं उडी टाकून जवळ जाऊन म्हणाला—" ह्या बिचाऱ्याचें डोकें फुटून चिंधडया झाल्या आहेत! ठीक आहे, आपण मार्ग बरोबर धरला आहे, हें ह्यावरून उघड आहे! चला पुढें!"

लॉर्ड मॅन्युअल—" पण प्रेत कोणाचें आहे! आणि पुरुषाचें आहे, कीं स्त्रीचें आहे!"

रिचर्ड—" तें पुरुषाचें आहे, सरदारसाहेब, आणि तो तुर्कच आहे, असें दिसतें!" इतक्यांत एक दोन घोडे ठेंचकाळलेले पाहून तो

म्हणाला—" हां! संभाळून चला, गडे हो! शोरलू येथें आपल्याला घोडे बदलतां आले तर पाहूं! कॉन्स्टांटिनोपलपासून शोरलूपर्यंत भरपूर चाळीस मैलांची मजल होते!"

बहुतेक घोडे दमले होते तरी, ते तसेच पुढें चालले. पहाट होऊं लागली तसतसा गार वारा अंगास अधिकच झोंबूं लागला; झुडपांतून त्यांना विवळल्यासारखा प्रतिध्वनि अधिकच स्पष्ट ऐकूं येऊं लागला; ढग व धुकेंही अधिकच घनदाट दिसूं लागलें. तथापि मंडळी कशाचीही पर्वा न करितां एकसारखी पुढें पुढेंच चालली होती.

पूर्व दिशेला क्षितिजाजवळ दृग्गोचर होऊं लागलेल्या एका अस्पष्ट प्रकाशरेखेकडे बोट दाखवीत लॉर्ड मॅन्युअल म्हणाले—" हा समोर अरुणोदयच दिसत आहे का?"

रिचर्ड—" होय सरदारसाहेब! आणि मला वाटतें, त्याजवळच ढगाच्या आड अंधुक अंधुक दिसत आहे तें शोरलूच्या मंदिराचें शिखरच असावें!"

दुसरा एक शिपाई तिकडे लक्षपूर्वक बारीक दृष्टीनें पहात म्हणाला—" होय होय! तें शिखरच आहे! आपण शोरलूजवळ आलों!"

ह्या वेळीं त्यांचे घोडे इतके दमून गेले होते कीं, शोरलूजवळ जाऊन पोंचेपर्यंत त्यांना फटफटीत उजाडलें, आणि दुरूनच त्यांना शोरलूचा तट व तेथील मंदिराचें शिखर स्पष्ट दिसूं लागलें. ते गांवाजवळ जाई-पर्यंत सूर्य उगवून वर देखील आला. वेशीवरील पहारेवाल्यानें, बादशाही हुजुरातीची तुकडी येत असलेली दुरूनच ओळखून, इतर शिपायांस आगाऊ सूचना दिली असल्यामुळें, त्यांनीं वेस उघडून ठेवली होती. अर्थात् लॉर्ड मॅन्युअलना व त्यांच्या मंडळींना गांवांत प्रवेश करण्यास विलंब लागला नाहीं व त्रासही पडला नाहीं. वेशीच्या देवडीवर तपास करितां त्यांना असें समजलें कीं, तुर्की स्वारांची एक टोळी काल रात्रीं नऊ वाजण्याच्या सुमारास शोरलू गांवाजवळून पुढें गेली. त्यांच्या बरोबर कांहीं कैदीही आहेत अशी बातमी होती.

तेथील ठाण्याचा अधिकारी म्हणाला—" तुर्कांचा नुसत्या लुटीशिवाय दुसरा कांहीं तरी विशेष हेतु असावा, असा माझा अंदाज आहे! कारण

ती भुरटी टोळी नसून, त्यांचा पुढारी प्रसिद्ध तुर्की सरदार अहमद पाशा हा होता. तो नुसत्या त्या लुटीकरितां कधींच जाणार नाहीं ! ”

रिचर्ड बर्स्टोनें त्या बाबतींत अधिक वाटाघाट न करितां, आपल्या मंडळीचे घोडे बदलून मागितले. ठाण्याच्या अधिकाऱ्यानें तत्काळ त्याची विनंति मान्य करून, घोडे आणविण्याची तजवीज केली. तथापि दुसरे घोडे तयार होऊन येईपर्यंत एक तास वेळ मोडला. नंतर लॉर्ड मॅन्युअल आपल्या मंडळीसह पुनः पुढील मार्गास लागले.

शोरलूच्या हद्दींतून पुढें गेल्यावर, प्रदेशाचें स्वरूप एकदम बदललें. कारण, शोरलू हेंच रोमन साम्राज्याचें सरहद्दीवरील ठाणें होतें. तेथून पुढें तुर्की मुलूख लागला. सर्व शेतें ओसाड व पड पडलेलीं दिसूं लागलीं. रस्ते घाणेरडे व उंच सखल लागले. रस्त्याच्या आसपासची कांहीं शेतें लुटलेलीं व कांहीं शेतांतील झोंपड्या जळलेल्या दिसूं लागल्या. शेतकरी क्वचितच कोठें दृष्टीस पडे. स्त्री तर एकही कोठें नजरेस पडली नाहीं ! कांहीं शेतांतून धान्याचीं कणसें कापून नेलेले ठोंबे वाऱ्यानें फडफडत असलेले दिसत होते. फळबागांतील झाडांवरील फळें जशींचीं तशींच झाडांवर सडत असलेलीं किंवा झाडांखालीं विसकटून पडलेलीं दिसत होतीं. ह्या एकंदर चिन्हांवरून, त्या प्रदेशावर किती अत्याचार घडला होता, आणि “ मोडकळीस आलेलें रोमन साम्राज्य ” त्याचा बचाव व बंदोबस्त करण्यास कसें असमर्थ होतें, हें उघड दिसत होतें.

त्या प्रवासी मंडळीपैकीं मार्गांत कोणी कांहीं फारसे बोलत नव्हते. क्वचित् कोणी तरी त्या प्रदेशाच्या स्थितीसंबंधानें उद्गार काढी. दुपारच्या सुमारास ते बोर्गिया नांवाच्या एका लहान गांवाजवळ आले. तें गांव अजीबात बेचिराख झालें होतें. गांव दुरून दिसूं लागतांच येथें घोड्यांना कांहीं चंदीवैरण व माणसांना कांहीं अन्नपाणी मिळेल अशी त्यांना आशा वाटत होती, परंतु त्यांनीं गांवांत येऊन सगळा गांव धुंडाळला, तरी त्यांना एकही मनुष्य भेटला नाहीं. घरांच्या बाह्य स्वरूपावरून, तेथें नुकताच शत्रूंचा हल्ला झाला असल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत होतीं. घरांचीं दारें मोडलेलीं व खिडक्या फोडलेल्या दिसत

होत्या. घरांतील धान्य व इतर किरकोळ वस्तु रस्त्यावर विसकटून पडलेल्या दिसत होत्या, आणि कोठें कोठें फुटक्या पेटयाही पड-लेल्या होत्या.

" अरेरे ! काय भयंकर स्थिति ही ! " रिचर्ड वर्स्टो खिन्न स्वरानें उद्गारला—" ह्या लोकांना नीतीची व धर्माधर्माची कांहींच पर्वा दिसत नाहीं ! "

" आग लागो ह्यांच्या दुष्ट हातांना ! " दुसरा एक शिपाई संतापानें म्हणाला.

" ह्या स्थितीवरून, ते नुकतेच येथून पुढें गेले असावेत, एवढी गोष्ट निश्चित आहे ! " आणखी एक जण गंभीर स्वरानें म्हणाला—"आपल्याला जर लवकर ताज्या दमाचे घोडे मिळतील, तर आज रात्रींपर्यंत आपण त्यांना खचित गांठूं असें वाटतें ! "

लॉर्ड मॅन्युअल निराश स्वरानें उद्गारले—" पण तशी कांहीं आशा दिसत नाहीं ! "

रिचर्ड—" सरदारसाहेब, येथें आतां उगीच वेळ दवडण्यांत हंशील दिसत नाहीं. पुढें कोठें तरी चांगली जागा पाहून दोन तास घोड्यांना विसावा देऊं व आपणही विश्रांति घेऊं ! "

" ठीक आहे ! " असें म्हणून लॉर्ड मॅन्युअल पुढें निघाले, तेव्हां बाकीची सर्व मंडळी त्यांच्या पाठोपाठ चालूं लागली. सुमारें दोन मैलां-वर एक चढण चढून गेल्यावर त्यांना एकदम एक उतार लागला. त्या दरीच्या पलीकडे लागलीच दुसरी टेंकडी चढावयाची होती. घोलांतील रस्त्याच्या डाव्या बाजूस एक लहान लहान झुडपांचें जंगल असून त्यांतून एक बारीकसा ओढा वळणावळणांनीं वहात गेला होता. उजव्या बाजूसही तसें जंगल असून, तो घोल वांकडातिकडा दूरवर पसरलेला दिसत होता, ती प्रवासी मंडळी दरी उतरून पुढील टेंकडीच्या पायथ्याशीं आली, तों कांहीं जणांच्या तोंडून एकदम एक आश्चर्योद्गार बाहेर पडला. रस्त्याच्या उजव्या बाजूस शें-दीडशें कदमांवर टेंकडीच्या पाय-थ्याशीं एक लहानशी सुंदर झोंपडी असलेली त्यांच्या दृष्टीस पडली. त्या झोंपडीच्या सभोंवतीं आठ-दहा घोडे असून त्यांपैकीं कांहींवर स्वार बसले

होते व कांहीं मोकळे होते, त्यावरून कांहीं लोक झोंपडींत शिरले असावे, असें उघड दिसत होतें. ते घोडेस्वार तुर्की टोळीपैकीं होते.

लॉर्ड मॅन्युअल त्यांच्याकडे पहात म्हणाले—" ते पहा ! ते स्वार त्या टोळीपैकींच असावे ! चला, दोस्तहो, त्यांच्यावर एकदम छापा घालूं ! "

एक शिपाई मध्येंच ओरडला—" थांबा, थांबा ! त्या टेंकडीच्या पायथ्याशीं तें काय दिसतें आहे ? त्या ओढ्यावरील पुलाजवळ पहा ! मनुष्यासारखी आकृति दिसते ! प्रेत तर नसेल ? छे, तें हालचाल करीत आहे ! चला, दोस्तहो, तें काय आहे तें प्रथम पाहूं या ! "

तो शिपाई झपाट्यानें पुलाकडे निघाला, तेव्हां बाकीचे लोकही त्याच्या मागून चालले. पुलाजवळ जाऊन पहातात तों, एक रक्तबंबाळ झालेला शेतकरी पुलाच्या धक्क्यास टेंकून उभा आहे, त्याच्या अंगावरील जखमांतून रक्ताचे पाट वहात आहेत, आणि अतिशय रक्तस्रावामुळें त्याची शक्ति क्षीण होऊन, तो झोके खात आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्याच्या हातांतील मोडका सोटा, त्याच्या सर्वांगावर उडालेली धूळ, आणि शत्रूच्या वारानें त्याच्या बाळदरोबरच कापली गेलेली त्याच्या डोक्यावरील जाड लोंकरीची टोपी इत्यादि चिन्हांवरून, त्यानें धैर्यानें शत्रूशीं दोन हात केले असल्याचें स्पष्ट दिसत होतें.

रिचर्ड त्याच्या जवळ जाऊन कळवळ्यानें म्हणाला—" अरेरे, तुमची अशी स्थिति कशानें झाली ! कोणी दुष्टानें तुमच्यावर हा अत्याचार केला ! "

तो वृद्ध शेतकरी झोंपडीकडे बोट दाखवून धापा टाकीत क्षीण स्वरानें म्हणाला—" तुर्कांनीं ! तुर्कांनीं ! पण त्यांना कांहीं मदत करितां आली तर पहा ! कृपा करून त्यांना तुर्कांच्या तावडींतून सोडवा ! "

" कोणाला मदत करावयाची ? कोणाला सोडवायाचें ? लॉर्ड मॅन्युअल पुढें होऊन म्हणाले—" झोंपडींत तुमची कोणी माणसें आहेत कीं काय ? "

" माझीं बायकोमुलें ! " तो मुमूर्षु शेतकरी मोठ्या प्रयासानें म्हणाला " तीं त्या झोंपडींतच आहेत ! ते पहा आंत शिरले ! हाय देवा ! "

लॉर्ड मॅन्युअलनीं तत्काळ आपला घोडा झोंपडीकडे वळविला इतक्यांत रिचर्ड त्या जखमी शेतकऱ्यास म्हणाला—" पण तुर्कांची मुख्य

टोळी कोठें गेली?"

शेतकरी क्षीण स्वरानें म्हणाला–" ती आड्रियानोपलकडे गेली, पण पाशा मागें राहिला आहे! तो त्या झोंपडींत गेला आहे! कृपा करून माझ्या बायकामुलांना त्याच्या हातून सोडवा! ईश्वर तुमचें कल्याण करील!"

लॉर्ड मॅन्युअल पुनः झोंपडीकडे निघाले, इतक्यांत एक शिपाई पुढें येऊन हळूच म्हणाला–" सरदार साहेब, आपण जर प्रत्येक ठिकाणीं असे थांबूं लागलों तर पुढें जाण्यांत तरी काय अर्थ आहे? मुख्य टोळी आपण कधींच गांठूं शकणार नाहीं! त्यापेक्षां परत गेलेलें काय वाईट? चला, आपण पुढें जाऊं या!"

"छे!" लॉर्ड मॅन्युअल त्याचा निषेध करून म्हणाला–" तसें करणें योग्य नव्हे! आपण दुसऱ्यावर कृपा केल्यावांचून ईश्वर तरी आपल्यावर कसा कृपा करील? आपल्याला जर देवाची मदत पाहिजे आहे तर आपणही दुसऱ्याला शक्य तितकी मदत केलीच पाहिजे!"

लॉर्ड मॅन्युअलनीं आपला घोडा झोंपडीकडे भरधांव फेंकला, तेव्हां सर्व मंडळी त्यांच्या पाठोपाठ निघाली. रिचर्ड आपल्याशीं पुटपुटला, "शाबास! याचें नांव दिलदारपणा!"

ह्या सर्व स्वारांच्या अंगांत चिलखतें होतीं. हीं पोलादी कड्यांचीं असून त्यांच्या खालच्या बाजूला जाड कापड व वरच्या बाजूला उंची गुलाबी मखमल शिवलेली होती. लॉर्ड मॅन्युअलच्या चिलखतावर सोनेरी कलाबतूचा कशिदाही काढलेला होता. डोक्यावर पोलादी उंच शिरस्त्राणें असून त्यांच्या कळसांवर सिंहांचीं तोंडें काढलेलीं होतीं. पायांत जाड कातड्याचे गुडघ्यापर्यंतचे बूट व त्यावर चिलखती विजारी होत्या. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें प्रत्येकाजवळ दुधारी परशु होते. शिवाय दोघां तिघांजवळ धनुष्यें आणि बाणांचे भाते असून बाकीच्यांच्या जवळ लांब भालेही होते. लॉर्ड मॅन्युअल यांच्या कमरेला कट्यार व हातांत नवीनच निघालेली तोडयाची बंदूक होती. त्या बंदुकीच्या दस्त्यावरही सोन्याचें नक्षी काम केलेलें होतें. ही बंदूक म्हणजे अगदीं नवीन सुधारलेलें हत्यार म्हणून लॉर्ड मॅन्युअलना तिचें मोठें महत्व वाटत होतें,

पण खरोखर ती धनुष्यबाणांच्या निम्यानें देखील उपयोगाची नव्हती. ह्याशिवाय प्रत्येक स्वाराच्या कमरेला बांकदार तलवारही लटकत होती. ह्या तलवारी भोसकण्याच्या, वार करण्याच्याही उपयोगी पडत असत. ह्याप्रमाणें त्यांची शस्त्रास्त्रांची तयारी होती.

सूर्य नुकताच पश्चिमेकडे कलला होता, त्याच्या प्रखर किरणांमुळें, आणि घोड्यांच्या टापांनीं उडत असलेल्या धुरळ्यामुळें, हे येणारे स्वार कोण आहेत, हें झोंपडीजवळच्या तुर्की स्वारांना प्रथम बराच वेळ कळलें नाहीं. ते झोंपडीजवळ आले, इतक्यांत झोंपडींतून हृदयद्रावक आरोळ्या त्यांच्या कानांवर आल्या, तेव्हां ते अधिकच वेगानें चाल करून आले. ते बरेच जवळ आल्यावर, ते आपले तुर्की स्वार नसून रोमन स्वार आहेत, असें झोंपडीजवळच्या तुर्कांच्या लक्षांत आलें. तत्काळ झोंपडीं-तून एक मुसलमान बाहेर आला. त्याच्या पोषाखावरून तो अंमलदार असावा असें दिसत होतें. त्याच्या मागून आणखी कांहीं तुर्क बाहेर आले, व सर्वजण आपापल्या घोड्यांवर स्वार झाले. नंतर त्या अंमलदारानें हुकूम करतांच सर्वजण झपाट्यानें चालते झाले. तें पाहतांच रोमन तिरंदाजांनीं त्यांच्यावर बाण सोडले व लॉर्ड मॅन्युअल-नींही बंदूक झाडली.

त्या पळपुट्या तुर्की स्वारांपैकीं एकजण खालीं पडला, पण बाकीचे तुर्क आपल्या त्या जखमी सोबत्याची वास्तपुस्तही न करितां तसेच पुढें निघून गेले. तेव्हां रिचर्ड म्हणाला —“कोणी तरी जाऊन त्यांना कैद करून आणा.”

दोघे रोमन स्वार त्या जखमी होऊन पडलेल्या तुर्कास धरून आणा-वयास गेले, आणि लॉर्ड मॅन्युअल व रिचर्ड घोड्यांवरून उतरून झोंपडी-कडे धांवले. ती झोंपडी लहानच पण मजबूत, नीटनेटकी व स्वच्छ होती. त्यांत एक स्वतंत्र देवघर असून, तेथें मेरी देवतेची पवित्र तसबीर ठेवलेली असून, पुढें नंदादीप जळत होता. झोंपडींत एक पोक्त बाई व तिची तरुण मुलगी अशीं दोनच माणसें होतीं. ती पोक्त बाई तुर्कांच्या मारानें विव्हळ होऊन जमिनीवर विवळत पडली होती, आणि तिची पंधरा सोळा वर्षांची तरुण सुंदर मुलगी देवघरांत गुडघे टेंकून

हात जोडून व डोळे मिटून देवाची करुणा भाकीत होती. तिचा केश-कलाप तिच्या पाठीवर मोकळा सुटलेला असून, त्यांतील कांहीं केस तुटलेले व जमिनीवर पडलेलेही दिसत होते, त्यावरून तुर्कांच्या अत्याचाराचें स्वरूप उघड समजण्यासारखें होतें.

लॉर्ड मॅन्युअल त्यांच्याजवळ जाऊन म्हणाले—" बाई आतां भिऊं नका, आम्ही तुम्हांला मदत करावयास आलों, ही ईश्वराची मोठीच कृपा ! "

त्या मुलीनें चटकन् मागें वळून पाहिलें. ग्रीक पोशाख व ग्रीक चेहरे तिच्या दृष्टीस पडतांच तिच्या तोंडून एक आनंदोद्गार निघाला, आणि भावनातिरेकानें ती एकदम बेशुद्ध होऊन पडली.

कांहीं ग्रीक स्वार चटकन पुढें धांवले आणि त्या बाईला व मुलीला शुद्धीवर आणण्यासाठीं शक्य ते उपचार करूं लागले. इतक्यांत जखमी तुर्कास धरून आणावयास गेलेले स्वार त्याला घेऊन आले; तेव्हां लॉर्ड मॅन्युअल व रिचर्ड त्या तुर्काकडे वळले.

लॉर्ड मॅन्युअलना तुर्की भाषा साधारण समजत होती, पण त्यांना बरोबर बोलतां येत नसे, म्हणून रिचर्ड पुढें होऊन त्या जखमी तुर्काला त्याच्या भाषेंत म्हणाला—" भल्या माणसा, मी काय म्हणतों तें नीट ऐक ! आम्ही विचारतों ती खरी हकीगत सांगशील तर, आम्ही तुला जीवदान देऊं. पण जर कां आम्हांला फसवाविण्याचा प्रयत्न केलास तर, मात्र तुझें आयुष्य भरलेंच असें समज ! काल सिलिव्हरी गांव ज्या टोळीनें लुटलें, त्या टोळींत तूं होतास का ? "

तुर्क—" इन्शाल्ला, होय, मी त्यांत होतों ! "

रिचर्ड—" त्या टोळीचा नायक कोण होता ? "

तुर्क—" अहमदपाशा ! "

रिचर्ड—" बरें, तुम्हीं काल सिलिव्हरीहून कांहीं माणसें धरून आणलीं का ? "

तुर्क—" माशाल्ला ! सिलिव्हरीहून नाहीं, पण गांवाबाहेरील समुद्र-किनाऱ्यावरच्या एका बंगल्यांतून मात्र धरून आणिलीं ! "

रिचर्ड—" किती माणसें धरून नेलीं ! "

तुर्क—“ एक म्हातारा, त्याची बायको आणि मुलगी, अशीं तीन माणसें ! ”

रिचर्ड—“ तीं आतां कोठें आहेत ? ”

तुर्क—“तें मला काय माहीत! अल्ला व महमदपैगंबर यांना माहीत!”

रिचर्ड—“ हां, खबरदार ! अशी उडवाउडवी आमच्याशीं चालवयाची नाहीं ! नीट सांग, तीं हल्लीं कोठें असावीं असा तुझा अंदाज आहे ? ”

तुर्क—“ आमच्या बाकीच्या मंडळीबरोबर पुढील मुक्कामावर असतील. ”

रिचर्ड—“ आजचा त्यांचा मुक्काम कोठें ठरला आहे ? ”

तुर्क—“ इस्किबाबा येथें ! ”

रिचर्ड—“त्या कैद्यांची पुढें काय व्यवस्था करण्याचा विचार आहे?”

तुर्क—“ म्हाताऱ्याला व त्याच्या बायकोला पाशासाहेबांचे गुलाम म्हणून ठेवून घेण्यांत येणार असून, त्यांच्या मुलीला जनानखान्यांत दाखल करण्यांत येणार आहे ! ”

रिचर्ड—“ बरें, तुम्हीं ह्या झोंपडीवर कां हल्ला केला ? ”

“ अल्लाहो अकबर ! ” तो तुर्क क्षीण स्वरानें म्हणाला “ ती आमची चूक झाली ! ”

त्या जखमी तुर्कांच्या जखमेंतून बराच रक्तस्राव झाल्यामुळें, तो अगदीं क्षीण होऊन पडला. त्याच्या तोंडून एक शब्दही निघेना. त्याच्या घशांत घर घर आवाज सुरू झाला. तो मरत असलेला पाहून रिचर्ड आपल्याशींच उद्गारला—“ बिचारा आपल्या मरणानें मरत आहे हें बरेंच आहे, नाहीं तर मला त्याची हत्या घ्यावी लागली असती. कारण, त्याला मी जिवंत कधींच सोडलें नसतें ! ”

शेतकऱ्यांची मुलगी युडोशिया शुद्धीवर आल्यावर देववरांतून बाहेर आली, आणि तिनें लॉर्ड मॅन्युअलचे घट्ट पाय धरून त्यांचे अत्यंत कृतज्ञतेनें आभार मानून त्यांना शेंकडों धन्यवाद दिले.

लॉर्ड मॅन्युअल करुणस्वरानें म्हणाले—“ मुली, माझे आभार मानण्यापेक्षां त्या देवतेचे आभार मान. तिनेंच तुला ह्या संकटांतून सोस-

विलें." इतक्यांत युडोशियाची आईही बाहेर येऊन त्यांच्या पायां पडली. तिजकडे वळून ते म्हणाले—" बाई, तुमच्यावर त्या देवतेनेंच कृपा केली, म्हणून तुमचा बचाव झाला, बरें, आम्हांला ज्यानें इकडे येण्याविषयीं सूचना दिली, ते तुमचे पति का ?"

बाई—" आमच्या संकटाची हकीकत जर त्यांनीं आपल्याला सांगितली असेल, तर ते माझे पतिच असले पाहिजेत, ते आपल्याला कोठें भेटले ? ते कोठें आहेत ?"

लॉर्ड मॅन्युअल—" ते आम्हांला त्या ओढ्याच्या पुलाजवळ भेटले, पण अजूनपर्यंत ते जिवंत राहिले असतील कीं नाहीं, याची मला शंकाच आहे ! त्यांना जबर जखमा झाल्या असल्यामुळें, ते अगदीं क्षिण झाले होते !"

लॉर्ड मॅन्युअलनीं त्या शेतकऱ्याच्या भेटीची हकीगत थोडक्यांत सांगितली, ती ऐकतांच युडोशिया व तिची आई ह्या दोघीही पुलाकडे धांवत निघाल्या. त्यांच्या मागून लॉर्ड मॅन्युअलही आपल्या मंडळीसह तिकडेच गेले. तो शेतकरी धक्क्याजवळ तसाच पडला होता. त्याची बायको व मुलगी त्याच्याजवळ जाऊन बसल्या. त्याची ती आसन्नमरण स्थिति पाहून दोघीही रडूं लागल्या. लॉर्ड मॅन्युअलच्या टोळीच्या घोड्यांच्या टापा ऐकतांच त्या मुमूर्षु शेतकऱ्यानें मान वळवून त्यांच्याकडे पाहिलें.

आपल्या डोळ्यांपुढें येत चाललेली अंधारी दूर करण्याकरितां डोळ्यावरून हात फिरवीत तो शेतकरी आपल्या बायकोकडे व मुलीकडे पहात क्षिण स्वरानें म्हणाला—" बाळ, युडोशिया तूं खुशाल आहेस ना ? आणि तीही बचावली का ?"

युडोशिया रडत रडत म्हणाली—" होय, बाबा, आम्ही दोघीही खुशाल आहों ! देवानें आमच्यावर कृपा केली, आणि थोर सरदारसाहेबांनीं आमच्यावर मोठे उपकार करून आम्हांला त्या तुर्कांच्या तावडींतून सोडविलें ! पण बाबा, तुमची काय दशा ही !"

तो शेतकरी लॉर्ड मॅन्यअलकडे कृतज्ञ दृष्टीनें अवलोकन करीत अस्पष्ट स्वरानें व मोठ्या प्रयासानें म्हणाला—" आहाहा, सरदारसाहेब, ईश्वर तुमचें कल्याण करो, तुमचे सर्व मनोरथ पूर्ण करो !"

थोड्याच वेळांत त्या बिचाऱ्याला शेवटचे भयंकर आंचके येऊं लागले. तो मूळचा सशक्त असल्यामुळें त्याचा प्राण सहजासहजीं जाणें शक्यच नव्हतें. रिचर्डनें अशा प्रकारचे मृत्यु बरेच पाहिलेले होते. तो चटकन् घोड्यावरून उतरून त्या शेतकऱ्याजवळ जाऊन बसला, आणि त्याचे आयास कमी करण्याकरितां त्यानें त्याचे दोन्ही हात हलकेच दाबून धरले. अर्ध्या मिनिटाच्या आंतच त्याची सर्व धडपड शांत झाली, क्षणभर घशांत घरघर झाली, आणि लागलेंच त्याचें प्राणोत्क्रमण झालें! त्याच्या बायकोनें व मुलीनें त्याच्याबद्दल अतिशय शोक केला.

लॉर्ड मॅन्युअलनीं त्या दोघींचें समाधान करण्याचा थोडासा प्रयत्न केला. इतक्यांत रिचर्ड त्यांच्याजवळ येऊन हळूच म्हणाला—" चला, सरदारसाहेब, आतां आपण पुढें जाऊं या! ह्या बायांना आतां कांहीं भीति बाळगण्याचें कारण दिसत नाहीं!"

लॉर्ड मॅन्युअल—" ठीक आहे! कोणी तरी दोघेजण तें प्रेत उचलून त्यांच्या झोंपडींत नेऊन पोंचवा, आणि लवकर निघून या. तोंपर्यंत आम्ही हळूहळू पुढें होतों!"

लॉर्ड मॅन्युअलनीं त्या दोघी दुःखी स्त्रियांना आणखी दोन समाधानाच्या गोष्टी सांगितल्या, आणि ते आपल्या मंडळीसह त्यांचा निरोप घेऊन तेथून पुढें निघाले. त्यांच्या सूचनेप्रमाणें दोन इसम प्रेताची व्यवस्था करण्याकरितां मागें राहिले.

ती मंडळी बराच वेळपर्यंत कांहीं न बोलतां मुकाट्यानें चालली होती. नंतर लॉर्ड मॅन्युअल गंभीर स्वरानें रिचर्डला म्हणाले—" आपला थोडा खोळंबा झाला खरा, पण आपण त्या झोंपडीकडे गेलों हें फार उत्तम केलें. त्या दोघी स्त्रियांची अब्रू बचावल्याचें पुण्य आपल्याला लाभलें, आणि त्या बिचाऱ्या शेतकऱ्याच्या मृत्युसमयींचा शुभाशीर्वाद मिळाला! हें पुण्य व हा आशीर्वाद आपल्याला खास उपयोगी पडेल, असा माझा दृढ विश्वास आहे!" रिचर्डही गंभीरपणें म्हणाला—"तथास्तु!"

## प्रकरण ८ वें.

# पहिली चकमक.



कॉन्स्टांटिनोपलहून निघाल्यापासून एकसारखा प्रवास करीत आलेली ही मंडळी रात्रीं आठ वाजण्याच्या सुमारास इसकीबाबा गांवाजवळ येऊन पोंचल्यावर, पुढें काय करावयाचें ह्याविषयीं आपापसांत खलबत करूं लागली. शेतकऱ्याच्या झोंपडीजवळ रिचर्ड वस्टोंच्या सवालावरून त्या जखमी मुसलमान स्वारानें सांगितल्याप्रमाणें, खरोखरच अहमद-पाशानें त्या रात्रीं त्या गांवांत मुक्काम केला होता. गांवाच्या अलीकडे सुमारें पावमैलावर, रस्त्यापासून थोड्या अंतरावर एक आंबराई दिसली, तेथें रिचर्डच्या सूचनेवरून सर्व मंडळी घोडयांवरून उतरली. त्यांनीं सोय सांपडेल तसतसे आपापले घोडे झाडांना गुंतविले, आणि कोणी जमिनीवर तर कोणी झाडांना टेंकून, हातपाय ताणून विसांवा घेत पडले, आणि मागील मुक्कामावर संपादन केलेल्या थोडया थोडया खाद्य पदार्थांचा समाचार घेऊं लागले. ह्या वेळीं मोकळया मैदानांत स्वच्छ चांदणें पडलें होतें, पण आंबराईतील दाट झाडीमुळें, तेथें मात्र फारसा प्रकाश नव्हता. केव्हां तरी वाऱ्यानें हालणाऱ्या जीर्ण पानांची सळसळ, किंवा कचित् रात्रीकिडयांची करकर यावांचून त्या ठिकाणची शांतता दुसऱ्या कशानेंही भंग पावत नव्हती.

कांहीं वेळानें रिचर्ड लॉर्ड सॅन्युअलना हळूच म्हणाला—“ अहमद-पाशाचा मुक्काम आज ह्या गांवांत आहे ह्यांत शंका नाहीं. त्या अर्थीं मला वाटतें, मीं वेषांतर करून गांवांत जावें, आणि नक्की बातमी काढून आणावी ! ”

लॉर्ड सॅन्युअल—“ ठीक आहे ! तूं परत येईपर्यंत आम्ही येथेंच तुझी वाट पहात राहतों ! पण फार सावधगिरीनें, संभाळून जा ! तुझ्या हुषारीवर तुझेंच केवळ नव्हे, तर आम्हां सर्वांचें जीवित अवलंबून आहे, हें ध्यानांत असूं दे ! ”

रिचर्ड—" सरदारसाहेब, मी तर शक्य तितकी सावधगिरी ठेवतोंच, तथापि हें साहस आहे; आणि असें साहस केल्याशिवाय गत्यंतरही नाहीं ! त्या अर्थीं आपण आतां असें ठरवूं—मी येथून निघाल्यापासून दोन तासांत, किंवा फार फार तर तीन तासांत जर परत आलों नाहीं, तर मी शत्रूच्या तावडींत सांपडलों. असें बेलाशक समजा, आणि आपल्याला योग्य वाटेल तशी पुढें तजवीज करा ! जरी मी दुर्दैवानें तुर्कांच्या हातीं लागलों, आणि त्यांनीं कितीही खटपट केली तरी, माझ्या तोंडून त्यांना एक शब्दही कळणार नाहीं; ही खात्री असूं द्या.

लॉर्ड मॅन्युअल—" त्याबद्दल मला मुळींच शंका नाहीं ! ह्या प्रसंगीं ईश्वर तुझें संरक्षण करो ! त्याच्या वांचून ह्या वेळीं कोणीही साह्य करण्यास समर्थ नाहीं ! "

रिचर्डनें आपल्या घोड्याच्या जिनास बांधलेलें बोचकें आणावयास एका शिपायास सांगितलें; त्यानें तें तत्काळ आणून दिलें. तें सोडतां सोडतां रिचर्ड म्हणाला—"ही माझी वेषांतराची सामग्री ! हे कपडे अंगावर घातले कीं निघालोंच ! "

थोड्याच वेळांत रिचर्डचें वेषांतर पूर्ण झालें. त्याला तुर्की वेष बेमालुम घेतां येतो हें जरी लॉर्ड मॅन्युअलना माहीत होतें, तरी त्याच्याकडे पाहतांच ते देखील क्षणभर चकित झाले. त्याचा पेहराव, त्याचा चेहरा आणि त्याची मुद्रा देखील बरोबर तुर्कासारखी दिसूं लागली. इतकेंच नव्हे, पण त्याचा स्वर व त्याची हालचाल देखील थेट जातिवंत तुर्कासारखी बनली. त्यानें एका गरीब तुर्काचा वेष धारण केला होता. त्याच्या बरोबरच्या लोकांहून अधिक चाणाक्ष लोकांनीं देखील त्याच्याकडे चौकसदृष्टीनें पाहिलें असतें, तरी तो अस्सल तुर्क नसेल असा त्यांना क्षणभरही संशय आला नसता.

तेथून निघतांना रिचर्ड म्हणाला—" सरदारसाहेब, आणि दोस्त, हो, येतों मी आतां ! ईश्वर कृपा करील तर, आणखी दोन तीन तासांत आपली पुनः भेट होईलच ! जरी तसें न घडलें तरी, माझें कर्तव्य मीं योग्य रीतीनें बजावलें ह्याबद्दल माझ्या मनाला समाधानच वाटेल, आणि आपणही आपलें कर्तव्य असेंच बजावाल, अशी माझी खात्री आहे ! "

" ईश्वर तुमचें संरक्षण करो ! " कांहीं जण गंभीर स्वरानें उद्गारले.

रिचर्ड तत्काळ आंबराईतून बाहेर पडला, आणि लवकरच मोठ्या रस्त्याला लागला. थोड्याच वेळांत तो गांवाजवळ येऊन पोंचला. कडेच्या एका घराजवळ त्याला दोघे तुर्की गस्तवाले भेटले. त्यांपैकीं एकानें रिचर्डला दुरून येतांना पाहतांच, " कोण ? " असें पुकारलें.

"दोस्त !" रिचर्डनें निर्भयपणें उत्तर दिलें---"मी बोर्गियाहून आलों आहें, आणि पाशासाहेबांना एक महत्वाची बातमी कळवावयाची आहे !"

" तुझें नांव काय ? " गस्तवाल्यानें दरडावून विचारलें.

" मुस्तफा. " रिचर्डनें शांतपणें उत्तर दिलें.

दुसरा गस्तवाला पुढें होऊन म्हणाला--" तुझा निरोप काय असेल तो आम्हांला सांग, म्हणजे तो आम्ही पाशासाहेबांच्या कानावर घालण्याची तजवीज करूं ! "

रिचर्ड--" छे छे, तसें करितां येणार नाहीं ! तो निरोप सांगितला तर, मीं स्वतःच सांगितला पाहिजे, नाहीं तर माझा माझ्याजवळ राहील. तो कोणालाच कळणार नाहीं ! "

रिचर्डचें हें उत्तर त्या गस्तवाल्यांना रुचलें नाहीं, तथापि त्याला एकदम धुडकावून देण्याचीही त्यांची छाती होईना. त्यांनीं थोडा वेळ आपापसांत हळुहळू कांहीं वाटाघाट केली. नंतर त्यांतील एकजण, मुस्तफा नामधारी-रिचर्डला म्हणाला--" तूं क्षणभर येथेंच रहा, तोंपर्यंत मी पाशासाहेबांचा हुकूम घेऊन येतों ! "

एक गस्तवाला पाशाकडे निघून गेला, व दुसरा मुस्तफासह तेथेंच बसला. ते दोघे एकमेकांशीं एकही शब्द बोलले नाहींत. थोड्याच वेळानें पाशाकडे गेलेला शिपाई परत येऊन, त्यानें रिचर्डला आपल्या बरोबर पाशासाहेबांकडे चलण्यास विनंति केली. रिचर्ड तत्काळ त्याच्या बरोबर निघाला. आपण समजून उमजून काळाच्या जबड्यांत शिरत आहों, हें तो जाणून होता, तथापि त्याचें मन बिलकुल कचरलें नाहीं.

इसकबाबा हें अगदींच लहान खेडें होतें. तेथें फक्त चाळीस पन्नास घरांची वस्ती होती. तुर्कांची धाड तेथें येऊन पडण्यापूर्वींच तेथील रहिवासी शेतकरी आपापलीं घरेंदारें सोडून रानांत पळून गेले होते.

प्रत्येक घराच्या दाराशीं मुसलमान शिपायांच्या टोळ्या अस्ताव्यस्त लोळंत असलेल्या दिसत होत्या. बहुतेक लोक दारूनें बेहोष होऊन गेले होते, आणि कित्येक ठिकाणीं तर अत्यंत किळसवाणे बीभत्स प्रकार दृग्गोचर होत होते. तेथील प्रार्थना मंदिर हीच काय ती सगळ्या गांवांत मोठी इमारत असल्यामुळें, बहुतेक स्वारांचे घोडे तेथेंच बांधण्यांत आले होते, आणि त्यांच्यापुढें गवत व धान्य इतकें विसकटलेलें होतें, कीं, त्यावरून त्या तुर्की लुटारूंना त्या मोफत लुटलेल्या गरीब शेतकऱ्यांच्या मूल्यवान् जिनसांची कवडी इतकीही किंमत वाटत नव्हती, हें उघड दिसून येत होतें. प्रार्थनामंदिरासमोरच एक मोठें घर होतें, तेथें पाशासाहेबांनीं आपला तळ ठोकला होता. तें घर त्या गांवच्या कोतवालाचें असून, बरेंच प्रशस्त व व्यवस्थित होतें. घराच्या दरवाज्यावर दोन शिपायांचा सशस्त्र खडा पाहरा होता, तथापि त्यांनीं रिचर्डला व त्याच्या बरोबरच्या गस्तवाल्याला मुळींच अटकाव केला नाहीं. ते दोघे आंत गेल्यावर, गस्तवाल्यानें रिचर्डला एका दालनांत पाशासाहेबांसमोर नेऊन उभें केलें, आणि आपण निघून गेला.

अहमदपाशा शरीरानें बराच स्थूल, पण सुस्वरूप असून, त्याचें वय ह्या वेळीं जवळ जवळ पन्नास वर्षांचें होतें. तो एका गालिच्यावर तक्याशीं टेंकून बसला होता. दिवसभर प्रवासाचे झालेले श्रम, तो वारंवार हुक्याच्या झुरक्यानें व सरबताच्या घुटक्यानें परिहार करीत होता. वेषधारी मुस्तफा आंत येतांच पाशासाहेबांस तुर्की पद्धतीप्रमाणें कुर्निसात करून आदबीनें बाजूस उभा राहिला, आणि तुर्की रिवाजाप्रमाणें, पाशा साहेबांची आपल्याशीं बोलण्याची केव्हां लहर लागते, याची वाट पाहूं लागला.

कांहीं वेळानें पाशा त्याच्याकडे वक्रदृष्टीनें पहात म्हणाले—" काय रे तूं कोठून आला आहेस ? तुझें काय काम आहे ? "

मुस्तफा—" गरीब परवर, मी बोर्घियाहून आलों आहें ! तिकडील एक महत्त्वाची हकीगत सरकारच्या कानांवर घालावयाची आहे ! "

अहमदपाशा सरबताचा आणखी एक घोट घेऊन म्हणाले— " काय ती ? "

मुस्तफा—“ तेथील ख्रिस्ती काफरांनीं विसा येथील रोमन लष्कराची मदत मागितली असून, आड्रियानोपलला जातांना वाटेंत आपल्या स्वारीला आडविण्याचा त्यांनीं बेत केला आहे. ”

“ अल्ला हो अकबर ! ” पाशा हंसून म्हणाला—“ त्यांच्या बापाच्या हातून देखील तसें घडून येणें शक्य नाहीं ! आम्हांला त्याची मुळींच पर्वा वाटत नाहीं ! ”

मुस्तफा—“ आपण एका ख्रिस्ती अधिकाऱ्याला त्याच्या कुटुंबासह कैद केलें असल्याची तेथें बातमी आहे, आणि त्या मंडळींना आपल्या हातून सोडविण्याचा त्या काफरांचा निश्चय आहे ! मला ही बातमी कळतांच, ती आपल्या कानांवर घालणें हें माझें आद्य कर्तव्य आहे असें मला वाटलें. ”

“ तूं केलेंस तें ठीक केलेंस ! ” असें म्हणून पाशासाहेब पुनः हुक्का ओढूं लागले. त्यांची आणखी केव्हां काय विचारण्याची लहर लागते, याची वाट पहात मुस्तफा स्तब्ध उभा राहिला.

कांहीं वेळानें अहमदपाशा मुस्तफाकडे वळून म्हणाले—“ विसा येथें ख्रिस्ती काफरांचें कितीसें लष्कर आहे ? ”

मुस्तफा—“ इन्‌शाल्ला ! ह्या बंद्याला तें नक्की कांहीं माहीत नाही !”

पाशा—“ आमच्यावर केव्हां आणि कोठें छापा घालण्याचा त्यांचा बेत ठरला आहे ? ”

मुस्तफा—“ आज रात्रीं आणि येथेंच हल्ला करण्याचा त्यांचा विचार ठरला होता. तथापि ते मध्यरात्रीपर्यंत येथवर कांहीं येऊं शकणार नाहींत, असा माझा अंदाज आहे ! ”

पाशा—“ ठीक आहे, खुशाल येऊं दे त्यांना, आमची केव्हांही तयारीच आहे ! कैदी ह्याच घरांत बंदोबस्तांत आहेत, ते मुळींच त्यांच्या हातीं लागणार नाहींत ! आमची त्यांची येथेंच गांठ पडून चकमक झडावी असा ईश्वरी नेमच ठरला असला तर, तो कोण कसा चुकविणार ! ”

मुस्तफा—“ जनाबेअली, मी गांवांत येतांना लक्षपूर्वक चोहोंकडे पहात आलों. विसाकडील बाजूच्या रस्त्याला, येथून सुमारें अर्ध्या मैला-

वर एक अरुंद खिंड आहे, त्या खिंडींतूनच इकडे येण्याचा मार्ग आहे. त्यावांचून दुसरी वाट नाहीं. तेव्हां आपले दहावीस स्वार जरी ती खिंड संभाळून उभे राहिले, तरी ते तेथें केवढ्याही मोठ्या लष्कराला थोपवून धरूं शकतील अशी माझी खात्री आहे!"

कांहीं वेळ विचार करून अहमदपाशा म्हणाले—"तूं ती खिंड आमच्या स्वारांना दाखविशील का?"

मुस्तफानें ती गोष्ट आनंदानें मान्य केली, तेव्हां पाशानें आपल्या एका अंमलदारास बोलावून शंभर स्वारांना तयार होऊन येण्याचा हुकूम दिला.

विसाच्या लष्करासंबंधानें अहमदपाशा जरी वरवर बेपर्वाईनें बोलत होता, तरी त्या लष्कराच्या पराक्रमाबद्दल व त्यावरील सेनापतीच्या हुषारीबद्दल त्या प्रांतांत बरीच ख्याति होती, आणि तुर्कांनाही त्याची दहशत वाटत होती.

रुमेलिया प्रांताची खडानूखडा माहिती रिचर्डला असल्यामुळें त्यानें जी खिंडीची माहिती सांगितली, तीही कांहीं अगदींच चुकीची नव्हती. पाशानें आपल्या कांहीं माहितगार लोकांस बोलावून आणून, त्यांच्याकडून त्या माहितीच्या खरेपणाबद्दल खात्री करून घेतली.

पाशाच्या हुकमाप्रमाणें थोड्याच वेळांत शंभर तुर्की स्वार व त्यांवरील अंमलदार तयार होऊन आले. पाशानें रिचर्डला त्या लोकांना त्या खिंडींतील सोईची जागा दाखविण्यास सांगितलें. त्याप्रमाणें रिचर्ड उर्फ मुस्तफा त्या टोळीच्या अधिकाऱ्याबरोबर निघाला.

आपल्या स्वारांना ती खिंड दाखवून, तत्काळ आपल्याकडे परत येण्याविषयीं पाशानें मुस्तफाला ताकीद केली होती. कारण, त्या प्रांतासंबंधानें आणखी कांहीं माहिती त्याला विचारून घ्यावयाची होती. त्याप्रमाणें रिचर्ड त्या स्वारांच्या टोळीला खिंडींत उभें करून परत निघाला. पण तो आलेल्या सरळ मार्गानें गांवाकडे न जातां, दुसऱ्याच बाजूला वळला. कारण, त्याचे दोस्त आंबराईंत उतरले होते, तेथें प्रथम जाऊन, त्यांना झालेली हकीगत कळवून, मग गांवांत परत जावें, असा त्याचा विचार होता. त्याला आंबराईंतून जाऊन दोन तास होऊन गेले असल्यामुळें, आपले सोबती आपल्याबद्दल काळजी करीत असतील,

त्यांची काळजी दूर करणें हें आपलें अवश्य कर्तव्य आहे असें त्याला वाटत होतें.

खिंडींतून परत निघाल्यावर कांहीं वेळ सरळ रस्त्यानें परत जाऊन, नंतर रिचर्ड एका बाजूला वळला. त्यापूर्वी त्यानें चोहोंकडे लक्षपूर्वक निरखून पाहून, आपल्याकडे कोणाची नजर नाहीं किंवा पाळतीवरही कोणी नाहीं, अशी खात्री करून घेतली. थोडयाच वेळानें तो आंबराईंत येऊन पोंचला. त्याला पाहतांच त्याच्या सर्व मित्रांनीं त्याचें मोठ्या आनंदानें स्वागत केलें.

" कसें काय, रिचर्ड ? " लॉर्ड मॅन्युअल उत्कंठित स्वरानें म्हणाले— " काय काय झालें ? बातमी मिळाली का ? कैदी कोठें ठेवलेले आहेत ? त्यांची समक्ष भेट झाली का ? आपण पुढें काय करावयाचें ?

" थांबा, थांबा, सरदारसाहेब, मला एकेक गोष्ट तरी सांगू द्या ! " रिचर्ड हंसून म्हणाला. नंतर झालेली सर्व हकीगत व कळलेली बातमी थोडक्यांत सांगून, तो पुढें म्हणाला—" आतां पुढें आपण काय करावयाचें हें उघडच दिसत आहे ! तळावर आतां तुर्की स्वारांपैकीं चाळीस पंचेचाळीस जणांपेक्षां अधिक स्वार खास नाहींत. आपण सोळा इसम आहों ! त्यांची संख्या आपल्या तिप्पट आहे हें खरें, पण ते बहुतेक दारूच्या निशेनें धुंद झालेले आहेत; शिवाय विसाच्या लष्कराचा हल्ला येणार ह्या बातमीनें त्यांचा दमही बराच खचला आहे; आणि त्यांच्यापैकीं निवडक शंभर स्वार खिंडींत जाऊन बसले आहेत, व गाळ तेवढा गांवांत तळावर शिल्लक उरला आहे ! अशा स्थितींत आपण सोळा इसम त्यांना पुरून उरण्यासारखे आहों, अशी माझी खात्री आहे. "

लॉर्ड मॅन्युअल—" कांहीं असलें तरी, आपण प्रयत्न हा केलाच पाहिजे ! मात्र हें काम हां हां म्हणतां उरकलें पाहिजे. त्यांना सावध होऊन सावरासावर करण्यास देखील सवड मिळतां कामा नये ! "

रिचर्ड—"पण आपण त्यांच्यावर मोकळ्या मैदानांत उघडपणें हल्ला करण्याचें कारणच नाहीं ! कैदी ज्या घरांत ठेवण्यांत आले आहेत, तें घर प्रार्थनामंदिरासमोरच असून, तेवढेंच काय तें चिरेबंदी आहे, ही त्याची मोठी

खूण आहे. त्याच्या पिछाडीस एक बाग असून त्याच्या पलीकडे मळे व शेवटीं ही आंबराई आहे. आपण सर्व जण त्या बागेच्या पलीकडे घराच्या तटाबाहेर जवळच आपले घोडे बांधून ठेवा, आणि तटावरून बागेंत उतरून, मागील दारानें घरांत शिरा, म्हणजे कामच झालें!"

लॉर्ड मॅन्युअल—"पण तूंही आमच्या बरोबर येणारच ना?"

रिचर्ड—"छे छे, तुमच्याबरोबर येण्यापेक्षां मी अगोदरच तेथें जाऊन बसतों, म्हणजे घरांत शिरण्याच्या कामीं तुम्हांला बरीच मदत करितां येईल! हं, आटपा लवकर, घोड्यावर स्वार व्हा, आणि चालू लागा. मी आपल्याला वाट दाखवून, मग दुसऱ्या रस्त्यानें गांवांत जाऊन पाशाच्या भेटीला त्या घरांत जाणार! चंद्र मावळला, ही ईश्वराची कृपाच समजली पाहिजे! आतां कोणाच्या दृष्टीस पडण्याची फारशी भीति उरली नाहीं!

त्या मंडळींना घोड्यावर बसून निघण्यास फारसा विलंब लागला नाहीं. रिचर्डचा घोडा एका स्वारानें आपल्या बरोबर चालविला होता, आणि रिचर्ड लॉर्ड मॅन्युअलच्या घोड्याबरोबर रस्त्याला लागेपर्यंत पायींच चालला होता.

ती मंडळी रस्त्याला लागल्यावर रिचर्ड समोर बोट दाखवून म्हणाला—"तीं उंच उंच झाडें दिसत आहेत, तींच त्या घराच्या पिछाडीला आहेत. येथून थेट त्या झाडांच्या रोखानें चला. वाटेंत तुम्हांला कांहीं अडथळा येण्याचा संभव नाहीं, तथापि शक्य तितक्या सावधगिरीनें वागा. त्या घराची विशेष खूण तुम्हांला सांगितलीच आहे, त्यावरून घर चुकण्याची कांहीं भीति नाहीं. आतां आणखी एकच गोष्ट सांगावयाची आहे. आतांपासून एक तासानें तुम्ही त्या घरांत शिरा. तितकी मला सवड पाहिजे!"

ह्याप्रमाणें माहिती सांगून, रिचर्ड त्या मंडळीला सोडून आपल्या रस्त्याला लागला, आणि थोड्याच वेळांत गांवांत येऊन पोंचला. आतां त्याला असें दिसून आलें कीं, तुर्की स्वार जरी तळावर फारसे उरले नव्हते, तरी आपण पिकविलेल्या विसाच्या लष्कराच्या कंडीमुळें, अवशिष्ट स्वार फार सावधगिरीनें वागत आहेत. वेशीवरचे पहारेकरी दुप्पट

वाढविलेले होते, आणि चोहोंकडे गस्तीचा बंदोबस्त विशेष सक्तीचा दिसत होता. नुकताच जेथें दारूचा अड्डा होता, तेथें आतां शिपायांची चौकी बनली होती, आणि दोन तासांपूर्वी बेहोष व अस्ताव्यस्त पडलेले सर्व तुर्की शिपाई आतां व्यवस्थेनें व सावधगिरीनें वागत होते.

पाशासाहेबांच्या मुक्कामावर आल्याबरोबर रिचर्डनें आपण परत आल्याची वर्दी पाशा साहेबांकडे पाठविली. थोड्याच वेळांत पाशा साहेबांनीं त्याला आपल्या समोर बोलावलें. पाशानें त्याला त्या प्रदेशाची वाटेंतील अडचणींच्या ठिकाणांची आणि आड्रियानोपलजवळच्या निर्भय प्रदेशांत जाऊन पोंचेपर्यंत कोठें कोठें संकटें येण्याचा संभव आहे ह्याविषयींची सर्व खुलासेवार माहिती करून विचारून घेतली. ह्या संभाषणांत जवळ जवळ अर्धा तास निघून गेला. नंतर अहमदपाशानें मुस्तफाला चांगलें बक्षीस देण्याचें वचन देऊन निरोप दिला.

रिचर्ड बाहेर येऊन अंगणांत एका ओटयावर बसला. तेथें आणखी बरेच लष्करी लोक हुक्का ओढीत, सरबत पीत व गप्पा मारीत बसले होते. रिचर्ड बाह्यतः आपण त्यांच्या गोष्टी ऐकत सहज बसलों आहों, असें दर्शवीत होता. पण खरोखर त्याचें सर्व लक्ष त्या घराच्या आकारमानाचा आणि तेथील जाण्यायेण्याच्या दारांचा विचार करण्यांत गुंतलें होतें. ती इमारत चौकानी असून पुढील तीन बाजूंना दुमजली बांधकाम असून मागील बाजूस मात्र बगीचा व ठेंगणा तट होता. पाशाची बैठककीची खोली गांवाकडील बाजूला रस्त्याला लागून होती. त्यावरून सिलिव्हरीचे कोतवाल मिस्टर कॉनियाटिस व त्यांची मंडळी त्या भागांत बसून, त्याच्या समोरच्या दुसऱ्या भागांत असावी, असा रिचर्डनें सहजच अंदाज केला. तथापि आपला अंदाज बरोबर आहे कीं नाहीं याची खात्री करून घेण्याच्या उद्देशानें, त्यानें त्या मंडळीशीं त्याच दिशेनें बोलण्याचा उपक्रम केला.

रिचर्ड इकडे तिकडे पहात आश्चर्यानें म्हणाला—" ह्या असल्या भिकार झोंपडयांत तुम्ही इतक्या महत्वाच्या कैद्यांचा बंदोबस्त तरी कसा ठेवूं शकतां कोण जाणे! पाशासाहेबांना तर त्या कैद्यांसंबंधानें विशेष काळजी दिसते! "

एक वृद्ध तुर्क समोर बोट करून म्हणाला—" तें कां? ती जागा चांगली मजबूत आणि बंदोबस्ताची आहे! कैद्यांना तेथून पळून जातां येणें शक्य नाहीं!"

रिचर्डचा अंदाज खरा ठरला. तो पुढें म्हणाला—" शिवाय त्यांच्यावर पाहराही भरपूर असेलच!"

वृद्ध तुर्क—" हे:, तेथें पाहऱ्याचें काय कारण? दरवाजे चांगले मजबूत असून, त्यांना भक्कम कुलपें ठोकलेलीं आहेत!"

रिचर्ड—" मग काय त्यांची भीति आहे! त्या विस्ताच्या ख्रिस्ती काफरांना तर येथपर्यंत येतां येणेंच आतां शक्य नाहीं! अल्लाच्या व पैगंबराच्या कृपेनें इस्तंबूलपर्यंतचा सर्व मुलूख एकदां आपल्या सुलतान साहेबांच्या ताब्यांत आला म्हणजे मुळींच भीति बाळगावयास नको! तोंपर्यंत ह्या प्रांतांत राहणें मोठें धोक्याचें झालें आहे!"

" इनशाल्ला!" दुसरा एक तुर्क उद्गारला—" भल्या माणसा, इस्तंबूलपर्यंतच काय म्हणतोस? त्याच्याही पलीकडे जाण्याचा सुलतानसाहेबांचा इरादा आहे. आतां आड्रियानोपल येथें आम्हांला फार दिवस कांहीं बसून रहावें लागणार नाहीं! आमचा हा हिंवाळा आड्रियानोपलचा शेवटचाच!"

रिचर्ड—" आम्ही असें ऐकतों कीं, सुलतानसाहेबांनीं खूप जंगी तयारी चालविली आहे! मला स्वतःला त्यासंबंधानें कांहीं माहिती नाहीं, पण आमच्या गांवांतील ख्रिस्ती काफर मात्र त्या बातमीनें बरेच बावरलेले दिसत आहेत!"

इतक्यांत शेजारच्या मंदिरांतून 'लाइला इइल्लिलामहमद रसूलुल्ला!' अशी कर्कश आरोळी रिचर्डच्या कानावर आली. ही रात्रींच्या निमाजाची वेळ झाल्याची सूचना होती. ती ऐकतांच सर्व तुर्क लोक गुडघे टेंकून निमाज पढूं लागले. रिचर्डलाही त्यांच्यासारखी कवाईत करणें भाग पडलें. तथापि तो मनांतल्या मनांत देवाची प्रार्थना करून म्हणाला, "ईश्वरा, मला ह्या प्रसंगीं राष्ट्रकार्यासाठीं ह्यांचें अनुकरण करणें भाग पडत आहे, पण त्याबद्दल तूं मला क्षमा कर!"

निमाज आटोपल्यावर त्या मंडळींचें पुनः संभाषण सुरू झालें. बोलतां

बोलतां विसाच्या रोमन लष्कराच्या गोष्टी निघाल्या. त्यांचा हल्ला येण्याचा कितपत संभव आहे व आला तर काय परिणाम होईल, ह्या विषयीं वाटाघाट सुरू झाली. त्यांत त्या मुसलमानांना रोमन लष्कराचें किती भय वाटत होतें, हें पाहून मुस्तफा वेषधारी रिचर्डला मोठी मौज वाटली, आणि त्यानें त्यांची भीति शक्य तितकी अधिकच वाढविली.

एवढा वेळ मुकाट्यानें ऐकत बसलेला एक तुर्क गंभीर स्वरानें म्हणाला—" तर मग आज तिसरे प्रहरीं त्या खोऱ्यांतील झोंपडीजवळ जी टोळी आपल्यावर चालून आली होती, ती ह्या विसाच्या लष्करापैकींच असावी, असें वाटतें ! त्या वेळीं आपल्या पाशासाहेबांची चांगलीच कमबख्ती आली होती, पण थोडक्यांत निभावलें. ते स्वार खिस्ती काफर असल्याचें प्रथम मींच ओळखलें ! आणखी एक क्षणभर जर माझी नजर तिकडे गेली नसती, तर आपले पाशासाहेब ह्या वेळीं विसाच्या किल्ल्यांतील अंधार कोठडीची हवा खात पडले असते !"

" किंवा कदाचित् स्वर्गालाही गेले असते ! " दुसरा एकजण उद्गारला.

तिसरा एक तुर्क म्हणाला—" पण त्यांना स्वर्गास जाण्याची मुळींच इच्छा नाहीं ! कारण, त्यांना स्वर्गांतल्या पऱ्यांपेक्षां आड्रियानोपलच्या पऱ्याच फार आवडतात ! खरोखर, आपल्या कैदेंत हल्लीं जी एक परी आहे, तिच्या इतकी खुपसुरत परी स्वर्गांत देखील असेल कीं नाहीं, कोण जाणे ! "

दुसरा एक वृद्ध तुर्क अधिकारी म्हणाला—" खरेंच ! तुझें म्हणणें अगदीं बरोबर आहे ! इतकी सुंदर तरुणी आपल्या सुलतानसाहेबांच्या जनानखान्यांत देखील नसेल ! किंबहुना पूर्वीचे सुलतान अमुराथ, ज्यांची सौंदर्याचे भोक्ते म्हणून फार प्रसिद्धी होती, त्यांच्याही जनानखान्यांत असण्याची संभव नाहीं !"

रिचर्डचें लक्ष ह्या भाषणाकडे मुळींच नव्हतें. आपले सोबती येऊन पोंचल्याची चाहूल आपल्याला केव्हां ऐकूं येते, ह्याची तो एकाग्रचित्तानें वाट पहात होता. थोड्याच वेळांत भिंतीच्या पलीकडे बागेंत हळूच शीळ वाजलेली त्याला ऐकूं आली.

ती शीळ तेथील तुर्की शिपायांच्याही कानावर आली. त्यांपैकीं एक दोघे भयभीत स्वरानें म्हणाले—" हें काय ? हें काय ? "

" कंदील कोठें आहे ? " पाहऱ्यावरील वृद्ध अधिकारी म्हणाला— " हसन आणि अबदुल्ला, तुम्ही दोघे कंदील घेऊन पिछाडीच्या दारानें बागेंत जा, आणि काय आहे तें पाहून या ! "

रिचर्ड—" कशाला आतां ? कदाचित् एखादें भूतखेत असेल ! "

अबदुल्लाच्या मनांतही जागचें हलावयाचें नव्हतें, म्हणून तो म्हणाला— " असेल कांहीं तरी, त्याची कशाला पंचाईत पाहिजे ? "

हसन भयभीत स्वरानें म्हणाला—"या खुदा ! येथें भुतें आहेत का ? "

मुस्तफा—" हो, असें म्हणतात खरें ! ह्या प्रांतात ह्या इस्कीबाबा गांवची भुतांच्या बाबतींत फार प्रसिद्धि आहे ! असल्या जुन्या आणि पडक्या इमारतींत तर भुतें हटकून असावयाचींच ! "

आणखी एकजण म्हणाला—" आणि ह्या रोमन लोकांतील भुतें तर फारच दुष्ट असतात म्हणे ! "

मुस्तफा—" हो, असें मींसुद्धां ऐकलें आहे खरें ! आमच्या बोर्धिया गांवीं त्यांच्या धर्माचा एक मुफती आहे, तो आपला स्वतःचाच अनुभव परवां मला सांगत होता ! "

" काय काय म्हणत होता " एकदम दोघे तिघे उत्कंठेनें म्हणाले.

त्या लोकांना भुताखेतांच्या काल्पनिक गोष्टी सांगून, त्यांची शक्य तितकी घाबरगुंडी उडवावयाची रिचर्डला हौसच होती. तो भोंवतालच्या सर्व मंडळीकडे पाहून म्हणाला—" सांगूं का ती हकीगत ? "

" सांगा, सांगा ! " वृद्ध अधिकारी म्हणाला, व त्याला सर्वांचें अनुमोदन मिळालें.

रिचर्ड—" आतां चंद्र मावळून काळोख पडला आहे, तेव्हां मी तुमच्याजवळ येऊन बसतों, आणि मग तें सांगतों ! "

रिचर्डनें इतकी भीति प्रदर्शित केल्यावर बाकीची मंडळी सहजच भ्याली, आणि सर्व जण एकमेकांजवळ घोळका करून, रिचर्डच्या समोर येऊन बसले. त्यामुळें बागेच्या तटाजवळून ते बरेच दूर झाले.

रिचर्ड एकदां खाकरून म्हणाला—" ऐका तर ! बोर्धिया येथें

पूर्वी ॲब्राहॅम नांवाचा एक ख्रिस्ती मनुष्य रहात होता. तो त्या गांवांचा काजी ( न्यायाधीश ) होता, पण अतिशय दुष्ट मनुष्य होता. त्याचा हात लांच घेण्यास नेहमीं पुढें असे, पण दानधर्म किंवा परोपकार करण्यास कधीं पुढें होत नसे. लांच घेतल्याशिवाय तो निवाडा कधींच देत नसे. त्यानें कित्येक अनाथ, विधवा बायाबापडयांस आणि निराश्रित, परदेशी पोरांसोरांस लुबाडून पैसा मिळविला होता. गोरगरिबांवर तो अतिशय जुलूम करीत असे. शेवटीं तो मरण पावला. तो असा दुष्ट असल्यामुळें, लोकांनीं त्याचें प्रेत त्याच्या दर्ग्याच्या आवारांत दफन न करितां, गांवाबाहेर नेऊन पुरलें. त्यानंतर थोडयाच दिवसांत त्या बाजूला एक समंध हिंडतांना दिसूं लागल्याचा बोभाटा ऐकूं येऊं लागला. त्यानें कित्येक मुलेंही खाऊन टाकल्याची बातमी उठली. लोकांनीं त्याबद्दल चोहोंकडे पुष्कळ तपास केला, पण त्या समंधाचें वसतिस्थान कोणाला सांपडलें नाहीं. एके दिवशीं असें घडून आलें कीं, त्या ॲब्राहॅमचा एक मित्र डेमिट्रियस नांवाचा होता, तो रानांत ससाच्या शिकारीला गेला होता, तेथें त्याला रात्र झाली, आणि तो अतिशय दमला होता, म्हणून एका ठिकाणीं विसावा घेण्यासाठीं पडला. त्यानें आपल्या हातांतील सोटा आपल्या छातीवर आडवा ठेवला होता. कर्मधर्मसंयोगानें, तो ज्या ठिकाणीं पडला होता, त्याच ठिकाणीं पूर्वी ॲब्राहॅमचें प्रेत पुरलेलें होतें. उरावरील आडव्या सोट्याच्या योगानें त्याचा आकार त्याच्या धर्मातील क्रुसासारखा बनला होता. त्याला तशीच झोप लागली. मध्यरात्रीच्या सुमारास तो एकदम जागा झाला. त्या वेळीं वारा फार जोराचा वहात होता, आणि आकाशांतून ढग एक सारखे एका मागून एक धांवत होते. ती रात्र चांदण्याची होती, पण ह्या ढगांच्या शर्यतीमुळें, केव्हां स्वच्छ चांदणें तर केव्हां गडद काळोख पडत होता. वाऱ्याच्या योगानें शेजारच्या डोंगरी जंगलांतून भयप्रद प्रतिध्वनि ऐकूं येत होते. केव्हां उजाडतें, असें डेमिट्रियसला होऊन गेलें. इतक्यांत जमिनींतून त्याला एक आवाज ऐकूं आला.

"डेमिट्रियस, डेमिट्रियस," अशी त्याला हाक ऐकूं येऊं लागली. तो आवाज ॲब्राहॅमचा असल्याचें डेमिट्रियसनें तत्काळ ओळखलें तो इतका

घाबरला कीं, त्याचें सर्वांग थंडगार घामानें डबडबून, थरथर कापूं लागलें. त्याला जाग्यावरून हालण्याचेंही सामर्थ्य उरलें नाहीं !

" डेमिट्रियस, " तो आवाज पुनः आला--" मला बाहेर यावयाचें आहेरे. "

डेमिट्रियस सर्व धैर्य एकवटून खोल स्वरानें म्हणाला--" मग कां येत नाहींस ? "

समंध--" तुझा सोटा तुझ्या छातीवर आडवा क्रुसासारखा आहे, त्यामुळें बाहेर येतां येत नाहीं ! तेवढा सोटा काढून बाजूला ठेव ! "

समंधाला क्रुसाची इतकी भीति वाटते हें पाहून डेमिट्रियसला बराच धीर येऊन तो म्हणाला--" छे छे, मी नाहीं काढणार ! तूं बाहेर आल्याबरोबर मला फाडून खाशील ! "

समंध--" नाहीं रे, खचित मी तुला कांहीं इजा करणार नाहीं ! "

डेमिट्रियस--" पण तशी तूं शपथ घेतल्याशिवाय मला खरें वाटणार नाहीं ! "

समंध--" हो हो, शपथपूर्वक मी तुला कांहीं करणार नाहीं ! "

डेमिट्रियस--" हेः ! असल्या मोघम शपथेवर माझा मुळींच विश्वास नाहीं ! "

समंध--" तर कशी शपथ घेऊं ? सांग तूं सांगशील तशी घेतों !"

समंध कोणती शपथ मोडूं शकत नाहीं, हें डेमिट्रियसला माहीत होतें. तो म्हणाला--" आपल्या मालकाची-सैतानाची शपथ घे ! "

समंध प्रथम तें कबूल करीना. त्यानें डेमिट्रियसचीं बरींच आर्जवें केलीं व धमक्याही घातल्या, पण त्यानें आपला आग्रह सोडला नाहीं. तेव्हां नाइलाज होऊन समंधानें सैतानाची शपथ घेतली. नंतर डेमिट्रियसनें आपल्या छातीवरील सोटा बाजूला केला, व तो उठून बसला, तेव्हां समंध बाहेर निघून गेला. डेमिट्रियस उजाडेपर्यंत तेथेंच बसून राहिला. उजाडण्याच्या सुमारास तो समंध पुनः आपल्या कबरस्थानाजवळ परत आला. त्यावेळीं त्याचे हात व तोंड रक्तानें माखलेलें डेमिट्रियसच्या दृष्टीस पडलें, तें पाहून तो फार घाबरला.

समंध आपल्या कबरस्थानांत गुप्त झाला, व डेमिट्रियस उजाडल्यावर

गांवांत आला आणि त्यानें सर्व हकीगत मुफतीला कळविली. तेव्हां पुढील शनिवारीं मुफती गांवांतील सर्व ख्रिस्ती लोकांसह तेथें गेला. कारण, शनिवारीं समंधांना बाहेर पडण्याची सैतानाची परवानगी नसते. त्यांनीं ॲब्राहॅमचें प्रेत उकरून बाहेर काढलें. तें जसेंच्या तसेंच, पण काळें ठिकर झालेलें होतें. नंतर मुफतीनें कांहीं मंत्र म्हणून तें प्रेत तेथल्या तेथेंच जाळून टाकलें. तेव्हांपासून मात्र तेथील लोकांना त्या समंधाचा पुनः त्रास झाला नाहीं.

रिचर्डची ही कथा ऐकून कित्येक तुर्क शिपाई अगदीं घाबरून गेले, आणि भयभीत मुद्रेनें काळोखाकडे पाहूं लागले. अबदुल्ला म्हणाला—"आणि येथेंही तसले भयंकर समंध आहेत का ?"

रिचर्ड—"माषाल्ला ! येथेंही ते आहेत असें मीं ऐकलें आहे !"

इतक्यांत बागेंतून एक भयंकर किंकाळी ऐकूं आली. त्याबरोबर ते तुर्की शिपाई इतके भेदरून गेले कीं, जिवाच्या भयानें एकमेकांना ढकलीत व तुडवीत आपापल्या खोल्यांत शिरले आणि त्यांनीं दारें लावून घेतलीं. ह्याप्रमाणें तें आंगण अगदीं मोकळें झालें. एका क्षणांत लॉर्ड मॅन्युअल व त्यांचे अनुचर पिछाडीच्या तटावरून आंगणांत उतरले.

"शाबास, सरदारसाहेब !" रिचर्ड आनंदानें म्हणाला—"छान बतावणी झाली ! आपण माझी समंधाची कथा सगळी ऐकली वाटतें ?"

"हो हो !" लॉर्ड मॅन्युअल उत्सुक स्वरानें म्हणाले—"पण आपली मंडळी कोठेंशी आहेत ?"

"ती समोरच्या इमारतींत आहेत." रिचर्ड समोर अंगुलीनिर्देश करून म्हणाला—"त्यांना एका स्वतंत्र खोलींत एके ठिकाणींच ठेवलें आहे. पण थांबा, अगोदर हें दार बंद करून घेऊन मग तिकडे जाऊं या, म्हणजे आपल्याला बरीच अधिक सवड मिळेल !"

तुर्की शिपाई ज्या खोल्यांत पळून गेले होते, त्यांचे दरवाजे रिचर्ड व लॉर्ड मॅन्युअल ह्यांनीं तत्काळ लावून, बाहेरून कड्या घातल्या. नंतर ते आपल्या अनुयायांसह ज्या भागांत कैदी ठेविले होते त्या भागाकडे वळले. तेथें एक पहारेवाला उभा होता. तो आपल्या सोबत्यांप्रमाणेंच भुतांना भिणारा होता, पण जातीचा शूर असल्यामुळें, मानवी शत्रूंना

भिऊन पळाला नाहीं. " धांवा धांवा, दगा, दगा ! " असें मोठ्यानें ओरडत, त्यानें पुढें असलेल्या लॉर्ड मॅन्युअलच्या अंगावर भाला फेंकला पण तो मध्येंच रिचर्डनें आपल्या परशूनें तोडून उडवून दिला, आणि तत्काळ त्या दुर्दैवी तुर्काच्या छातींत आपली कट्यार खुपसली. नंतर तो आपल्या तिघां-चौघां सोबत्यांस हाका मारून म्हणाला—" गडे हो, आणखी दहा मिनिटेंपर्यंत प्राणाचीही पर्वा न करितां एवढ्या दारांचें रक्षण करा, तोंपर्यंत आम्ही आलोंच. "

" चला, सरदारसाहेब ! " रिचर्ड लॉर्ड मॅन्युअलकडें वळून म्हणाला " ह्या पडवीच्या पलीकडेच ती खोली असावी, असा माझा अंदाज आहे ! "

दोघेही त्या पडवींतून पलीकडे गेले. पुढें त्यांना एक दार लागलें. त्याला बाहेरून कुलूप लावलेलें होतें, त्यावरून तेथेंच कैदी असावेत असें त्यांना वाटलें. कुलूप भक्कम असल्यामुळें, तें लवकर मोडण्यासारखें नव्हतें. म्हणून त्या नादास न लागतां, रिचर्डनें दारावरच आपल्या परशूचा तडाखा मारला. दुसरा तडाखा मारण्यापूर्वींच आंतून एक किंकाळी, व ' कोण आहे ? ' असा सवाल त्यांना ऐकूं आला. तो आवाज कॉनियॅटिसचाच असल्याचें लॉर्ड मॅन्युअलनीं तत्काळ ओळखलें.

लॉर्ड मॅन्युअल—" मी मॅन्युअल क्रिसोलरास आहें, कोतवालसाहेब तुम्हांला दार उघडतां येत असेल तर उघडा ! "

कॉनियॅटिस—" शाबास, सरदारसाहेब, देव तुमचें कल्याण करो ! दार बाहेरून बंद आहे, तें आपणच उघडलें पाहिजे ! "

" तर मग दारांतून मागें व्हा, नाहीं तर दार मोडून अंगावर पडेल ! "

असें म्हणून रिचर्डनें आपल्या परशूचे आणखी दोन तीन जोराचे तडाखे दारावर मारले. त्याबरोबर दार मोडून व निखळून आंत पडलें. नंतर रिचर्ड व लॉर्ड मॅन्युअल खोलींत शिरले.

" हं, आटपा, चला, एक क्षणभर देखील विलंब करण्याची सोय नाहीं ! " मॅन्युअल घाईघाईनें म्हणाले. " तुम्ही त्या बाईंना घेऊन चला, मी युफ्राशियाला घेऊन येतों. कोतवालसाहेब, आपणां सर्वां.

करितां बागेंत घोडे तयार आहेत, चला लवकर !"

ती सर्व मंडळी खोलींतून बाहेर निघाली, तों पडवीच्या तोंडाशीं उभ्या केलेल्या आपल्या मंडळीवर तुर्क लोकांनीं जोराचा हल्ला केला असून, ते मोठ्या निकरानें आपली जागा संभाळून त्यांचा प्रतिकार करीत आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तुर्क लोकांना रिचर्डचें कपट लवकरच कळून आल्यामुळें, त्यांनीं आपले लोक जमवून, कैद्यांच्या खोलीकडे धांव घेतली. परंतु पडवीच्या दारांतच मॅन्युअलच्या निवडक लोकांनीं त्यांना आडविलें, तेव्हां तेथेंच त्यांची चकमक सुरू झाली. अहमदपाशा स्वतः तुर्कांचा पुढारी होता. कारण, हे कैदी आपल्या ताब्यांतून निसटून गेल्याचें जर सुलतानाला कळलें, तर आपल्याला फांसावर लटकावें लागेल, हें तो जाणून होता. पडवी इतकी अरुंद होती कीं, तेथें फार तर दोघांना एकदम जातां येईल. अशा अडचणीच्या जागीं व हातघाईच्या झटापटींत ग्रीक स्वारांच्या लांब भाल्यांचा चांगला उपयोग झाला. तथापि तुर्कांची संख्या मोठी असल्यामुळें, रोमनशिपायांपैकीं दोन इसम त्यांच्या हल्ल्यांत कामास आले. इतक्यांत लॉर्ड मॅन्युअल व रिचर्ड आपल्या मंडळीसह तेथें येऊन पोंचले.

"सरदार साहेब," रिचर्ड घाईनें म्हणाला—"आपण ह्या मंडळीसह बागेंत जाऊन अगोदर घोड्यांवर स्वार व्हा, तोंपर्यंत मी ह्यांना येथें थोपवून धरतों ! चला, चला लवकर, नाहींतर सगळें गांवच्यागांव आमच्यावर चालून येईल !"

लॉर्ड मॅन्युअल—"पण तूंही आमच्याबरोबर येतोसना ?"

"होय होय !" रिचर्ड गडबडीनें म्हणाला—"मी कसेंही करून आपल्या पाठोपाठ येतोंच ! पण बोलण्यांत वेळ घालवूं नका, चला !"

रिचर्डनें त्या झटापटींत एकदम उडी घातली, आणि मोठ्या शौर्यानें रस्ता मोकळा केला. लॉर्ड मॅन्युअल बाकीच्या मंडळीसह झटकन अंगणांत आले, आणि एकदोघां अनुयायांच्या मदतीनें सर्वजण तत्काळ तटावरून पलीकडे बागेंत जाऊन आपापल्या घोड्यांवर स्वार झाले. कोतवाल व त्यांची बायको आणि मुलगी यांना ही गोष्ट इतकी आकस्मिक व अपेक्षेबाहेरची होती कीं, आपण तुर्कांच्या कैदेंतून मुक्त झालों, हें त्यांना

प्रथम खरेंही वाटेना.

एक रोमन सैनिक म्हणाला—" सरदारसाहेब, येथें एक क्षणभर देखील न थांबतां एकदम पुढें निघून जावें, अशी रिचर्ड नाइकांची सक्त ताकीद आहे, ह्यासाठीं आतां येथून एकदम निघालें पाहिजे ! "

आपल्या प्रियकर युफ्राशियाच्या बचावाकरितां एकदम निघून जाणेंच अवश्य आहे हें जरी लॉर्ड मॅन्युअलना माहीत होतें, तथापि आपल्या मित्राला संकटांत सोडून आपण पळून जाणें त्यांना प्रशस्त वाटेना. म्हणून ते म्हणाले—" पण रिचर्ड ? त्याला सोडून पुढें कसें जावयाचें ? "

सैनिक—" रिचर्ड नाईक आपला स्वतःचा बचाव करण्यास समर्थ आहेत. आपल्याला पुढें जाण्यास सवड मिळावी म्हणून त्यांनीं तुर्कांना थोपवून धरलें आहे. ह्या सवडीचा आपण फायदा घेतला नाहीं तर, त्यांचे सर्व श्रम व्यर्थ जातील ! चलावें लवकर ! "

मॅन्युअलना पुढें बोलण्यास सवडच उरली नाहीं. ते मुकाट्यानें पुढे निघाले, तेव्हां त्यांच्या पाठोपाठ कोतवाल, त्यांची बायको, मुलगी, मॅन्यु-अलचे चार नोकर व हुजुरातींतील चार स्वार अशी मंडळी भरधांव घोडे फेंकीत निघाली. रात्र गदड काळोखी असून रस्ताही खाच खळ-ग्यांचा होता, तथापि शत्रूच्या पाठलागाच्या भीतीपुढें ह्या कोणत्याही अडचणींची त्यांना मुळींच पर्वा वाटली नाहीं. ते ज्या आंबराईतून आले होते, तिकडेच भर वेगानें निघाले.

आंबराईत पोंचल्यावर आपला घोडा मॅन्युअलच्या घोड्याजवळ उभा करून युफ्राशिया म्हणाली—" खरोखर, मला हें सगळें स्वप्नासार-खेंच वाटत आहे ! आम्हांला धरून नेलेलें, आपल्याला इतक्या लवकर कळलें तरी कसें ? आणि इतक्या घाईनें नेमक्या ठिकाणीं कसे आलां ? "

मॅन्युअल—" लाडके, नीट संभाळून सावधगिरीनें घोड्यावर बैस, अजून आपल्याला पुष्कळ दूर जावयाचें आहे ! ह्या वेळीं सगळी हकी-गत सविस्तर सांगण्यास सवड नाहीं. डेमिट्रियसनें ही बातमी मला कळविली. सेनापति सर एडवर्ड यांनीं आपले दहा स्वार माझ्या मदतीला दिले, आणि आम्ही काल दिवसभर तुमचा तपास करीत येत होतों.

अद्यापि आपण निर्भय झालों नाहीं, पण ईश्वरकृपेनें लवकरच सर्व संकटांतून पार पडूं अशी आतां आशा वाटूं लागली आहे ! "

कोतवाल त्यांच्या जवळ येऊन म्हणाले—" आतां जावयाचें कोणीकडे ? "

मॅन्युअल—" विसाला जावयाचें ! एकदां तेथें जाऊन पोंचलों म्हणजे मग काळजी नाहीं ! "

कोतवाल—" हो, तेंच ठीक ! लॉर्ड मॅन्युअल, पुढें कांहींही होवो, ती गोष्ट ईश्वराधीन आहे, पण तुम्हीं आम्हांला दास्यत्वांतून, आणि युफ्राशियाला त्याहीपेक्षां भयंकर स्थितींतून मुक्त करण्याचा जो हा विलक्षण साहसाचा प्रयत्न केला तो मात्र ईश्वराजवळ खास रुजू होईल ! आणि ईश्वर तुम्हांला त्याचें योग्य बक्षीस दिल्यावांचून राहणार नाहीं ! " नंतर ते इतर मंडळीकडे वळून म्हणाले—" आणि दोस्तहो, तुमचे माझ्यावर जे उपकार झाले आहेत, ते मी जन्मभर विसरणार नाहीं, हें तुमच्याही निदर्शनास येईल ! "

" सरदारसाहेब, " मागून एक स्वार ओरडला " डाव्या हातच्या रस्त्यानें जावयाचें ! विसाचा रस्ता पलीकडच्या डोंगराच्या उत्तरेकडून आहे ! "

" ठीक आहे ! " असें म्हणून मॅन्युअलनीं आपला घोडा डाव्याबाजूला वळविला, तेव्हां सर्व मंडळी त्याच रोखानें निघाली. कांहीं वेळानें मॅन्युअल एकदम उद्गारले—" ऐका, ऐका ! घोड्यांच्या टापा ऐकूं येत आहेत ! होय, खचित कोणी घोडेस्वार मागून येत आहेत ! "

सर्वजण मागें वळून सूक्ष्म दृष्टीनें पाहूं लागले, तथापि घोड्यांचा पुढें जाण्याचा वेग त्यांनीं मुळींच कमी केला नाहीं. थोड्या वेळानें अगदीं पिछाडीचा स्वार ओरडून म्हणाला—" चला सरदारसाहेब, घोड्याला टांच द्या, खचित कोणी तरी आपला पाठलाग करीत येत आहेत ! "

मंडळींनीं अधिकच वेगानें घोडे दवडले. पण थोड्याच वेळांत " थांबा, थांबा, उभे रहा ! " अशी अस्पष्ट आरोळी त्यांच्या कानावर आली.

" ओहो, आपले रिचर्ड नाईक ! " एक दोन स्वार आनंदानें

उद्गारले. त्याबरोबर मॅन्युअलनीं सर्वांना तेथेंच थांबावयास सांगितलें.

मॅन्युअल त्या स्वारांस म्हणाले—“ तुमची खात्री आहे का ? तो रिचर्डचाच आवाज, असें तुम्हीं खचित ओळखलें का ? ”

इतक्यांत पुनः अधिक स्पष्ट आरोळी ऐकूं आली, ती ऐकतांच स्वतः मॅन्युअलची पूर्ण खात्री झाली. नंतर ते युफ्राशिया जवळ येऊन म्हणाले—“ ज्याच्या शौर्यामुळें व हुशारीमुळें, तुमची आज प्राणसंकटांतून मुक्तता झाली, तो हाच माझा मित्र रिचर्ड बर्स्टो येत आहे ! त्याचें जर आज कांहीं बरें वाईट झालें असतें, तर जन्मभर माझ्या मनाला टोंचणी लागून राहिली असती. पण ईश्वरकृपेनें सर्व निभावलें ! ”

थोडयाच वेळांत रिचर्ड बर्स्टो आणि तीन स्वार येऊन दाखल झाले. तो म्हणाला—“ ते बोर्धियाच्या रस्त्याला आमचा पाठलाग करावयास गेले आहेत ! आम्ही इतके वेडे असूं असें त्यांना वाटलें तरी कसें, कोण जाणे ! असो, चला आतां, वेळ दवडून उपयोग नाहीं. विसा येथून बरेंच लांब आहे ! ”

सर्व मंडळी पुनः पुढें चालूं लागल्यावर मॅन्युअल म्हणाले—“ पण—रिचर्ड तूं त्यांच्या तावडींतून कसा सुटलास ? ”

रिचर्ड—“ सुदैवानें खुद्द पाशालाच एक जखम झाली, तेव्हां त्याचे लोक त्याला उचलून नेण्याच्या नादाला लागले. त्या धांदलींत आम्ही निसटलों ! आमच्या चकमकींत आमचे चार इसम कामास आले, पण त्यांच्याबद्दल आम्हीं भरपूर सूड उगवून घेतला ! काय, कोतवालसाहेब, आपल्याला त्रास बराच झाला असेल, पण कांहीं इजा वगैरे झालीनाहीं ना ?”

कोतवाल—“ ईश्वरकृपेनें शारीरिक इजा आम्हांला मुळींच झाली नाहीं ! पण त्या दुष्टांनीं माझीं सर्व हत्यारें काढून घेतलीं. मला एखादी तरवार मिळेल तर बरें होईल. कारण, कदाचित पुनः प्रसंग आला तर, एक दोन हात केल्यावांचून शत्रूच्या स्वाधीन होणें मला कमीपणाचें वाटेल ! ”

रिचर्ड—“ देवकरो, आणि इतक्यांत पुनः हाणामारीचा प्रसंग न येवो ! तथापि दुर्दैवानें तसा प्रसंग आलाच तर आपल्याला तरवार मिळण्याचीही तजवीज होईल ! ”

मुस्तफावेषधारी रिचर्डच्या सांगण्याप्रमाणें बोर्धियाकडून येणाऱ्या लष्कराच्या तोंडावर अहमदपाशानें जी शंभर स्वारांची टोळी खिंडीकडे पाठविली होती, तिजवरील अधिकारी वासिफ हा फार हुषार व धोरणी मनुष्य होता. पाशाच्या हुकुमाप्रमाणें निमूटपणें वागणें त्याला भाग होतें, तथापि मुस्तफाच्या वागणुकीवरून, व त्यानें सांगितलेल्या त्या विलक्षण हकीगतीवरून, त्याला बरीच शंका आली. खिंडीकडे जातांना मुस्तफाबरोबर त्याचें बरेंच संभाषण झालें, त्यावरूनही त्याला असें वाटू लागलें कीं, सुलतानमहमदाचा जय व्हावा, एवढाच कांहीं ह्या मुस्तफाचा हेतु नसावा. ह्या कामीं त्याचा अंतस्थ उद्देश कांहीं निराळा असावा. तथापि तो खरा तुर्क नसेल अशी कल्पना मात्र वासिफच्या मनांत एकदांसुद्धां आली नाहीं, आणि आपला संशय त्यानें यत्किंचितही प्रदर्शित केला नाहीं.

रिचर्ड त्यांना खिंडींत पोंचवून परत निघाला, तेव्हां वासिफनें आपल्या हाताखालील जमादार अली यास आपली शंका एकांतीं निवेदन केली. तेव्हां अली म्हणाला—" तर मग मी त्याच्या मागून गुप्तपणें त्याच्या पाळतीवर जातों ! मला ह्या प्रदेशाची पूर्ण माहिती आहे. तो कितीही लबाड असला तरी मी त्याला मुळींच फसणार नाहीं !

वासिफ—" ठीक आहे, तसेंच कर ! तो सरळ गांवांत गेला, तर कांहीं हरकत नाहीं. पण दुसरीकडे कोठें वळला तर मात्र त्याच्या हालचालीवर चांगली नजर ठेव. आणि तुला त्याची कांहीं लबाडी दिसली तर त्याला तत्काळ पकडून कैद करून आण. पाशासाहेबांनीं विचारलेंच तर मी त्याचा जाब देईन ! "

वरिष्ठाची परवानगी मिळतांच अली जमादार ताबडतोब रिचर्डच्या टेहळणीवर निघाला. रिचर्ड आपल्या दृष्टीच्या टप्प्यांत राहील, अशा बेतानें शक्य तितक्या दुरून तो रिचर्डचा पाठलाग करूं लागला. चंद्र अद्यापि मावळला नसल्यामुळें, त्याला बऱ्याच अंतरावरून रिचर्डवर सहज नजर ठेवतां येत होती. त्यामुळें ती गोष्ट रिचर्डच्याही लक्षांत आली नाहीं. अलीनें थेट आंबराईपर्यंत रिचर्डचा पाठलाग केला. तो त्याच्या मागोमाग आंबराईत देखील गेला असता, परंतु तेथें बऱ्याच

मंडळींचा गलबला त्याच्या कानावर आला, त्यामुळें पुढें जाण्याची त्याची छाती झाली नाहीं. कांहीं तरी कपट आहे खास, अशी अली जमादाराची आतां पूर्ण खात्री झाली. आंतील मंडळींचें काय बोलणें चाललें आहे हें समजून घेण्याची त्याला अत्यंत उत्कंठा लागली होती, पण तो इतका दूर होता कीं, आंतील संभाषण कोणत्या भाषेंत चाललें आहे हें देखील त्याला स्पष्ट ऐकूं येईना, आणि जवळ जाण्याची तर छाती होईना. बाकी तो जवळ गेला असता तरी देखील त्याला एक अक्षरसुद्धां कळलें नसतें. कारण त्याला ग्रीक भाषा मुळींच समजत नव्हती.

अली जमादार आंबराईच्या कडेला एका झाडाआड छपून बसला. थोड्याच वेळानें मुस्तफा व त्याच्याबरोबर कांहीं घोडेस्वार त्या आंबराईंतून बाहेर पडलेले त्याला दिसले. ते सर्वजण गांवाकडे निघालेले त्यानें पाहिले. ते कांहीं अंतरावर गेल्यावर अली जमादार आपल्या खिंडींतील ठाण्याकडे परत आला, आणि त्यानें घडलेली सर्व हकीगत वासिफ यास सविस्तर सांगितली. वासिफनें आपल्या हातखालच्या दोन तीन हवालदारांस बोलावलें, आणि त्यांना सर्व हकीगत कळवून, पुढें काय करावें, त्याविषयीं त्यांची सल्ला विचारली.

बऱ्याच वाटाघाटीनंतर सर्वांनुमतें असें ठरलें कीं, आपल्याला ठाण्यावरून दूर करण्यांत मुस्तफाचा कांहीं तरी वेगळा हेतु असावा, हें जरी उघड आहे, तरी विसाच्या लष्करच्या हल्ल्याची त्यानें सांगितलेली बातमी खोटी म्हणावयास तरी काय आधार आहे? त्याचप्रमाणें त्याच्या बरोबर गांवाकडे गेलेले ग्रीक स्वार तरी आपले शत्रु आहेत, कीं मुस्तफानें फितविलेले खिस्ती लष्करांतील फितुरी आहेत, हें समजण्यास तरी काय मार्ग आहे? जर कदाचित् हल्ल्याची बातमी खरी असली, आणि आपण पाशासाहेबांचा हुकूम मोडून ही जागा सोडून गेलों, तर आपणां सर्वांना प्राणदंडाहून कमी शिक्षा होण्याची आशाच नाहीं! त्यापेक्षां हुकमाप्रमाणें आपण आपल्या ठिकाणीं रहावें हेंच बरें! बाकीच्या गोष्टींबद्दल पाशासाहेब जबाबदार आहेत, आपल्याकडे काय संबंध?"

वासिफाला देखील हा युक्तिवाद पटला, तथापि त्याचें मन शांत झालें नाहीं. त्यानें अली जमादाराबरोबर दहा स्वार देऊन त्याला पुनः

आंबराईकडे पाठविलें, आणि ते गांवांत गेलेले ग्रीक स्वार केव्हां परत येतात व पुढें काय करितात ह्याची टेहेळणी ठेवावयास सांगितलें. त्याचप्रमाणें एका हवालदारास ही हकीगत पाशासाहेबांच्या कानावर घालण्याकरितां गांवांत ठाण्यावर पाठविलें. परंतु तो हवालदार बिचारा त्या प्रदेशाचा अगदींच गैरमाहीत असल्यामुळें, आणि चंद्र मावळून काळोख पडल्यामुळें रस्ता चुकला, व दऱ्याखोऱ्यांनीं व ओघळींनी किती तरी वेळ हेलपाटे खात फिरला. त्यामुळें तो ठाण्यावर येऊन पोंचण्यापूर्वीं बरास वेळ रिचर्ड व लॉर्ड मॅन्युअल आपल्या मंडळीसह निघूनही गेले होते.

अली जमादार व त्याच्या बरोबरचे स्वार आंबराईजवळ आल्यावर झाडींमध्यें छपून राहून ग्रीक स्वारांची वाट पाहूं लागले. परंतु एक तासभर त्यांना वाऱ्यामुळें वाजणाऱ्या झाडांच्या फांद्या व क्वचित् एखाद्या घुबडाचा घूत्कार, ह्यावांचून दुसरें कांहींच ऐकूं आलें नाहीं. ते कंटाळून परत जाण्याच्या बेतांत होते, इतक्यांत गांवाकडून घोडयांच्या टापा त्यांना ऐकूं आल्या. त्या प्रथम अस्पष्ट होत्या, तरी लवकरच स्पष्ट कानांवर येऊं लागल्या. तेव्हां ते हुषारीनें उभे राहिले.

काळोखामुळें ते किती जण होते किंवा कोण कोण होते हें जरी अलीला दिसणें शक्य नव्हतें, तरी ते विसाच्या रस्त्यानें जात आहेत एवढें त्यानें तत्काळ ओळखलें, आणि इषारत मिळतांच एकदम छापा घालण्याच्या तयारीनें त्यानें आपले स्वार एकत्र उभे केले.

रिचर्ड व मॅन्युअल एकमेकांशीं बोलत, आपल्या मंडळीसह रस्त्यानें चालले होते, आपण कसे निसटून आलों, ह्याची हकीगत रिचर्डनें सांगितल्यावर लॉर्ड मॅन्युअल म्हणाले—" खरोखर, ह्या चोरांचा इतक्या लवकर बिनचूक पत्ता लागेल, अशी मला कांहीं आशा वाटत नव्हती ! पण ईश्वरकृपेनें त्यांचा पत्ता लागला. इतकेंच नव्हे, पण आपलें काम देखील अपेक्षेबाहेर सहज रीतीनें व अल्प श्रमानें झालें ! "

मेरियाबाई ( कोतवालांची पत्नी ) म्हणाली—" ही ईश्वराची कृपा हें तर खरेंच, पण आपले उभयतांचेही उपकार कांहीं अल्पस्वल्प नव्हेत ! "

ह्याप्रमाणें मंडळी बोलत चालली असल्यामुळें, त्यांचा प्रवासाचा वेग बराच मंदावला होता. तथापि ते अगदींच कांहीं रेंगाळत चालले नव्हते.

कांहीं वेळानें युफ्राशिया म्हणाली—" खरेंच, परवांची आपली सूचना जर बाबांनीं तत्काळ मान्य केली असती, तर आपले आणि आमचेही किती तरी कष्ट वांचले असते ! "

लॉर्ड मॅन्युअल हंसून म्हणाले—" लाडके, माझ्या सर्वच सूचना तुझ्या बाबांनीं ताबडतोब अमलांत आणाव्या, असें तुला मनापासून वाटतें ना ?"

सर्वांनीं कॉन्स्टांटिनोपल येथें येऊन राहण्याच्या सूचनेबरोबरच लवकर विवाह करून टाकण्याचीही मॅन्युअलची सूचना होती, हें ध्यानांत येऊन, युफ्राशिया लाजून म्हणाली—" निदान राजधानींत जाऊन राहण्यास तरी कांहीं हरकत नव्हती, असें मला वाटतें. त्यांना शहरांत जाऊन राहणें म्हणजे पिंजऱ्यांत पडण्यासारखें वाटत होतें, पण आपण जर आज आमची मुक्तता केली नसती, तर काय भयंकर परिणाम झाला असता ह्याची कल्पना देखील करवत नाहीं ! तथापि माझें प्रेम मात्र आपल्या चरणीं अढळ राहिलें असतें. "

मॅन्युअल—" त्याबद्दल मला शंकाच नाहीं ! ही भयंकर बातमी कानांवर पडतांच माझ्या हृदयाला किती असह्य वेदना होऊं लागल्या, ह्याची तुलादेखील यथार्थ कल्पना होणार नाहीं ! तुझ्या मुक्ततेची जर यत्किंचित्‌ही आशा नसती, तर मला तत्काळ वेडच लागलें असतें ! "

युफ्राशिया—" असो, ईश्वराच्या कृपेनें तें सर्वच संकट दूर झालें ! आतां—"

इतक्यांत आंबराईच्या बाजूनें एकाएकीं एक आरोळी ऐकूं आली व मॅन्युअल आणि त्याची मंडळी आश्चर्यानें तिकडे वळून पाहतात तों, कांहीं तुर्की स्वार आपल्यावर चालून येत आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें.

अली जमादार पुढें धांवून येऊन रिचर्डच्या पाठीवर तरवारीचा वार करून रागानें ओरडला—" खडे रहो, बदमाष ! "

रिचर्डच्या अंगांत मजबूत चिलखत असल्यामुळें तो वार त्याला मुळींच लागला नाहीं. तो मागें वळून ओरडून म्हणाला—" दोस्तहो,

चला, ह्या तुर्की लुटारूंना आपल्या विजयी रोमन समशेरीचें पाणी दाखवा ! सरदारसाहेब, आपण कोतवालांच्या मंडळीसह पुढें व्हा, आम्ही ह्या चोरांचा पुरा बंदोबस्त करून, लवकरच तुम्हांला येऊन मिळतों ! ”

रिचर्डनें आपल्या परशूच्या एका घावासरशीं पहिल्या झपाट्यास एका तुर्काला तर लोळविलेंच. पण तुर्क स्वार सावधपणें चढून आले होते, आणि ग्रीक स्वार काहींसे बेसावध होते, त्यामुळें ग्रीक स्वारांची प्रथम बरीच धांदल उडाली. शिवाय तुर्की स्वार व त्यांचे घोडे ताज्या दमाचे होते. ते आपल्या ठाण्याच्या जवळ असल्यामुळें त्यांच्या अंगीं एक प्रकारचें धैर्य होतें, आणि ते त्या ठिकाणचे माहितगार होते. इकडे ग्रीक स्वार दोन दिवसांच्या अहोरात्र अविश्रांत प्रवासामुळें अगदीं दमून गेले होते, त्यांना दुसऱ्या कोणाचा आधार नव्हता, आणि त्या प्रदेशाची त्यांना माहितीही मुळींच नव्हती. रिचर्डच्या सूचनेप्रमाणें करण्याचें मॅन्युअलच्या मनांतही नव्हतें, आणि तसें करितां येणें शक्यही नव्हतें, कारण, तुर्की स्वारांनीं त्यांचा रस्ता अगोदरच आडविला होता व एकट्या मॅन्युअलला त्यांची फळी फोडतां येण्याचाही संभव नव्हता.

काळोखांतच ह्या उभय पक्षांची हातघाईची झटापट सुरू झाली. अगोदरच ग्रीक स्वारांची संख्या कमी, त्यांतही कांहीं असामी नायकांचें संरक्षण करण्यांत गुंतले, त्यामुळें तुर्क लोकांचीच सरशी होऊं लागली. त्यांच्यापुढें रिचर्डचें व त्याच्या अनुयायांचें कांहीं चालेना. तथापि चार चार पांच मिनिटांत तो रंग बदलला. ग्रीक स्वारांच्या शिस्तीच्या लढाईमुळें, अव्यवस्थित तुर्की स्वारांचा पराक्रम फिका पडूं लागला. त्यांचे चार पांच स्वार त्या चकमकींत पडले. ग्रीक स्वारांपैकीं मात्र एकच इसम कामास आला. रिचर्डनें अली जमादारास बरेंच जेर केलें, तेव्हां उरलेले तुर्की स्वार पोबारा करण्याच्या बेतांत आले.

इतक्यांत जयाचें पारडें पुनः फिरलें. गांवाकडून बऱ्याच घोड्यांच्या टापा ऐकूं येऊं लागल्या, त्याबरोबर तुर्की स्वारांना पुनः धैर्य आलें. आपल्याला मदत आली, अशा विश्वासानें ते बचावाच्या धोरणानें धिमेपणानें लढूं लागले. आणखी स्वार येत असलेले ऐकतांच रिचर्डची व

त्याच्या लोकांची मात्र बहुतेक निराशा होत चालली.

अली जमादाराला मात्र फारसा आनंद झालेला दिसला नाहीं. कारण त्याच्या मनांत अशी शंका आली कीं, हे विसाच्या ख्रिस्ती लष्करापैकीं लोक असून, आमच्या खिंडींतील टोळीचा पराभव करून, आपल्या दोस्तांना मदत करावयास इकडे आलेले नसतील कशावरून ! पण ही त्याची शंका एका क्षणांतच दूर झाली. "अल्लाहो अकबर" अशी कर्कश आरोळी त्याच्या कानावर आली. ती ऐकतांच तुर्क लोकांना हर्ष झाला. पण ग्रीक लोकांना मात्र हा आपल्या मस्तकांवर वज्राघातच झाला असें वाटलें.

अली जमादाराला जाऊन बराच वेळ झाला, तरी तो परत आला नाहीं, यावरून कांहीं तरी दगा असावा, असा संशय येऊन, वासिफनें आणखी पंचवीस तीस स्वारांची एक तुकडी त्याच्या मदतीकरितां पाठविली होती, तीच ही टोळी होय. ह्याप्रमाणें तुर्कांची संख्या जरी एकदम बेसुमार वाढली, तरी रिचर्ड व त्याचे अनुयायी यावरून गेले नाहींत. निराशेमुळें त्यांच्या अंगीं विशेषच साहस आलें. रिचर्ड व लॉर्ड मॅन्युअल जिवावर उदार होऊन लढत होते. पण इतक्या लोकांपुढें त्यांचा किती वेळ निभाव लागणार ! शेवटीं त्यांच्या स्वारांपैकीं फक्त तीन इसम शिलक राहिले. तेव्हां अली जमादारानें लढाई तहकूब केली आणि ग्रीक लोकांना हत्यारें खालीं ठेवून स्वाधीन होण्यास सांगितलें.

आतां व्यर्थ धडपड करण्यांत अर्थ नाहीं, असा विचार करून लॉर्ड मॅन्युअल व रिचर्ड हे स्वाधीन होण्यास तयार झाले मात्र खुद्द सुलतान महमदाच्या हुकमाशिवाय, आपल्या लोकांपैकीं कोणासही कांहीं इजा करावयाची नाहीं, असें त्यांनीं अलीकडून वचन घेतलें.

अली जमादारानें सर्व कैदी निरनिराळ्या स्वारांच्या ताब्यांत देऊन बंदोबस्तानें परत चालविले. प्रथम ते खिंडीकडे वासिफच्या तुकडीस जाऊन मिळाले. वेषधारी मुस्तफानें हल्ल्याची बातमी अजीबात खोटी सांगितली, असें आतां उघड सिद्ध झाल्यामुळें, त्यांना आतां खिंडींत थांबण्याचें कारणच उरलें नाहीं. म्हणून सर्व जण मिळून कैदी लोकांना

बंदोबस्तानें बरोबर घेऊन गांवाकडे परत निघाले.

युफ्राशियाला सोडविण्याच्या प्रयत्नांत, तिची मुक्तता न होतां, आपण मात्र तिच्याबरोबर कैदी झालों, आतां तिला सोडविण्याची खटपट कोण करणार, असा विचार मनांत येऊन लॉर्ड मॅन्युअलना फार वाईट वाटलें. रिचर्डची तर खात्रीच होती कीं, आड्रियानोपलला जाणें म्हणजे कबरस्थानांत प्रवेश करणेंच होय. कारण, हेर ठरल्यावर माफी मिळ- ण्याची आशाच करावयास नको. कोतवाल कॉनियॅटिस यांना स्वतः बद्दल फारशी फिकीर वाटत नव्हती, पण आपली पत्नी व कन्या यांची स्थिति मनांत येऊन मात्र त्यांचे डोळे अश्रूंनीं भरून येत. तिघे ग्रीक स्वार खिन्न अंतःकरणानें चालले होते. आपल्याला शासन म्हणजे धर्मांतर किंवा मरण यांपैकीं कोणतें तरी एक पतकरावें लागणार, हें ते जाणून होते. प्रत्येक कैद्याला त्याच्या घोड्याच्या जिनाशीं बांधण्यांत आलें होतें. व त्याच्या दोहों बाजूंस दोन दोन स्वार चालले होते, त्यांना एकमेकांशीं बोलण्याची देखील परवानगी नव्हती. निसटून जाण्याची तर मुळींच आशा नव्हती. ह्याप्रमाणें उजाडतां उजाडतां ती सर्व मंडळी विजयाच्या आरोळ्या ठोकीत इस्कीबाबा गांवीं येऊन पोंचली.

---

## प्रकरण ९ वें.



# देशद्रोह्यांचें तुर्कांशीं लांगूल चालन.

बाहेरच्या लॅटिन धर्मपंथी युरोपियन राष्ट्रांशीं समेट करून त्यांची ह्या प्रसंगीं शक्य तितकी मदत मिळवावी, असा कान्स्टंटाइन बादशहांचा व परराष्ट्रीय प्रधान लॉर्ड फ्रांझा यांचा उद्देश होता. तुर्कांच्या ह्या वावटळांत रोमन साम्राज्याचा अजीबात नाश करण्यापेक्षां, लॅटिन राष्ट्रांशीं व पोप महाराजांशीं समेट घडवून आणून त्यांचें साह्य घेण्याला, लोकही प्रसंगा- कडे लक्ष देऊन पूर्वीचा द्वेष व दुराग्रह सोडण्यास तयार होतील अशी त्यांची कल्पना असल्यामुळें, त्यांनीं त्या दिशेनें एकसारखी खटपट

चालविली होती. परंतु विनाशकाळच्या सामान्य नियमांस अनुसरून, लोक इतके विचारशून्य व दुराग्रही बनले होते कीं, ह्या विपत्काळीं लॅटिन लोकांविषयींचा द्वेष कमी होण्याऐवजीं अधिकच तीव्र झाला. लॅटिन लोकांवर यत्किंचित्‌ही विश्वास ठेवूं नका, असें लोक उघड उघड प्रतिपादन करूं लागले, आणि त्यांची वाटेल तशी निंदा व नालस्ती त्यांनीं सुरू केली. ग्रीक धर्मोपदेशक व विशेषतः जेनेडियस रात्रंदिवस आपल्या शिष्यवर्गाला ह्या समेटाच्या विरुद्ध उपदेश करूं लागले. लॅटिन लोकांशीं समेट करून त्यांच्या मदतीनें साम्राज्याचा बचाव करण्यापेक्षां, तें साम्राज्य बुडालें, किंवा आपला सर्वस्वीं नाश झाला, तरी पतकरला, पण लॅटिन लोकांशीं समेट करून आणि त्यांच्या आधीन होऊन धर्मभ्रष्ट होऊं नका, प्राचीन संस्कृति सोडूं नका, आणि ईश्वराचा क्षोभ संपादन करून, अक्षय नरकाचें साधन जोडूं नका, असा जेनेडियस उघड उपदेश करूं लागला. लोकांचा तर त्याच्यावर पूर्ण, किंबहुना अंधविश्वास होता म्हटलें तरी चालेल.

जेनेडियसचें म्हणणें अगदींच निराधार होतें असेंही म्हणतां येत नाहीं. कारण, लॅटिन लोकांचें व विशेषतः धर्माधिकारी इसिडोर याचें वर्तन असावें तितकें निर्दोष व सलोख्याचें नव्हते. इतकेंच नव्हे पण पूर्वीं ग्रीक लोकांच्या मनांत त्यांच्या संबंधानें द्वेष नसता; तरीही सांप्रतच्या त्यांच्या बेपर्वाईच्या व जुलमी वर्तनानें खचित उत्पन्न झाला असता. त्यामुळें कार्डिनल इसिडोर याच्या विरुद्ध लोकमत इतकें प्रक्षुब्ध होऊन गेलें होतें कीं, सरकारी बंदोबस्त नसता तर, लोकांनीं त्याची धिंड काढून त्याला केव्हांच शहराबाहेर हांकून दिलें असतें. शिवाय जिनोवाचा सरदार जास्टिनियन हा दोन हजार लोकांनिशीं कॉन्स्टांटिनोपल येथें ग्रीक लोकांच्या मदतीस आला होता, त्याचा कार्डिनल इसिडोर यांस आश्रय असल्यामुळें कार्डिनलचा अपमान करून जस्टीनियनचें वैमनस्य संपादन करण्याचीही लोकांची छाती नव्हती. शिवाय अज्ञानी व अविचारी लोकांची अशी दृढ भावना होती कीं, कॉन्स्टांटिनोपल शहर हें परमेश्वराचें पवित्र वसतिस्थान असल्यामुळें, त्याजवर कितीही भयंकर संकटें आलेलीं असलीं तरी, ईश्वर तीं अखेरीस पार पाडून, आपल्या पवित्र क्षेत्राचा बचाव

केल्यावांचून राहणार नाहीं. ग्रीक लोकांची ही भोळी समजूत प्राचीन यहुदी लोकांच्या समजुतीसारखीच होती.

ह्याशिवाय कॉन्स्टांटिनोपल शहरांतील कुलीन व सरदार लोकांतील नेभळटपणा, फाजील चैन, स्वाभिमानशून्यता, विश्वासघातकता, परस्परांविषयीं मत्सर व क्षुद्र स्वार्थबुद्धि इत्यादि राष्ट्रविघातक दुर्गुण इतके वाढले होते कीं, त्याला सगळ्या युरोपखंडांत दुसरी तोड सांपडणार नाहीं. ह्या नामर्द लोकांना अशी काळजी पडली होती कीं, रोमन साम्राज्य तर कांहीं आतां फार दिवस टिकाव धरू शकत नाहीं, तेव्हां ह्या साम्राज्याचा नाश झाला तरी, आपली संपत्ति कशी बचावेल, आणि आपली चैन अव्याहत कशी चालेल. ह्या नीच हेतूनें कांहीं थोर थोर म्हणविणाऱ्या लोकांनीं असा बेत केला होता कीं, सुलतान महमदाशीं गुप्तपणें तह करावा, आणि आपले प्राण व द्रव्य यांचें संरक्षण करावें, मग त्यांत राष्ट्राचा नाश झाला, किंवा सर्व देशबांधवांना गुलामगिरी आली तरी हरकत नाहीं. हा नुसता विचार नसून कांहीं नीच लोकांनीं ह्या धोरणानें प्रत्यक्ष खटपटही चालविली होती. त्यांची तुर्कांशीं अशी वाटाघाट चालली होती कीं, नियमित दिवशीं रात्रीं त्यांनीं सुलतानाच्या सैन्याला शहराची एक वेस उघडून द्यावी, व त्याबद्दल तुर्कांनीं त्यांच्या आणि त्यांच्या आप्तांच्या जीवित वित्ताला किंवा धर्माला कोणत्याही प्रकारें तोशीस लावू नये. तथापि मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्यासारखें हें बिकट काम करावयाचें कोणीं, एवढाच कायतो प्रश्न होता. कारण, ह्या लोकांपैकीं एकाच्याही अंगीं तितकें धैर्य नव्हतें.

" सुलतान पुरवला, पण पोप नको, " हें वाक्य तर शहरांत बहुतेक सर्वतोमुखीं होऊन गेलें होतें; आणि मंदिरांतील उपदेशांत व सार्वजनिक व्याख्यानांत तें निर्भयपणें प्रतिपादण्यांत येत होतें. ह्याप्रमाणें लॅटिन-लोकांचा उघड उघड द्वेष करणारे धर्मोपदेशक धर्माचरणाच्या बाबतींत तेवढें स्वातंत्र्य मिळाल्यास, आपल्या कटांत सामील होतील, असें कटवाल्यांना वाटत होतें, व त्यांचा तो अंदाज अगदींच चुकीचाही नव्हता. त्यामुळें धर्माचरणाच्या बाह्य कवायतींवांचून इतर कशाचीही पर्वा न करणारे कांहीं धर्मोपदेशक थोड्याशा खटपटीनें ह्या कटवाल्यांना मिळाले.

आणि त्यांचें एक संमिश्र शिष्ट मंडळ तयार होऊन, आड्रियानोपल येथील सुलतानाच्या दरबाराशीं त्यांच्या गुप्त वाटाघाटीही सुरू झाल्या. तुर्कांना ही गोष्ट इष्ट असल्यामुळें, त्यांनींही ह्या कटवाल्यांशीं आनंदानें वाटाघाट सुरू केली. तेव्हां आपला उद्देश सिद्धीस जाण्याच्या रंगांत आला आहे, अशी कटवाल्यांनाही दळकट आशा वाटूं लागली.

मागील प्रकरणांत सांगितलेल्या गोष्टी घडून आल्यानंतर एके दिवशीं सेनापति सर एडवर्ड आपल्या हुजुरातीच्या लष्कराची कवाईत पाहून आपल्या बंगल्यांत परत आल्यावर विश्रांति घेत पडले होते, इतक्यांत लॉर्ड फ्रांझांनीं तावडतोब भेटीस बोलावलें आहे, अत्यंत महत्त्वाचें व निकडीचें काम आहे, असा जरूरीचा निरोप आला.

रिचर्ड वर्स्टोकडील किंवा लॉर्ड मॅन्युअलकडील कांहीं तरी विशेष खबर आली असेल, असें वाटून सर एडवर्ड तत्काल उठून प्रधान-साहेबांच्या वाड्यांत गेले, तों लॉर्ड फ्रांझा दिवाणखान्यांत एकटेच इकडे तिकडे फेऱ्या घालीत असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांच्या चेहऱ्यावरून, त्यांचें अंतःकरण अत्यंत प्रक्षुब्ध व अस्वस्थ झालेलें असावें, असें सर एडवर्डना तत्काळ दिसून आलें.

लॉर्ड फ्रांझांना प्रणाम करून सर एडवर्ड म्हणाले—"कां प्रधान साहेब, इतक्या तातडीची आज्ञा झाली ? आड्रियानोपलकडील किंवा दुसऱ्या कोणीकडील कांहीं चिंताजनक खबर तर आलेली नाहीं ना ?"

"ती ह्यापेक्षां पुष्कळ बरी !" लॉर्ड फ्रांझा खिशांतून एक कागद काढून तो सर एडवर्डच्या हातीं देऊन म्हणाले—"हा कागद वाचून पहा, म्हणजे तुम्हांला समजेल ! कांहीं वेळापूर्वीं माझ्या बगीच्यांत पिछाडीच्या रस्त्यावर पडलेला तो मला सांपडला !"

सर एडवर्डनीं तो कागद वाचून पाहिला, त्यांत पुढील मजकूर होता—"प्रधानसाहेब, आपल्याविषयींची अत्यंत आदरबुद्धि आणि इतर कांहीं कारणें, त्यांचा येथें स्पष्ट निर्देश करण्याची आवश्यकता नाहीं, ह्यामुळें मला आपल्याला ही सूचना देणें भाग पडत आहे ! येथील प्रसिद्ध धर्माधिकारी जोसफ हा आज रात्रीं आठ वाजतां कोठें जातो, कोणास भेटतो, व काय वाटाघाट करितो, हें अवश्य समजून घ्यावें.

ही सूचना कोणाकडून आली, याचा तपास करण्यांत वेळ व श्रम व्यर्थ घालवूं नये. कारण, तो पत्ता तर लागणार नाहींच, पण पुनः अशी सूचनाही मिळणार नाहीं ! ”

कागद वाचून पाहिल्यावर सेनापति म्हणाले—“ ह्याबद्दल आपली काय कल्पना आहे ? पत्रलेखकाबद्दल नव्हे, पण त्यांतील मजकुराबद्दल ?”

लॉर्ड फ्रांझा—“ ही सूचना अत्यंत महत्त्वाची व अवश्य विचार करण्यासारखी आहे, असें मला वाटतें ! कारण, हा जोसफ अतिशय भयंकर मनुष्य आहे. शिवाय चालसेडन मठाची गादी त्याला मिळाली नाहीं, म्हणून त्याचा आमच्या प्रधानमंडळावर फार राग आहे. त्यामुळें तो कसलेंही भयंकर दुष्ट कृत्य करावयास मागें पुढें पहाणार नाहीं, अशी माझी समजूत आहे ! तो मोठा कारस्थानी व उलाढाल्या मनुष्य असून जेनेडियसच्या खालोखाल लोकप्रियही आहे ! ”

सर एडवर्ड—“ पण जेनेडियस कसाही असला तरी प्रामाणिक व स्पष्टवक्ता आहे. तो विरुद्ध झाला तर उघड रीतीनें विरोध करील, तसेंच त्याचें धर्माचरणही निवळ दंभ माजविण्याच्या हेतूचें नसतें, अशी माझी समजूत आहे. हा जोसफची गोष्ट मात्र तशी नाहीं. तो प्रत्येक बाबतींत जेनेडियसच्या उलट आहे. आज बरेच दिवस त्याच्यावर माझी नजर आहेच, पण ह्यापुढें त्याच्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे, असें वाटतें ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ मीं तर त्याला ताबडतोब कैदच केलें असतें, पण सध्यांच्या प्रसंगीं तसें कांहीं केल्यास लोकांत विशेष खळबळ व अस्वस्थता माजेल, म्हणून नाइलाज आहे ! लॅटिन लोकांच्या पक्षपातानें आम्हीं त्याला कैद केलें, अशी लोक आपली भलतीच समजूत करून घेतील. शिवाय, आपलाही त्यांत फायदा नाहीं. त्याला कैद करितांच सर्व कटवाले सावध होतील, आणि आपल्याला कांहींच बातमी लागूं देणार नाहींत. बाकी, कट खास झाला आहे, एवढें ह्या पत्रावरून उघड दिसतें ! ”

सर एडवर्ड—“ ह्या पत्रांतील मजकुराच्या खरेपणाविषयीं मला तर मुळींच शंका नाहीं ! ”

लॉर्ड फ्रांझा—" मजकुराच्या सरळपणावरून, तें खरें असावें असेंच वाटूं लागतें. जोसफ निःसंशय इतका भयंकर मनुष्य आहे कीं, त्याच्या संबंधानें कसलीही बातमी कानांवर आली, तरी ती अशक्य वाटत नाहीं. शिवाय, ह्या बातमींत मला फसवून कोणाचा काय फायदा होणार ? आमचें लक्ष खऱ्या संकटाकडून उडून, एखाद्या काल्पनिक संकटाकडे वेधावें, असा मात्र कदाचित् गूढ हेतु त्यांत असण्याचा संभव आहे ! पण खरोखरच कोठें कट झाला असेल, तर जोसफ त्यांत असावयाचाच, अशी माझी बालंबाल खात्री आहे ! "

सर एडवर्ड—" कसेंही असलें तरी, ही गोष्ट सध्यां अत्यंत गुप्त राखणें अवश्य आहे ! बरें, ह्या जोसफच्या हालचालीवर एकसारखी पाळत ठेवण्याची कामगिरी जरूर पडल्यास थोड्या हुजुरातीच्या स्वारांच्या मदतीनें मीं स्वतःच पतकरली तर ? "

लॉर्ड फ्रांझा—" तर काय ? मी तुम्हांला तीच विनंति करणार होतों ! ह्या कामाची सर्व जबाबदारी आणि पूर्ण मुखत्यारी मी तुमच्या-वरच सोंपवितों, तुम्हांला पाहिजे तेव्हां वाटेल तिकडे जाण्याचा परवाना व अधिकार मी तुम्हांला खुद्द सरकारांच्या सहीशिक्क्यानिशीं आणून देतों. तुम्ही आपली सर्व तयारी करून, सायंकाळीं भोजनासच इकडे या, म्हणजे आपण पुढील योजना ठरवूं ! "

सर एडवर्ड—" ठीक आहे. आपल्या सूचनेप्रमाणें मी सहा वाजतां येथें हजर होतों. आतां दोन वाजून गेले. मला तावडतोब आपल्या तजविजीला लागलेंच पाहिजे. "

असें म्हणून, सर एडवर्ड लॉर्ड फ्रांझाचा निरोप घेऊन, तेथून बाहेर पडले. कोणत्या रीतीनें जोसफच्या हालचालीवर पूर्ण नजर ठेवणें सोपें जाईल, हें निश्चित करण्याकरितां प्रथम ते जोसफच्या मठाकडे गेले. हा मठ कॉन्स्टांटिनोपलच्या पूर्व भागांत असून, अतिशय विस्तृत व प्रख्यात होता. त्यांत प्राचीन काळापासून वारंवार बांधलेल्या अनेक लहान लहान इमारती होत्या, तथापि त्या सर्व एकाच जुन्या ग्रीक पद्धतीच्या होत्या. मुख्य इमारतीचें दोन चौक मठाधिपतींना राहण्याकरितां स्वतंत्र तोडून दिलेले होते. त्याशिवाय स्वयंपाकघर, भटारखाना, कोठी, भांडार

वगैरे अनेक इमारती सभोंवतीं पसरलेल्या होत्या. त्या सर्व इमारतींत मुख्य प्रार्थनामंदिर विशेष शोभायमान दिसत असे. त्याच्या शिखराचे पांच कळस चांदीचे होते. मंदिराच्या सर्व भिंती संगमरवरी दगडाच्या असून फार भक्कम व उंच होत्या. मंदिराभोंवतीं सुंदर बगीचाही होता सर्व मठाच्या सभोंवतीं उंच तट असून, त्याला फक्त एकच दरवाजा चौकासमोर होता.

जोसफ अद्यापि मठांतच आहे, अशी बातमी काढल्यावर, सर एड-वर्डनीं आपल्या हुजुरातीच्या लोकांपैकीं कॉंटारी नांवाच्या आपल्या अत्यंत विश्वासू नाइकास मठाच्या मुख्य दरवाजासमोर असलेल्या एका विश्रांतिगृहांत बसविलें. तेथून त्याला दरवाजावर पूर्ण नजर ठेवतां येण्या-सारखी होती. कॉंटारीच्या अंगावर लष्करी पोषाख नसून, साधा व्या-पारी पद्धतीचा वेष होता. त्या काजील चैनीच्या काळांत प्रहरांचे प्रहर विश्रांतिगृहांत बसून मजेंत घालविण्याची पुष्कळ चैनी लोकांची नेह-मींची वहिवाट असल्यामुळें, कॉंटारी नाईक तेथें बसून राहिल्याबद्दल कोणाला कांहीं शंका येण्याचा संभव नव्हता. जोसफ मठांतून बाहेर जाऊं लागल्यास त्याचा गुप्तपणें पाठलाग करण्याविषयीं, कॉंटारीला सेनापतीसाहेबांची सक्त ताकीद होती. आणि तो जर बाहेरच पडला नाहीं, तर आपण परत तेथें येईपर्यंत त्यानें त्या विश्रांतिगृहांत स्वस्थ बसून रहावें असेंही सर एडवर्डनीं त्याला सांगितलें होतें.

ह्याप्रमाणें सर्व तजवीज केल्यावर सेनापति सर एडवर्ड राजवाड्यांत परत आले. नंतर त्यांनीं आपल्या सैन्यापैकीं खात्रीचे विश्वासू दहा इसम बोलावून, त्यांना अशी ताकीद देऊन ठेवली कीं, एका गुप्त कामगिरीकरितां त्यांची जरूर लागणार आहे, ह्याकरितां त्यांनीं सायं-काळीं सात वाजतां चौकीवर तयार असावें.

हिंवाळ्याचे दिवस असल्यामुळें, दिवस मावळतांच थंडी पडूं लागली. पहारेवाल्यांनीं आपले जाड झबले अंगाभोंवतीं गुंडाळून घेतले. दुकानाच्या खिडक्या बंद करण्यांत आल्या आणि मंडळी जमण्याच्या ठिकठिकाणच्या अड्डयावर आगट्या पेटल्या. सेंट सोफायाच्या व त्या बरोबरच इतर शेंकडो मंदिरांतून सायंकाळच्या प्रार्थनेचे घंटानाद

होऊं लागले. राजवाड्यांच्या चौकांत शेंकडों दिवे लागले. प्रार्थना आटोपतांच बादशहांच्या भोजनाची सिद्धता झाल्याचे सुचविणारीं शिंगें व इतर वाद्यें वाजूं लागलीं.

बादशाहा व लॉर्ड फ्रांझा हे मंदिरांतून प्रार्थना आटोपून एकदमच परत येत असल्यामुळें, त्यांची भोजनाची वेळही एकच येई. प्रधान-साहेबांना आपल्याकरितां तिष्ठत बसावें लागूं नये म्हणून, सर एडवर्ड गडबडीनें पोषाख करून प्रधानसाहेबांच्या बंगल्यांत आले. ह्या वेळीं पंक्तीस तिसरें कोणीच यावयाचें नव्हतें. दोघेही मुत्सद्दी येऊन मेजाशेजारीं बसल्यावर नोकरांनीं दोन ताटें वाढून आणून त्यांच्या पुढें ठेवलीं. नोकर निघून गेल्यावर त्या उभयतांनीं त्या गुप्त पत्रासंबंधानें पुनः एकदां सर्व वाटाघाट केली. लॉर्ड फ्रांझांनीं स्वतः वारंटें व परवाने तयार करून बादशाही सह्याशिक्यांसह पुरे करून आणिले होते. ते सर एडवर्डला म्हणाले--" कट झाला असल्याबद्दल बादशहांची देखील बहुतेक खात्री आहे. सभास्थानीं जातांना व तेथून परत येतांना कांहीं लोकांच्या तोंडून बाहेर पडलेले जे उद्गार त्यांच्या कानांवर आले त्यांवरून त्यांना पूर्वींच असा कांहीं संशय आलेला होता, तो ह्या निनांवी सूचनापत्रानें दृढ झाला. त्याचप्रमाणें लोकांचा विशेष असंतोष ज्या ज्या ठिकाणीं उघड-पणें दृष्टोत्पत्तीस येत होता, त्या त्या ठिकाणीं धर्मोपदेशक जोसफ हजर असलेला दिसत होता, मात्र तो प्रत्यक्ष पुढें न येतां शक्य तितका मागें राहण्याचा प्रयत्न करीत असे, असेंही त्यांच्या दृष्टीस पडलें आहे. त्यावरून ह्या कटांत जोसफ हा प्रमुख मंडळीपैकीं असावा, अशी त्यांची दृढ समजूत आहे. "

त्यानंतर आणखी कांहीं वाटाघाट होऊन असें ठरलें कीं, सर एडवर्डनीं रात्रीच्या रात्रीं त्यांना कळेल ती बातमी लॉर्ड फ्रांझाना कळवावी; आणि सर एडवर्ड परत येईपर्यंत, किंवा त्यांच्याकडून बातमी येईपर्यंत लॉर्ड फ्रांझांनीं त्यांची वाट पहात बसावें.

लॉर्ड फ्रांझांच्या पंक्तीचें सुग्रास भोजन, ह्या महत्त्वाच्या कामगिरींत त्यांनीं व बादशहांनीं टाकलेला पूर्ण भरंवसा, आणि विशेषतः लॉर्ड फ्रांझा ह्यांनीं आपल्या घराण्याशीं होणाऱ्या शरीरसंबंधाबद्दल काढलेले

एक दोन अनुकूल उद्गार, ह्यांच्या योगानें सर एडवर्डच्या अंतःकरणास इतकी उमेद आली कीं, त्यापुढें त्या वेळच्या तीव्र हवेचें त्यांना स्मरण देखील राहिलें नाहीं.

भोजन आटोपल्यावर व सर्व बोलणें चालणें झाल्यावर लॉर्ड फ्रांझा सर एडवर्डना निरोप देतांना म्हणाले—" या आतां, सेनापतिसाहेब, मात्र आपल्या जिवाला संभाळून काय करावयाचें तें करा! तुम्ही स्वतः प्राणाविषयीं बेफिकीर असाल, पण तुमच्या प्राणाची तुमच्या स्वतःपेक्षां, रोमन राष्ट्राला व विशेषतः मला अधिक किंमत आहे, हें विसरूं नका!"

सर एडवर्ड त्यांचे आभार मानून निघून गेल्यावर, लॉर्ड फ्रांझा आपल्या खासगी खोलींत येऊन मेजाशीं एक पुस्तक वाचीत व विचार करीत बसले.

सर एडवर्डच्या सुदैवानें त्या रात्रीं अंगास झोंबणारा गार वारा सुटला नव्हता, किंवा बर्फाचा वर्षाव अगर दहिंवरही फारसें नव्हतें. तथापि तशी प्रतिकूल परिस्थिति असती, तरी देखील ते अंगीकृत कर्तव्यापासून यत्किंचित् देखील परावृत्त झाले नसते. त्या रात्रीं पावसाचें किंवा बर्फाचें वादळ जरी नव्हतें, तथापि आकाश अभ्राच्छादित असून, दाट धुकें पडलेलें होतें. एकही तारा कोठें दृग्गोचर होत नव्हता. वारा तर इतका स्तब्ध होता कीं, बास्परस सामुद्रधुनीच्या लाटा देखील किनाऱ्याच्या खडकावर आदळत नव्हत्या. रस्त्यांतील एखादा कंदील, किंवा नाक्यावरील पहारेवाल्यांनीं पेटविलेली आगटी ह्यांचाच काय मिणमिणीत प्रकाश त्या दाट धुक्यांतून बाहेर पडेल तेवढाच! त्यावांचून प्रकाशाचा एक किरण देखील कोठें दृष्टीस पडत नव्हता.

ज्या विश्रांतिगृहांत सर एडवर्डनीं कॉटारीला बसविलें होतें, तेथें ते जाऊन पोंचले. कॉटारीकडून त्यांना समजलें कीं, जोसफ अद्यापि मठांतून बाहेर पडला नाहीं; शहरांतील कित्येक चैनी व अनीतिमान आणि मनसोक्त वागण्याविषयीं प्रसिद्ध असलेले लहान मोठे सरदार मात्र सायंकाळच्या वेळीं मठांत येऊन गेले, त्यांपैकीं एक दोन असामी मात्र परत बाहेर आलेले दिसले नाहींत, त्यावरून ते अद्यापि मठांतच असावे असा कॉटारीचा अंदाज होता.

ह्याप्रमाणें कॉंटारीकडून सर्व हकीगत समजून घेतल्यावर, सर एडवर्डनीं आपले निवडक दहा इसम त्याच विश्रांतिगृहांत आणून बसविले, आणि दुसरा हुकूम होईपर्यंत तेथेंच बसून समोरच्या मठावर व तेथील हाल-चालीवर सक्त नजर ठेवावयास सांगितलें. नंतर कॉंटारीला बरोबर घेऊन ते मठाच्या बाहेरच्या तटाची तपासणी करीत सभोंवतीं फिरूं लागले. सर एडवर्ड यांचा आज असा दृढनिश्चय होता कीं, जोसफला आज आपल्या देखलगिरीवांचून कोठेंही जाऊं द्यावयाचें नाहीं.

रात्रींचे आठ वाजून बराच वेळ झाला. काळोख अधिकच भीषण दिसूं लागला. सृष्टिदेवतेचें स्वरूपही हळुहळू उग्रतर होऊं लागलें. वाऱ्याचा वेग बराच वाढल्यामुळें, मठाच्या उंच तटावरून व सभोंव-तालच्या झाडींतून, त्याचा भीषण प्रतिध्वनि कानांवर येऊं लागला. मठाचा दरवाजा बंद झाला. आंतील इमारतींपैकीं प्रार्थनामंदिर खेरीज करून, दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं दिव्याची एक ज्योत देखील दृष्टीस पडेनाशी झाली. प्रार्थनामंदिरांत मात्र चोहोंकडे दिव्यांचा लखलखाट दिसत होता. अद्यापि जोसफची विशेष कांहीं हालचाल दिसेना, तेव्हां सर एडवर्डची अशी समजूत होऊं लागली कीं, लॉर्ड कांझा यांना मिळालेली सूचना अजीबात खोटी तरी असावी, किंवा दुसऱ्या एखाद्या महत्त्वाच्या गोष्टीकडून त्यांचें लक्ष दुसरीकडे वेधण्याची तरी ही युक्ति असावी, किंवा हवा वाईट पडल्यामुळें असो, अगर दुसऱ्या कोणत्या तरी कारणानें असो, जोसफनें आपला विचार बदलला असावा. तथापि मध्यरात्रीपर्यंत आपली टेहळणी अशीच कायम ठेवण्याचें सर एडवर्डनीं ठरविलें. त्यानंतर मात्र येथें बसण्याचें कारण नाहीं, असा त्यांनीं विचार केला.

परंतु नवाचे ठोके पडतांच मठाचा दरवाजा उघडला, आणि एक धर्मोपदेशक, पायघोळ झगा घालून व आपला चेहरा पूर्णपणें झांकण्या-सारखी आपली टोपी पुढें ओढून, मठांतून बाहेर पडला आणि झपा-ट्यानें समुद्राकडे निघाला. सर एडवर्ड व कांटारी त्याच्या मागून कांहीं अंतरानें, त्याला आपली चाहूल समजू न देतां, व त्यालामात्र आपल्या दृष्टीआड न होऊं देतां, गुप्तपणें त्याचा पाठलाग करीत निघाले, शह-

रांतील कित्येक घाणेरडे व असंद बोळ आणि गल्ल्या ओलांडून ते शेवटीं बंदरावर येऊन पोंचले. त्या ठिकाणाला हल्लीं साराग्लियोपॉइंट म्हणतात. काळोख जरी गडद पडलेला होता, तरी तशा वेळीं देखील तेथें एक लहानशी होडी धक्क्याशीं तयारच होती. त्या होडीजवळ आणखी कांहीं वस्त्रावगुंठित इसम उभे होते. त्यांनीं ह्या नवागत धर्मोपदेशकास तत्काळ ओळखलें, आणि ते त्याच्याशीं हळुहळू कांहीं बोलूं लागले. धक्क्यावरील बुरजाच्या आडून त्यांच्याजवळ निर्भयपणें जितकें जातां येईल तितकें जाऊन, सर एडवर्ड व कॉंटारी त्यांचें खलबत ऐकूं लागले.

एकजण म्हणाला—“ अर्धा तास तिकडे मशाल जळत आहे ! आम्ही तुमची वाट पहात उभे आहों ! तुम्हीं आम्हांला फसविलें कीं काय, असें देखील आम्हांला शेवटीं वाटूं लागलें ! ”

जोसफ—“ काय करावें, माझें लिहिणेंच आटोपलें नाहीं ! शिवाय, मठांतून बाहेर पडल्यावर दोन इसम माझा पाठलाग करीत असावे, अशी मला शंका आली. त्यांची नजर चुकविण्याकरितां मला किती तरी हेलपाटे घेऊन येथें यावें लागलें. असो, बराच विलंब झाला आहे, आतां तरी कृपाकरून वेळ व्यर्थ घालवूं नका ! ”

तत्काळ सर्व मंडळी होडींत बसली, आणि एका क्षणांत वल्ह्यांचा आवाज सर एडवर्ड व कॉंटारी यांना ऐकूं येऊं लागला. सर एडवर्ड आपल्या सहचराचा हात धरून हळूच म्हणाले—“ कॉंटारी, मोठें विलक्षण कारस्थान दिसतें ! जोसफशीं बोलत होता, तो कोण असावा, ह्याविषयीं तुझी कांहीं कल्पना चालते का ? ”

कॉंटारी थोडा घुटमळूं लागला. तेव्हां सर एडवर्ड पुन्हां म्हणाले—“सांग सांग, भिऊं नको ! तुझी-माझी कल्पना बहुतेक बरोबर जुळणार !”

कॉंटारी—“ पण कदाचित् चुकलीच तर मला माफी असावी ! मला खरोखर ते गृहस्थ सरदार लियॉन्शियस असावे, असें वाटलें ! ”

सर एडवर्ड—“होय होय ! खचित तोच, ह्यांत आतां शंका नाहीं ! बरें, ही मशाल दिसते, ही कोठेंशी असावी ? ”

बॉस्परसच्या सामुद्रधुनीपलीकडे त्या मशालीचा झगझगीत प्रकाश पड-

लेला असून, ती चॅल्सेडन येथील व न्युपोर्ट बंदरांतील इतर दिव्यांपेक्षां उंच व अधिक तेजस्वी दिसत होती.

कॉंटारी कांहीं वेळ त्या मशालीकडे व आसपासच्या दिव्यांकडे लक्षपूर्वक पाहून म्हणाला—" सेनापतिसाहेब, त्या मशालीच्या डाव्या अंगाला पिंवळट दिवा दिसतो, तो कॅलसेडन गांवांतील युफेमियाच्या मठांतील असावा, असें वाटतें. अर्थात् त्या मशालीच्या उजव्या बाजूचा तो तांबूस प्रकाश लींडरच्या बुरजावरीलच असला पाहिजे ! "

सर एडवर्ड—" बरोबर ! माझाही तसाच अंदाज आहे ! बरें, आपल्याला तेथपर्यंत कसें तरी जातां येईल, असें तुला वाटतें का ? "

कॉंटारी—" हो हो, आपल्या लोकांपैकीं एक-दोघांना बोलावून आणिल्यास, त्यांच्या मदतीनें मी आपल्याला सहज तेथवर पोंचवूं शकेन ! "

सर एडवर्ड—" छे छे, तें कांहीं उपयोगी नाहीं ! त्यांत वेळ फार मोडेल आणि बोभाटाही होईल ! त्यापेक्षां ती पहा तेथें एक छोटीशी होडी धक्क्याच्या कडीला बांधून ठेवलेली दिसत आहे, तिचा आपण तूर्त उपयोग करूं या ! त्यांत दोन वल्हीं देखील आहेत ! "

कॉंटारीनें तत्काळ ती होडी दोराला धरून धक्क्याशीं ओढली. दोघेही तत्काळ तींत बसले, आणि दोर सोडून ती वल्हवूं लागले. त्या दोघांसही खलाशाची कला फारशी अवगत नसल्यामुळें, त्यांचे बरेच हाल होऊं लागले व होडीही लवकर वेगानें चालेना. तथापि त्यांनीं धैर्य न सोडतां एकसारखे श्रम करून शक्य तितक्या झपाट्यानें होडी चालविली. जसजसे ते पलीकडच्या किनाऱ्या जवळ जवळ चालले, तसतशी त्यांची खात्री होऊं लागली कीं, आपल्या अजमासाप्रमाणें ती मशाल खरोखरच लींडर बुरजाच्या अलीकडील माळावरच आहे. पूर्वी तेथें एक किल्ला होता, पण तो आतां कांहीं थोडे अवशिष्ट पडके भाग खेरीज करून बहुतेक उध्वस्त झालेला होता. किनाऱ्याला त्या किल्ल्याच्या पडक्या पायऱ्या होत्या, तेथेंच तेवढी होडी लावण्याची सवड होती. बाकीच्या ठिकाणीं कडा तुटलेला होता.

दोघेही होडींतून पायऱ्यांवर उतरल्यावर कॉंटारी आपली होडी एका झुडपाच्या फांदीला बांधीत म्हणाला—" आपण जर नेहमींच्या धक्क्या-

वर गेलों असतों, तर आपल्याला तेथें दोन होडग्या दिसल्या असत्या! कारण, हा धर्मोपदेशक येथें कोणाला तरी गुप्तपणें भेटण्याकरितां आपल्या साथीदार मंडळीसह आलेला असावा, असा माझा अंदाज आहे! शिवाय ह्या बेटाला आशियाकडील किनाऱ्यासही एक उतार आहे. तेथें आपण उतरलों असतों तर आपल्या आगमनाचा बोभाटा होण्याची मुळींच भीति नव्हती!"

सर एडवर्ड—"तुझी पक्की खात्री असेल तर चला, आपण तिकडच्या बाजूला जाऊन उतरूं! मात्र फार सावधगिरीनें गेलें पाहिजे, बोभाटा किंवा चाहूल अगदीं होऊं देतां कामा नये! मी आपल्या स्वतःच्या प्राणाच्या भीतीनें इतकी खबरदारी घ्यावयास सांगतों असें समजूं नको, आपल्या उभयतांच्या सुरक्षितपणावर साम्राज्याचें महत्त्वाचें हिताहित अवलंबून आहे! हं, मग विलंब नको!"

कॉंटारीनें पुनः बोट हाकारली. आणि हळूहळू त्या छोट्या बेटाला वळसा घालून तो अपेक्षित स्थळीं सुरक्षितपणें येऊन पोंचला. तेथें धक्का किंवा बंदर काहीं नसून, फक्त एक सखल व उतरता खडक होता. त्यावर रहदारी नसल्यामुळें बरेंच शेवाळ माजलेलें होतें. त्यामुळें तेथून वर चढून जाणें फार धोक्याचें होतें. कॉंटारीनें होडी कशी तरी एका वेलीला गुंतविली, आणि ते दोघेही सावधगिरीनें व धिमेपणानें त्या खडकावरून हळूहळू चढूं लागले. थोड्याच वेळानें ते किनाऱ्यावरील सुरक्षित जागीं येऊन पोंचले.

त्यानंतर ते त्या पडक्या किल्ल्याच्या रोखानें निघाले व लवकरच त्या किल्ल्याच्या तटाजवळ आले. किल्ल्यांतील बहुतेक इमारती जरी जमीनदोस्त झालेल्या होत्या, तरी तटाच्या आश्रयाला असलेली मुख्य दरवाज्यांतील देवडी मात्र अद्यापि उभी असून बहुतेक दुरुस्त होती. त्या देवडीच्या कोठडींतून कांहीं माणसांचें संभाषण किंवा वादविवाद चालल्यासारखा आवाज सर एडवर्डच्या कानांवर आला. तेव्हां काळोखांतून रस्ता काढीत काढीत, सर एडवर्ड व कॉंटारी हे त्या देवडीच्या कोठडीजवळ येऊन पोंचले. खोलीचें दार बंद होतें. ते दोघेही कोठडीच्या बाजूनें फिरून पाहूं लागले, तों एका भिंतीला एक लहानसा

झरोका असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. तो बराच उंच होता, तथापि त्याच्याखालीं पडक्या दगड मातीचा ढीग झालेला असल्यामुळें, तेथून त्यांना आंतील सर्व प्रकार दिसला नाहीं. तरी भाषण ऐकूं येणें शक्य होतें, म्हणून ते मोठ्या हुषारीनें व सावधगिरीनें त्या झरोक्याजवळ जाऊन उभे राहिले.

" पण पाशासाहेब, आपण म्हणतां त्याप्रमाणें खरोखर तजवीज होईल, अशी आमची खात्री झाली पाहिजे ! " हे शब्द सर एडवर्डना प्रथम ऐकूं आले. ते बोलणारी व्यक्ति जरी त्यांच्या दृष्टीस पडली नाहीं, तरी आवाजावरून ते ड्यूक लियॉनाशियसच आहेत अशी त्यांची पूर्ण खात्री होती, लियॉनाशियस पुढें म्हणाले—" आपण आमच्याकडून सर्व गोष्टी कबूल करून घेतां, वचनें घेतां, आणि करार करून घेतां, पण आपण त्याबद्दल आम्हांला मोबदला किंवा सवलती काय देणार, हें स्पष्ट कांहींच सांगत नाहीं, हें योग्य नव्हे, व ह्यानें आमचें समाधानही होणार नाहीं ! "

पाशा—" आमच्या सद्धर्मपालक सुलतान खलीफसाहेबांची अंतःकरणपूर्वक अशी इच्छा आहे कीं, शक्य तितकी खटपट करून आपल्या प्रजाजनांचा, आणि त्याबरोबर साधल्यास तुम्हां ख्रिस्ती लोकांचाही रक्तपात वांचवावा. आमच्या पवित्र कुराणाची अशी आज्ञा आहे कीं, विधर्मी लोकांना दास्य करावयास लावावें, पण बसलंड लोकांना मात्र जिवंत देखील ठेवूं नये ! म्हणून त्यांनीं कृपाळू होऊन आम्हांला तुमची समजूत घालण्यासाठीं पाठविलें आहे. अल्लाच्या कृपेनें कॉन्स्टांटिनोपल आपल्या हातीं येईल कीं नाहीं, ह्याविषयीं सुलतानसाहेबांच्या मनांत यत्किंचितही शंका नाहीं ! तें तर हातीं येणारच, पण त्या कामीं शक्य तितकी कमी प्राणहानि व्हावी, एवढीच त्यांची सदिच्छा ! "

जोसफ—" पुढें कॉन्स्टांटिनोपलचें कांहींही होवो, पण एवढें मात्र मी आपल्याला निश्चित सांगतों कीं, आपल्या सुलतानसाहेबांनीं लढाई करून तें शहर काबीज करण्याचा प्रयत्न करण्याचें मनांत आणिलें, तर तुमचें सर्व सैन्य, तुमच्याजवळ असेल तितका सर्व दारूगोळा, तुम्हांला मिळतील तितक्या सर्व तोफा, आणि तुमच्या खजिन्यांत असेल तितकी

सर्व संपत्ति ही कॉन्स्टांटिनोपलच्या तटावर त्यांना अर्पण करावी लागेल! आणि हें काम आपल्याला वाटत होतें तितकें सोपें नाहीं, अशी त्यांची स्वानुभवानें पूर्ण खात्री होईल!"

"पाशासाहेब," लियॉनाशियस म्हणाला—"पूर्वीच्या विचारी मुत्सद्यांची अशी एक म्हण आहे कीं, शहाण्या माणसानें शत्रूला जिवावर उदार होण्याचा प्रसंग सहसा आणूं नये! आमचें म्हणणें जर तुम्ही अमान्य कराल, तर आमच्या मैत्रीऐवजीं आमचें हाडवैरच तुम्ही संपादन केल्यासारखें होईल. कारण, शहर तुम्हीं काबीज केलें म्हणजे आमचा काय परिणाम होणार हें आम्ही पूर्णपणें जाणून आहों. त्यापेक्षां आमचें म्हणणें मान्य करा, म्हणजे कॉन्स्टांटिनोपल तुमचेंच आहे! त्याला रक्तपात तरी कशाला!"

पाशा—"बरें, तुमच्या ह्या विनंतिपत्रांत काय काय मागण्या नमूद केल्या आहेत, त्या आणखी एकदां मला ऐकूं द्या!"

जोसफ—"त्या कांहीं लक्षांत न राहण्याइतक्या अवघड किंवा घोंटाळ्याच्या नाहींत, तथापि आपली इच्छा असली तर आणखी एकदां वाचून दाखवितों. पहिली गोष्ट ही कीं, शहरांतील मुख्य दहा प्रार्थना मंदिरें आणि सेंट सोफायाचा मठही आम्हां ख्रिश्चन लोकांकडे निरंतर राहिलीं पाहिजेत. आणि त्यांना तोडून दिलेलें सर्व उत्पन्न त्यांच्याकडे अव्याहत चाललें पाहिजे!"

पाशा—"बरें, पुढें?"

जोसफ—"त्यानंतर, ह्या कागदावर नमूद केलेल्या लोकांचें व त्यांच्या कुटुंबांतील आप्तस्वकीय मंडळींचें जीवित, वित्त, अब्रू व स्वातंत्र्य यांचें पूर्ण रक्षण झालें पाहिजे, आणि हल्लीं ते ज्या योग्यतेनें राहतात, तितक्या योग्यतेनें व सवलतीनें त्यांना नेहमीं राहतां आलें पाहिजे.

पाशा—"ठीक! आणखी काय?"

जोसफ—"कॉन्स्टांटिनोपल येथें जे ख्रिश्चन लोक राहतील त्यांना आपल्या धर्माचें आचरण करण्यास प्रतिबंध होऊं नये; त्याचप्रमाणें त्यांना पोषाखाच्या, खाण्यापिण्याच्या हिंडण्या फिरण्याच्या, गाडी, घोडे नोकर-चाकर बाळगण्याच्या किंवा कामधंद्याच्या बाबतींत कोणतेही त्रासदायक

किंवा कमीपणा आणण्यासारखे निर्बंध घालूं नयेत. ”

पाशा–“ एवढेंचना ? कीं आणखी कांहीं राहिलें आहे ? ”

जोसफ—“ मागण्या एवढ्याच ! पण त्या बरोबर रीतीनें पूर्ण करण्यांत येतील अशी आमची खात्री पटविली पाहिजे ! ”

लियॉनशियस–“ पण माझी आणखी एक मागणी राहिली ! आहे ! लॉर्ड फ्रांझाची मुलगी मला मिळाली पाहिजे ! ह्या बाबतींतील माझ्या महत्वाच्या कामगिरीबद्दल, ही थियोडोरा मला बक्षीस म्हणून मिळाली पाहिजे ! तिच्या बापाचा निकाल तुम्ही करालच ! कारण, हातपाय हालत असतील तोंपर्यंत, तो म्हातारा लढाईच करीत राहणार, स्वस्थ कधीं बसणार नाहीं ! ”

जोसफ–“ पण सरदारसाहेब, आपण विवाहित आहांना ? आपली विवाहित धर्मपत्नी अद्यापि हयात आहेना ? आपण तिचा घटस्फोट केलेला नाहीं ना ? ”

लियॉन्शियस जोसफच्या अंगावर खेकून ओरडून म्हणाला–“ बस ! साधुबुवा, तुम्ही ह्या पंचाइतींत पडूं नका ! तुमच्या धुरती तुम्ही तजवीज पहा ! ही माझी खासगी बाब आहे, ह्यांत तुम्हांला ढवळाढवळ करण्याचें कारण नाहीं ! माझें मी पाहून घेईन ! मी जो आपला जीव धोक्यांत घालीत आहें, तो तुमच्या मठांच्या आणि भटांच्या संरक्षणाकरितां नव्हे ! ” माझी ही मागणी जर मान्य होत नसेल, तर मला ह्या कटाची मुळींच जरूर नाहीं ! ”

जोसफ हात जोडून व आकाशाकडे तोंड करून गंभीर स्वरानें म्हणाला–“ हे सर्वसाक्षी परमेश्वरा, ह्या पापकर्माशीं माझा लेशमात्रही संबंध नाहीं, हें तूं जाणतच आहेस ! मी ईश्वराच्या व स्वधर्माच्या सेवेच्या पवित्र हेतूनें ह्या कार्यांत पडलों आहें, आणि त्याच कारणास्तव मी माघार घेण्यास तयार नाहीं ! पण ह्यांचें हें दुष्ट कारस्थान कोणाही ख्रिश्चन म्हणविणाऱ्या मनुष्यास खचित शोभण्यासारखें नाहीं ! ”

“ अहो साधुबुवा, ” लियॉन्शियस कुचेष्टेनें हसून म्हणाला–“आपण त्याबद्दल बिलकुल काळजी करूं नका ! तशीच अडचण उत्पन्न झाली तर, मी मुसलमान होईन म्हणजे झालें ! मग कसें काय, पाशासाहेब ?

ही माझी मागणी मान्य आहे कीं नाहीं ? मला आतांच काय तें स्पष्ट कळलें पाहिजे ! "

पाशा हंसून म्हणाला—" तुमच्या बाकीच्या मागण्या जर सुलतानसाहेबांनीं मंजूर केल्या तर ह्या मागणीची आम्हांला कांहींच दिकत वाटणार नाहीं, एवढें मी तुम्हांला माझ्या अधिकारांत खात्रीनें सांगतों ! आतां तुमच्या मागण्यांपैकीं दुसऱ्या व तिसऱ्या कलमांचा अनुकूल निकाल लावितां येईल असें मला वाटतें ! परंतु पहिल्या कलमासंबंधानें व विशेषतः मठांच्या संबंधानें सुलतानसाहेबांच्या कानावर घालून, त्यांचा अभिप्राय समजून घेतल्याशिवाय, मला कांहींच सांगतां येणार नाहीं; आणि सुलतानसाहेबांना आमचे मुख्य मुल्लासाहेब जसा सल्ला देतील, तदनुरोधानेंच त्यांचा अभिप्राय पडणार ! "

जोसफ—" पण सुलतानसाहेबांना जर ह्या अटी मान्य झाल्या, तर त्यांनीं त्या अक्षरशः पाळण्याविषयीं कुराणावर हात ठेवून शपथ घेतली पाहिजे, त्याशिवाय आमची खात्री पटणार नाहीं ! "

पाशा—" हो हो, ज्या अटी मान्य होतील, त्या पाळण्याविषयीं वाटेल तसली शपथ करावयास काय हरकत आहे ? "

जोसफ—" नुसती शपथ घेऊनच भागणार नाहीं, त्यांनीं कांहीं दिवस तरी आपला एक मुलगा आमच्या ताब्यांत ओलीस ठेवला पाहिजे ! कारण, एकदां शहर त्यांच्या स्वाधीन झाल्यावर, त्यांनीं शपथ मोडली तर आम्हीं त्यांचें काय करणार ? म्हणून प्रथमच आम्हांला ही खबरदारी घेणें भाग आहे ! "

पाशा—" पण सुलतानसाहेबांना हें मान्य होईल असें मला वाटत नाहीं ! "

जोसफ—" ह्यांतील कोणतीही मागणी अमान्य झाली तरी, हा तह होणें शक्य नाहीं, हें मी आपल्याला प्रथमच सांगून ठेवतों ! बरें, आपल्याकडील निश्चित उत्तर आम्हांला कधीं व कोठें मिळणार ? "

पाशा—" येथेंच ! ह्या ठिकाणासारखें दुसरें सुरक्षित स्थळ नाहीं ! आजपासून आठव्या दिवशीं रात्रीं ह्याच वेळीं मी पुनः येथें येईन ! "

" ठीक आहे ! " आतांपर्यंत स्तब्ध असलेला एक गृहस्थ म्हणाला,

आम्हीं पुढील बुधवारीं ह्याच वेळीं येथें येऊं. पण त्या वेळीं जर ह्या गोष्टीचा अखेर निकाल लागला नाहीं, तर पुनः मी तर ह्या बाबतींत मुळींच पडणार नाहीं! मग अखेरपर्यंत लढूनच काय तो निकाल लावील."

जोसफ--"बरोबर! माझेंही मत तसेंच आहे! चला आतां, परत जाऊं या! रात्र निवळत चालली. शहरांतील लोकांची रस्त्याला रहदारी सुरू होण्यापूर्वीं आपल्याला आपापल्या स्थानीं अदृश्य झालें पाहिजे, नाहीं तर कोणी तरी पाहून ओळखल्यास भलतेंच संकट यावयाचें!"

कटवाले पाशाचा निरोप घेऊन तेथून निघाले व आपली होडी त्यांनीं ज्या ठिकाणीं उभी केली होती, तेथें आले.

कटवाले निघून गेल्यावर पाशा आपल्या बरोबरच्या अनुचरास म्हणाला--"हे ख्रिस्ती काफर किती शंकेखोर असतात, पाहिलेस ना? आमचे सद्धर्मपालक सुलतान खलीफसाहेब, असल्या एक सोडून दहा कॉन्स्टांटिनोपलकरितां देखील आपलें वचन कधीं मोडणार नाहींत, हें ह्या काफरांना खरें वाटणार नाहीं! कदाचित् व्हानींच्या लढाईची गोष्ट त्यांच्या डोळ्यांपुढें असेल, आणि आपल्यासारखेच दुसरे लोक लबाड असतील, अशी त्यांची समजूत असेल!"

पाशाचा सेवक कांहीं न बोलतां नुसता हंसला. नंतर ते दोघेही तेथून किनाऱ्यावर आले आणि आपल्या होडींत बसून चालते झाले. ह्याप्रमाणें शेवटीं सर एडवर्ड व कॉंटारी हे दोघेच त्या बेटावर राहिले.

"हा चांगलाच नीचपणाचा कट दिसतो!" कॉंटारी उत्तेजित स्वरानें म्हणाला--"आजपर्यंत कित्येक कट झाले होते, पण ह्यानें त्या सर्वांवर कळस केला! चला, सेनापतिसाहेब, परत जावयाचें ना?"

सर एडवर्ड--"हो, चला आतां येथें कांहीं काम नाहीं! हा कट अत्यंत नीचपणाचा तर खराच, पण तो आपल्याला वेळेवर समजला, ही ईश्वराची मोठीच कृपा! आतां त्याचा बंदोबस्त तरी करितां येईल! असो, कॉंटारी, आजची तुझी महत्त्वाची कामगिरी मी बादशहांच्या कानांवर घालीन, आणि त्यांच्याकडून तुला योग्य बक्षीस

मिळाल्यावांचून राहणार नाहीं अशी माझी खात्री आहे ! ”

कॉटारी—“ मी ही सेवा आपल्यावरील भक्तीमुळें करीत आहें. त्याबद्दल बक्षिसाची अपेक्षा मीं मुळींच मनांत ठेवलेली नाहीं. तथापि आपले उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं ! मला आपल्या हाताखालीं लेफ्टेनंटची जागा मिळाली, म्हणजे माझ्या महत्त्वाकांक्षेची सीमा झाली तेवढी मात्र मला मोठी हौस आहे ! ”

दोघेही परत येऊन होडींत बसल्यावर सर एडवर्ड म्हणाले—“ का बरें ? लेफ्टेनंटच्या जाग्याची तुला इतकी आवश्यकता कां वाटते ? बढतीकरितां, कीं बहुमानाकरितां, कीं चैनीकरितां ? ”

कॉटारी होडी वल्हवितां वल्हवितां म्हणाला—“ तसा कांहीं माझा उद्देश नाहीं, तथापि लेफ्टेनंटची जागा मिळाल्याशिवाय मला लग्न करून घेतां येत नाहीं, म्हणून मला ती लवकर मिळावी असें वाटतें ! ”

सर एडवर्ड—“ म्हणजे ? तुझें लग्न ठरलेलें आहे कीं काय ? कोणाशीं ? ”

कॉटारी—“ मी खेड्यांतील रहिवासी असल्यामुळें, खेड्यांतीलच वधु पसंत केली आहे. तथापि ती सुशील व कुलीन असून आमचें एकमेकांवर अत्यंत प्रेम आहे. बोर्विया व इस्कीबात्रा ह्या गांवांच्या दरम्यान रस्त्यालगतच तिच्या बापाचा जमीनजुमला असून, तेथेंच तो राहात असतो. तो प्रामाणिक, धर्मनिष्ठ व बाणेदार शेतकरी म्हणून त्या प्रांतांत प्रसिद्ध आहे. त्याचें नांव टॉमस असून, त्याच्या एकुलत्या एका कन्येचें नांव युडेशिया आहे. ”

सर एडवर्ड—“ ठीक आहे. पण तूं म्हणतोस तें ठिकाण स्वतंत्र वृत्तीच्या पाणीदार मनुष्याला एकटें दुकटें राहण्यासारखें सध्यांच्या काळीं तरी सुरक्षित नाहीं ! तेथून तूं त्या मंडळींना शक्य तितकें लवकर शहरांत आणून ठेवशील तर बरें ! तुला लेफ्टेनंटची जागा लवकरच मिळेल, असें मी आतांच वचन देऊन ठेवतों ! माझ्यावर विश्वास ठेवून तूं तावडतोब आपल्या पुढील तजविजीला लाग ! हं, चला आतां लवकर किनारा गांठला पाहिजे ! प्रधानसाहेब माझी वाट पहात बसले असतील,

त्यांना ही सर्व हकीगत अगोदर कळविली पाहिजे!"

आपल्या अल्पस्वल्प कामगिरीचें बक्षीस आपल्या अपेक्षेबाहेर व थोडयाच वेळांत मिळणार हें पाहून कॉटारीचें अंतःकरण आनंदानें भरून गेलें. त्यानें तुटक शब्दानीं पण मनापासून कृतज्ञतेनें सेनापतीचे आभार मानले. त्यांच्यावर त्याची अधिकच भक्ति बसली व त्यांच्याकरितां आत्मसमर्पण करण्याचा प्रसंग आला तरी मागें सरावयाचें नाहीं, अशी त्यानें मनांतल्या मनांत प्रतिज्ञा केली.

होडी थोडयाच वेळांत किनाऱ्यास येऊन लागली. त्यांनीं ती पूर्वी होती तेथें बांधून ठेवली व ते दोघेही लॉर्ड फ्रांझांच्या बंगल्यांत जाण्याकरितां, राजवाडयाकडे झपाट्यानें निघाले.

---

## प्रकरण १० वें.

## सुटकेचा प्रयत्न.



लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास आणि त्यांच्या बरोबरची मंडळी ह्यांना तुर्की स्वारांनीं कैद करून, ॲड्रियानोपलाच्या किल्यांत नेलें. हा किल्ला प्रथम बलगेरियन स्वाऱ्यांपासून रोमन साम्राज्याचें संरक्षण करण्याकरितां सरहद्दीवरील लष्करी ठाणें म्हणून बांधण्यांत आला होता. त्या काळच्या मजबूत लष्करी ठाण्यांमध्यें ह्या किल्याची गणना होती. इतकेंच नव्हे, पण तो लष्करी कौशल्याचा नमुना म्हणून त्या वेळीं प्रसिद्ध होता. त्यानंतर झालेल्या अनेक बादशहांनीं त्यांत आणखीही भर घातलेली होती. शेवटीं सुलतान अमूराथ याच्या ताब्यांत तो किल्ला आल्यावर, त्यानें खिस्ती राष्ट्रांविरुद्ध चालविलेल्या महायुद्धाचें मुख्य ठाणें त्यानें ह्याच ठिकाणीं केलें. त्या वेळीं त्यानें त्या किल्ल्यास आणखी एक भक्कम कोट बांधून, सभोंवतीं खोल खंदकही केला.

ॲड्रियानोपलचा किल्ला त्या काळच्या सामान्य चालीप्रमाणें वर्तुलाकार नसून चौकोनी होता. त्याचे तट इतके उंच असत कीं, त्यांतून सूर्य

किरण फारच थोडा वेळ आंत येत. त्यामुळें तटांच्या आंतील बाजेंत जिकडे तिकडे ओल व शेवाळ माजलेलें असे. आणि कुजलेल्या पाल्या-पाचोळ्याची दुर्गंधीही भरून राहिलेली असे.

ह्या किल्ल्याच्या आंत एका कोंपऱ्यास असलेल्या तुरुंगाच्या इमार-तींत लॉर्ड मॅन्युअल व त्याच्या बरोबरच्या मंडळीस आणून ठेवण्यांत आलें. लॉर्डमॅन्युअल, कोतवाल कॉनिएटस् व रिचर्ड बर्स्टो यांना वरच्या मज-ल्यांतील एका खोलींत ठेवलें. आपल्या बायकामंडळीस आपल्यापासून दूर करूं नये, म्हणून त्यांनीं किल्लेदाराचीं पुष्कळ आर्जवें केलीं, पण त्यांचें कांहीं न ऐकतां, युफ्रेशिया व तिची आई यांना तळमजल्याच्या खोलींत नेऊन गाडलें, आणि इतर नोकरांना खालच्या तळघरांत कोंबण्यांत आलें.

त्यांतल्या त्यांत सुदैवाची गोष्ट एवढीच होती कीं, सुलतान महमदाची स्वारी ह्या वेळीं शिकारीकरितां बऱ्याच दूरच्या जंगलांत गेली होती. तथापि ते केव्हां परत येतील ह्याचा कांहीं नियम नव्हता. आणि ते परत येतांच ह्या कैद्यांचा काय तो अखेर निकाल लागावयाचा होता.

ह्या तुरुंगांत आल्यावर तिसरे प्रहरीं मॅन्युअल व त्याचे दोघे मित्र आपल्या कोठडींत विचार करीत सचिंत बसले होते. त्यांची कोठडी चौकोनी असून, तिच्या भिंती उंच उंच होत्या. त्या भिंतींना उत्तरेच्या बाजूस एक व पूर्वेच्या बाजूस एक, असे दोनच झरोके होते. हे झरोके फार उंचीवर असून, अतिशय अरुंद होते. शिवाय भक्कम लोखंडी गज मारून त्यांचा पक्का बंदोबस्त केलेला होता. कोठडीच्या भिंती चिरेबंदी असून, दाराला दोहोंबाजूंस लोखंडी पत्रे मारलेले होते. कोठडींत गवताच्या तीन गाद्यांवांचून दुसरें कांहींच सामान नव्हतें. आणि ह्या गाद्या देखील कैद्यांची थोर योग्यता लक्षांत आणून, विशेष मेहेरबानगीनें दिलेल्या होत्या.

तुर्की अंमलदार कैदी लोकांना ह्या कोठडींत कोंडून परत निघून गेल्याबरोबर कोतवाल कॉनिएटस् निराश होऊन आपल्या गादीवर पडला. लॉर्ड मॅन्युअल वेड्यासारखा खोलींतल्या खोलींत इकडून तिकडे हेलपाटे घालूं लागला. परंतु रिचर्डनें प्रथम सर्व कोनेकोपरे तपासून पाहिले,

नंतर भिंतींवर व जमिनीवर ठिकठिकाणीं टिचक्या मारून पाहिल्या, मग उड्या मारून झरोक्याचे गज धरले व शक्य तितकें उंच डोकें करून, बाहेरची परिस्थिति पाहण्याचा प्रयत्न केला, आणि शेवटीं विचार करीत इकडे तिकडे दोनतीन फेऱ्या घातल्या. शेवटीं तो लॉर्ड मॅन्युअलजवळ येऊन गंभीर स्वरानें म्हणाला—" सरदारसाहेब, येथून निसटून जातां येणें कठिण दिसत आहे, तथापि आपण सर्वांनीं मिळून जर झटून खटपट केली, तर तेंही शक्य होईल अशी मला आशा आहे. "

कोतवाल—" हें:, रिचर्ड, तुला काय वेड लागलें आहे कीं काय ? "

मॅन्युअल—" त्यांत माझ्या प्रिय युक्रेशियाच्या सुटकेची कांहीं आशा आहे कां ? "

रिचर्ड हंसून म्हणाला—" कोतवालसाहेब, मला वेड तर मुळींच लागलेलें नाहीं. आणि सरदारसाहेब, आपल्या युक्रेशियाताईंना जर सोडवितां आलें नाहीं, तर मग त्यांची सुटका होण्याची आशाच नको! तथापि प्रयत्न करणें एवढेंच आपल्या हातीं आहे; यश देणारा परमेश्वर समर्थ आहे. आणि माझें तर मत असें आहे कीं, ह्या तुरुंगांत कुजून मरण्यापेक्षां, सुटकेच्या प्रयत्नांत मरण आलें तरी तें श्रेयस्कर आहे ! "

" अगदीं बरोबर ! " लॉर्ड मॅन्युअल उत्तेजित स्वरानें उद्गारले— " मात्र हा प्रयत्न निष्फळ आहे, हें विसरतां कामा नये ! कारण, आपण ज्या किल्ल्यांत आहों, तो अत्यंत मजबूत असून, तो सुलतानाच्या राज्यांत आहे, येथें त्याचें लष्करी ठाणें आहे, शिवाय खुद्द सुलतानाचाही मुक्काम येथेंच आहे. अशा स्थितींत येथून पळून जाण्याचा विचार मनांत आणणें देखील वेडेपणाचें आहे ! "

रिचर्ड—" पण ही इमारत तुरुंगाकरितां म्हणून कांहीं मूळची बांधलेली नव्हे. एवढें उघड दिसत आहे ! "

लॉर्ड मॅन्युअल " तें कशावरून ? माझ्या नाहीं लक्षांत आलें ! "

कोतवाल कॉनिएटस यांना असल्या गोष्टींचा विशेष अनुभव असल्यामुळें, ही गोष्ट त्यांच्या लक्षांत चटकन् येऊन, ते म्हणाले " बरोबर आहे, रिचर्ड, तुमचें म्हणणें खरें दिसतें ! ही इमारत मूळची तुरुंगाची

त्यास नसावी, अशी माझीही कल्पना आहे ! ”

रिचर्ड–“ एखाद्या अज्ञान पोराच्या देखील हें सहज ध्यानांत येण्यासारखें आहे ! तसें असतें तर, ह्या खिडक्या अशा बाहेरच्या बाजूला आल्याच नसत्या ! येथील कैद्यांना शहरांतील देखावे पाहतां यावे, आणि त्यांची करमणूक होऊन त्यांना बाहेरच्या बातम्याही कळाव्या, असा खुळा उद्देश कोणाचा तरी असूं शकेल का ? ”

लॉर्ड मॅन्युअल विचार करून म्हणाले–“ खरेंच ! तुमच्या म्हणण्यांत बराच तथ्यांश दिसतो ! ”

रिचर्ड––“ शिवाय हें पहा, सरदारसाहेब, ह्या खिडक्यांना हे जे गज बसविले आहेत, ते मूळचे नसून, मागाहून बसविलेले आहेत. ”

मॅन्युअल––“ हो, प्रथम त्या खिडक्या मोकळ्याच असाव्या, असें दिसतें ! बरें, पण हा मूळचा तुरुंग नसावा असें जरी गृहीत धरलें, तरी पुढें काय ? ”

रिचर्ड––“ पुढें आणखी काय असावयाचें ? आपली येथून सुटका आतां, चोहोंबाजूंना चौक्या, पहारे वगैरे बंदोबस्त असल्यामुळें, तिकडून कांहीं सवड होणें शक्य नाहीं; पण जमिनीवर तर कांहीं पाहरा असणें शक्य नाहीं, तेव्हां तिकडून प्रयत्न करण्याचा माझा विचार आहे. ”

कोतवाल––“ शाबास, रिचर्ड, तुझी कल्पना माझ्या लक्षांत आली, आणि ती मला बरोबर पटलीही ! पण हत्यारें कशीं मिळणार ? ”

रिचर्ड हंसून म्हणाला––“ कोतवालसाहेब, वाघाच्या तोंडांत मुंडी खुपसावयास तयार व्हावयाचें म्हणजे, ती शाबूत बाहेर काढण्याची कांहीं तरी तजवीज प्रथम केल्याशिवाय कसें चालेल ? पण आतांच मी आपणाला कांहीं सांगत नाहीं. कारण, तुरुंगावरचा अधिकारी इतक्यांत आपलें अन्नपाणी घेऊन येईल. पण जर माझा अंदाज खरा ठरला, तर आपल्याला लवकरच खालच्या खोलींत जातां येईल. तेथें जर कोणी कैदी कदाचित् असले, तर प्रसंगाप्रमाणें वागावयास आपण तयार असलें पाहिजे ! स्वातंत्र्यप्राप्तीकरितां कांहीं तरी संकट सोसण्याची तयारी ही पाहिजेच ! युक्रेशियाताई व त्यांच्या मातुश्री ह्याच इमारतींत कोठें तरी असल्या पाहिजेत, त्यांचाही आपल्याला तपास लागल्यावांचून

राहणार नाहीं. ईश्वर करील तर, सुलतान महमदाची घटकाभर चांगलीच करमणूक होईल!"

दिवस मावळेपर्यंत रिचर्डनें आपला उद्देश आपल्या दोवां सोबत्यांना हळूहळू समजावून सांगितला. संध्याकाळीं एक तुर्की शिपाई कोठडीचें दार उघडून आंत आला, आणि एक पाण्याचें मडकें व तीन भाकरी तेथें ठेवून मुकाट्यानें परत निघाला. "सलाम, नाईक, कसें काय आहे?" असें रिचर्डनें त्याला विचारलें, पण तो एक अक्षरही न बोलतां, किंवा नुसतें मागें वळूनही न पाहतां तसाच बाहेर चालता झाला. कोठडीचें दार बंद झालें, पुनः कुलूप लागलें व जिन्यावरून खालीं उतरतांना त्या शिपायाचीं पावलें खाडखाड वाजत, शेवटीं ऐकूं येईनातशीं होऊन पुनः जिकडे तिकडे सामसूम झालें.

"किती अरसिक मनुष्य आहे!" रिचर्ड हंसत हंसत उद्गारला. "कोठडीचें कुलूप देखील गंजल्यासारखें ऐकूं आलें, त्यावरून ह्या कोठडीचा फार दिवसांत उपयोग केलेला नसावा असें दिसतें! बरें, सरदारसाहेब, कोतवालसाहेब, चला या. ईश्वरकृपेनें आपल्याला ह्यापेक्षां चांगलें जेवण लवकरच मिळो, पण अगदींच उपाशीं राहण्यापेक्षां हें कांहीं वाईट नाहीं! शिवाय आपल्याला पुढें पुष्कळ काम आहे, तेव्हां ह्याचा आदर केलाच पाहिजे!"

नंतर तिघेही जेवावयास बसले. रिचर्डनें आपली भाकरी बघतां बघतां खलास केली, पण त्याचे दोघेही सोबती खिन्न व विमनस्क झाले असल्यामुळें, त्यांना एकही घास गिळेना. पाण्याच्या घोटाबरोबर कसे तरी दोन घास पोटांत घालून, त्यांनीं तें भिकार जेवण आटोपलें. नंतर रिचर्ड म्हणाला—"आतां आपण आपल्या कामाला लागूं! तुम्ही प्रथम कांहीं एक गडबड न करितां अगदीं स्वस्थ बसा, म्हणजे मी कानोसा घेतों. खालच्या खोलींत कोणी आहे कीं काय, हें मला अगोदर पाहिलें पाहिजे!"

रिचर्ड तक्तपोशीवर पडला, आणि त्यानें आपला कान फळ्यांना लावला. त्या वेळीं तो इतका एकाग्र व निश्चल झाला होता कीं, तो जिवंत आहे कीं मेला आहे, याचा देखील एखाद्याला संशय आला

असता. ह्याप्रमाणें दोन तीन मिनिटें झाल्यावर तो चटकन् उठून म्हणाला " खालची खोली रिकामी तरी असावी, किंवा तेथें कोणी कैदी असल्यास तो निजलेला तरी असावा, असें वाटतें ! पण त्याचीही आपण शहानिशा करूं ! प्रथम ह्या मडक्यांतलें पाणी संपवून तें रिकामें करा ! "

कोतवाल—" मला पाणी पुरे ! मला आतां कांहीं नको ! "

लॉर्ड मॅन्युअल—" मला तर मुळींच तहान नाहीं ! ".

रिचर्ड—" तहान नसली तरी घोट घोट पिऊन घेतलेलें बरें. कारण, पुनः पाणी मिळणार नाहीं. हें मडकें आतां आपल्याला फोडावयाचें आहे"

" काय ? मडकें फोडावयाचें ? तें कां ? " मॅन्युअलनीं आश्चर्यानें विचारलें.

रिचर्ड—" चाहूल पाहण्याकरितां ! मी पुनः मघासारखा फळीला कान लावतों, आणि तुम्ही कोणी तरी तें मडकें अशा जोरानें खालीं टाका कीं, त्याचा शक्य तितका मोठा आवाज व्हावा. म्हणजे त्यांत दोन कामें साधतील. खालच्या खोलींत कोणी कैदी निजला असला, तर तो जागा होईल, आणि त्याची चाहूल मला ऐकूं येईल; शिवाय आपल्यावर किती सक्त पाहरा आहे, हेंही समजेल. कारण पहारेवाला जवळपास असला तर, तो काय झालें हें पाहण्याकरितां खास येईल. "

कोतवाल—" खालीं कोणी निजला असला, तर तो ह्या आवाजानें जागा होईल, यांत संशय नाहीं, पण त्याची चाहूल कशी ऐकूं येणार ? "

रिचर्ड—" त्याबद्दल काळजी करूं नका. ती कला मी मुद्दाम एका मुसलमानाजवळ शिकलों आहें. बरें, पाणी कोणाला नको ना ? तर मग उरलेलें मीच पिऊन टाकतों ! "

रिचर्डनें मडकें तोंडाला लावून तत्काळ रिकामें केलें. आणि तें लॉर्ड मॅन्युअलच्या हातीं देऊन तो म्हणाला—" सरदारसाहेब, मीं हातानें खूण केल्यावर, आपण हें मडकें शक्य तितकें उंच करून जोरानें खालीं आपटा ! "

रिचर्ड पूर्वीसारखाच फळ्यांना कान लावून अगदीं स्तब्ध पडला. लॉर्ड मॅन्युअल मडकें हातांत घेऊन, त्याच्याकडे पहात उभे राहिले. थोड्या वेळानें रिचर्डनें खूण करितांच, मॅन्युअलनीं तें मडकें खूप जोरानें

तक्तपोशीवर टाकलें. त्याबरोबर इतका मोठा आवाज झाला कीं, त्याचा प्रतिध्वनि जिन्यावर देखील घुमूं लागला. मडक्याच्या तर सहस्त्रावधि ठिकऱ्या उडाल्या. क्षणभरानें रिचर्ड उठून म्हणाला—" खालच्या खोलींत तर कोणी नाहीं, अशी माझी पूर्ण खात्री झाली ! आतां पहारेवाले कोणी येतात कीं काय, ह्याची थोडा वेळ वाट पाहूं ! "

तिघेही पांच मिनिटें स्तब्ध बसले, पण बाहेर कोठें कांहीं हालचाल दिसली नाहीं. त्यावरून पाहऱ्याचा बंदोबस्त फारसा सक्तीचा नाहीं, अशी त्यांची खात्री झाली. रिचर्ड म्हणाला—" मी तुरुंगावरचा अधिकारी असतों तर असा अव्यवस्थित बंदोबस्त कधींही ठेवला नसता ! असो, आतां आपल्या कामाला लागूं या ! "

नंतर रिचर्डनें आपल्या पायांतील दोन्ही बूट काढले. त्यांपैकीं एका बुटाच्या तळव्याखालून त्यानें एक करवतीचें बारीक पातें बाहेर काढलें व दुसऱ्यांतून त्या पात्याची छोटी मूठ व कानस काढली. तीं सर्व हत्यारें उत्तम पोलादी असून, चकचकीत व तीक्ष्ण होतीं.

करवतीला मूठ बसवीत रिचर्ड हसून म्हणाला—" तुर्कांनीं आमच्या हातांतील हत्यारें काढून घेतलीं, आणि झडत्या घेऊन आमच्या जवळचें सर्व द्रव्यही लुबाडून घेतलें, त्या वेळीं त्यांना माझ्या जाड बुटांचा संशय येतो कीं काय, अशी मला भीति पडली होती ! पण ईश्वरकृपेनें त्यांना ती शंका आली नाहीं, म्हणून आपल्याला सुटकेचा कांहीं प्रयत्न करावयास तरी साधन झालें ! "

तीं हत्यारें पाहून कोतवाल म्हणाले—" खरेंच, रिचर्ड, तुझी हुषारी मोठी अजब आहे ! आपल्याला ह्या प्रयत्नांत बहुतेक यश येणार अशी मला खात्री वाटूं लागली आहे ! "

रिचर्ड—" ईश्वराची कृपा असली तर आपल्याला खचित यश येईल ! आतां हा करवत लपवून ठेवावयास अशी सुरक्षित जागा हुडकून काढली पाहिजे कीं, तेथें तपास करण्याचें कोणाच्या स्वप्नांत देखील कधीं येणार नाहीं ! "

रिचर्डनें एकवार चोहोंकडे दृष्टि फिरवून, चटकन् उडी मारून, खिडकीचे गज धरले, आणि दोन गजांमधील फटींतून बाहेर बोटें घालून

पाहिलें, तों गजाच्या बाहेर बरीच रुंद जागा असल्याचें त्याला दिसून आलें. नंतर तो खालीं उतरून म्हणाला–" ठीक आहे. ही जागा कोणाच्या लक्षांत येण्यासारखी नाहीं, आणि तेथून हत्यारें खालीं पड-ण्याचीही भीति नाहीं ! आतां मी आपल्या कामाला लागतों. या मधल्या गादीखालचीच जागा आपल्या कामाला योग्य आहे. कारण, प्रसंग पडल्यास ती ताबडतोब झांकून टाकतां येईल. "

रिचर्डनें मधली गादी ओढून बाजूला सारली, आणि खालची एक सोईची फळी पाहून ती कापण्यासाठीं तो करवत घेऊन खालीं बसून म्हणाला—" फळ्या कांहीं फारशा जाड दिसत नाहींत, अर्थात् त्या कापावयास फारसा त्रास पडणार नाहीं. फक्त तुळया कोठें आहेत, ह्याचा अजमास पाहिला पाहिजे. नाहीं तर तुळईवरचीच फळी कापली गेली म्हणजे आपले सर्वच श्रम व्यर्थ जातील ! "

नंतर त्यानें वरील तुळया पाहून, खालच्या तुळयांचा अजमास बस-विला, आणि दोन तुळयांच्या मधील जागेचा अंदाज करून, तो पडटाळून पाहण्यासाठीं फळ्या वाजवूनही पाहिल्या. मग तो म्हणाला– " हां, सांपडली जागा ! आतां कामाला लागतों. आपल्याकडे कोणाचें लक्ष असेल, किंवा आपणांवर कोणाची नजर असेल, असें दिसत नाहीं, तथापि आपण शक्य तितकी सावधगिरी घेतलेली बरी ! माझा करवत जरी पातळ आहे, तरी फळी कापतांना त्याचा थोडा तरी आवाज होणारच ! तेव्हां, मी फळी कापूं लागलों म्हणजे तुम्ही कोणी तरी मोठ्यानें गाण्यास सुरवात करा. म्हणजे त्या दंग्यांत करवताचा आवाज झांकून जाईल. तोंपर्यंत दुसऱ्यानें स्वस्थ पडून रहावें. म्हणजे त्याला तितकी विश्रांति मिळेल, आणि कोणी पाहिलें तर त्यालाही कोणी निज-लेले व कोणी बसलेले पाहून कांहीं शंका येणार नाहीं. "

कोतवाल—" सरदारसाहेब, तुम्ही निजा. तुम्हांला बरेच श्रम झालेले आहेत ! मी कांहीं फारसा दमलेला नाहीं, मी गाणें गात बसतों ! "

लॉर्ड मॅन्युअल—" ठीक आहे ! आपली आज्ञा मी आभारपूर्वक मान्य करितों, पण दोन तासांनीं आपण मला उठविलें पाहिजे, म्हणजे मला

आपल्या वांटणीचें काम करावयास सांपडेल!"

कोतवाल—"बरें तर चार तासांनीं आपल्याला खचित उठवीन. मग आपण उरलेली रात्र तिघांत सारखी वाटून घेऊं! आतां निजा. मी व रिचर्ड मिळून होईल तितकें काम करितों!"

श्रमानें व चिंतेनें जर्जर झाल्यामुळें, लॉर्ड मॅन्युअलनीं आपल्या त्या जाडया भरड्या गवती गादीवर अंग टाकतांच त्यांना गाढ झोंप लागली. रिचर्ड आपल्या कामाला लागला. प्रथम त्यानें कानशीच्या टोंकानें फळीला करवत चालण्यासारखी फट पाडली. नंतर त्यानें करवतानें फळी कापण्यास आरंभ केला. इकडे कोतवाल कॉनिएटस ह्यांनीं आपल्या बेसूर गाण्यासही तत्काळ सुरुवात केली. त्यांचा आवाज चांगला नव्हता, व त्यांना गातांही येत नव्हतें, तथापि तिकडे लक्ष न देतां त्यांनीं जोराजोरानें गाण्याचा सपाटा लावला. रिचर्डनें इतक्या झपाट्यानें काम चालविलें होतें कीं, ते थंडीचे दिवस असून सुद्धां, त्या श्रमांमुळें त्याचें अंग घामानें डबडबून गेलें.

कांहीं वेळानें रिचर्ड धापा टाकीत म्हणाला—"कोतवालसाहेब, आतां तुम्ही थोडी करवत घ्या. माझीं बोटें अगदीं काचून गेलीं, आणि मला दमही लागला आहे! क्षणभर तुम्ही हळूहळू काम करा, तोंपर्यंत मी गाणें म्हणतों. म्हणजे मला तितका विसांवा मिळून, पुनः काम करण्यास दम येईल!"

कोतवालांनीं तत्काळ करवत घेऊन फळी कापण्यास झपाट्यानें सुरुवात केली. पण त्यांना असल्या श्रमांची कधीं संवय नसल्यामुळें अर्ध्या तासाच्या आंतच त्यांना करवत खालीं ठेवावा लागला.

"ठीक आहे!" रिचर्ड उत्तेजित स्वरानें म्हणाला—"आतां मला पुनः दम आला! इतक्यांत काम खलास करून टाकतों पहा!"

त्यानें पुनः कामास आरंभ केला, आणि तीन तासांच्या आंत चोहोंकडून फळी कापून दीड फूट औरस चौरस विवर तयार केलें, आणि तो फळीचा तुकडा उचलून वर काढून ठेवला. तें पाहतांच, आपली सुटका आतां खास होणार असें वाटून कोतवालास अत्यंत आनंद झाला. पण पुढें अद्यापि किती अडचणी आहेत, हें रिचर्डला

माहीत असल्यामुळें, तो त्या हर्षांत गर्क न होतां पुढील तजविजीचा विचार करूं लागला.

रिचर्ड त्या विवरांतून खालीं वांकून पाहून म्हणाला—" खालची तक्तपोशी किती खोल आहे, हें प्रथम पाहिलें पाहिजे ! काळोखामुळें खालीं कांहीं दिसत नाहीं. माझ्या कमरेला गुंडाळलेली बरीच लांब काढणी आहे, तिच्या साह्यानें खालचें माप घेतों, म्हणजे समजेल ! "

त्यानें कमरेची रशी सोडून, तिच्या एका टोंकास कानस बांधली, आणि ती हळूहळू खालीं सोडली. त्यावरून त्याला आढळून आलें कीं, खालची तक्तपोशी तेरा फुटांपेक्षां कमी नाहीं. हें पाहून त्या दोघांही धाडसी इसमांना बरीच काळजी वाटूं लागली.

रिचर्ड कांहीं वेळ विचार करून म्हणाला—" येथून खालीं उडी टाकतां येणें शक्य नाहीं व श्रेयस्करही नाहीं. जरी हातपाय न मोडतां सुरक्षित खालीं जातां आलें, तरी उडीचा आवाज एवढा मोठा होईल कीं, पहारेवाले कितीही निष्काळजी असले तरी त्या आवाजासरसे धांवून आल्यावांचून राहणार नाहींत, आणि तसे कोणी आले तर, मला वरही येतां येणार नाहीं ! त्या अर्थी ही रशी पिवट करून वळून तिचा मोठा दोर केला पाहिजे, आणि त्या दोराच्या साह्यानें हळू हळू खालीं गेलें पाहिजे. त्यांवांचून गत्यंतर नाहीं ! पण तसा दोर वळण्यास बराच वेळ लागणार ! त्यापूर्वीं अगोदर ही चोरवाट झाकून टाकली पाहिजे, आणि करवत अदृश्य केला पाहिजे. कारण, शिपाई केव्हां कोणत्या निमित्तानें येईल, ह्याचा नियम नाहीं ! "

चोरदाराची व करवतीची व्यवस्था लावल्यावर रिचर्ड म्हणाला—" आतां लॉर्ड मॅन्युअलना उठविलें पाहिजे. दोर वळणें बरेंच मेहनतीचें काम आहे, त्याला सर्वांची मदत पाहिजे ! "

लॉर्ड मॅन्युअलना कोतवालांनीं जागृत केलें. ते उठल्यावर रिचर्डनें त्यांना सर्व परिस्थिति समजावून सांगितली. नंतर तिघेही पुनः उद्योगास लागले. त्यांचे डोळे झोंपेनें जड झाले होते, तरी तिकडे लक्ष न देतां, त्यांनीं आपलें काम तसेंच नेटानें चालविलें होतें. ह्याप्रमाणें दोन तास सक्त मेहनत केल्यावर त्यांचा दोर तयार झाला. तो खालच्या तक्तपोशीला

पुरण्याइतका लांबही झाला, आणि एका मनुष्याचा बोजा सहन करण्याइतका मजबूतही झाला. परंतु ह्या वेळीं रात्र संपून पहाट झाल्यामुळें, पुनः काळोख पडेपर्यंत त्यांना आपलें काम तितकेंच बंद ठेवणें भाग पडलें.

रिचर्ड म्हणाला—“ आतां फारसा वेळ नाहीं, तथापि खालच्या खोलीच्या खालीं काय आहे हें पाहिल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. मी ह्या दोराला धरून खालीं जातों, तुम्ही दोर बळकट धरा, आणि मी खालीं जातांच हें चोरदार झांकून घ्या, म्हणजे कोणी आलें तरी त्याच्या एकदम लक्षांत येणार नाहीं. ”

फारशी खटपट न पडतां रिचर्ड खालच्या खोलींत उतरला खालीं पाय टेकतांच तो म्हणाला—“ आतां दार बंद करून घ्या, आणि सुमारे पंधरा मिनिटांनीं उघडा. तोंपर्यंत मी स्वस्थपणानें खालचा तपास करितों. ”

दार झांकल्यावर कोतवाल मॅन्युअलला म्हणाले—“ खरोखर जर कोणाच्या हातून आमची सुटका होण्यासारखी असली, तर ती ह्या रिचर्डच्या हातूनच होण्याचा संभव आहे ! फक्त मला एवढीच भीति—”

“ हो ! ” मॅन्युअल मध्येंच उद्गारले—“ सुलतान आणखी एक-दोन दिवस आला नाहीं, तर आपली सुटका होण्याचा बराच संभव आहे ! ”

कोतवाल—“ तेंच ! पण तो केव्हां येईल, ह्याचा काय भरंवसा आहे ! ”

मॅन्युअल कान देऊन ऐकत म्हणाले—“ ते पहा, रिचर्ड खालीं कांहीं तरी खटपटींत आहे ! पण आवाज केवढ्यानें करीत आहे ! ”

“ ऐका, ऐका ! ” कोतवाल भयभीत स्वरानें म्हणाले—“ जिन्यावर कोणाचीं तरी पावलें वाजत आहेत ! कोणी तरी खास इकडे येत आहे ! आतां कसें करावयाचें ? ”

मॅन्युअलनें चटकन् त्या चोर दारावर गादी ओढली, आणि कोतवालास त्यावर बसावयास सांगितलें; नंतर एका कोपऱ्यांतील गादीवर आपला झुबला अशा रीतीनें पसरून ठेवला कीं, तेथें कोणी तरी निजलें

आहे असें दिसावें; आणि आपण तिसऱ्या गादीवर विचार करीत बसला.

कोतवाल खिन्न स्वरानें पुटपुटले—" आतां काय होईल, कोण जाणे! ईश्वराची इच्छा असेल, तसें होईल!"

जिन्यावरील पावलें जवळ जवळ वाजूं लागलीं, दाराच्या फटींतून दिव्याच्या प्रकाशाचे बारीक किरण दिसूं लागले, गंजलेल्या कुलपांत किल्ली करकरलेली ऐकूं आली, आणि थोड्याच वेळांत खोलीचें दार उघडलें.

मॅन्युअल हळूंच म्हणाले—" ईश्वराची इच्छा असेल तसें होईल! तथापि मला कांहीं अजून निराशा वाटत नाहीं! तुम्ही स्वस्थ असा, मीं पाहतों काय होतें तें!"

एक तुर्की अधिकारी हातांत कंदील घेऊन आंत येऊन म्हणाला—"काय हो? रात्रभर कसली गडबड चालविली आहे? आणि तिसरा कैदी कोठें आहे? काय रात्रभर दंगा करून आमचें डोकें उठविलें!"

मॅन्युअल—" मग काय करावें? आमच्या मनाला शांतता नाहीं, तर आम्हांला झोंप कोठून येणार? (तिसऱ्या बिछान्याकडे बोट दाखवून) त्या बिचाऱ्याचा नुकताच कोठें डोळा लागला आहे! आम्हांला देखील घटकाभर झोंप लागेल तर बरें होईल! पण झोंप येतच नाहीं, त्याला काय करावें?"

तुर्क रागानें गुरगुरला—" काय करावें म्हणजे? स्वस्थ बसून रहावें. पुनः अशी गडबड कराल तर तुम्हांला तळघरांत नेऊन टाकावें लागेल! मग वाटेल तितका दंगा केलात तरी बाहेर कोणाला त्रास होणार नाहीं!"

मॅन्युअल—" बरें बुवा, आम्ही आतां स्वस्थ पडून राहतों, मग तरी झालें? कोतवालसाहेब, बिछान्यावर डोळे मिटून पडून झोंप घेण्याचा प्रयत्न करूं या, म्हणजे दुसऱ्याला त्रास नको, आणि आपल्यालाही थोडें बरें वाटेल! सलाम, साहेब, आतां आम्ही कांहीं दंगा करीत नाहीं, तुम्ही जा!"

तुर्की अधिकारी गुरगुरत खोलीच्या बाहेर पडला, आणि त्यानें पुनः दार बंद करून घेतलें. त्याला कोणत्याही प्रकारची शंका आली नाहीं. त्याची चाहूल जिन्यावर ऐकूं येईनाशी झाल्यावर मॅन्युअल उठून हळूच

म्हणाले—“ एका संकटांतून तरी ईश्वरकृपेनें निभावलों ! ह्यापुढें मात्र विशेष सावधगिरीनें वागलें पाहिजे ! आज आतां अधिक कांहीं खटपट करितां येणें शक्य नाहीं ! रिचर्डला एकदां वर काढूं या, म्हणजे झालें!”

त्यांनीं गादी बाजूला ओढून चोरदार मोकळें केलें आणि रिचर्डला हाक मारली. त्यानें दोर सोडावयास सांगतांच, दोर खालीं सोडून, त्यांनीं रिचर्डला वर ओढून घेतलें.

वर येतांच रिचर्ड उत्तेजित स्वरानें म्हणाला--“शाबास सरदारसाहेब, आपण मोठ्या हुषारीनें वेळ मारून नेली, म्हणून हें संकट टळलें ! मी खालून सर्व संवाद ऐकला ! दार उघडल्याचा शब्द ऐकतांच, मी तर अगदीं निराश झालों होतों ! असो, ईश्वर करो आणि सुलतान उद्यांपर्यंत तरी न येवो ! कारण, सुलतान आला कीं, मला हेर म्हणून फाशीची शिक्षा ठरलेलीच आहे ! मग तुमची चौकशी सावकाश होईल ! पण आज आतां अधिक कांहीं करण्यास सवड नाहीं ! आतां घटकाभर झोंप घेऊं या, पुनः रात्रीं फार काम आहे. खालच्या खोलींत कोणी तरी माणसें आहेत, ह्यांत कांहीं शंका नाहीं, पण तीं कोण असावीं, ह्याचा तपास रात्रीं करूं ! ”

ते तिघेही मित्र आपापल्या गवती बिछान्यावर स्वस्थ पडले आणि ते जरी संकटांत होते, तरी रात्रीच्या श्रमामुळें त्यांना लवकरच गाढ झोंपा लागल्या.

दुसरा दिवस उजाडला व मावळला. त्या तिघांही मित्रांना हा वेळ फार कंटाळवाणा गेला. त्या सबंध दिवसांत, सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं त्यांना अन्नपाणी आणून देणाऱ्या शिपायाखेरीज, कोणी त्यांच्या दृष्टीस देखील पडलें नाहीं. त्या शिपायाकडून कांहीं माहिती मिळविण्याची रिचर्डनें पुनः खटपट करून पाहिली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तो शिपाई त्याच्याशीं एक अक्षरही बोलला नाहीं. त्यांना अन्न मात्र भरपूर व बऱ्याच प्रकारचें मिळालें, त्यावरून त्यांची योग्यता तुर्की अधिकाऱ्यांना कळलेली असावी. दुपारचें जेवण झाल्यावर त्यांनीं पुनः झोंपा काढल्या. कारण, रात्रीं त्यांना फार काम असल्यामुळें जागरण व्हावयाचें होतें.

संध्याकाळ होऊन काळोख पडला, रात्रीचें अन्नपाणी ठेवून शिपाई परत गेला, त्या तिघांचेंही जेवण झालें, तेव्हां लॉर्ड मॅन्युअल पुनः कामास लागण्याविषयीं रिचर्डला घाई करूं लागले. इतक्यांत जिन्यावर पुनः पावलें वाजूं लागलीं, आणि थोड्याच वेळांत तुरुंगावरील अधिकारी दार उघडून त्यांच्या कोठडींत आला.

तो आंत येतांच लॉर्ड मॅन्युअलकडे वळून गंभीर स्वरानें म्हणाला— "सुलतानसाहेबांची स्वारी शिकारीहून परत आली आहे, आणि त्यांनीं तुम्हांला आतांच्या आतां भेटीस येण्याविषयीं फर्माविलें आहे!" नंतर तो रिचर्डकडे वळून म्हणाला—"आणि ए ग्रीक हेर, उद्यां सूर्य उगवणार हें जसें निःसंशय खरें आहे, तसेंच उद्यां तुला देहांत शिक्षा होणार हेंही निश्चित आहे! तेव्हां ही तुझ्या आयुष्याची उरलेली थोडी वेळ ईश्वरचिंतनांत घालवावयाची असली, तर त्या तजविजीला लाग!"

रिचर्ड—"वाः! तर मग अजून पुष्कळच अवधि आहे! पण काय हो, जेलर साहेब, उद्यां जर माझा देहांत होणार, तर माझ्या वांटणीची उद्यांची सरबताची बाटली आजच आणून द्याना बरें?"

जेलर तिरस्कारानें हंसून म्हणाला—"काय पाजी मनुष्य आहे! मरणाचे वेळीं देखील ह्याला ईश्वराचें स्मरण न होतां सरबताची आठवण होते! ठीक आहे, तुझी तेवढीच इच्छा असेल तर, तुला सरबताची एक बाटली पाठवून देईन!" नंतर मॅन्युअलकडे वळून म्हणाला—"हं, चला साहेब, सुलतान वाट पहात आहेत!"

लॉर्ड मॅन्युअल जेलरबरोबर जावयास निघाले. जातां जातां ते रिचर्डकडे वळून खिन्न स्वरानें उद्गारले—"अरेरे, काय दुर्दैव पहा! आपली काय आशा होती, आणि—

"हां, हां, सरदार साहेब!" रिचर्ड हळूच म्हणाला—"सावध असा, कदाचित् आपली भाषा त्यांना समजत असेल! आपल्याला कांहीं फारशी भीति नाहीं बरीचशी खंडणी भरली म्हणजे आपली खास सुटका होईल, आणि आपणास ताईच्याबद्दल कांहीं तरी रदबदली करितां येईल!

मॅन्युअल—"देव करो, आणि तुझा तर्क खरा ठरो! बरें तर, येतों

मी आतां कोतवालसाहेब, आपल्याला लवकरच सुस्थिति प्राप्त होवो, अशी माझी परमेश्वरास प्रार्थना आहे ! "

लॉर्ड मॅन्युअल जेलरबरोबर निघून गेल्यावर, कोतवाल खिन्न स्वरानें रिचर्डला म्हणाले—"दुर्दैव आमच्या पाठीस लागलेलें दिसत आहे, त्याच्या विरुद्ध खटपट करणें व्यर्थ होय ! "

रिचर्ड—" हें दैवावर हवाला ठेवणें हें रानटी माणसांचें काम ! आपणा ख्रिस्तानुयायांना हें बोलणें शोभत नाहीं ! ईश्वर आपल्याला अनुकूल असल्यावर, शेंकडों दुर्दैवांचें तरी काय चालणार ! "

कोतवाल—" हो ! तेंच खरें ! आपण परमेश्वराची प्रार्थना करूं. तो आम्हां अनाथांची उपेक्षा कधीं करणार नाहीं ! "

दोघेही गुडघे टेंकून व हात जोडून, अनन्यभावानें ईश्वराची प्रार्थना करूं लागले. त्यांची प्रार्थना आटोपते तों कोठडीचें दार पुनः उघडलें आणि एक शिपाई सरवताची बाटली तेथें ठेवून पुनः मुकाट्यानें दार बंद करून निघून गेला.

रिचर्ड ती बाटली घेऊन म्हणाला—" काम करून दम लागल्यावर पुनः ताकद येण्यास ह्याचा फार उपयोग होईल ! असो, आतां तासभर स्वस्थ बसून, लॉर्ड मॅन्युअल परत येतात कीं काय, तें पाहूं या; आणि मग आपल्या कामाला सुरवात करूं ! "

एक तास होऊन गेला तरी लॉर्ड मॅन्युअल परत आले नाहींत. रात्रही तास दोन तास होऊन गेली, तेव्हां ते दोघेही मित्र आपल्या कामाच्या तजविजीस लागले.

रिचर्ड आपलीं हत्यारें काढून घेऊन म्हणाला—" आपणा दोघांसही आतां खालीं गेलें पाहिजे, आणि तेथें आपल्याला बराच वेळही लागेल तोंपर्यंत इकडे जर कोणी पुनः कोठडींत आला, तर त्याला एकाएकीं शंका येऊं नये, अशी तजवीज करून गेलें पाहिजे ! कोतवालसाहेब, आपण आपला झुबला आपल्या बिछान्यावर पसरून ठेवा, आणि मीही आपला झुबला माझ्या बिछान्यावर पसरतों. झुबले अंतराळीं करून ठेवूं, म्हणजे कोणी निजल्यासारखें दिसेल. आपले झुबले जाड असल्यामुळें, ते सहज अंतराळीं राहूं शकतील. "

कोतवाल—" पण लॉर्ड मॅन्युअलची काय वाट ? ते परत आले तर खालीं कसे येणार, आणि त्यांची सुटका कशी होणार ? "

रिचर्ड—" ते आज कांहीं परत येणार नाहींत असें मला वाटतें ! यावयाचे असते तर मघांच आले असते. ते येथें मागें राहिले तरी त्यांच्या जिवाला फारशी भीति नाहीं ! खरें पुसाल तर, आपल्या मुलीवर व पत्नीवर फार मोठें संकट आहे ! त्यांची अगोदर कसेंही करून मुक्तता केलीच पाहिजे. बाकी कोणाबद्दलही तितकी काळजी करावयास नको ! "

कोतवाल—" पण त्यांचा तरी आपल्याला शोध कसा लागणार ? "

रिचर्ड—" माझा तर अंदाज असा आहे कीं, ह्या खोलीच्या खालच्या खोलींत त्याच बहुतकरून असाव्या ! कारण, काल रात्रीं मीं कानोसा घेतला त्या वेळीं तेथें बायका असाव्या, असें मला वाटलें. आणि येथें सध्यां दुसऱ्या कोणी बायका कैदेंत असण्याचा संभव दिसत नाहीं ! "

कोतवाल—" चला तर आतां कामाला लागूं या. उगीच वेळ दवडून उपयोग नाहीं ! तुझा तर्क खरा ठरला तर देवच पावला ! "

रिचर्ड चोरदार उघडून म्हणाला—" हं कोतवालसाहेब, आपण प्रथम खालीं उतरा, मी वर दोर ताणून धरतों. नंतर तुम्ही खालीं उभे राहून, उंच हात करून नुसता माझ्या पायाला आधार द्या, मी ही फळी हातांत धरून खालीं लोंबकळत पाय सोडतों. तुमच्या हातांचा थोडा आधार मिळाला कीं, मी हात सोडून हळूच खालीं उतरतों, म्हणजे आपाय होणार नाहीं, दोरही वर राहणार नाहीं, आणि मला हें चोरदारही झांकून घेतां येईल.

रिचर्डनें योजना केल्याप्रमाणें सर्व तजवीज झाली. त्यांत दोघांनाही बराच त्रास पडला, पण त्यांच्या हेतूप्रमाणें ते दोघेही सुखरूप खालच्या खोलींत येऊन दाखल झाले, आणि चोरदारही आच्छादित झालें.

रिचर्ड आपला करवत सरसावून म्हणाला—" आतां एकदम कामाला लागलें पाहिजे ! ईश्वर करो, आणि कालच्या प्रमाणेंच आजही आपल्याला पूर्ण यश येवो ! "

रिचर्ड पुनः कामाला लागला. त्यानें जागा तपासून पसंत करून,

करून, कानशीच्या टोकानें फळीला भेग पडली, आणि करवत चालू केला. परंतु करवत थोडा वेळ चालला नाहीं तोंच खालच्या खोलींतून मोठ्यानें बोलणें ऐकूं येऊं लागलें, तेव्हां त्यानें क्षणभर काम बंद केलें.

दोघेही लक्षपूर्वक ऐकूं लागले. थोड्याच वेळांत कोतवाल उत्तेजित स्वरानें म्हणाले—" हा खास माझ्या बायकोचा शब्द आहे, आणि दुसरी बोलणारी माझी मुलगीच आहे ! "

रिचर्ड " हो, मलाही तसेंच वाटतें. त्या घाबरून आरडाओरड करतील कीं काय, कोण जाणे ! आपल्याला शक्य तितकें लवकर काम आटोपलें पाहिजे ! "

रिचर्डनें पुनः करवत चालू केला, पण थोड्याच वेळांत, " कोण आहे, " असा स्पष्ट सवाल खालून ऐकूं आला. तो शब्द कोतवालांच्या पत्नी मेरियाबाई यांचाच होता, ह्याबद्दल आतां त्या दोघांसही शंका उरली नाहीं.

रिचर्डनें अधिक झपाट्यानें करवत चालू केला, आणि कोतवाल अस्वस्थ चित्तानें त्याच्याकडे पहात हळूच म्हणाले—" दैव हिला क्षणभर मुकी करील तर बरें होईल ! "

" कोण आहे तें ? " पुनः मोठ्यानें व कर्कश स्वरानें खालून सवाल आला. परंतु वरून कांहींच जबाब न मिळतां, करवत चालू राहिल्यामुळें, खालीं एकदम आरडाओरड व किंकाळ्या सुरू झाल्या.

" आतां मात्र काम भागलें ! " रिचर्ड करवत काढून घेऊन, तो आपल्या डगल्यांत लपवीत म्हणाला.

आरडाओरड थांबली. त्यानंतर बराच वेळ ते दोघे एकाग्र चित्तानें ऐकत राहिले, पण खालीं कांहीं विशेष हालचाल ऐकूं आली नाहीं; त्यावरून त्यांच्या दंग्याची कोणीं दाद घेतली नसावी, असें त्या दोघांनाही वाटलें.

थोड्या वेळानें रिचर्डनें पुनः हळू हळू फळी कापण्यास सुरुवात केली. परंतु करवताची खरखर सुरू होतांच पुनः खालीं अधिक मोठ्यानें आरडाओरड व किंकाळ्या सुरू झाल्या, त्याबरोबर रिचर्डनें पुनः करवत काढून घेतला, आणि ते दोघेही खिन्न होऊन स्तब्ध राहिले.

ह्या खेपेला मात्र त्यांच्या दंग्याची दाद लागलेली त्यांना दिसली. कारण थोड्याच वेळांत त्यांच्या खोलीचें दार उघडल्याचा आवाज झाला आणि कोणी तरी घोगऱ्या स्वरानें बोलत असावें असें त्यांना वाटलें. रिचर्ड तें लक्षपूर्वक ऐकण्याचा प्रयत्न करीत होता, पण त्याला शब्द कांहीं ऐकूं आले नाहींत. तथापि कोणी तरी खोलींत येऊन, त्या बायकांना धमकावीत असावें, असें बोलण्याच्या स्वरावरून त्यानें ओळखलें. क्षणाभरांत खालच्या खोलीचें दार बंद झाल्याचा आवाज होऊन, पुनः जिकडे तिकडे शांतता झाली.

थोडा वेळ थांबून,, रिचर्ड पुनः फळी कापूं लागला. तेव्हां पुनः एक अस्पष्ट किंकाळी ऐकूं आली, परंतु पुढें मात्र कांहीं आरडाओरड झाली नाहीं. रिचर्डनें कसें तरी एकदांचें आपलें काम पुरें केलें आणि फळीचा तुकडा वर काढून तो कोतवालास म्हणाला—" हं, कोतवालसाहेब, आपण मधांसारखे दोराच्या साह्यानें खालीं उतरा, आणि त्यांना शांत करा, म्हणजे फारशी काळजी नाहीं; मग मीही मघांप्रमाणें खालीं येतों ! पण अगोदर तुम्ही येथूनच त्यांच्याशीं बोलून त्यांना ओळख द्या, म्हणजे त्यांना धीर येईल. "

कोतवालांनीं त्या चोरदाराजवळ तोंड नेऊन, " मेरिया, मेरिया, " अशी हळूच हांक मारली.

" अरे देवा, कोण आहे तें ? " मेरियाबाईंनीं खालून भयभीत स्वराचें विचारलें.

कोतवाल—" मी निसिटस आहें. तूं मला ओळखलें नाहींस का ? माझ्याबरोबर आणखी एक मित्र आहे. भिऊं नको, आम्ही खालीं येऊन तुम्हां दोघींनाही सोडविण्याचा प्रयत्न करीत आहों ! स्वस्थ असा !

खालच्या दोघीही स्त्रियांच्या तोंडून आनंदाचे उद्गार बाहेर पडले व त्यांनीं ईश्वराचे आभार मानले. थोड्याच वेळांत दोराच्या साह्यानें कोतवाल खालीं उतरले आणि त्यांच्या मागून रिचर्डही तें चोरदार झांकून घेऊन हळूच सावधगिरीनें खालीं आला.

परस्परांच्या भेटी झाल्यावर कोतवालांनीं वरील सर्व हकीकत सांगितली आणि रिचर्डची मोठ्या कृतज्ञतेनें शिफारस केली. नंतर मेरिया-

बाई म्हणाल्या—" वरून करवताची खरखर ऐकतांच आम्ही घाबरलों. वरून कोणी तरी दुष्ट तुर्की मनुष्य आम्हांवर अत्याचार करण्याच्या हेतूनें गुप्तपणें येण्याचा प्रयत्न करीत असावा, अशी आमची समजूत होऊन, आम्हीं घाबरून ओरडलों, पण प्रथम कोणींच आमची दाद घेतली नाहीं. पुनः करवताचा आवाज ऐकूं आला, तेव्हां पुनः आम्ही ओरडलों, तेव्हां मात्र दार उघडून फेलर आंत आला, आणि यानें आम्हांला धमकावून म्हणाला—" खबरदार पुनः असा दंगा करून माझी झोंपमोड कराल तर, मी एकेकीला तळघरांतल्या कोठडींत नेऊन कोंडून ठेवीन ! वरच्या खोलीचें कुलूप देखील आज कित्येक दिवसांत काढलेलें नाहीं, मग तेथें कोण असणार, आणि खालीं तरी कसा येणार ? " एवढें बोलून तो पुनः दार बंद करून चालता झाला, तेव्हां आमचा निरुपाय होऊन, आम्ही वेईल त्या प्रसंगास तोंड द्यावयास तयार होऊन, ईश्वराची प्रार्थना करीत स्तब्ध राहिलों. "

रिचर्ड—" असो, झालें तें झालें. ईश्वर कृपेनें येथपर्यंत तर निभावलें. आतां पुढील तजविजीचा विचार केला पाहिजे ! खालची खोली रिकामी आहे, कीं तेथें कोणी कैदी आहे, हें तुम्हांला समजलें आहे का ? "

युफ्रासिया—" सुमारें एक तासापूर्वी खालीं कांहीं आरडाओरड व झटापट चालल्याची चाहूल ऐकूं येत होती, पण त्यापूर्वी व त्यानंतरही अगदीं स्तब्ध आहे. त्यावरून कोणी तरी तेथें आलें असावें व लवकरच बाहेर निघून गेलें असावें, असें वाटतें. "

रिचर्ड—" ठीक आहे, तर मग आपली एक धाडस केलें पाहिजे. मी आतां पुनः कामाला लागतो. तुम्ही स्वस्थ असा. बोलावयाचें झालें तरी अगदीं हळू बोला, फार दंगा करूं नका ! "

रिचर्डनें खालच्या तक्तपोशीवर पुनः करवत सुरू केला व तो झपाट्यानें आपलें काम करूं लागला. इकडे युफ्रासियानें आपल्या प्रियकर मॅन्युअल संबंधानें आपल्या बापाला सर्व हकीगत विचारून घेतली, व त्याचें वर्तमान ऐकून ती अतिशय खिन्न झाली. आपल्या परम प्रिय मॅन्युअलना शत्रूच्या तावडींत सोडून, आपण तेवढें येथून पळून जाणें हें

योग्य नाहीं, असेंही तिला वाटूं लागलें. तेव्हां कोतवाल तिची समजूत घालण्याकरितां म्हणाले—" लॉर्ड सॅन्युअलच्या जीवितावद्दल काळजी करावयास नको. त्यांना येथें अपाय होण्याची भीति नाहीं, असें माझें व रिचर्डचेंही मत आहे. फक्त त्यांना कांहीं काळ प्रतिबंधांत रहावें लागेल, पण कांहीं खंडणी दिल्यावर त्यांची सहज मुक्तता होईल. त्यांना व आम्हांलाही तुझीच काय ती मोठी काळजी आहे. तूं येथें राहिलीस तर तुजवर भलता नसता अत्याचार होण्याची भीति आहे. याकरितां तुझी येथून अगोदर मुक्तता केली पाहिजे ! "

युफ्रासिया निरुत्तर होऊन स्वस्थ बसली. नंतर मेरियाबाईनीं आपल्याला येथें आणिल्यावर कसकसें वागविण्यांत आलें व काय काय व्यवस्था झाली, हें आपल्या पतीस थोडक्यांत सांगितलें. इतक्यांत रिचर्डचें काम खलास होऊन, त्यानें फळीचा तुकडा बाजूस काढला. नंतर खालीं काय आहे हें पाहण्याकरितां तो दोराच्या साहानें खालीं उतरला. तेव्हां त्याला असें हें आढळून आलें कीं, खालची जमीन फळ्यांची नसून, दगडी फरशीची आहे. हें पाहून मात्र त्याला मोठी काळजी पडली. कारण, त्याच्या अंदाजाप्रमाणें अद्याप अगदी तळघरांत किंवा जमिनीच्या सपाटीस आलों नाहीं, अशी त्याची खात्री होती. तेथें अंधारांतच तो इकडे तिकडे फिरून त्या कोठडीची स्थिति चांचपून पाहूं लागला.

कांहीं वेळानें तो एका लोखंडी गजाला ठेचकाळला. तो गज कसला आहे हें त्यानें चांचपून पाहिलें, त्यावरून तो खिडकीचा असावा असें त्याला वाटलें. कांहीं वेळ त्याच्याशीं झटापटल्यावर त्यानें तें चौकटदार उघडलें, तों बाहेरून गार व ओलसर वारा त्याच्या अंगावर आला, आणि ' धो धो ' पाणी वहात असल्याचा शब्दही ऐकूं आला. त्यावरून तुंगा नदीचा खोल व जोराचा प्रवाह खालून वहात असावा, अशी त्याची खात्री झाली.

रिचर्डनें हळूच कोतवालांस हाक मारली, तेव्हां तेही खालीं आले. दोघांनीं मिळून बराच विचार केला. परंतु पुढें काय करावें, हें त्यांना कांहीं समजेना. रिचर्ड तर पोहण्याच्या कामांत पटाईत होताच, आणि कोतवालांनाही पोहतां येत होतें. पण बायकांना कसें न्यावयाचें, हीच

काय ती मोठी अडचण होती. तो कशी दूर करितां येणार हें त्यांना कळेना. वेळ तर थोडा उरला होता. तावडतोब प्रयत्न करणें जरूर होतें. नाहीं तर सर्व श्रम व्यर्थ होणार होते. कारण, उजाडल्यावर ही गोष्ट गुप्त राहणें शक्यच नव्हतें, आणि रात्र तर आतां तासभर देखील उरली नव्हती.

रिचर्ड त्या चोरदारांतून कांहीं वेळ लक्षपूर्वक पाहून म्हणाला—" वाहेरच्या बाजूला थोडासा प्रकाश दिसतो आहे. त्यावरून नदीचा ओघ मोकळा नसून, जवळच कोठें तरी सापळ्याचें दार किंवा जाळी असें कांहीं तरी असावेंसें वाटतें!"

कोतवाल—" हो, मलाही तसेंच वाटतें! पण ऐका! वल्ह्याच्या आवाजासारखा आवाज ऐकूं येत आहे! जवळच खालीं एखादी नांव असावी, असें दिसतें!"

रिचर्ड क्षणभर लक्षपूर्वक ऐकून म्हणाला—" होय! कोणी माणूस खालीं आहे खास! तें कोण असावें हें प्रथम पाहिलें पाहिजे! मी प्रथम त्याच्याशीं तुर्की भाषेंत बोलून पाहतों, म्हणजे काय तें समजेल, शत्रु असले तरी आमच्या ह्या स्थितींत अधिक वाईट काय करणार? पण मित्र असले तर मात्र मोठेंच काम होईल!"

कोतवाल—" पहा बुवा! तुला योग्य दिसेल तसें कर!"

रिचर्ड चोरदाराजवळ वांकून, अधिकारयुक्त स्वरानें म्हणाला—" कोण आहे खालीं?"

त्याला काय जबाब मिळाला, आणि खालीं कोण होतें, हें नीट समजावयास, अगोदरची थोडी हकीगत सांगितली पाहिजे.

प्रकरण ११ वें.

## अकल्पित मदत.



सर एडवर्ड कटवाल्यांची बातमी घेऊन बेटावरून परत आल्यावर एकदम लॉर्ड फ्रांझा यांच्या बंगल्याकडे गेले. ते कबूल केल्याप्रमाणें त्यांची वाट पहात बसलेच होते. सर एडवर्डनीं सर्व हकीगत प्रधान-साहेबांना सविस्तर कळविली. कांहीं तरी विश्वासघातकी कट झाला आहे, अशी जरी लॉर्ड फ्रांझा यांची प्रथमपासून कल्पना होती, तरी लॉर्ड लियॉनशियससारखा मोठा सरदार व साम्राज्याचा आधारस्तंभ त्या कटांत सामील असल्याचें ऐकून त्यांना इतकें विलक्षण आश्चर्य वाटलें कीं, आतां ह्यापुढें कोणावर भरंवसा ठेवावा, व कोणाला इमानी समजावें, हेंच त्यांना कळेना.

सर एडवर्डना आपल्या घरीं परत यावयास बहुतेक उजाडलें. शिवाय लॉर्ड फ्रांझांनीं त्यांनीं व बादशहांच्या भेटीस सकाळीं लवकर जावयाचें ठर-विलें होतें. कारण, ह्या भयंकर कटाचा तावडतोब बंदोबस्त करणें भाग होतें.

ठरल्याप्रमाणें लॉर्ड फ्रांझा व सर एडवर्ड यांनीं दुसरे दिवशीं सकाळीं बादशहांची भेट घेऊन कटाची सर्व हकीगत त्यांच्या कानावर घातली. ती ऐकून बादशहांनाही सखेदाश्चर्य वाटलें. तथापि त्यांनीं न डगमगतां, आपल्या निश्चयी स्वभावास अनुसरून, कटाच्या बंदोबस्तासाठीं जरूर त्या तजविजी सांगितल्या. शहरचे कोतवाल निसिफोरस ह्यांना बोला-वून आणून व कटाची हकीगत सांगून, गुप्त तपास करण्यास फर्माविलें. शेवटीं बादशहा म्हणाले—“ ह्या कटाचा पल्ला कोठवर जातो, हें मला पहावयाचेंच आहे ! कालच्या बैठकींत त्यांचें ठरल्याप्रमाणें; पुढील बैठक होऊं दे. त्यांत तो पाशा सुलतानाकडून काय निरोप आणितो तें पाहूं, आणि आमच्या निमकहराम कटवाल्यांचें त्यावर काय म्हणणें पडतें तेंही समजून घेऊं. मात्र सर एडवर्ड, तुम्ही त्या वेळी तयारीनिशीं

तेथें असा, आणि तेथें असतील त्या सर्व लोकांना, पाशासुद्धां कैद करा. त्याबद्दल सुलतानाला राग आला तरी पर्वा नाहीं !"

सर एडवर्ड—" आज्ञा सरकार, मी ही कामगिरी मोठ्या आनंदानें करीन !"

बादशहा—" ते आठ दिवसांनीं पुनः तेथें जमणार आहेत ना ? तो दिवस लक्षांत ठेवा. आणि तुमच्या त्या कॉंटारीलाही बरोबर घ्या. तो इमानी मनुष्य दिसतो, त्याला आजच्या आज बढती दिली पाहिजे, म्हणजे पुढें काम करण्यास उमेद येईल !"

सर एडवर्ड—" होय सरकार ! त्याला लेफटेनंटची जागा मिळविण्याची फार इच्छा आहे, आणि सरकार तुला ती जागा खास देतील, असें मींही त्याला सांगितलें आहे."

बादशहा—" ठीक आहे, त्याला ती जागा दिली आहे असें सांगा, आणि माझी आठवण म्हणून ही आंगठी त्याला बक्षीस द्या. !"

कॉंटारीला हें आनंदाचें वर्तमान कळतांच त्याला अत्यंत हर्ष झाला. हा आपला भाग्योदय आपल्या प्रियकर युडोशियाला केव्हां जाऊन सांगेन असें त्याला होऊन गेलें, आणि त्यानें सर एडवर्ड जवळ इस्की बाबाला जाण्याकरितां चार दिवसांची रजा मागितली. त्याची प्रेमपूर्ण उत्कंठा पाहून सर एडवर्डनींही त्याला खुषीनें रजा दिली. मात्र कटाच्या बैठकीच्या दिवशीं सकाळपर्यंत तरी येण्यास चुकूं नये, अशी ताकीद केली.

लेफटेनंट कॉंटारी त्याच दिवशीं तिसरे प्रहरीं आपल्या प्रियकरणीस भेटण्याकरितां इस्कीबाबाकडे निघाला. पण तिकडे काय दशा झाली होती ह्याची त्या बिचाऱ्याला कल्पना देखील नव्हती. त्याचप्रमाणें त्याचा मित्र रिचर्ड वर्स्टो, हाही तिकडेच कामगिरीवर गेला असल्याचें त्याला माहीत होतें, पण त्याच्यावर व त्याच्याबरोबरच्या मंडळीवर केवढें संकट गुदरलें होतें, हेंही कॉंटारीला कळलेलें नव्हतें. संध्याकाळच्या सुमारास तो थर्मॅलिटझ गांवापर्यंत पोंचला. दिवस मावळून रात्र पडूं लागली तरी तो तेथें थांबला नाहीं. आकाश निरभ्र असल्यामुळें, तारकांचा प्रकाश त्याला मार्ग दिसावयास उपयोगी पडत होता. शिवाय त्या प्रांताची त्याला खडान् खडा माहिती होती. शोरलूला जाईपर्यंत विसांवा

सुद्धां घ्यावयाचा नाहीं, असा निश्चयानें तो एकसारखा झपाट्यानें पुढें निघाला होता.

सोरलू येथें पोंचल्यावर घोड्याला विसावा देण्याकरितां तो तेथील लष्करी छावणींत उतरला. त्याच्या ओळखीचे बरेच लोक तेथें असल्या-मुळें, त्याची व त्याच्या घोड्याची तेथें उत्तम व्यवस्था लागली. त्याच-प्रमाणें अहमदपाशाच्या टोळीनें त्या बाजूला नुकत्याच केलेल्या हल्ल्या-चीही तेथें त्याला खबर मिळाली. यामुळें त्याचें मन सचिंत झालें. त्या हल्ल्यांत युडेशियावर व तिच्या बापावरही कांहीं संकट गुदरलें असेल कीं काय, अशी त्याला काळजी वाटूं लागली.

ती रात्र तेथें कशी तरी काढून, तो दुसरे दिवशीं पहांटेस उठून पुढें निघाला. दोनप्रहरपर्यंत तो वोर्दियाला येऊन पोंचला, तेथें त्याला युडेशियाच्या झोंपडीवरील हल्ल्याची, तिच्या बापाच्या मृत्यूची आणि रोमन स्वारांनीं केलेल्या तिच्या मुक्ततेची इत्थंभूत हकीगत समजली. तेव्हां तेथें फार वेळ न थांबतां तो लवकरच पुढें निघाला, आणि तिसरे प्रहरीं युडेशियाच्या झोंपडींत येऊन पोंचला.

युडेशियाकडून व तिच्या आईकडून त्याला सर्व वर्तमान समजलें, त्यावरून लॉर्ड मॅन्युअलनीं आपलें जरूरीचें व महत्त्वाचें काम बाजूस ठेवून, जर त्या वेळीं युडेशियाचा बचाव केला नसता, तर आपली भावी पत्नी पुनः आपल्या दृष्टीस देखील पडली नसती, अशी त्याची खात्री झाली आणि त्यानें लॉर्ड मॅन्युअलचे व रिचर्डचे अत्यंत कृतज्ञ अंतःकर-णानें आभार मानले.

नंतर युडेशिया खिन्न स्वरानें म्हणाली—" पण लॉर्ड मॅन्युअल व त्यांची भावी पत्नी, आणि तुमचे मित्र रिचर्ड बर्टो ही सर्व मंडळी हल्लीं तुर्कांच्या ताब्यांत सांपडली असून, आड्रियानोपलच्या किल्ल्यांत कैदेंत आहेत, अशी बातमी आली आहे ! "

हें ऐकून कोंटारी भयभीत स्वरानें उद्गारला—" अरे देवा, तर मग माझा मित्र रिचर्ड खचित प्राणास मुकणार ! कारण, तो तुर्कवेषानें तिकडे बातमी काढावयास जावयाचा होता, अर्थात् त्याला हेर म्हणून, देहांत शासन झाल्यावांचून राहणार नाहीं ! आतां काय करावें ? "

इतक्यांत शेजारच्या खोलींतून एक अपरिचित शब्द त्याच्या कानावर आला, त्यावरून तो म्हणाला—" तिकडे कोण बोलत आहे ? शब्द तर अनोळखी दिसतो ! "

युडेशिया—" तो एक तुर्की जखमी शिपाई आहे ! लॉर्ड मॅन्युअलशीं झालेल्या झटापटींत त्याला जबर जखम लागली; तो कसा तरी आमच्या झोपडीपर्यंत रखडत आला, आणि गयावया करून आश्रय मागूं लागला. "

कॉँटारी—" आणि प्रत्यक्ष शत्रूला तुम्हीं आपल्या घरांत ठेवून घेतलें ? "

युडेशिया—" हो ! आईचें मत असें आहे कीं, अपकाराची फेड उपकारानेंच करावी ! फादर डिमेट्रियसही म्हणाले कीं, मृत बाबांच्या आत्म्याला शांति व सद्गति प्राप्त करून देण्यास ह्या धर्मकृत्यासारखा दुसरा उपाय नाहीं ! शिवाय फादर डिमेट्रियसच्या उपदेशानें व आमच्या शुश्रूषेनें त्याच्या मनाला खिस्ती धर्माचीं तत्वें पसंत पडून, त्यानें नुकताच फादर डिमेट्रियसकडून बाप्तिस्माही घेतला आहे ! "

कॉँटारी—" शाबास, युडेशिया, तुम्हीं हें मोठेंच पुण्यकर्म केलें, आणि त्यामुळें मला तुम्हांविषयीं अधिकच प्रेम व पूज्यबुद्धि वाटूं लागली आहे ! त्याच्याशीं आतां कोण बोलत आहे ? "

युडेशिया—फादर डिमेट्रियस त्याच्या जवळ बसले आहेत. तुम्ही आल्याचें त्यांना कळवितें, तुम्हांला पाहून त्यांना फार आनंद होईल. "

युडेशियानें खोलीचें दार उघडलें, व ती आंत गेली. तिच्या पाठोपाठ कॉँटारीही खोलींत गेला. तेथें खाटेवर मरणोन्मुख स्थितींत पडलेला तुर्की शिपाई त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्या चर्येवरून, तो फार वेळ जगेल असें कॉँटारीला वाटलें नाहीं.

युडेशियाची आई त्याला वारा घालीत बसली होती, आणि फादर डिमेट्रियस त्याच्या खाटेजवळच गुडघे टेकून प्रार्थना करीत होते. त्यांची प्रार्थना आटोपल्यावर ते उठून कॉँटारीकडे वळून म्हणाले " या, कॉँटारी, तुम्ही परवां येथून गेल्यापासून मागें काय काय भयंकर व दुःखकारक गोष्टी घडून आल्या, त्या तुम्हांला समजल्याच असतील ?

परमेश्वराची इच्छा होती तसें झालें ! "

कॉटारी—" युडेशियाकडून मला सर्व हकीकत समजली आहे. हा जखमी मनुष्यही त्याच तुर्की टोळीपैकीं आहे म्हणे ? "

डेमिट्रियस—" होय. तो पूर्वी तुर्क होता खरा, पण वाइटापासून ईश्वर कधीं कधीं चांगला परिणाम परमेश्वर घडवून आणीत असतो ! ज्या जखमेमुळें त्याचा नश्वर देह लवकरच कबरस्थानांत जाण्याचा संभव आहे, तीच जखम त्याचा आत्मा स्वर्गास पोंचविण्यास कारण झाली ! त्यानें प्रभु येशूच्या सत्य धर्माचा स्वीकार केला आहे ! तो फार वेळ जगेल असें दिसत नाहीं ! "

कॉटारी त्या तुर्काकडे लक्षपूर्वक पहात म्हणाला—" तो पहा चळवळ करीत आहे व ओंठ हालवीत आहे, त्याच्या मनांत कांहीं तरी बोलावयाचें आहे वाटतें ! "

डेमिट्रियस त्या तुर्का जवळ बसून कळकळीनें म्हणाला—" काय बाळ जोसेफ तुला काय पाहिजे ? "

त्या तुर्काचें मूळचें नांव इस्माइल होतें, पण बाप्तिस्मा दिल्यावर त्याचें खिश्चन नांव जोसेफ असें ठेवलें होतें. तो कॉटारीकडे पहात क्षीण स्वरानें म्हणाला—" हे कोण आहेत ? रोमन लष्करी कामगार दिसतात ! "

कॉटारी पुढें होऊन म्हणाला—" मी रोमन बादशहांच्या हुजुरातींतील लेफ्टेनंट आहें ! "

जोसेफ—" गुरुजी, आपल्या हातून घडलेल्या पातकाचा परिहार करण्यास मार्ग असतां, तसें न करतां नुसता पश्चात्ताप करणें व्यर्थ आहे, असें तुम्हीं मला सांगितलें आहेना ! त्याप्रमाणें मी आतां माझ्या दुष्कर्माचा शक्य तितका परिहार करणार आहें ! पण मला थोडें पाणी द्या, घसा कोरडा झाला आहे ! "

युडेशियाच्या आईनें त्याला पाणी आणून दिलें, तें पिऊन तो म्हणाला—" लेफ्टेनंट, मी सांगतों तें ऐका, आणि तुमच्या अंगीं धैर्य असेल तर त्या माहितीचा उपयोग करून घ्या ! ज्या रोमन इसमांना आमच्या पाशानें कैद करून नेलें, त्यांना आड्रियानोपलच्या किल्ल्यांतील

नदीवरच्या तुरुंगांत ठेवलें असेल ! कारण असले कैदी नेहमीं तेथेंच ठेवतात. त्या इमारतीच्या खालून नदीचा प्रवाह गेला आहे. किल्ल्याच्या हद्दींत त्या प्रवाहाला दोहों बाजूंस दोन लोखंडी जाळ्या बसविलेल्या असून, त्यांची किल्ली माझ्या खिशांत आहे, ती घ्या. ती मजपाशीं कशी आली, हें सांगावयास आतां सवड नाहीं ! ती घेऊन, तुम्ही एखाद्या नावेंतून त्या तुरुंगाखालीं जा, आणि तुमच्या मित्रांना सोड-विण्याचा प्रयत्न करा ! आ—आ—पाणी, पाणी ! ”

युडेशियाच्या आईनें त्याच्या तोंडाजवळ पाण्याचा पेला धरला, पण त्या बिचाऱ्याला आतां पाणी घोटण्याची देखील ताकद उरली नव्हती, तो डोळे फिरवून आंचके देऊं लागला. कॉंटारीनें त्याचा खिसा चाच-पून किल्ली काढून घेतली. त्याचा प्राण चाललेला पाहून डिमेट्रियस म्हणाले—“ तुम्ही सर्वजण आतां बाहेर चला ! ”

डिमेट्रियस जोसेफच्या खाटेजवळ बसून प्रार्थना करूं लागले, व युडे-शिया, तिची आई आणि कॉंटारी बाहेरच्या खोलींत आले.

कॉंटारी उत्तेजित स्वरानें युडेशियाच्या आईला म्हणाला—“ मामी, तुमच्या सत्कर्माचें फळ ईश्वरानें किती लवकर दिलें पहा ! ज्या थोर पुरुषानें आणि माझ्या मित्रानें माझ्या प्रियकर युडेशियाच्या प्राणांचा व अब्रूचा बचाव केला, त्यांच्या सुटकेचें साधन माझ्या हातीं आलें आहे ! आतां मी असाच आड्रियानोपलला जाणार ! ”

युडेशियाची आई—“ हो हो, अवश्य चला ! ह्या सदिच्छेला माझी ही पूर्ण संमति आहे ! एका क्षणाचाही विलंब करूं नका ! ”

युडेशिया प्रेमपूर्ण स्वरानें म्हणाली—“ फार सावधगिरीनें व जपून वागण्याविषयीं आपल्याला सांगावयास नकोच, पण गुरुजी बाहेर येईप-र्यंत क्षणभर थांबावें ! त्यांचा आशीर्वाद घेऊन जावें, म्हणजे बरें ! ”

सुमारें पांच मिनिटांनीं खोलीचें दार उघडून फादर डिमेट्रियस बाहेर येऊन गंभीर व उदास स्वरानें म्हणाले—“ गेला बिचारा, प्रभूच्या सेवेला ! बरें, कॉंटारी, तुम्ही आतां काय करणार ? ”

कॉंटारी—“ दुसरें काय करायाचें ? ज्यांनीं माझ्या युडेशियाची अब्रू राखली, त्या लॉर्ड मॅन्यअलना, त्यांच्या भावी पत्नीला व तिच्या

आईबापांना आणि माझा मित्र रिचर्ड यांना संकटमुक्त करण्याची खटपट करावयास, असाच आड्रियानोपलला जाणार ! मला ह्या प्रयत्नांत यश मिळण्याविषयीं आपला आशीर्वाद असावा ! ईश्वर कृपेनें मी यशस्वी होऊन आल्यावर, सासूबाईंना व युडेशियाला कॉन्स्टांटिनोपलला घेऊन जाणार ! कारण, आतां त्यांनीं येथें राहणें सुरक्षित नाहीं ! यायला आमची ? ”

युडेशियाची आई—“ हो हो, अवश्य येईन ! तुमच्याशिवाय आतां आम्हांस दुसऱ्या कोणाचा आधार आहे ? ”

डिमेट्रियस—“ ठीक आहे! कॉँटारी, तुम्ही खुशाल चला तुम्हांला माझा पूर्ण आशीर्वाद आहे. ईश्वरानें तुम्हांला ह्या सत्कार्यांत यश द्यावें म्हणून, तुम्ही परत येईपर्यंत मी नित्य प्रार्थना करीत जाईन ! ”

युडेशिया—“ तुमचा घोडा येथपर्यंतच्या मजलीनें अगदीं दमून गेला असेल, त्यावरून तुम्हांला जलद जातां येणार नाहीं ! त्यापेक्षां त्या जोसेफचा घोडा घेऊन जाल तर बरें, असें मला वाटतें ! तोही उमदा आहे. ”

“ बरें तर ! ” असें म्हणून कॉँटारीनें तबेल्यांतून तुर्काचा घोडा सोडून आणिला तो खरोखरच त्याला पसंत पडला. नंतर डिमेट्रियसचा युडेशियाचा व तिची आई सोफायाबाई यांचा निरोप घेऊन, तो घोड्या-वर बसून झपाट्यानें इस्कीबाबाकडे चालता झाला.

सूर्यास्ताची वेळ होतांच आकाशांत मोठमोठ्या ढगांची धाव पळ सुरू झाली; वारा सोसाट्याचा वाहूं लागला; दूरदूरच्या टेकड्या क्षणांत आरक्त वर्ण तर क्षणांत काळ्याभोर दिसूं लागल्या, आणि सृष्टिदेवता लवकरच उग्र रूप धारण करणार असें वाटूं लागलें.

कॉँटारी इस्कीबाबा ओलांडून पलीकडे जातो तों, पावसाचे मोठमोठे थेंब समोरच्या वाऱ्यानें त्याच्या तोंडावर पडूं लागले. थोड्याच वेळांत जोराची वृष्टि व वादळ सुरू झालें. तथापि त्याला न जुमानतां, कॉँटारी तसाच घोडा दामटीत पुढें चालला होता. पण दोन तास रात्र झाली तरी पाऊस थांबेना व लवकर थांबण्याचें चिन्हही दिसेना, घोडा व स्वार दोघेही अगदीं थकून गेले, तेव्हां माइल्सआल्डन व कॉँटारीनें

रात्रभर कोठें तरी आश्रय व विसांवा घेण्याचें मनांत आणिलें.

कांहीं वेळानें रस्त्याच्या उजव्या बाजूस थोडयाशा अंतरावर त्याला दिव्याचा प्रकाश दिसूं लागला, त्यावरून तेथें वस्ती असावी असें अनुमान करून, त्यानें घोडा तिकडे वळविला. थोडयाच वेळानें तो एका झोंपडीजवळ आला, आणि घोडयावरून उतरून, आपल्या तरवारीच्या मुठीनें दार ठोठावूं लागला. बराच वेळ कोणी जबाब दिला नाहीं, पण शेवटीं, "कोण आहे बाहेर?" असा आंतूनच सवाल आला.

त्या शब्दांवरून आंतील माणसें आपल्याच जातीचीं आहेत अशी कॉंटारीची खात्री होऊन, तो म्हणाला—"मी एक रोमन प्रवासी आहें, दार उघडा. कृपा करून मला रात्रीच्या रात्र वस्तीला जागा द्या, मी तुम्हांला त्याचा भरपूर मोबदला देईन!"

ज्या गरीब शेतकऱ्याची ती झोंपडी होती, त्याचें नांव सिरील होतें. त्यानें चटकन उठून दार उघडलें. कॉंटारी आपला घोडा एका झाडाला बांधून आंत गेला. झोंपडी अगदीं लहान व घाणेरडी असून, दारिद्र्यपूर्ण दिसत होती, तथापि प्रसंगाकडे लक्ष देऊन, तेथेंच मुक्काम करण्याचा त्यानें निश्चय केला. शेतकऱ्याच्या बायकोनें त्याला थोडी बाजरीची भाकरी व चटणी आणून दिली. कॉंटारीनें अंगावरील भिजलेला झुबला काढून वाळत टाकला, आणि तो थोडी भाकरी खाऊन पाणी प्याला. तेव्हां त्याच्या अंगांत बरीच हुषारी आली. नंतर त्यानें शेतकऱ्याकडून थोडी वैरण मागून घेऊन घोडयापुढें टाकली, आणि शेतकऱ्याच्या बायकोनें दिलेल्या घोंगडीवर तो विश्रांति घेत पडला, तेव्हां लवकरच त्याला झोंप लागली.

पहांटेस उठल्यावर कॉंटारीनें असा विचार केला कीं, आपल्या अंगावरील लष्करी पोषाखानें आड्रियानोपल शहरांत प्रवेश व्हावयास अडचण पडेल, त्यापेक्षां शेतकऱ्याच्या वेषानें जावें हें बरें. म्हणून तो सिरीलला हाक मारून म्हणाला—"गडया, मला शत्रूच्या राजधानींत जावयाचें आहे, तेथील माहिती तर मला कांहींच नाहीं, अशा स्थितींत माझ्या लष्करी वेषानें तेथें जाणें सुरक्षित नाहीं, ह्याकरितां मेहेरबानी करून तुझा पोषाख, बैल आणि कांहीं भाजीपाला मला देशील तर, मी

तुला त्या सर्वांची भरपूर किंमत देईन, आणि माझा घोडाही मी तुझ्या स्वाधीन करीन."

भरपूर पैसे मिळत आहेत असें पाहून सिरीलनें कॉंटारीची विनंति आनंदानें मान्य केली, व त्याला आपला एक पोषाख आणून दिला. कॉंटारीनें शेतकऱ्याचा वेष धारण केल्यावर त्याच्या मनांत अशी कल्पना आली कीं, आपल्याला आड्रियानोपल शहरची मुळींच कांहीं माहिती नाहीं, त्याकरितां सिरील आपल्या बरोबर येईल तर, पुष्कळ सोय होईल. त्यानें सिरीलला आपला उद्देश कळविला व भरपूर रोजमुराही देण्याचें कबूल केलें, तेव्हां सिरील त्याच्याबरोबर जाण्यास तयार झाला.

नंतर त्यानें शेतांतून भाजीपाला गोळा करून आणून बैलाच्या पाठी-वर लादला, कॉंटारीनें फक्त एक खंजीर गुप्तपणें छपवून घेण्यासारखा होता तेवढा घेऊन बाकीचीं हत्यारें व पोषाख सिरीलच्या बायकोच्या स्वाधीन केला, आणि ते दोघेही बैल हांकीत आड्रियानोपलकडे निघाले.

आड्रियानोपल तेथून बारा मैल होतें. वाटेनें जातां जातां सिरीलनें तुर्की लोकांच्या जुलमाच्या व अत्याचारांच्या कित्येक गोष्टी कॉंटारीला सांगितल्या, त्या ऐकून कॉंटारीला अतिशय संताप आला, सुमारें तीन तास वाट चालल्यावर त्यांना आड्रियानोपलचे उंच मनोरे आणि दरग्या-वरील सोनेरी कळस दिसूं लागले. लवकरच ते दक्षिणेकडील वेशीनें शहरांत शिरले. वेशींतील शिपायांनीं त्यांना कांहीं अपमानास्पद शब्द बोलून त्यांची थोडी कुचेष्टा केली, परंतु आंत जाण्यास प्रतिबंध केला नाहीं, म्हणून त्यांच्या शब्दाकडे लक्ष न देतां, ते तसेच सुकाट्यानें शहरांत गेले.

कॉंटारीच्या सूचनेप्रमाणें सिरील त्याला किल्ल्यापुढील मैदानांत घेऊन आला. कॉंटारीनें त्या किल्ल्याची सर्व स्थिति लक्षपूर्वक पावलोकन केली. तो किल्ला शहरच्या एका बाजूला, तटाला लागून होता. त्याचा एक कोंपरा, शेजारून वाहणाऱ्या तुंजा नदीच्या प्रवाहावर आलेला होता. नदीच्या प्रवाहाला किल्ल्यापासून थोड्याशा वरच्या बाजूस, बाजार पेठेजवळ धक्का बांधलेला असून, तेथें बऱ्याच लहान लहान नावाही

बांधून ठेवलेल्या होत्या.

कॉँटारीनें ह्या सर्व गोष्टी लक्षपूर्वक अवलोकन केल्यावर, तो आपल्या सोबत्यासह नदीकिनाऱ्याच्या एका भिकार खाणावळींत गेला. तेथें त्या दोघांनीं जेवण केलें. नंतर तेथें जमलेल्या इतर लोकांपासून त्यानें शक्य तितकी माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला, त्यावरून त्याला असें आढळून आलें कीं, थोडासा कर दिला म्हणजे किल्ल्याखालच्या प्रवाहाचीं दारें, तेथील शिपाई नावेला उघडून देतात. ही सवलत दिवसा केव्हांही असते, पण सूर्यास्तानंतर रात्रीच्या वेळीं मात्र कोणत्याही सबबीवर तीं दारें उघडलीं जात नाहींत. दोन्ही बाजूंच्या संरक्षणार्थ प्रत्येक ठिकाणीं सहा सहा तुर्की शिपायांचा पाहरा असतो. भाजीपाला, फळफळावळ वगैरे विकणारे लोक, आणि कांहीं चैनी लोकही त्या किल्ल्याखालील प्रवाहांतून नावांमधून नेहमीं पलीकडे जेनीकेझिक बाजारपर्यंत जात येत असतात.

ह्याप्रमाणें माहिती मिळाल्यावर, कॉँटारी व सिरील खाणावळींतून बाहेर पडले. त्यांनीं बाजारांत एक हारा विकत घेतला, आणि त्यांत आपल्या जवळचा भाजीपाला भरून, तो घेऊन ते धक्क्यावर आले, तेथें त्यांनीं एका ग्रीक नावाड्याची नाव भाड्यानें ठरविली, आणि ते किल्ल्याच्या पलीकडे अर्ध्या मैलावर असलेल्या जेनीबाजार गांवाला जाण्याकरितां निघाले.

नावाड्यानें नांव हाकारली. थोड्याच वेळांत ती नाव किल्ल्याखालच्या प्रवाहाच्या दाराजवळ येऊन पोंचली. ह्याच ठिकाणीं आपल्या मित्रमंडळींना कैद करून ठेवण्यांत आलें असल्याचें कॉँटारीच्या मनांत आलें. दाराजवळ नाव उभी राहिली. नावाड्यानें चौकीदाराला हांका मारल्या, तेव्हां तो गुरगुरत बाहेर आला, सरकारी कराबद्दल अर्धा अमूराथ त्याला दिल्यावर त्यानें दार उघडलें. त्या वेळीं त्याच्या हातांतील चावी कॉँटारीच्या दृष्टीस पडली. ती आपल्या जवळच्या चावीसारखी असल्याचें पाहून त्याला आनंद झाला. दार कसें उघडावयाचें, हें त्यानें लक्षपूर्वक पाहून ठेवलें. दार उघडतांच नावाड्यानें नाव आंत नेली. किल्ल्याच्या दुसऱ्या टोंकालाही तसेंच एक दार दिसत होतें, आणि

वर चिरेबंदी भक्कम कमान बांधलेली होती.

काँटारी नावाड्याला म्हणाला—" जरा सावकाश चल गड्या, ही जागा मोठी पहाण्यासारखी दिसते ! "

नावाडी—" पण चौकीदार आपल्याला येथें फार वेळ थांबू देणार नाहींत. तथापि शक्य तितक्या सावकाशीनें मी नाव वल्हवितों तेवढ्यांत तुम्हांला काय पाहवयाचें असेल तें पाहून घ्या ! "

" ठीक आहे. असें म्हणून काँटारी लक्षपूर्वक पाहूं लागला, तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं, कमानीच्या मधोमध, अगदीं वरच्या बाजूला एक लोखंडी झडपाचें चोरदार आहे, आणि एका ठिकाणीं बाजूच्या भिंतीला प्रवाहाजवळ दुसरें एक तसेंच लहानसें दार आहे. हें दुसरें दार किल्ल्यांतून गुप्तपणें बाहेर पडण्यास उपयोगीं पडत असावें, असें उघड दिसत होतें, पण वरच्या चोरदाराचा उपयोग काय असावा, हें काँटारीच्या लक्षांत येईना.

काँटारीनें आपल्या ग्रीक नावाड्याला तें चोरदार दाखवून, त्याचा उपयोग विचारला, तेव्हां तो नावाडी गंभीर स्वरानें हळूच म्हणाला —" काय सांगूं, दोस्त, ह्या दगडांना जर वाचा असती, तर ह्या चोरदारांतून किती दुर्दैवी लोक परलोकीं गेले आहेत, हें त्यांनीं सांगितलें असतें ! हें चोरदार उघडलें जाऊन, त्यांतून अनेक वेळां भयंकर व हृदयद्रावक किंकाळ्या, आणि पाण्यांत पडल्याचा आवाज आमच्या कानावर आलेला आहे ! "

थोड्याच वेळांत ते दुसऱ्या दाराशीं येऊन पोंचले. तेथील चौकीदाराला पहिल्या चौकीवरील कराची पावती दाखवितांच त्यानें मुकाट्यानें दार उघडलें. परंतु त्या कुलपाची रचना व त्याची चावी अगदींच वेगळ्या प्रकारची असलेली काँटारीच्या दृष्टीस पडली. त्यावरून कदाचित् आपल्याला आपल्या मंडळीची मुक्तता येथें करितां आली तरी, आपल्या मनोदयाप्रमाणें ह्या दुसऱ्या दारानें बाहेर पडून शहराबाहेर निघून जाणें येथें शक्य नसून, पहिल्याच दारानें परत येणें भाग आहे, असें त्याला दिसून आलें.

कांहीं वेळानें त्यांची नाव जेनीबाजार येथें येऊन पोंचली. तेथें

कॉंटारीनें सिरीलच्या माहितीनें आपला भाजीपाला विकून टाकला, नंतर ते पुनः नावेंत बसून, किल्ल्याखालच्यीं दोन्ही दारें ओलांडून, शहरांत परत आले. वाटेंत त्यांना कोठेंही अडथळा झाला नाहीं.

खाणावळींत परत आल्यावर कॉंटारीनें सिरीलला भरपूर बक्षीस देऊन संतुष्ट केलें आणि त्याचे आभार मानून, त्याला निरोप दिला. नंतर एक पत्र लिहून, तें सिरीलच्या हातीं देऊन, कॉंटारी म्हणाला--

"सिरील, माझी तीन दिवस वाट पहा. तितक्या मुदतींत मी जर परत आलों नाहीं, तर हें पत्र घेऊन तूं कॉन्स्टांटिनोपलला जा, आणि तें खुद्द सेनापति सर एडवर्ड डी रस्टन यांच्याच हातीं दे. तुझे श्रम व्यर्थ जाणार नाहींत, ते तुला चांगलें इनाम देतील. शिवाय, मी परत आलों नाहीं तर, तुझ्या झोपडींत ठेवलेला माझा घोडाही मीं तुला बक्षीस दिला आहे असें समज."

सिरीलनें त्याचे आभार मानिले, आणि त्याच्या सूचनेप्रमाणें अक्षरशः वागण्याचें कबूल केलें. नंतर त्याच्या कार्यांत त्याला यश मिळावें अशी प्रार्थना करून, सिरील त्याचा निरोप घेऊन तेथून परत निघाला.

कॉंटारीनें सर एडवर्डना लिहिलेल्या पत्रांत रिचर्ड व लॉर्ड मॅन्युअल यांच्यासंबंधानें कळलेली बातमी, त्यांच्या मुक्ततेकरितां आपण चालविलेली खटपट, त्यांत आतांपर्यंत झालेली हकीगत व पुढील उद्देशही कळविले होते. आणि शेवटीं ह्या प्रयत्नांत आपलें बरें वाईट झाल्यास, आपल्या प्रियकर युडेशियाचें व तिच्या आईचें संरक्षण करावें, अशी विनंति केली होती. सर एडवर्ड आपली ही विनंति खचित मान्य करतील, अशी कॉंटारीच्या मनाची पूर्ण खात्री होती.

सिरील निघून गेल्यावर कॉंटारी आपल्याशींच पुढील तजविजीचा विचार करीत बसला. नंतर आठ वाजतां त्यानें जेवण केलें, आणि नऊ वाजण्याच्या सुमारास, आपल्याला दुसरीकडे काम आहे असें खाणावळवाल्याला सांगून, तो तेथून बाहेर पडला. तो एकदम नदीकिनाऱ्यावर आला. पण तेथें बरेच तुर्की नावाडी लोक धक्कयावर गप्पा मारीत बसलेले त्याच्या दृष्टीस पडले. तेथून ते आपापल्या झोंपडयांत निघून जाईपर्यंत एखादी नाव गुप्तपणें आपल्या हस्तगत होणें शक्य नाहीं असें

पाहून, कॉँटारी धक्क्यावर न जातां, अलीकडेच एका घराच्या आड अंधारांत छपून बसला.

बऱ्याच वेळानें शेजारच्या मशीदींतून, " लाइलाह इल्लिल्ला महमद रसूलुल्ला " ( सर्व विश्वांत परमेश्वर एकच आहे, आणि महमद हाच खरा पैगंबर आहे ) अशा आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या. ही मध्य रात्रीच्या नमाजाची सूचना होती. सद्धर्मपालक, खलीप, सुलतान महमद यांची स्वारी सध्यां आड्रियानोपल शहरांत असल्यामुळें, तेथील सर्व प्रार्थना वेळच्या वेळीं चालत असत. धक्क्यावरील सर्व मुसलमान नावाडी ही आरोळी ऐकतांच एकदम उठून मशीदींत निघून गेले. त्याबरोबर कॉँटारी हळूच उठून धक्क्यावर आला. तेथें कोणी नाहीं, असें दृष्टीस पडतांच त्यानें एका क्षणाचाही विलंब न करितां, तत्काळ आपल्या कामाला आरंभ केला. धक्क्याजवळ बांधून ठेवलेल्या नावांपैकीं एक नांव त्यानें सोडली, आणि तींत बसून त्यानें ती सुकाट्यानें हाकारली.

चंद्र नुकताच मावळला असल्यामुळें, काळोख इतका गडद पडला होता कीं, समोरच्या किल्ल्याचा उंच तट देखील कॉँटारीला स्पष्ट दिसेना. थोड्याच वेळांत त्याची नाव किल्ल्याजवळ आली. दाराचें कुलूप ज्या बाजूला होतें, त्या बाजूच्या किनाऱ्याला त्यानें आपली नाव उभी केली, आणि चटकन् खालीं उतरून, ती एका झुडपाला गुंतवून ठेवली. नंतर दार चांचपून, त्यानें कुलपाची जागा शोधून काढली व आपल्या जवळच्या चावीनें तें कुलूप काढून हळूच दार उघडलें. पण तें आपली नांव आंत जाईपर्यंत उघडें कसें राहणार, आणि आंत गेल्यावर बंद कसें होणार, याची त्याला मोठी पंचाईत पडली. कांहीं वेळ विचार करून, त्यानें तें दार तसेंच सोडलें, आणि नावेजवळ परत येऊन, ती ओढीत ओढीत दाराजवळ आणिली. नंतर दार उघडून, नांव दाराच्या आटणींत उभी केली. मग आपण नावेंत बसून, हळूहळू नाव आंत सरकावीत दार लावून घेतलें.

आपला कोणी पाठलाग करीत आहे कीं काय, कोठें कांहीं चाहूल ऐकूं येते कीं काय, हे पाहण्याकरितां, तो तसाच कांहीं वेळ स्तब्ध

राहिला. परंतु जिकडे तिकडे पूर्ण शांतता आहे असें दिसून आल्यावर त्यानें खिशांतून चकमक व मेणबत्ती काढून, ती पेटविली. किल्ल्यांतील पाहरेवाल्यांना किंवा प्रवाहाच्या दारांवरील चौकीदारांना आपल्या मेणबत्तीचा प्रकाश दिसण्याचा संभव नाहीं, अशी त्याची खात्री होती. त्यानें दिव्याच्या प्रकाशांत तेथील सर्व परिस्थिति लक्षपूर्वक तपासून पाहिली. नंतर आपल्या चावीनें बाजूचें चोरदार उघडतां येतें कीं नाहीं तें पहावें, असा विचार करून, त्यानें आपली नांव त्या चोरदारासजवळ आणून उभी केली. त्या चोरदारापुढें एक लहानसा कट्टाही होता, पण तेथें नाव गुंतविण्यास त्याला कांहींच साधन दिसेना. काय करावें ह्या विवंचनेंत तो आहे, इतक्यांत वरील चोरदाराजवळ कांहीं गडबड चाललेली त्याच्या कानांवर आली. त्याबरोबर कॉंटारीनें चटकन् आपली मेणबत्ती विझवून टाकली, आणि ज्या दारानें तो आंत आला होता, त्या दाराशीं नाव नेऊन उभी केली. नंतर पुढें काय होतें हें पाहण्याकरितां तो तेथेंच थांबला.

थोड्याच वेळांत वरील चोरदार उघडल्याचा आवाज कॉंटारीच्या कानांवर आला. नंतर त्यांतून प्रकाशकिरण दिसूं लागले, आणि ओढाओढी व ढकलाढकली चालल्यासारखी चाहूल ऐकूं येऊं लागली. त्यावरून कोणा तरी देहांत शासन झालेल्या दुर्दैवी कैद्याला तुर्की नराधम त्या चोरदारांतून खालीं पाण्यांत ढकलून देत असावे, असें कॉंटारीला वाटून, त्याच्या अंगावर शहारे आले.

"दे ढकलून एकदम!" एकजण वरून ओरडला.

"आतां धडपड करून उगीच का आम्हांला त्रास देतोस? मरण कांहीं अशानें चुकणार नाहीं!" दुसरा एक सौम्य स्वरानें म्हणाला.

"त्याचे हातपाय बांधून टाका, त्याशिवाय तो ऐकावयाचा नाहीं!" तिसरा एकजण उद्गारला.

ही तिसऱ्याची सूचना सर्वांना पटली असावी, असें कॉंटारीला वाटलें. कारण बराच वेळ धडपड झाल्यावर ती बंद झाली, आणि एक मनुष्य ग्रीक भाषेंत म्हणाला--"नीचांनों, माझी तरवार माझ्या हातीं असती, आणि मोकळ्या मैदानांत तुम्ही माझ्या अंगावर आलां असतां,

म्हणजे ग्रीक तरवारीचें पाणी तुम्हांला चांगलेंच दाखविलें असतें ! ”

“ अरे देवा ! ” कॉंटारी आवाज ओळखून चकित स्वरानें आपल्याशींच उद्गारला—“ हा तर माझा मित्र स्टीफन दिसतो ! ”

“ हं, द्या आतां त्याला खालीं लोटून ! ” वर एक तुर्क म्हणाला.

“ देवा, आतां तूंच माझें संरक्षण करणार ! ” स्टीफन उद्गारला.

तुर्कांनीं त्याला ओढीत ओढीत चोरदाराजवळ आणिलें, आणि एकदम खालीं लोटून दिलें. पाण्यांत धाडकन् आवाज होऊन पाणी जोरानें उसळलें, त्याबरोबर वरील चोरदार बंद झालें आणि पुनः जिकडे तिकडे शांत झालें. कॉंटारीनें तत्काळ आपली नाव त्या आवाजाच्या धोरणानें नेली. स्टीफनचे हातपाय बांधलेले होते तरी तो वर येतांच, डोकें पाण्यावर ठेवण्याची धडपड करीत होता. कॉंटारीनें त्याच्याजवळ जाऊन त्याला चटकन् धरून, मोठ्या कष्टानें नावेवर ओढून घेतलें. नंतर तो हळूच म्हणाला—“ स्टीफन, भिऊं नको. दोस्त, देवानें तुझा बचाव केला ! ”

स्टीफन इतका घाबरून गेला होता कीं, आपण कोणत्या परिस्थितींत आहों, हें देखील त्याला कळेना. तो भयभीत व चकित स्वरानें म्हणाला—“ मी कोठें आहें ? आणि तूं कोण आहेस ? ”

कॉंटारी—“ मी तुझा मित्र कॉंटारी आहे ! मला ओळखलें नाहींस का ? थांब, अगोदर तुझ्या हातांपायांस बांधलेले दोर कापतों, आणि मग दिवा लावतों ! ”

कॉंटारीनें स्टीफनचे हातपाय मोकळे केले आणि पुनः चकमक झाडून मेणबत्ती पेटविली. स्टीफन त्याच्याकडे पाहून आश्चर्यानें म्हणाला “ आहाहा, कॉंटारी, तूं मला आज खरोखर जीवदान देऊन जन्माचा ऋणी करून ठेवलेंस ! पण ह्या वेळीं तूं येथें कसा आलास ? ”

कॉंटारी—“ ती बरीच मोठी हकीगत आहे, सविस्तर सांगावयास तूर्त वेळ नाहीं. मुख्य गोष्ट एवढीच कीं, मला त्या प्रवाहावरील दाराची किल्ली मिळाली, आणि तिच्या साह्यानें मी लॉर्ड मॅन्युअल व त्यांच्या बरोबरच्या मंडळीस सोडविण्याचा प्रयत्न करण्यासाठीं गुप्तपणें येथें आलों आहें ! बरें, तुला एकट्यालाच त्यांनीं पाण्यांत लोटून दिलें आणि बाकी-

ल्या मंडळीचें काय झालें ? ती कोठें आहेत ? "

स्टीफन—" मला एकट्यालाच एका कोठडींत कोंडून ठेवलें असल्यामुळें, बाकीच्यांचा मला कांहींच पत्ता नाहीं ! कोतवाल व त्यांचीं बायकामाणसें ह्यांना सोडविण्याच्या झटापटींत मींच तुर्की स्वारांचे जास्त बळी घेतले होते, म्हणून त्यांचा माझ्यावर विशेष राग होता. "

कॉंटारी—" मग ? ते तरी त्यांच्या तावडींतून सुटले का ? "

स्टीफन—" ते सुटले होते, पण दुर्दैवानें पुनः आडकले. नंतर आम्हांला ह्या किल्ल्यांत आणून ठेवलें. बाकीची मंडळी मुसलमानी धर्म स्वीकारून, सुलतानाची चाकरी पतकरतील तर त्यांना जीवदान मिळेल, नाहींपेक्षां त्यांनाही देहांत शासन होईल असें पहारेवाले म्हणत होते. माझ्या पुढें त्यांनीं ही सूचना मांडली होती, पण मीं ती तत्काळ नाकारली, आणि त्यांची यथास्थित खरड काढली. म्हणून माझी शिक्षा अगोदर अमलांत आणली. "

कॉंटारी—" बरें, बाकीच्या मंडळींना कोठें ठेवलें आहे, हें तुला माहीत आहे कां ? "

स्टीफन—" छे, मुळींच माहीत नाहीं ! मला एका अंधारकोठडींत कोंडून ठेवलें होतें, तेथून आज पाण्यांत लोटून देण्याकरितां इकडे आणिलें ! "

कॉंटारी—" बरें तर, आपण एकदां चोहोंकडे फिरून, सर्व जागा नीट तपासून पाहूं या, म्हणजे आणखी कोठें एखादें चोरदार आहे कीं काय, तें समजेल. "

दोघेही नाव हळूहळू चालवीत, चोहोंकडे लक्षपूर्वक पहात चालले, पण दुसरें कोठें चोरदार वगैरे त्यांच्या दृष्टीस पडलें नाहीं. कांहीं वेळानें कॉंटरी स्टीफनचा हात एकदम धरून म्हणाला—" थांब थांब, ऐक ! "

स्टीफन—" कोठें काय आहे ? मला तर कांहीं ऐकूं येत नाहीं ! "

कॉंटारी—" वरील चोरदाराजवळ कांहीं तरी हालचाल होत असावी, असा मला भास झाला ! नीट लक्ष देऊन ऐक ! "

स्टीफन—" अरे देवा, आमच्या मंडळीपैकीं आणखी कोणाला ढकलून देण्याचा ह्या राक्षसांचा बेत आहे कीं काय ? "

काँटारी चटकन् मेणबत्ती फुंकून म्हणाला—" तें कांहीं असो पुनः चोरदार उघडत आहे, एवढें खास ! आपण अगदीं सावध राहिलें पाहिजे ! "

थोड्याच वेळांत चोरदार उघडल्याचा आवाज त्यांच्या कानांवर आला, आणि वर कोणी हळूहळू कुजबुजत असल्याचेंही त्यांना ऐकूं आलें, पण दिव्याचा प्रकाश मात्र मुळींच दृष्टीस पडला नाहीं.

काँटारी स्टीफनला हळूच म्हणाला—" आमच्या दिव्याचा प्रकाश कोणा पहारेवाल्यांच्या दृष्टीस पडल्यामुळें, ते आमचा तपास करण्याकरितां मुद्दाम अंधारांत आले आहेत कीं काय, कोण जाणे ? "

स्टीफन कांहीं वेळ विचार करून म्हणाला—" नदीवरील जाळीचीं दारें किती खोलीपर्यंत पाण्यांत आहेत ? "

काँटारी हंसून म्हणाला—" बुडी मारून दारांखालून पलीकडे जातां येणें शक्य नाहीं ! त्याबद्दल मीं दुपारींच पूर्ण चौकशी केली आहे !

स्टीफन—" ऐक ! बऱ्याच लोकांचे आवाज चोरदाराशीं ऐकूं येत आहेत ! मला वाटतें, आपण पुनः त्यांच्या तावडींत सांपडणार ! "

काँटारी—" चूप, चूप ! एक आवाज मला ओळखीचासा वाटतो ! तो माझा मित्र रिचर्ड बर्टो याचा असावा, असें खचित वाटतें ! "

ह्याप्रमाणें ते दोघे विचार करीत आहेत, तोंच, मागील प्रकरणाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें, " कोण आहे ? " असा रिचर्डचा अधिकारयुक्त सवाल स्पष्टपणें त्यांच्या कानावर येऊन, त्यांची सर्व शंका दूर झाली, आणि तो रिचर्डच आहे, अशी खात्री होऊन त्यांना मोठा आनंद झाला. नंतर थोड्याच वेळांत परस्परांची परस्परांस पूर्ण ओळख पटली.

आनंदाचा व आश्चर्याचा पहिला आवेग ओसरल्यावर, रिचर्ड व काँटारी यांनीं थोडक्यांत अवश्य तितका परस्परांच्या परिस्थितीचा व खटपटीचा खुलासा केला, आणि ह्या ईश्वरी योगायोगाचा फायदा घेऊन तेथून सुटका करून घेण्याचा निश्चय केला. रिचर्डनें खालीं दोर सोडून काँटारीला वर ओढून घेतलें, आणि स्टीफन नाव संभाळावयास खालीं राहिला.

वरील चोरदाराच्या खोलींत आल्यावर, पुढें कसें करावयाचें, ह्या

विषयीं रिचर्ड व कॉंटारी ह्यांची वाटाघाट सुरू झाली. कांहीं वेळानें कॉंटारी म्हणाला—" मला वाटतें, आतां उजाडावयास कांहीं फारसा अवकाश नसेल, तेव्हां आपण उजाडेपर्यंत येथेंच रहावें, आणि सकाळीं दरवाजे प्रथम उघडतांच, आपण राजरोसपणें बाहेर निघून जावें ! पण एकदम सात माणसें बसण्यासारखी माझी नाव मोठी नाहीं. त्याकरितां आपल्याला दोन खेपा कराव्या लागतील ! त्याचप्रमाणें वेषांतराचीही कांहीं तरी तजविज केली पाहिजे, म्हणजे तितका धोका कमी येईल."

रिचर्ड—" वेषांतराची तजवीज येथल्या येथें जमणें शक्य दिसत नाहीं. आणि खरें म्हटलें असतां, विशेष भीति काय ती स्टीफनला आहे ! त्यालासात्र आहे त्या वेषांत बाहेर पडणें आतां सुरक्षित नाहीं. मला वाटतें, कोतवाल कॉनियाटिस, त्यांची पत्नी व कन्या ह्या तिघांनाच प्रथम घेऊन जावें. त्यांना कांहीं शहरांत कोणीं पाहिलेलें नाहीं. शिवाय त्यांच्यासारखे सुखवस्तु ग्रीक लोक ह्या शहरांतही पुष्कळ आहेत. त्यांपैकींच हेही असतील, अशा समजुतीनें कोणालाच त्यांच्याविषयीं फारशी शंका येण्याचा संभव नाहीं."

कॉंटारी—" ठीक आहे ! चला तर, विलंब करून उपयोग नाहीं! स्टीफनला उघडपणें बाहेर पडणें सुरक्षित नाहीं, म्हणून मला वाटतें, प्रथम पहाटेच्या झांजटींत त्याला आणि बायकांना शहरांत पोंचवावें, नंतर दुसऱ्या खेपेला बाकीच्यांना न्यावें. इतक्या लवकर कांहीं किल्ल्यांत बोभाटा होऊं शकणार नाहीं."

कॉंटारीची ही सूचना सर्वांना पसंत पडून त्याप्रमाणेंच करावयाचें ठरलें. त्याला दोराच्या साह्यानें पुनः खालीं सोडण्यांत आलें. नंतर त्यानें व स्टीफननें दोरावरून मेरियाबाईंना संभाळून खालीं घेतलें. शेवटीं युफ्राशिया खालीं आली. ती तरुण व चपळ असल्यामुळें, तिला खालीं उतरण्यास मुळींच श्रम पडले नाहींत.

कॉंटारी व स्टीफन यांनीं हळूहळू नाव हांकारली. कोतवाल व रिचर्ड हे वर चोरदाराशीं पुनः नावेची वाट पहात बसले. रिचर्ड नेहमींच्या स्वभावाप्रमाणें शांत व स्थिर बसला होता, पण कोतवालांच्या मनास मात्र, आपली पत्नी आणि कन्या सुरक्षितपणें कशा पार पडतील, ह्या-

विषयीं अतिशय काळजी वाटत होती.

कांहीं वेळानें कोतवाल सचिंत स्वरानें म्हणाले—" हा स्टीफन ह्या वेळीं बरोबर नसता तर बरें झालें असतें, असें मला वाटतें. कारण, त्याला कोणीं मध्यंच ओळखलें तर सर्वांचाच घात व्हावयाचा ! "

रिचर्ड—" छे छे, कोतवालसाहेब, स्टीफनमुळें घात तर कधींच होणार नाहीं ! प्रसंग पडला तर, तो आपला स्वतःचा घात करून घेईल, पण दुसऱ्याचें नुकसान होऊं देणार नाहीं ! त्याचा झाला तर उपयोगच होईल ! त्याच्याबद्दल मुळींच शंका घ्यावयास नको ! "

कोतवाल—" त्यांना शहरांत पोंचावयाला फार वेळ लागेल का ? "

रिचर्ड—" छे, मुळींच नाहीं ! वाटेंत कांहीं अडचण आली नसली तर, ते एव्हांना पोंचले देखील असतील ! "

कोतवाल—" मी त्यांना जेव्हां सुरक्षित पाहीन, तेव्हांच माझें मन शांत होईल ! आम्ही येथून जाईपर्यंत तो क्रूर जेलर आला नाहीं म्हणजे झालें ! आम्ही अशा रीतीनें निसटून गेल्याचें कळल्यावर किल्ल्यांत मोठी दंगल उडेल नाहीं ? "

रिचर्ड—" काल सकाळीं जेलर आठ वाजेपर्यंत कांहीं आपल्या कोठडींत आला नव्हता; त्यावरून तो आजही त्या वेळेपर्यंत येणार नाहीं, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं ! म्हणजे अजून दोन तास तरी अवकाश आहे ! ईश्वराची कृपा असेल तर, आपण त्यापूर्वींच येथून निघून जाऊं, आपण कांहीं काळजी करूं नये ! "

थोड्याच वेळांत फटफटीत उजाडलें. खोलींत प्रकाश पडला व खालचा प्रवाहही स्वच्छ दिसूं लागला. कोतवाल व रिचर्ड हे दोघेही कॉटारीच्या नावेची वाट पहात बसले. बराच वेळ झाला तरी नावेचा पत्ता लागेना. कोतवाल घाबरून बहुतेक निराश झाले, तेव्हां रिचर्ड त्यांना धीर देऊन म्हणाला—" भिऊं नका, इतक्यांत नांव आली नाहीं तर आपण येथेंच न थांबतां पाण्यांत उतरूं आणि पोहत जाऊन, बाजूच्या चोरदारापुढील जाईला धरून नावेची वाट पाहूं ! "

इतक्यांत पाण्यांत वल्ह्याचा सूक्ष्म शब्द होत असलेला ऐकून रिचर्ड आनंदानें म्हणाला—" हा पहा कॉटारी नाव घेऊन आला ! "

काँटारीनें चोरदाराखालीं नाव उभी करून रिचर्डला हळूच इषारत केली, तेव्हां त्यानेंही काँटारीला तसाच जबाब दिला. नंतर रिचर्डनें कोतवाल साहेबांस प्रथम खालीं सोडलें, नंतर तो स्वतः मोठ्या युक्तीनें नावेंत उतरला. तत्काळ दोघांनीं दोन वल्हीं घेऊन, नांव झपाट्यानें हांकारली.

बायकांना कोठें ठेवलें आहे, असें कोतवालांनीं विचारल्यावरून काँटारी म्हणाला—" त्यांना नदी किनाऱ्याजवळच एका रिकाम्या घराच्या आंगणांत बसविलें आहे ! आपण तेथें जाईपर्यंत त्यांना कांहीं धोका येणार नाहीं अशी माझी खात्री आहे ! ह्या दारांतून बाहेर पड-तांना मात्र बराच त्रास झाला ! "

थोड्याच वेळांत ती नाव दारांतून बाहेर पडून, सुरक्षितपणें स्वस्थळीं पोंचली.

---

## प्रकरण १२ वें.

# किल्ल्यांतून सुटका.



कटवाल्यांची दुसरी बैठक ज्या दिवशीं रात्रीं बेटावर व्हावयाचें ठरलें होतें, त्या दिवशीं तिसरे प्रहरीं, बादशहांच्या आज्ञेप्रमाणें, सर एडवर्ड त्यांच्या भेटीस गेले. वर्दी कळतांच बादशहांनीं त्यांना आपल्या खासगी बैठकीच्या खोलींतच बोलावलें. तेथें गेल्यावर सर एडवर्ड बादशहांना प्रणाम करून नम्र स्वरानें म्हणाले—" सरकार, आज रात्रीं कटवाल्यांची दुसरी बैठक ठरलेली आहे; आपल्या आज्ञेप्रमाणें, त्यासंबंधांत सर-कारचे काय हुकूम असतील ते समजून घेण्यासाठीं मी हजर झालों आहें ! "

कॉन्स्टंटाइन बादशहा हंसून म्हणाले—" सेनापति, तुमच्या शौर्यावर, इमानावर व हुशारीवर आमचा पूर्ण भरंवसा आहे ! तुम्हींच ह्या प्रसंगीं साम्राज्याचा बचाव करण्यास समर्थ आहां ! तुम्हांला मी आणखी काय

सूचना करणार ? ह्या कामगिरीची सर्व मुखत्यारी मी तुमच्याकडे पूर्णपणें सोंपविली आहे ! तुम्हांला योग्य वाटेल तसें करा ! तुमचा तो कॉंटारी तुमच्या बरोबर आहे ना ? ”

सर एडवर्ड खिन्न स्वरानें म्हणाले–“ नाहीं सरकार ! आपल्या आज्ञे-प्रमाणें पूर्वी रिचर्ड बर्स्टोला ॲड्रियानोपलची बातमी काढण्याकरितां पाठविलें होतें, त्याच्या बरोबरच लॉर्ड मॅन्युअलही कोतवाल कॅनियाटिस व त्यांची वायकामंडळी यांना तुर्कांच्या कैदेंतून सोडविण्याकरितां गेले, पण ते दोघेही तुर्कांच्या तावडींत सांपडल्याची बातमी आली आहे. त्यांना मदत करण्याचा प्रयत्न करण्यासाठीं कॉंटारीही तिकडेच गेला आहे असें समजतें ! तो तरी बिचारा सुरक्षित आहे कीं त्यांच्या हातीं सांपडला, कोण जाणे ! पण कॉंटारी नसला तरी, मी सरकारच्या काम-गिरींत अंतर पडूं देणार नाहीं ! ”

बादशहा–“ त्याविषयीं आम्हांला मुळींच शंका नाहीं ! मात्र हें काम शक्य तितकें गुप्त रीतीनें करा, विनाकारण बोभाटा होऊं नये. असो, मॅन्युअलबद्दल लॉर्ड फ्रांझाना फार वाईट वाटलें असेल ! ”

सर एडवर्ड–“ होय सरकार ! त्यांचें मॅन्युअलवर प्रत्यक्ष पुत्रा-प्रमाणें प्रेम आहे ! प्रधानसाहेबांच्या कन्येशीं विवाह करण्याचें जरी त्यांनीं नाकारलें, आणि कोतवालाच्या कन्येशीं वाङ्निश्चय केला, तरी त्यांना मॅन्युअलचा फारसा राग आला नाहीं, किंवा त्याच्याविषयींची कळकळही कमी झाली नाहीं ! ते शत्रूंच्या तावडींत सांपडले असल्यामुळें त्यांचा फार छळ होण्याचा संभव आहे, तथापि, प्राण जाण्याचा प्रसंग आला तरी, ते आपल्या धर्माचा, आपल्या देशाचा व आपल्या राजाचा अभिमान कधीं सोडणार नाहींत, अशी माझी खात्री आहे ! ”

बादशहा–“ सर्वांनाच ईश्वरानें अशी सद्बुद्धि दिली असती, तर आजचें संकट कधींच आलें नसतें ! एकंदरींत, आतां फार दिवस नि-भाव लागण्याचें चिन्ह दिसत नाहीं ! ”

सर एडवर्ड–“ ईश्वराची इच्छा असेल, तर तसें होईल ! तथापि मी एवढें खात्रीपूर्वक सांगतों कीं, ह्या सनातन रोमन साम्राज्याचा नाश होणार असला तरी, तो अभिमानास्पद रीतीनेंच होईल ! ”

बादशहा—" तसें तर झालेंच पाहिजे ! आजपर्यंत चंद्रांकित निशाणाशीं झगडत झगडत, क्रुसाच्या पवित्र निशाणाखालीं ज्या हजारों पुण्यशील वीरांनीं आपले प्राण अर्पण केले आहेत, त्यांच्या स्वर्गस्थ आत्म्यांना त्यावांचून शांति मिळणार नाहीं ! "

सर एडवर्ड—" खरें आहे सरकार ! बरें, कटवाल्यांना कैद केल्यावर मी लागलाच रातोरात सरकारच्या भेटीला येऊं, कीं उद्यां सकाळीं आलों तरी चालेल ? "

बादशहा—" तुमची कांहीं गैरसोय होत नसेल तर, त्यांना कैद करून, त्यांचा पक्का बंदोबस्त केल्याबरोबर मला कळवावयास या ! मी तुमची वाट पहात बसतों ! तें कळेपर्यंत मला झोंप लागणार नाहीं ! "

सर एडवर्ड—" आज्ञा सरकार ! आपली आज्ञा अक्षरशः बजावण्याचें, परमेश्वर मला सामर्थ्य देवो ! "

बादशहांचा निरोप घेऊन, सेनापति सर एडवर्ड आपल्या बंगल्याकडे परत आले. ह्या महत्त्वाच्या कामगिरीची सर्व जबाबदारी बादशहांनीं त्यांच्या एकट्यावर टाकली असल्यामुळें, ती आपल्या हातून योग्य रीतीनें कशी पार पडेल, अशी त्यांना काळजी वाटत होती. त्या कामीं सल्ला मसलत घेण्यासारखे काय ते लॉर्ड फ्रांझाच त्यांना लायख वाटत होते, पण त्यांचें मनही ह्या प्रसंगीं सल्ला देण्यासारख्या शांत स्थितींत नव्हतें. आपला पुत्रवत् प्रिय मॅन्युअल, क्रूर तुर्कांच्या हातीं लागला असल्याचें समजतांच, त्यांना मॅन्युअलच्या जीविताविषयीं बहुतेक निराशाच वाटूं लागली होती. त्यांना मॅन्युअलच्या बापाचें, मृत्युसमयीं त्याला दिलेल्या वचनाचें, मॅन्युअलच्या बाललीलांचें, व थोरपणच्या त्याच्या प्रेमळ व निष्कपट वर्तनाचें स्मरण होऊन, त्यांचें अंतःकरण दुःखानें विषण्ण होऊन गेलें होतें. लॉर्ड फ्रांझा हे जरी उत्तम धोरणी मुत्सद्दी होते, आणि त्यांच्याच कर्तबगारीवर साम्राज्याचें भवितव्य अवलंबून होतें, तथापि ते युद्धकलाविशारद वीर नव्हते, हें बादशहांना माहीत असल्यामुळें, त्यांनीं ह्या महत्त्वाच्या व धोक्याच्या कामगिरीची पूर्ण मुखत्यारी एकट्या सर एडवर्डकडेच सोंपविली होती.

सर एडवर्डनीं फार हुशारीनें व सावधगिरीनें आपली सर्व तयारी गुप-

पणें करून ठेवली होती. त्यांनीं जिनोवाचें सरकारी जरूरीचें टपाल पाठविण्याकरितां म्हणून, एक जहाज बंदरांत आणवून ठेवलें होतें. जहाजाच्या कप्तानाजवळ त्यांनीं एक मोहोरबंद लखोटा देऊन ठेवला होता; तो चोवीस तासांनंतर कप्तानानें वाचून पहावयाचा व त्याप्रमाणें करावयाचें, अशी त्याला सक्त ताकीद देण्यांत आली होती. नेमलेल्या दिवशीं कप्तानानें सिलिव्हरीच्या समोर वाट पहात रहावयाचें, आणि सेनापति सर एडवर्ड यांचा हुकूम होईल त्याप्रमाणें वागावयाचें, असें ठरलें होतें. ह्याप्रमाणें सर्व तजवीज अत्यंत गुप्त रीतीनें चालली असल्यामुळें, कट-वाल्यांना त्या बाबतींत यत्किंचितही शंका आली नाहीं.

बादशहांचा निरोप घेऊन परत आल्यावर, सर एडवर्ड आपल्या अत्यंत विश्वासू चार शिपायांसह संध्याकाळच्या सुमारास, सिलिव्हरी वेशीनें बाहेर पडले, आणि सिलिव्हरीकडे चालते झाले. ते रात्रीं आठ नऊ वाजण्याच्या सुमारास सिलिव्हरीला येऊन पोंचले. रात्र अगदीं काळोखाची होती. आणि सर एडवर्डच्या आजच्या कामगिरीला ती इष्टच होती. सिलिव्हरीच्या वेशींत आपले व बरोबरच्या स्वारांचे घोडे वेशीवरील रखवालदारांच्या स्वाधीन करून, ते एक कंदील बरोबर घेऊन बंदरावर गेले.

बरोबर आलेल्या रखवालदारास सर एडवर्डनीं विचारलें—" एखादें मोठें जहाज बंदरासमोर आलेलें आहे का ? "

रखवालदार—" होय साहेब, जिनोवाच्या जहाजासारखें एक जहाज सूर्यास्तानंतर आलें आहे खरें, पण सूर्यास्तानंतर कोणतेंही जहाज बंदरांत येऊं देऊं नये, असा सरकारी हुकूम असल्यामुळें, बंदरकास-गारानें तें बंदराच्या हद्दीबाहेरच थोपविलें. "

सर एडवर्ड—" होय का ? तर मग बंदरकासगाराच्या घराकडेच अगोदर जाऊं या ! त्यांचें घर जवळच असेल नाहीं ? "

रखवालदार—" होय साहेब, तें आंगणांत कंदील लावलेलें घर दिसतें, तेंच बंदरकासगाराचें घर ! जवळच आहे ! "

त्या घराजवळ येतांच सर एडवर्डनीं आपल्या खंजीराच्या मुठीनें दार जोरानें ठोठावलें, थोड्याच वेळानें, " कोण आहे ? " असें त्रासिक

स्वरानें ओरडत बंदर कामगारानें दार उघडलें. भलत्याच वेळीं आप-ल्याला त्रास दिल्याबद्दल चांगली खरडपट्टी काढावयाचा त्याचा बेत असावा, पण सेनापतींना पाहतांच त्याचा राग कोणीकडच्या कोणीकडेच जाऊन, त्यानें सेनापतींना नम्रपणें सलाम केला, आणि तो चकितदृष्टीनें त्यांच्याकडे पहात उभा राहिला. "आपल्याला ताबडतोब जहाजावर जावयाचें आहे," असें सर एडवर्डनीं कळवितांच बंदरकामगाराची धांदल उडाली. त्यानें खलाशांना उठवून, सरकारी होडी तयार कर-ण्याचा हुकूम केला.

थोड्याच वेळांत होडी तयार झाली. सर एडवर्ड व त्यांच्या बरो-बरचे चार शिपाई होडींत बसले. बंदरकामगारही त्यांना जहाजापर्यंत पोंचवावयासाठीं बरोबर निघाले, चार खलाशी वल्हीं मारूं लागले आणि त्यांनीं हां हां म्हणतां होडी जहाजाजवळ आणिली.

वल्ह्यांचा आवाज ऐकून जहाजावरील कप्तान कॉरेसी बाहेर आला. "कोणाची होडी?" असें त्यानें मोठ्यानें विचारलें. "सिलिव्हरीची सरकारी होडी आहे." बंदरकामगारानें तत्काळ जबाब दिला. "सेनापतिसाहेब सर एडवर्ड आले आहेत!"

सेनापतींचें नांव ऐकतांच कप्तानानें ताबडतोब कंदील आणविला. शिडी खालीं सोडली, आणि नम्रपणें सेनापतींचें स्वागत केलें. सर एडवर्ड आपल्या चार अनुचरांसह जहाजावर चढले, आणि त्यांनीं खलाशांना बक्षीस देऊन, बंदर कामगारास निरोप दिला.

सिलिव्हरीची होडी निघून गेल्यावर कप्तान कॉरेसी म्हणाला—"बराच वेळ आम्ही आपल्या सूचनेची वाट पहात आहों, पण आपण स्वतःच येथें याल असें आम्हांला वाटत नव्हतें!"

सर एडवर्ड—"मला थोडासा उशीरच झाला! बरें, वारा कोणी-कडचा आहे?"

कप्तान—"वायव्य कोनाचा आहे!"

सर एडवर्ड—'ठीक! शिडें ताणा, आणि कॅलसेडनकडे जहाज हाकारा! पुढें काय करावयाचें, तें मी तुम्हांला मग सांगतों!"

कप्तानानें लागलीच जहाजावरील खलाशांना तत्काळ जरूर ते हुकूम

दिले. थोड्याच वेळांत शिडें ताणलीं गेलीं, वल्हीं सुरू झालीं, आणि तें ग्रिफिन नांवाचें जहाज मारसोराच्या शांत समुद्रावरून झोकानें कॅलसे-डनकडे निघालें.

सर्व तजवीज लावून, कतान पुनः सर एडवर्डजवळ आले. नंतर सर एडवर्ड त्याला कटासंबंधीं जरूर तेवढी थोडक्यांत माहिती सांगून म्हणाले— " त्या बेटापासून अर्ध्या मैलाच्या सुमारास जहाज उभें करा. तेथून एका छोट्याशा होडींतून मी बेटावर जाईन, म्हणजे मला गुप्तपणें तेथें उतरतां येईल. नंतर दोन तासांनीं दुसरी एक होडी तिकडे पाठवा, म्हणजे सर्व कटवाल्यांना कैद करून, जहाजावर घेऊन येईन ! मात्र ही सर्व व्यवस्था मुकाट्यानें झाली पाहिजे ! "

कतान—" आपल्या आज्ञेप्रमाणें सर्व तजवीज होईल, पण आपण असे एकाकी जाणें धोक्याचें नाहीं का ? माझ्या जहाजावर शिपाई व खलाशी मिळून शंभर सशस्त्र जवान आहेत, त्यांपैकीं कांहीं आपल्या मदतीला घेतलेलें बरें, असें मला वाटतें ! "

सर एडवर्ड—" तशी कांहीं जरूर दिसत नाहीं. कटवाले फारतर आठ इसम असतील असा माझा तर्क आहे. माझ्याबरोबर चार जवान आहेतच शिवाय छोट्या होडीचे दोन खलाशी येतील, इतके पुरे झाले. कट-वाल्यांना पकडून आणिल्यावर कोणीं त्यांच्याशीं एक अक्षर देखील बोलूं नये, असा बंदोबस्त ठेवा म्हणजे झालें. "

आणखी थोडा वेळ ह्याच विषयावर बोलणें होत आहे तोंच कॅलसे-डनचे दिवे दिसूं लागले. सेनापतींनीं सांगितलेल्या अजमासाला जहाज येतांच शिडें गुंडाळून तें उभें करण्यांत आलें, नंतर सर एडवर्ड आ-पल्या चौघां विश्वासू सेवकांसह एका होडींत बसले, दोघे तरुण खलाशी होडी वल्हवूं लागले, आणि ते लवकर पूर्वीच्या ठिकाणीं लींडर बेटाच्या किनाऱ्यावर गुप्तपणें येऊन उतरले.

होडी एका झाडाच्या सावलीच्या अंधारांत बांधून ठेवून, ते सर्व जण हळूहळू किनाऱ्यावरून पडक्या किल्ल्याकडे येऊं लागले. ज्या ठिकाणीं कटवाल्यांची सभा मागील खेपेस भरली होती, त्या ठिकाणीं येऊन सर एडवर्डनीं लक्षपूर्वक कानोसा घेतला, पण कोठें कांहीं हाल-

चाल ऐकूं आली नाहीं. जिकडे तिकडे अगदीं सामसूम होतें. त्यावरून, आपण बरेच लवकर आलों असावे असें त्यांस वाटलें. त्यांनीं चोहों-कडे फिरून, एका मोडक्या खिडकीजवळची अशी सोईची जागा शोधून काढली कीं, तेथून सर्व प्रकार आपल्या दृष्टीस पडावा व सर्व भाषण आपल्याला स्पष्टपणें ऐकूं यावें. मात्र आपण सहसा कोणाच्या दृष्टीस पडूं नये ह्याप्रमाणें जागा पसंत केल्यावर सर एडवर्डनीं आपल्या लोकांना योग्य ठिकाणीं बसविलें. व आपणही आपल्या स्थानीं बसले.

बराच वेळ झाला तरी कटवाल्यांपैकीं कोणाचाच पत्ता लागेना, किंवा कोठें कांहीं हालचाहूलही दिसेना, तेव्हां आपण इतकी सावधगिरी घेतली तरी कटवाल्यांना कांहीं बातमी लागली कीं काय, आणि त्यांनीं आपला बेत बदलला कीं काय, अशी त्यांना काळजी वाटूं लागली. पण मध्यरात्र उलटल्यावर थोड्याच वेळांत आशियाकडील बाजूनें वल्ह्यांचा आवाज ऐकूं येऊं लागला. आणखी कांहीं वेळानें एक होडी जुन्या उतारावर येऊन लागली. तींतून कांहीं तुर्की लोक उतरून किल्ल्याकडे आले व देवडींत जाऊन बसले. त्यांच्याबरोबर कंदील होता, त्यावरून, ते तिघे इसम असल्याचें सर एडवर्डना दिसून आलें. त्यां-पैकीं एक रशीदपाशा असून दुसरे दोघे त्याचे नोकर होते.

रशीदपाशा आंत येऊन बसल्यावर आपल्या सेवकांस हळूच म्हणाला—" आम्हांलाच उशीर झाला, असें मला वाटत होतें, पण ख्रिस्ती काफरांचा अजूनही पत्ता नाहीं! ते आपल्याला फसवून कांहीं दगा तर करणार नसतील ना ? "

एक सेवक—" इनषाल्ला ! जनाब, त्या काफरांची विश्वासघात करण्याची काय छाती आहे ? त्यांच्या इतक्या गुप्त गोष्टी आपल्याला कळलेल्या आहेत कीं, त्या त्यांच्या बादशहाच्या कानावर गेल्या तर, त्यांचीं डोकीं क्षणभरही त्यांच्या धडांवर राहणार नाहींत! "

पाशा—" आजच्या बैठकींत बहुतेक काम आटपेल असें वाटतें. तथापि एकाएकीं त्यांच्या सर्व मागण्या कबूल करून उपयोगीं नाहीं.

त्यामुळें ते कदाचित् अधिकच हातपाय पसरूं लागतील ! सुलतान-साहेबांनीं मेहेरबानी करून माझी विनंति मान्य केली, हें बरें झालें ! बाकी अल्लाच्या कृपेनें शेवटीं कॉन्स्टांटिनोपल आपल्या हातीं आल्या-वांचून राहणार नाहीं हें खरें, पण तें घेण्यांत किती तरी रक्तपात व प्राण-हानि झाली असती, आणि किती पैसा खर्च झाला असता ! ”

दुसरा सेवक—“ ऐका, ऐका, साहेब, ते आले वाटतें ! मला बाहेर कोणाची तरी चाहूल ऐकूं येत आहे ! ”

रशीदपाशा कान टवकारून लक्षपूर्वक ऐकत म्हणाले—“ हो हो, वल्ह्यांचा आवाज ऐकूं येत आहे खरा ! तेच आले असावे ! ”

थोडयाच वेळांत कॉन्स्टांटिनोपलकडील किनाऱ्यावर एक होडी येऊन लागली. तींतून उतरलेले लोक काळोखांतूनच चाचपडत किल्ल्याकडे येऊं लागले. त्यांचे चेहरे सर एडवर्डना प्रथम जरी दिसले नाहींत, तरी त्यांच्या आकृति मोजून पाहतां, सहा इसम आले असल्याचें त्यांच्या लक्षांत आलें.

बैठकीच्या खोलींत येतांच रशीदपाशांनीं उठून त्या सर्वांचें स्वागत केलें. आंतील कंदिलाच्या मंद प्रकाशांत सर एडवर्डनीं धर्मोपदेशक जोसफ व डयूक लियॉनशियस ह्यांना तत्काळ ओळखलें.

परस्परांची सलामी झाल्यावर मंडळी आपापल्या स्थानीं बसली. नंतर रशिदपाशा म्हणाले—“ मागील बैठकींत ठरल्याप्रमाणें, मीं आड्रियानोपलला जाऊन सुलतानसाहेबांची भेट घेतली. विनाकारण प्राणहानि न होतां, ह्या कामाचा शांततेनेंच निकाल करावा, अशी त्यांची फार इच्छा आहे ! ”

जोसफ—“ सुलतानांनीं आमच्या विनंतीला मान देऊन, आमच्या मागण्या मंजूर केल्या कां ? असल्या गुप्त बैठकी आणि वाटाघाटी फार दिवस चालणें सुरक्षित नाहीं ! तुम्हांला त्याबद्दल फारशी फिकीर बाळ-गण्याचें कारण नाहीं; किंबहुना तुमच्या मालकाकडून ह्या कामगिरीबद्दल तुम्हांला बक्षीस देखील मिळेल, पण आम्हांला मात्र मोठा धोका बसण्याची फार भीति आहे ! ”

रशीदपाशा—“ सुलतानसाहेबांनीं मेहेरबानी करून ज्या उदार देणग्या

तुम्हांला देण्याचें मान्य केलें आहे, त्या तुम्हीं विचार करून पाहिल्यास तुम्हांलाही संतोषकारक वाटतील, अशी माझी खात्री आहे! तुम्हीं आपल्या परिस्थितीचा पूर्ण विचार करून पाहिल्यास, ह्यापेक्षां अधिक मागणेंच अविचाराचें होईल असें तुम्हांला वाटेल!"

जोसफ—" पाशासाहेब, असें मोघम बोलूं नका, काय तें स्पष्ट सांगा. आमची परिस्थिति परमेश्वराधीन आहे! ती आमच्याही हातीं नाहीं, किंवा सुलतानांच्याही हातीं नाहीं! ईश्वराच्या प्रेरणेनें ज्या कमींत कमी मागण्या आम्हीं केल्या आहेत, त्या सर्व मान्य झाल्याच पाहिजेत, नाहींतर आम्हांला ह्या वाटाघाटीशीं कांहीं कर्तव्य नाहीं! आजची ही बैठक शेवटची आहे, येथें काय तो निकाल लागला पाहिजे! पुनः आम्ही ह्याबद्दल वाटाघाट करणार नाहीं. निदान येथें तरी पुनः आम्हांला येतां येणें शक्य नाहीं!"

रशीदपाशा—" ठीक आहे! मी आतां ओळीनेंच तुमच्या मागण्यांचा निकाल सांगतों. तुमची पहिली मागणी दहा मुख्य प्रार्थनामंदिरें व मठ यांच्या नेमणुकांसंबंधाची आहे, ती सुलतानसाहेबांनीं मंजूर केली आहे. तथापि ती मंजूर करून घेण्याच्या कामीं तुमच्यासाठीं आम्हांला अतिशय खटपट करावी लागली!"

रोमन दर्यासारंग सरदार नियोफेटस म्हणाले—" शाबास, तुम्हीं सुलतानसाहेबांना योग्य सल्ला दिली, आणि त्यांनीं ती मान्य केली, हें फार उत्तम झालें! बरें, आतां दुसऱ्या मागणीसंबंधानें सांगा! आम्हांला येथें फार वेळ बसण्याची सवड नाहीं."

रशीदपाशा—" तुमची दुसरी विनंति, खिस्ती लोकांचा अपमान किंवा बेअब्रू होईल, अशीं कोणतींही बंधनें त्यांच्यावर लादलीं जाऊं नयेत, अशी आहे!"

जोसफ—" हो! मग त्याबद्दल सुलतानांचें काय म्हणणें आहे?"

रशीदपाशा—" त्यासंबंधाच्या इतर सर्व गोष्टी सुलतानसाहेबांनीं कशा तरी मान्य केल्या, पण घोड्यावर किंवा घोड्याच्या गाडींत बसण्याची सर्व खिस्ती लोकांना सर्रास परवानगी देण्याचें सुलतानसाहेबांचे मौलवी व मुफती मान्य करीनात, त्यामुळे सुलतानसाहेबांचा

नाइलाज झाला. तथापि, शहर स्वाधीन करण्यास तयार असलेल्या प्रमुख मंडळीपुरते व्यक्तिशः विशेष परवाने देण्यांत येतील, असें त्यांनीं अभिवचन दिलें आहे ! आणि एवढ्यावर तुम्हीं संतोष मानला पाहिजे ! ”

दर्यासारंग नियोफेटस—“ तर मग आतां पुढें वाटाघाट करण्याचें कारणच नाहीं ! येथेंच सर्व गोष्टी संपल्या ! ”

ड्यूक लियॉनशियश—“छे छे, असा भलताच आग्रह धरण्यांत काय अर्थ आहे ? आमच्यापुरते आम्हांला जर सर्व हक्क मिळत आहेत, तर इतरांची पंचाईत करून ही सर्वच वाटाघाट मोडणें योग्य नाहीं, असें मला वाटतें ! ”

ह्यावर दुसरा एकजण म्हणाला—“ तें खरें, पण आपण आपल्यापुरताच विचार केला तर, इतर लोक काय म्हणतील ? ”

जोसफ—“ सरदारसाहेब, हा प्रश्न तूर्त आपण इतकाच बाजूस ठेवून, आपल्या तिसऱ्या अटीकडे वळूं. कारण, ती फार महत्त्वाची आहे. तिच्या निकालावर सर्व गोष्टी अवलंबून आहेत. ती जर अमान्य झाली, तर पुढें बोलावयासच नको. परंतु ती मंजूर असली, तर पुनः आपण ह्या प्रश्नासंबंधानें विचार करूं ! हं, पाशासाहेब, तिसऱ्या अटीचें काय ? ”

रसीदपाशा—“ ती सुलतानसाहेबांना पूर्णपणें मान्य आहे ! तुमच्यावर त्यांचा पूर्ण विश्वास आहे, आणि त्यांच्या वचनांवरही तुम्ही सर्वतोपरी भरंवसा ठेवावा, अशी त्यांची इच्छा आहे. तथापि तुमचा आग्रहच असेल तर, कोणालाही तुमच्याकडे ओलीस देण्यास त्यांना मुळींच भीति वाटत नाहीं. कारण, आपलें वचन मोडण्याची त्यांची इच्छाच नाहीं, मग त्यांना कसली भीति ? ”

जोसफ—“ फार उत्तम आहे ! परस्परांवर भरंवसा ठेवून, परस्परांनीं प्रामाणिकपणानें वागावें, यांतच उभयतांचेंही हित आहे ! ”

रसीदपाशा—“ झालें तर ! मीं सांगितलेल्या गोष्टींत यत्किंचित्‌ही बदल करण्याचा मला अधिकार नाहीं ! ह्या गोष्टी तुम्हांला कबूल असतील तर, आतांच्या आतांच लेखी करारपत्र उभय पक्षांच्या सह्यां-

निशीं होऊन जाऊं द्या, म्हणजे निकाल लागला!"

डयूक लियॉनशियस—" थांबा थांबा! पाशासाहेब, माझ्या मागणीचें काय झालें? थियोडोरा मला मिळालीच पाहिजे, त्याशिवाय मला इतर गोष्टी मुळींच कबूल नाहींत, किंवा मी करार पत्रावर सहीही करणार नाहीं, किंबहुना, तें होऊंच देणार नाहीं!"

रसीदपाशा हंसून म्हणाले—" त्याबद्दल तुम्ही काळजी करूं नका. शहर आमच्या ताब्यांत आल्यानंतर, तुम्हीच तिला आपल्या कबजांत घ्या. सुलतानसाहेब तुम्हांला मुळींच हरकत करणार नाहींत."

जोसफ हात जोडून व डोळे मिटून, वर तोंड करून गंभीर स्वरानें म्हणाला—" परमेश्वरा, ह्या धर्मबाह्य नीच कर्माशीं माझा कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं, हें तूं जाणतच आहेस! एकाच्या पातकाबद्दल इतर निरपराध माणसांना शासन न होवो, आणि ह्या पवित्र कार्याचा घात न होवो!"

लियॉनशियस—" अहो साधुबुवा, तुम्ही इतके घाबरूं नका, मी तुमच्या देवाची कशी तरी समजूत काढीन, समजलां?"

इतक्यांत एक तेजस्वी तारा तुटून, आकाशांत तोफेसारखा गडगडाट झाला, आणि चांदण्यासारखा स्वच्छ प्रकाश क्षणभर पडला. ह्या आकस्मिक उत्पातामुळें सर्वच कटवाले घाबरून चकित दृष्टीनें चोहोंकडे पाहू लागले. त्यावेळीं नियोफिटसची दृष्टि सहज मोडक्या खिडकीकडे गेली, तों तेथें कोणी तरी बसलें असल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याबरोबर ते जोसफचा हात धरून भयभीत स्वरानें म्हणाले—" दगा, दगा! बाहेर कोणी तरी हेर आहे! खिडकीशीं मला आतां एक मनुष्य दिसला!"

रसीदपाशा—" खरें कीं काय? चला, आपण तपास करूं या!" असें म्हणून पाशानें आपल्या नोकराला मशाल पेटविण्यास सांगितलें. सर्व मंडळींची धांदल उडून, ती एके ठिकाणीं गोळा झाली.

सर एडवर्डनीं तत्काळ आपल्या लोकांना सूचना केली, आणि कटवाल्यांना दारांत गांठून एकदम त्यांच्यावर हल्ला करण्याचा निश्चय ठरविला. त्यांनीं तत्काळ आपले लोक त्या तयारीनें उभे केले.

मशाल पेटतांच रसीदपाशा आपली तरवार उपसून सर्वांच्या पुढें निघाला. त्याच्यामागून त्याचे दोघे अनुचर निघाले, आणि नंतर ग्रीक कटवाले बाहेर पडण्यास तयार झाले. " चला दोस्त हो, माझ्या मागून या, भिऊं नका ! " असें म्हणून, पाशानें एकदम दार उघडलें, त्याबरोबर बाहेर उभे असलेले हत्यारबंद ग्रीक लोक मशालीच्या प्रकाशांत त्याच्या दृष्टीस पडले. तथापि तो न डगमगतां, पुढें आला. त्याच्या मागून त्याचे दोघे सहाय्यकही आले. तत्काळ उभय पक्षांत हातघाईची झटापट सुरू झाली. ग्रीक कटवालेही त्या चकमकींत सामील झाले. त्यांनीं सर एडवर्डना तत्काळ ओळखलें. आपल्या कटाची बातमी बादशहांच्या कानांवर गेली असावी, आणि त्यांच्या हुकमानेंच सर एडवर्ड येथें आपल्याला कैद करावयास आले असावे, असें ग्रीक कटवाल्यांना वाटून त्यांची जीवनाशा नष्ट झाली, आणि ते जिवावर उदार होऊन लढूं लागले.

बराच वेळ चकमक झडली, एक ग्रीक शिपाई जखमी होऊन पडला, तरी बाकीचे ग्रीक वीर आपल्याला आवरणें शक्य नाहीं असें पाहून, पाशानें आपल्या साथीदारांस आपल्या होडीकडे चलण्याचा हुकूम केला, त्याबरोबर ते तुर्क पाशाच्या मागून बंदराकडे निघाले, मशालजीनें हातांतील मशाल फेंकून दिली, पण ती वाळलेल्या गवतावर पडल्यामुळें, तें गवत पेटून, जिकडे तिकडे मोठा प्रकाश पडला.

पाशा परत निघालेला पाहतांच ग्रीक कटवालेही घाबरून त्याच्या पाठोपाठ आपल्या होडीकडे पळूं लागले. सर एडवर्डनीं त्या सर्वांचा पाठलाग करण्याविषयीं आपल्या लोकांना हुकूम केला, आणि खूप जोरानें खुणेची शीळ वाजविली. ती खूण रात्रीच्या शांत वेळीं ग्रिफिन जहाजावर सहज ऐकूं गेली. कॅप्टन कॉरेसीनें ती खूण ऐकतांच व बेटावर पेटलेली आग पाहतांच, आपली मोठी होडी आठ सशस्त्र खलाशांसह तत्काळ बेटाकडे रवाना केली.

पाशा व त्याचे लोक ह्यांनीं किनाऱ्यापर्यंत पळत येऊन, कशी तरी आपली होडी गांठली, आणि होडींत उड्या टाकून त्यांनीं ती सोडली. परंतु थोडेसे पुढें गेले नाहींत तोंच पुढील होडीनें त्यांना गाठलें. त्यांना

पकडून कैद करण्याविषयीं सर एडवर्डनीं होडीवाल्यांस ओरडून सांगितलें. आतां आपलें कांहीं चालणार नाहीं असें पाहून रसीदपाशा व त्याचे अनुयायी विशेष धडपड न करितां त्या जिनोई खलाशांच्या स्वाधीन झाले.

इकडे सर एडवर्डच्या लोकांनीं ग्रीक कटवाल्यांना घेरलें होतें. रसीदपाशाचा परिणाम पाहून, तेही निराश झाले. त्यांपैकीं ड्यूक लिऑनशियस सेनापतींना म्हणाला—" सर एडवर्ड, तुम्ही आमच्या जीवनाची हमी घेत असाल, तर आम्ही मुकाट्यानें तुमच्या स्वाधीन होण्यास तयार आहों ! "

सर एडवर्ड रागानें म्हणाले—" मी कोणत्या प्रकारची हमी घेऊं इच्छीत नाहीं. तुम्ही सर्व बादशहा सरकारचे गुन्हेगार आहां, आणि त्यांच्या हुकमानें मी तुम्हांला कैद करीत आहें ! तुम्हांला शासन करण्याचा किंवा माफी देण्याचा अधिकार बादशहांचा आहे. तथापि तुम्ही विनाकारण त्रास न देतां स्वाधीन व्हाल, तर त्याचा उपयोग तुम्हांला झाल्यावांचून राहणार नाहीं, एवढेंच मी सांगूं शकतों ! "

जोसफ व नियॉफिटस ह्यांनीं विचार करून, बिन तक्रार स्वाधीन होण्याचें कबूल केलें, तेव्हां बाकीच्यांचा नाइलाज होऊन त्यांनाही ग्रीक शिपायांच्या स्वाधीन व्हावें लागलें. सर एडवर्डनीं त्या सर्वांना बंदोबस्तानें होडींत बसवून ग्रिफिन जहाजाकडे आणिलें, आणि जहाजावर चढवून तेथें त्यांची सर्व तजवीज लावली. रसीदपाशा व त्याचे साथीदार अगोदरच जहाजावर येऊन दाखल झाले होते. सर्व व्यवस्था लागल्यावर, जहाज कॉन्स्टांटिनोपलकडे निघालें.

कप्तान कॅरेसी सर एडवर्डजवळ येऊन म्हणाले—" सेनापतिसाहेब, आपल्या धैर्याची कमाल आहे ! इतक्या कटवाल्यांवर आपण एवढ्या थोड्या लोकांनिशीं चालून गेलां, आणि कामगिरी फत्ते करून आलां, धन्य आहे आपल्या शौर्याची आणि साहसाची ! "

सर एडवर्ड हंसून म्हणाले—" माझे हुजुरातीचे सैनिक तसेच बहाद्दर आहेत ! त्यांच्या जिवावर मला कशाचीही भीति वाटत नाहीं ! चला, आतां लवकर राजवाड्याकडे गेलें पाहिजे ! सरकार माझी वाट पहात

असतील! हें वर्तमान कळल्याशिवाय त्यांचें चित्त स्वस्थ होणार नाहीं!"

कप्तान—" ठीक आहे, एक घटकेच्या आंत मी आपल्याला राजवाड्याजवळ नेऊन पोंचवितों! पण सेनापतिसाहेब, मघांशीं तुटलेला तारा आपण पाहिला का?"

सर एडवर्ड—" खरेंच! इतका तेजस्वी तारा मीं आजन्मांत कधीं पाहिला नव्हता! विशेषतः त्या ताऱ्याच्या प्रकाशामुळेंच आम्ही इतक्या लवकर कटवाल्यांच्या दृष्टीस पडलों, नाहीं तर त्यांच्या नीचपणाचा त्यांच्याच स्वदस्तुरचा लेखी पुरावा आमच्या हातीं येण्याचा संभव होता!"

कप्तान—" असले तारे कांहीं तरी मोठ्या घडामोडीचे सूचक असतात, असें म्हणतात!"

सर एडवर्ड—" असतील कदाचित्, कांहीं सांगवत नाहीं!"

कप्तान—" ऐका, ऐका! हें काय?"

दोघेही कान देऊन ऐकूं लागले. प्रथम एक घंटा वाजूं लागली, नंतर दुसरी सुरू झाली, लागलीच तिसरी, असें होतां होतां, राजधानींतील सर्वच प्रार्थनामंदिरांतून गंभीर घंटानाद ऐकूं येऊं लागला. थोड्याच वेळानें दिव्यांचा प्रकाश कोठें कोठें चमकूं लागला, नंतर लवकरच चिराखदानासारखी दिव्यांची ओळच्या ओळच दिसूं लागली, पुढें घंटानाद बंद झाला, आणि हजारों कंठांतून निघणारा ईशस्तुतीचा गंभीर व मधुर ध्वनि पहाटेच्या शांत वेळीं ऐकूं येऊं लागला.

कॅप्टन कॉरेसी—" हा देवाच्या उत्सवाची मिरवणूक निघाली आहे वाटतें! लवकर जाऊन, आपल्यालाही ती पाहिली पाहिजे! बरें, सेनापतिसाहेब, कोठें उतरावयाचें?"

सेनापति—" राजवाड्याच्या पिछाडीच्या धक्क्याजवळ जहाज लावा, म्हणजे मी तेथें उतरून लागलाच बादशहांच्या भेटीस जाणार आहें! तुम्हीं पुढें काय करावयाचें, हें बादशहांना विचारून, त्यांची आज्ञा मी तुम्हांला लवकरच कळवीन."

कॅप्टन—" ठीक आहे, हें आलेंच उतरावयाचें ठिकाण!"

थोड्याच वेळांत ग्रिफिथ जहाज राजवाड्याच्या पिछाडीच्या धक्क्यास येऊन लागलें, आणि सर एडवर्ड चटकन् खालीं उतरून वाड्यांत गेले.

## प्रकरण १३ वें.

# आड्रियानोपलहून पलायन.



कॉंटारीचा निरोप घेऊन सिरील शेतकरी आपल्या झोंपडीकडे येण्या-साठीं ॲड्रियानोपलहून परत निघाला, तो योग्य वेळीं आपल्या घरीं येऊन सुरक्षित पोंचला. कॉंटारीनें दिलेली बक्षिसाची रक्कम पाहून त्याच्या बायकोला मोठा आनंद झाला. तिनें त्या दिवशीं संध्याकाळपासून संपादन केलेलें सर्व द्रव्य एके ठिकाणीं करून, तें झोंपडींत एका कोंप-ऱ्यांत पुरून ठेवलें. आजचा दिवस सोन्याचा आहे असें तिला वाटूं लागलें. नंतर नवराबायको आनंदानें मनोराज्य करीत बसलीं. इतक्यांत पुनः घोड्यांच्या टापा त्यांना ऐकूं येऊं लागल्या, व थोड्याच वेळांत कांहीं घोडेस्वार झोंपडीजवळ थांबून जोरानें दार ठोठावूं लागले.

आणखी कांहीं फायद्याची कामगिरी मिळेल ह्या आशेनें सिरीलच्या बायकोनें चटकन् दार उघडलें, तों दोघे दाढीवाले धिप्पाड तुर्की स्वार तिच्या दृष्टीस पडले, त्याबरोबर ती घाबरली. सिरीलही दारांत धांवत आला. त्याला पाहतांच एका स्वारानें त्याच्या हाताला जोरानें एक झोला देऊन दरडावून विचारलें—" हा आंगणांत बांधलेला घोडा कोणाचा ? ह्याचा मालक कोठें आहे ? कीं तूं चोरून आणिलास ? खरें बोल नाहीं तर प्राणास मुकशील ! "

बिचाऱ्या सिरीलची भीतीनें बोबडी वळली. तो चांचरत म्हणाला— " नाहीं साहेब, एक ग्रीक स्वार हा घोडा येथें ठेवून आड्रियानोपलला गेला आहे ! तो परत आल्यावर आपला घोडा घेऊन जाणार आहे ! मीं तो चोरून आणलेला नाहीं, किंवा माझी त्यावर सत्ताही नाहीं. "

तुर्क—" अरे चोरा ! हा तुर्की रिसाल्यांतील घोडा असून, ग्रिक स्वाराचा म्हणून सांगतोस काय ? खास ह्यांत कांहीं तरी लबाडी आहे ! तूं आमच्या एखाद्या स्वाराचा खून करून त्याला लुटलेंस वाटतें ! बोल लवकर, खरें सांग, नाहीं तर ह्याच झाडाला तुला फांशी देतों ! "

सिरीलची बायको घाबरून, त्याच्या बचावाकरितां कोँटारीचा पोषाख घेऊन धांवत आली, आणि ते कपडे तुर्की स्वारापुढें टाकून म्हणाली—“ हा पहा, साहेब, त्या ग्रीक स्वाराचा पोषाख, आम्ही खोटें कशाला सांगूं ? तो आपला घोडा व पोषाख येथें ठेवून गेला आहे. त्यानें घोडा कसा व कोठून आणिला, हें आम्हांला काय माहीत ? ”

तुर्की स्वार ते कपडे तपासून पाहून म्हणाला—“ हो ! हा पोषाख तर ग्रीक स्वाराचा दिसतो ! पण तो आंगावर कोणते कपडे घालून गेला? तो तुमच्या ओळखीचा आहे काय ? ”

सिरीलची बायको—“ तो माझ्या यजमानाचे कपडे घालून गेला आहे ! त्याची आमची मुळींच ओळख नाहीं, पूर्वीं आम्ही त्याला कधीं पाहिलेलाही नाहीं किंवा त्याचें नांव गांवही आम्हांला ठाऊक नाहीं ! ”

तुर्क—“ अगदीं खोटी गोष्ट ! तो कोणी तरी ग्रीक हेर असला पाहिजे, आणि गुप्त बातमी काढण्याच्या, किंवा दुसऱ्या एखाद्या दुष्ट उद्देशानें वेष पालटून आड्रियानोपलला गेला असला पाहिजे ! आणि ज्या अर्थीं तुम्हीं त्याला वेषांतर करण्याच्या कामीं मदत केली आहे. त्याअर्थीं तुम्हांला त्याची पूर्ण माहिती असली पाहिजे ! ”

सिरील—“ नाहीं साहेब, देवाशपथ आम्हांला त्याची कांहीं माहिती नाहीं; परत आल्यावर चांगलें बक्षीस देण्याचें त्यानें कबूल केलें, त्यावरून पोटाच्या आशेनें आम्हीं त्याला कपडे दिले, आणि त्याचा घोडा व पोषाख येथें ठेवून घेतला ! ”

तुर्क—“ छे, हें आम्हांला मुळींच खरें वाटत नाहीं ! तो ग्रीक हेर कोण आहे, आणि आड्रियानोपलला कशाला गेला आहे, हें सर्व तुला खचित माहीत आहे ! बऱ्या गोष्टीनें सर्व हकीकत सांग, नाहीं तर तुला फांशी देतों, आणि तुझी झोंपडी जाळून टाकतों ! ”

सिरीलनें व त्याच्या बायकोनें गयावया करून पुष्कळ सांगितलें, पण ते तुर्क कांहीं केल्या ऐकेनात, व त्यांची खात्रीही होईना.

शेवटीं सिरीलची बायको म्हणाली—“ माझा नवरा त्या ग्रीक मनुष्याबरोबर आड्रियानोपलला गेला होता, तो नुकताच परत आला आहे ! ”

हें ऐकतांच तुर्क स्वार सिरीलकडे क्रुद्ध दृष्टीनें पाहूं लागला. तेव्हां सिरीलच्या नाइलाज होऊन, त्यालाही थोडीशी हकीकत सांगावी लागली. तो म्हणाला–" आपल्याला आड्रियानोपलची मुळींच माहिती नाहीं, आणि तेथें तर आपल्या एका आप्ताकडे जरूरीचें काम आहे, आणि आपल्या ग्रीक लष्करी पोषाखांत गेलों तर आपल्याला वेशीवर अडवितील, असें त्या ग्रीक स्वारानें सांगितलें, म्हणून मीं त्याला आपले कपडे दिले; आणि त्याच्याबरोबर आड्रियानोपलला गेलों. तेथें एका खाणावळींत आम्हीं दोघांनीं फराळ केला, नंतर त्यानें मला निरोप दिला व तो आपल्या आप्ताला भेटावयास गेला, तेव्हां मी परत आलों, तो तुकताच घरीं येऊन पोंचलों ! ह्यापेक्षां मला अधिक कांहीं माहीत नाहीं ! ह्या उपर तुमच्या मर्जीस वाटेल तसें करा ! "

तुर्क—" तुझें सांगणें खरें कशावरून ? त्याला प्रमाण काय ? "

सिरील—" मी देवाची शपथ घेऊन सांगतों, हेंच प्रमाण ! ह्याशिवाय मी दुसरें कसलें प्रमाण देऊं शकणार ? "

सिरीलच्या मुद्रेवरून व बोलण्याच्या झोंकावरून, तो खरें बोलत असावा, असें तुर्की स्वाराला वाटलें. तथापि तसें न दाखवितां तो आपल्या सोबत्यास म्हणाला—" ह्याला कैद करून ठाण्यावर नेलें पाहिजे, त्याशिवाय हा सर्व गोष्टी कबूल करणार नाहीं ! मी ह्याची आंगझडती घेतों, तोंपर्यंत तूं झोंपडीची झडती घे, आणि कांहीं संशया-स्पद जिन्नस मिळाला तर पहा ! "

एकजण झोंपडींत गेला, व दुसरा सिरीलची झडती घेऊं लागला. झोंपडींत गेलेल्या इसमास तेथें कांहीं मिळालें नाहीं, सिरीलच्या खिशांत मात्र कॉटारीचें पत्र सांपडलें. तें ग्रीक भाषेंत लिहिलेलें असल्यामुळें, त्या तुर्कांना वाचतां येईना. सिरीललाही लिहितांवाचतां येत नव्हतें.

" हें पत्र कसलें ? " असें त्या तुर्कानें दरडावून विचारलें. तेव्हां सिरील म्हणाला—" आपला घोडा व पोषाख माझ्या ताब्यांत ठेवला असल्याबद्दल, त्या ग्रीकस्वारानें मला ही चिठी लिहून दिली आहे ! त्यानें कबूल केलेलें बक्षीस मला दिल्यावर ही चिठी व त्याचे जिन्नस त्याला परत द्यावयाचे आहेत ! "

तुर्की स्वारांना तें खरें वाटलें नाहीं, तथापि ह्यांच्याकडून अधिक कांहीं माहिती मिळणें शक्य नाहीं अशी त्यांची खात्री झाल्यामुळें, ते सिरीलला सोडून देऊन, घोडा व पत्र घेऊन चालते झाले.

थोड्या वेळानें सिरीलनें असा विचार केला कीं, कॉंटारीचें पत्र तुर्कांच्या हातीं पडल्याची हकीगत त्याला कळवून सावध करणें हें आपलें कर्तव्य आहे ! तो फारकरून वाटेला भेटेल किंवा ऑड्रियानोपलच्या खाणावळींत तरी त्याची गांठ पडेल ! असा विचार करून, तो पुनः ऑड्रियानोपलला जावयास निघाला, पुनः असा अविचार न करण्याविषयीं त्याच्या बायकोनें त्याला पुष्कळ उपदेश केला, पण तिचें न ऐकतां, तो तसाच शहराकडे चालता झाला.

सिरील ऑड्रियानोपलजवळ गेला, तों पहाटेची वेळ झाली. थोडथोडें दिसूंही लागलें, इतक्यांत शहराकडून घोड्यांच्या टापा येकूं येऊं लागल्या. पुनः आपण तुर्की स्वारांच्या तावडींत सांपडूं नये ह्या भीतीनें सिरील चटकन् रस्त्याच्या बाजूच्या एका झाडाच्या आड दडून बसला.

थोड्याच वेळानें ते घोडेस्वार जवळ आले. ते आपापसांत हळूहळू बोलत येत होते. त्यांचे शब्द जरी सिरीलला समजले नाहींत, तरी ते ग्रीक आहेत, एवढी त्याची खात्री होऊन, त्याची भीति नष्ट झाली, आणि तो पुनः रस्त्यावर येऊन पुढें निघाला. तोंच समोरून येणाऱ्या मंडळींत कॉंटारी आहे, असें त्याच्या पोषाखावरून व शब्दावरून सिरीलनें तत्काळ ओळखलें आणि त्याला आनंद झाला.

कॉंटारीबरोबर मेरियाबाई, युफ्राशिया, कोतवाल रिचर्ड व स्टीफन ही मंडळी होती. त्यांच्या देखत कॉंटारीला सूचना देणें कदाचित् योग्य होणार नाहीं असा विचार करून, सिरील पुढें होऊन कॉंटारीला हाक मारून म्हणाला—" लेफ्टेनंट साहेब, क्षणभर बाजूला येतां का ? आपल्याशीं एकांतीं दोन शब्द बोलायचे आहेत ! "

कॉंटारी सिरीलला ओळखून म्हणाला—ठीक आहे, दोस्त, काय सांगावयाचें असेल तें लवकर सांग, मला फार वेळ सवड नाहीं ! रिचर्ड तुम्ही ह्या मंडळीसह पुढें व्हा, मी इतक्यांत तुम्हांला गांठतोंच : "

सिरीलनें तुर्की स्वारांच्या अत्याचाराची सर्व हकीगत कॉंटारील

थोडक्यांत सांगितली, आणि त्याचें पत्रही त्यांच्या हातीं गेल्याचें कळविलें. तें ऐकून कॉंटारीला आपल्या प्रियकर युडेशियाबद्दल काळजी वाटूं लागली. त्या पत्रांतील मजकूर कळल्यावर तुर्कीस्वार कदाचित् पुनः तिच्या झोंपडीवर हल्ला करावयास जातील, अशी त्याला भीति वाटूं लागली.

सिरीलनें ही सूचना मुद्दाम येऊन दिल्याबद्दल, कॉंटारीनें त्याचे आभार मानिले. नंतर रिचर्ड जवळ येऊन त्याला सर्व हकीगत सांगून, तो सचिंतस्वरानें म्हणाला—"ह्याला काय उपाय करावा ?"

रिचर्ड विचार करून म्हणाला—"मोठीच पंचाईत आहे ! मेरियाबाई व युफ्राशियाताई ह्यांना तर सोडून जातां येणार नाहीं, आपली मंडळी थोडी असल्यामुळें, दोन टोळ्याही करितां येणार नाहींत, आणि तुमच्या युडेशियाचें संरक्षण करण्यावांचून तर गत्यंतरच नाहीं !"

"युफ्राशिया हें ऐकून म्हणाली—"त्यांत कसली अडचण ? सगळे जणच युडेशियाच्या झोंपडीकडे जाऊंया चला ! कांहीं झालें तरी, तिला संकटांत सोडून पुढें जाणें आपल्याला योग्य नाहीं ?"

कोतवाल—"अलबत, तसेंच केलें पाहिजे ! त्या मुलीचें व तिच्या आईचें संरक्षण करणें अवश्य आहे !"

"चला तर !" कॉंटारी उत्साहानें म्हणाला—"आपण चौघेजण आहों ! आपणांपैकीं प्रत्येक जण चार चार तुर्कांचा समाचार घेण्यास समर्थ आहे अशी माझी खात्री आहे !"

ती सर्व मंडळी शक्य तितक्या वेगानें घोडे दवडीत पुढें निघाली. उजाडण्याच्या सुमारास ती एका टेकडीच्या माथ्यावर आली. कॉंटारी सर्वांच्या पुढें होता. त्यानें समोर न्याहाळून पाहिलें, तों कांहीं तुर्की स्वार त्याच रस्त्यानें चाललेले त्याच्या दृष्टीस पडले.

"ते पहा, ते पहा हरामखोर !" असें ओरडून, कॉंटारी आपली तरवार उपसून, व घोड्याला टांच मारून, झपाट्यानें दवडत निघाला. तें पाहून रिचर्ड म्हणाला—"चला चला, कोतवालसाहेब, स्टीफन, आपण त्याच्या मदतीला गेलें पाहिजे, नाहीं तर भलताच परिणाम होईल ! कारण, तुर्की स्वार सहाजण दिसत आहेत. बायांनो, तुम्हीही होईल

तितक्या जलदीनें आमच्या पाठोपाठ या. फारशा दूर राहूं नका, म्हणजे तुम्हांला भीति बाळगण्याचें कारण नाहीं!"

कोतवाल कॉनियॅटीस, रिचर्ड व स्टीफन हे तिघेही कॉटारीच्या मागून भरधांव निघाले. ते या टेंकडीच्या तळाशीं येतात तों, तुर्कांनीं युडेशियाच्या झोंपडीस गराडा घातलेला त्यांच्या दृष्टीस पडला. त्यांना त्या वेळीं कोणत्याही प्रकारची भीति नसल्यामुळें, ते घोडयांवरून उतरून कोणी झोंपडींत शिरत होते, व कोणी बाहेरील फळबागेची नासाडी करीत होते. इतक्यांत कॉटारी व त्याची मंडळी तेथें जाऊन पोंचली. ग्रीक स्वारांस पाहतांच त्या तुर्कांची एकदम धांदल उडाली. त्यांना घोडयावर बसून हत्यारें उपसण्यासही पुरती फुरसद मिळाली नाहीं, इतक्यांत कॉटारीच्या मंडळींनीं त्यांच्यावर जोरानें हल्ला केला. पहिल्याच तडाख्यास तुर्की टोळीचा नाईक व आणखी एक स्वार, असे दोन इसम कॉटारीच्या व रिचर्डच्या समशेरींस बळी पडले. कोतवाल व स्टीफन ह्यांनीं बाकीच्या चौघांसही बरेंच घेरलें होतें, त्यांनीं आपल्या सोबत्यांचा परिणाम पाहतांच, आपला आतां निभाव लागणें शक्य नाहीं असें ओळखून, तेथून एकदम पळ काढला. इतक्यांत मेरियाबाई व युफ्राशिया ह्याही तेथें सुखरूप येऊन पोंचल्या.

कॉटारी घोडयावरून उडी टाकून, झोंपडींत धांवत गेला युडेशिया व तिची आई ह्या बिचाऱ्या अगदीं घाबरून गेल्या होत्या, व धर्मगुरु डिमिट्रियस त्यांना धीर देऊन त्यांचें समाधान करीत होता. कॉटारीला पाहतांच त्या सर्वांना अतिशय आनंद होऊन, त्यांची सर्व भीति एका क्षणांत नष्ट झाली. त्यांनीं कॉटारीचें मोठ्या प्रेमानें स्वागत केलें, व ईश्वरानें त्याला अगदीं वेळेवर मदतीस पाठविल्याबद्दल त्याचे मनःपूर्वक आभार मानिले.

आपल्या बरोबर आणखी कोण कोण मंडळी आहेत, हें कॉटारीनें त्यांना सांगतांच सर्व मंडळी धांवत बाहेर आली, आणि त्यांचें मोठ्या आदरानें स्वागत करून, त्यांना झोंपडींत घेऊन गेली. कॉटारी व त्याच्या बरोबरीची मंडळी रात्रभर झालेल्या जागरणानें व दगदगीनें अगदीं थकून बोळी होती आणि त्यांचे घोडेही भरधांव प्रवासानें दमले

होते, त्यामुळें सर्वांनाच विश्रांतीची जरूर होती, म्हणून त्यांनीं थोडा तेथें वेळ विसावा घेण्याचें ठरविलें.

कॉंटारी व रिचर्ड यांनीं आपणां सर्वांची मुक्तता किती साहसानें व कौशल्यानें केली, ह्याची हकीगत युफ्राशियानें थोडक्यांत युडेशियाला सांगितली. ती ऐकून युडेशियाला आपल्या भावी पतीबद्दल फार अभिमान वाटला, आणि तिच्या आईला व डिमिट्रियसला त्यांच्या साहसाचें मोठें आश्चर्य वाटलें. त्यांनीं कॉंटारीची व रिचर्डची त्यांच्या साहसाबद्दल व शौर्याबद्दल अत्यंत प्रशंसा केली.

नंतर कॉंटारी युडेशियाच्या आईला म्हणाला—" आतां ह्यापुढें तुम्ही येथें क्षणभर देखील राहणें सुरक्षित नाहीं, ह्यासाठीं आतांच्या आतांच आमच्याबरोबर निघण्याची तयारी करा! तुम्हांला मदत करण्याचें सामर्थ्य ईश्वरानें मला आतां भरपूर दिलें आहे!"

डिमिट्रियसनेंही त्यांना कॉन्स्टांटिनोपलला जाण्याविषयीं आग्रहपूर्वक संमति दिली, तेव्हां त्या नाइलाजास्तव कबूल झाल्या. नंतर कॉंटारी रिचर्डला म्हणाला—" रिचर्ड, मला वाटतें, आपण येथून सरळ कॉन्स्टांटिनोपलला न जातां, प्रथम विसाला जावें. कारण, आपला पाठलाग झाल्यावांचून खास राहणार नाहीं. किंबहुना, तुर्कीस्वार आतांपर्यंत आपल्याला पकडावयास निघालेही असतील. ह्याकरितां थोडा आडरस्ता धरून त्यांना फसविलें पाहिजे, त्याशिवाय त्यांच्या हातून बायकांचा बचाव करण्यास दुसरा मार्ग नाहीं!"

रिचर्ड कांहीं वेळ विचार करून म्हणाला—"हो, तसेंच केलें पाहिजे. कारण, सिलिव्हरीपेक्षां किंवा शोरलूपेक्षां देखील, येथून विसाच जवळ आहे! पण रस्ता माल धोक्याचा आहे!"

कॉंटारी—" कांहीं हरकत नाहीं. मुसलमानांच्या तावडींत सांपडण्यापेक्षां दुसरा कोणताही धोका पुरवला! घोड्यांना एक घटकाभर विसांवा देऊन लागलेच निघूंया! येथें फार वेळ थांबणें सुरक्षित होणार नाहीं!"

डिमिट्रियस—" हाच विचार योग्य आहे! आणि मीही तुमच्या बरोबर येणार! माझ्या शिष्यवर्गाला सोडून जाणें माझ्या जिवावर येत आहे, पण माझ्यामुळें ह्या गरीब लोकांना अधिकच त्रास होण्याचा संभव

आहे. तेव्हां ही मुसलमानांची बंडाळी मोडेपर्यंत, कांहीं काळ आपणच येथून निघून जावें, हें बरें ! ”

युफ्राशिया—“ हो हो, गुरुजी, चलाच तुम्ही आमच्या बरोबर प्रसंग विशेषीं तुमच्या उपदेशाचा व सल्लामसलतीचाही आम्हांला उपयोग होईल. पण आतां लवकर निघण्याची तयारी करा ! ”

घोड्यांना पाणी पाजून व सर्व मंडळींनीं थोडासा उपहार करून, ती थोड्याच वेळांत तेथून निघून विसाच्या रस्त्याला लागली.

तुरुंगावरील शिपाई सकाळीं नेमलेल्या वेळीं रिचर्ड व कोतवाल ह्यांच्या कोठडींत आला. त्यानें आपल्याबरोबर भाकरी व पाणी आणिलें होतें, तें खालीं ठेवून, तो हेटाळणीच्या स्वरानें म्हणाला—“ हं, ख्रिस्ती काफरांनो, हेंच तुमचें शेवटचें अन्नपाणी ! तुम्हांला सुलतानसाहेबांच्या हुकमानें आज फाशीं,........पण हें काय ? ” असें म्हणून तो एका बिछान्याजवळ गेला, तों सर्व बिछाने रिकामे असलेले त्याच्या दृष्टीस पडले. तो चकित दृष्टीनें चोहोंकडे पहात आपल्याशींच उद्गारला—“असें कसें झालें ? हे काफर भुतांसारखे जागच्या जागीं अदृश्य झाले कीं काय ? या अल्ला ! ते खास जादूगार असले पाहिजेत ! कारण, येथून उंदराला देखील बाहेर पडतां येण्यासारखी मोठी फट नाहीं, आणि कुलूपही मोडलेलें नाहीं ! ” त्यानें भयभीत अंतःकरणानें पुनः एकदां सर्व भिंती झरोके व दारें तपासून पाहिलीं, आणि झालेली हकीगत वरिष्ठ अधिकाऱ्याला कळविण्याकरितां तो खिन्न मुद्रेनें तेथून निघाला.

शिपायाच्या तोंडची ती विलक्षण हकीगत ऐकून, जेलर संतापून म्हणाला—“ काय मूर्ख मनुष्य आहेस ! बाहेर जाण्यास कोठेंही वाट नसेल तर कैदी पळून जातील कसे ? जा, पहाऱ्यावरील नाइकास अगोदर घेऊन ये, म्हणजे आपण ती कोठडी तपासून पाहूं ! पण एवढें लक्षांत ठेव कीं, ह्यांत तुझी कांहीं कसूर दृष्टीस पडल्यास तुझें डोकें ठिकाणावर राहणार नाहीं. ”

थोड्याच वेळांत तो शिपाई नाइकास घेऊन आला. नंतर सर्व जण त्या रिकाम्या कोठडीजवळ आले. जेलरनें बाहेरचें दार व कुलूप तपासून पाहिलें. तें शाबूत असल्याची खात्री झाल्यावर तो म्हणाला—

" ते काफर जरी येथून निसटले असले, तरी किल्ल्यांतून त्यांना बाहेर पडतां येणें मुळींच शक्य नाहीं ! कोठें तरी ते सांपडलेच पाहिजेत ! "

नंतर सर्वांनीं कोठडींत जाऊन, तेथील सर्व जागा तपासून पाहिल्या, पण कोठें कांहींच चिन्ह दिसेना. शेवटीं नाइकानें तिन्ही बिछाने उचलून कोंपऱ्यांत फेंकून दिले, तों मधील बिछान्याखालची फळी कापलेली त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां तो ओरडून म्हणाला—" हें पहा, हें पहा ! त्या हरामखोरांनींच ही चोरवाट तयार केली असावी ! "

नाइकानें आपल्या तलवारीच्या टोंकानें ती फळी उचकटून काढली, तेव्हां त्याच मार्गानें कैदी खालच्या खोलींत जाऊन छपून बसले असावे, असें जेलरास वाटून तो धांदलीनें म्हणाला—" चला चला, खालच्या खोलीकडे चला. तेथें ते सांपडतील ! "

सर्वजण खालच्या खोलीकडे धांवले. पण खोलीचें कुलूप काढून आंत जाऊन पाहतात तों, तेथेंही फळी कापून भोंक पाडलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. तें पाहून नाईक म्हणाला—" हां हां ! आतां माझ्या लक्षांत आलें. खालच्या खोलींतल्या बायका काल रात्रीं आरडाओरड करीत होत्या, त्या ह्याचकरितां ! मीं त्यांना " कां ओरडतां ? " असें विचारलें, तेव्हां त्या म्हणाल्या " वरून कोणी तरी फळी कापून खालीं येण्याचा प्रयत्न करीत आहे ! " मला तें खरें वाटलें नाहीं, म्हणून मीं त्यांना स्वस्थ राहण्याविषयीं खडसून ताकीद केली. "

" या अल्ला ! " जेलर घाबरून म्हणाला—" त्या बायकाही नाहींशा झाल्या असल्या तर मात्र आपणां सर्वांचींच शंभर वर्षें भरलीं ! सुलतान-साहेब मुळींच क्षमा करणार नाहींत ! "

" चला चला, खालच्या कोठडींत जाऊन पाहूं या ! " असें म्हणून सर्व मंडळी बायकांच्या कोठडींत आली. पण कोठडी ती रिकामी असून खालचें लोखंडी चोरदार उघडें असलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें, व खालच्या प्रवाहाचा ' घो घो ' आवाज त्यांच्या कानांवर आला.

ह्याच मार्गानें सर्व कैदी पळून गेले. अशी आतां सर्वांची निःसंशय खात्री झाली. कोणा तरी साथीदारानें खाली नाव आणिली असावी,

आणि तींतून ते गेले असावे, असें सहजच अनुमान झालें. जेलरनें तत्काळ त्या गोष्टीचा सर्वत्र बोभाटा केला. किल्लेदारानें लागलेंच तपासाचें काम सुरू केलें. प्रवाहावरील चौकीदारांकडे प्रथम शोध करण्यांत आला, परंतु तेथें कांहींच पत्ता लागला नाहीं; तेव्हां त्यानें शहरांत शोध करावयास ताबडतोब माणसें पाठविलीं.

कैदी लोकांशीं ज्यांचा ज्यांचा संबंध होता, त्या सर्वांनाच आपापल्या जिवाचा भरंवसा वाटेनासा झाला. कारण, अहमद पाशानें सुलतान साहेबांना आपल्या पराक्रमाची प्रौढी सांगतांना युफ्राशियाच्या सौंदर्याचें यथास्थित वर्णन केलें होतें, आणि रिचर्ड बर्स्टोच्या चातुर्याचीहि सविस्तर हकीगत सांगितली होती. त्यावरून सुलतानसाहेबांनीं रिचर्डची प्रथम भेट घेऊन त्याची स्वतः तपासणी करून शिक्षा देण्याचें ठरविलें होतें, आणि युफ्राशियाला स्वतः पाहून, ती पसंत झाल्यास तिला आपल्या जनानखान्यांत दाखल करावयाचा त्यांचा विचार होता, हें सर्वांना माहीत होतें.

कैदी पळून गेल्याची बातमी किल्लेदारानें भीत भीत सुलतानसाहेबांच्या कानांवर घातली. ती ऐकतांच सुलतान अतिशय संतापून गेले. त्यांनीं जेलर, पाहारेवाले व नदीवरील चौकीदार ह्या सर्वांनाच एकदम कैदेंत ठेवण्याचा हुकूम दिला, आणि वाटेल ती खटपट करून कैदी लोकांना हुडकून काढून पुनः पकडून परत आणण्याविषयीं किल्लेदाराला सक्त ताकीद केली. किल्ल्यांत व शहरांत चोहोंकडे एकच गोंधळ माजून राहिला.

कांहीं वेळानें सिरील शेतकऱ्याजवळ मिळालेलें पत्र घेऊन, वालीद किल्ल्यांत आला, त्याच्या पाठोपाठ युडेशियाच्या झोंपडीवरून जीव घेऊन पळून आलेले स्वारही येऊन दाखल झाले. त्या पत्रावरून व स्वारांच्या हकीकतीवरून सर्वांची खात्री झाली कीं, कैदी कॉन्स्टांटिनोपलकडे पळून गेले. वेशीवरील चौकीदारास विचारतां, पहाटेस कांहीं ग्रीक बायका व पुरुष घोड्यांवर बसून बोर्धियाच्या बाजूला गेल्याचें समजलें. तत्काळ सुलतानच्या हुकुमानें शंभर स्वारांची एक तुकडी

कैद्यांच्या पाठलागाकरितां बोर्वियाकडे रवाना झाली.

वेशींतून बाहेर पडल्यापासून रस्त्यानें येणाऱ्या प्रत्येक मनुष्याजवळ त्या स्वारांचा नायक कैद्यांविषयीं तपास करीत चालला; त्यावरून, कैदी त्याच रस्त्यानें पुढें गेले असल्याविषयीं त्याची खात्री झाली, तेव्हां त्यानें झपाट्यानें दौड सुरू केली. कॉंटारी आपल्या सर्व मंडळीसह युडेशियाच्या झोंपडींतून पुढें विसाकडे रवाना झाला, त्यावेळीं ही पाठलाग करणाऱ्या स्वारांची टोळी इस्कीबाबा येथें येऊन पोंचली.

लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास ह्यांना सुलतानांनीं आदले दिवशीं रात्रींच इतर कैद्यांपासून फोडून वेगळ्या एका कोठडींत ठेवलें होतें. ते कॉन्स्टॉंटिनोपल येथील मोठ्या योग्यतेचे सरदार आहेत, असें सुलतानाला समजलें होतें, व त्यांचें मन वळवून त्यांच्याकडून कांहीं तरी फायदा करून घेण्याचा सुलतानांचा उद्देश होता, म्हणून त्यांची बरदास्त त्यांच्या योग्यतेप्रमाणें उत्तम प्रकारें ठेवण्याचीही त्यांनीं तजवीज करविली होती. हें आकस्मिक स्थित्यंतर झालेलें पाहून लॉर्ड मॅन्युअलनाही मोठें आश्चर्य वाटलें, तथापि आपल्या प्रियकर युफ्राशियाच्या सुरक्षिततेबद्दल त्यांच्या मनाला एकासारखी काळजी लागून राहिली होती.

दुसरे दिवशीं सकाळीं एक अधिकारी त्यांच्या खोलींत येऊन नम्रपणें सलाम करून म्हणाला—" सरदारसाहेब, तसदीची माफी असावी! तसाच जरूरीचा प्रसंग आला आहे, म्हणून आपल्याला त्रास देणें भाग पडत आहे!"

लॉर्ड मॅन्युअल चकित व खिन्न स्वरानें म्हणाले—" काय झालें ?"

तुर्की कामगार—" आपल्या बरोबरची इतर सर्व मंडळी कालरात्रीं किल्ल्यांतून पळून गेली, त्यांच्या पाठलागाकरितां शंभर स्वारांची तुकडी रवाना झाली आहे व ते लवकरच सांपडतील, ह्यांत शंका नाहीं. ती मंडळी कसकशा तजविजीनें पळून गेली हेंही कळलें आहे. पण त्यांना बाहेरून कोणीं मदत केली, हें मात्र अद्यापि बरोबर समजलें नाहीं. कैदी पुनः हातीं लागतांच त्या सर्वांना देहांत शासन होणार, ह्यांत मुळींच संशय नाहीं. तथापि त्यांपैकीं कोणा एखाद्याला माफी मिळावी अशी आपली इच्छा असल्यास, आणि तशी असणें स्वाभाविकही आहे.

तर आपण त्यासंबंधाची सर्व खरी माहिती, व विशेषतः बाहेरून कोणाकडून कशी मदत मिळाली, ती कृपा करून सांगावी, म्हणजे सुलतानसाहेबांकडे आम्ही रदबदली करून, आपल्या प्रिय माणसास जीवदान मिळवून देण्याची शक्य तितकी खटपट करूं !"

लॉर्ड मॅन्युअल हंसून म्हणाले—" ती गोष्ट मला माहीत असती तरी देखील मीं ती क्वचित सांगितली नसती ! आपल्या माणसांचा विश्वासघात करण्याइतका मी कृतघ्न असेन, असें तुम्हांला वाटतें काय ? तथापि त्यांना बाहेरून कोणाकडून कशी मदत मिळाली असावी, हें मला मुळींच माहीत नाहीं, किंबहुना त्या संबंधानें कल्पना देखील मनांत येत नाहीं ! किल्ल्यांतून पळून जाण्याचा त्यांचा विचार होता, हें मला माहीत आहे, आणि त्या प्रयत्नांत त्यांना पूर्ण यश यावें अशी माझी अद्यापिही पूर्ण इच्छा व ईश्वरास प्रार्थना आहे !"

तुर्की अधिकारी—" तर मग, आपल्याला कांहीं माहीत नाहीं, असें सुलतानसाहेबांस कळवूं का ?"

लॉर्ड मॅन्युअल—" माझा निरोप म्हणून सुलतानसाहेबांस कळविण्याचें कांहीं कारण नाहीं, आणि त्यांना निरोप पाठविण्याची मलाही कांहीं जरूर नाहीं. मला माहीत असलेली हकीगत मीं तुम्हांला सांगितली आहे, तिचा तुम्ही वाटेल तसा उपयोग करण्यास मुखत्यार आहां !"

इतक्यांत आणखी एक कामगार गडबडीनें तेथें येऊन त्या अधिकाऱ्यास म्हणाला—" पळून गेलेले कैदी शहरांतून पार होऊन कॉन्स्टांटिनोपलच्या मार्गाला लागल्याची बातमी आतांच सुलतानसाहेबांच्या कानांवर आली आहे, आणि........"

" काय " लॉर्ड मॅन्युअल चकित स्वरानें त्याला म्हणाले- " ते सुरक्षितपणें शहरांतून बाहेर पडले !"

कामगार—" हो ! त्याबद्दल आतां शंकाच उरली नाहीं ; ते सूर्योदयापूर्वींच घोड्यांवर बसून वेशीच्या बाहेर गेले !"

ही बातमी इतक्यांत तरी लॉर्ड मॅन्युअलला समजूं नये, अशी पहिल्या अधिकाऱ्याची इच्छा होती, पण त्याचा नाइलाज झाला. शेवटीं तो त्या दुसऱ्या कामगाराकडे वळून रागानें म्हणाला—" बरें, तुम्ही ह्या

वेळीं इकडे कां आलां ? मुद्दाम ही बातमी कळवावयासच कीं काय ? ”

दुसरा कामगार—“ छे, आपल्याला सुलतानसाहेबांनीं तावडतोब बोलावलें आहे, म्हणून आपला शोध करीत इकडे आलों ! ”

“ चला तर ! ” असें म्हणून दोघेही तेथून निघून गेले. नंतर लॉर्ड सॅम्युअल आनंदित अंतःकरणानें आपल्याशींच उद्गारले—“वाहवा ! धन्य आहे रिचर्डच्या अकलेची आणि साहसाची ! ती सर्व मंडळी आड्रियानोपल शहरांतून तर सुरक्षित बाहेर पडली, तशीच एकदां कॉन्स्टांटिनोपलला सुखरूप पोंचोत म्हणजे झालें ! मग माझें इकडे कसेंही होवो, त्याची मला मुळींच पर्वा नाहीं ! ”

---

## प्रकरण १४ वें.

## कटवाल्यांची चौकशी.



पहाटेच्या वेळीं एकदम तुटलेल्या तेजस्वी तान्यानें सर्व कॉन्स्टांटिनोपल शहरांत खळबळ उडवून दिली होती. तो तारा मंद गतीनें आकाशांतून गेल्यामुळें, शहरांतील पुष्कळ लोकांना पहावयास सांपडला. आणि त्याचा कडकडाट तर एवढा मोठा झाला कीं, त्या योगानें शहरांतील सर्व लोक खडबडून जागे झाले. व्यापारी लोक दुकानांचीं दारें उघडून धडपडत बाहेर आले, श्रीमान् सुखवस्तु लोक झोंपेंतून उठून अर्ध नग्न स्थितींतच खिडक्यांतून डोकावून पाहूं लागले, रंगेल मंडळी आपले डाव तसेच टाकून रस्त्यावर धांवली, आणि सरकारी कामगारही कावरे बावरे होऊन बाहेर पडले. ह्याप्रमाणें शहरांत जिकडे तिकडे एकदम गोंधळ उडाला.

रस्त्यावर लोक टोळ्या टोळ्यांनीं जमून, त्या उल्कापातानें सुचविल्या जाणाऱ्या संकटाविषयीं आपापसांत तर्कवितर्क चालवूं लागले, कोणी म्हणत, हें राजक्रांतीचें चिन्ह आहे; कोणी म्हणत, ही दुष्काळाची

सूचना आहे; कोणी सांगत, ही महामारीची सूचना आहे; आणि कांहीं म्हणत, हा कांहीं तरी भयंकर ईश्वरी क्षोभ आहे!

इतक्यांत सेंट रोमॅनसच्या प्रार्थनामंदिरावरील जंगी घंटा वाजूं लागली, व एक सरकारी हलकारा मोठ्यानें पुकारीत निघाला—"शहरवासी लोकहो, रस्ता सोडा; चालसेडनचे धर्माधिकारी ( आर्च बिशप ) यांची स्वारी सेंट रोमॅनसच्या मंदिरांत उपासना करण्यासाठीं येत आहेत, आणि बादशहांची स्वारीही त्यांच्या बरोबरच पायीं येत आहे! साम्राज्याचें व राजधानीचें सर्व संकटांपासून संरक्षण करण्यासाठीं ते आज विशेष प्रार्थना करणार आहेत!"

लोक रस्त्याच्या दोहों बाजूंस हारीनें उभे राहिले. त्यानंतर थोड्याच वेळानें आर्च बिशप साहेबांची स्वारी सेंट सोफायाच्या चौकाकडून आली. सर्वांच्या पुढे मशालवाले चालले होते, त्यांच्या मागून निरनिराळ्या मंदिरांतील धर्मोपदेशक व्यवस्थेनें जात होते, त्यांच्या मागून मोठमोठे सरदार व मानकरी चालले होते, व त्यांच्या मागून आर्च. बिशप साहेब, उजव्या बाजूस बादशहा डाव्या बाजूस मुख्य प्रधान ह्यांच्यासह येत होते. त्यांच्या आजू बाजूंस जळत असलेल्या सुवासिक मेणबत्त्यांचा सुगंध चोहोंकडे दरवळत होता. आर्चबिशप साहेब वृद्ध व भव्य असून, त्यांची पांढरी शुभ्र दाढी त्यांच्या छातीवर लोळत होती. बादशहांनीं व इतर मानकऱ्यांनींही अगदीं साधे पोषाख केले होते. सर्वांच्या मागून आर्चबिशप साहेबांच्या सन्मानार्थ ठेवलेलें स्वारांचें पथक चाललें होतें. ह्याप्रमाणें ही शांत व गंभीर स्वारी चालली असतां लोकांनीं ईश्वराच्या, आर्चबिशप साहेबांच्या व बादशहांच्या जयजयकारानें आकाश दणाणून सोडलें. अशा थाटानें स्वारी सेंट रोमॅनसच्या भव्य मंदिराजवळ येऊन दाखल झाली, इतक्यांत सेनापति सर एडवर्ड मागून धांवत आले, आणि बादशहांना प्रणाम करून, त्यांनीं आपली हकीगत थोडक्यांत त्यांच्या कानांवर घातली.

"शाबास, सर एडवर्ड!" बादशहा कृतज्ञ स्वरानें हळूच म्हणाले. "ईश्वराची आपणांवर खरोखर मोठी कृपा दिसते! तुम्ही आज साम्राज्याची अत्यंत महत्त्वाची कामगिरी बजावली आहे, ही गोष्ट मी विसर-

णार नाहीं ! त्या सर्व हरामखोरांना पक्क्या बंदोबस्तांत ठेवा उद्यां त्या-च्याबद्दल काय तो विचार करूं ! ”

सर एडवर्ड बादशहांचा निरोप घेऊन आपल्या जहाजाकडे परत आले. नंतर त्यांनीं सर्व कैद्यांस खालीं उतरून घेऊन, कडक बंदो-बस्तानें राजवाड्यांत नेलें. रशीदपाशाची त्याच्या योग्यतेनुरूप तजवीज लावण्यांत आली. इतर तुर्क लोकांना दुसऱ्या एका ठिकाणीं ठेवण्यांत आलें, आणि रोमन कटवाल्यांची वेगवेगळ्या कोठड्यांतून व्यवस्था लावण्यांत आली. त्यांमध्यें ड्यूक लियॉनशियस, दर्यासारंग नियॉफेटस व धर्माधिकारी जोसफ हे प्रमुख असून, बाकीचे तिघे पायदळ पलटणींतील अधिकारी होते.

बादशहांच्या आज्ञेप्रमाणें सर एडवर्डनीं लॉर्ड फ्रांझा व धर्माध्यक्ष या उभयतांसही राजवाड्यांत लवकर येण्याविषयीं सूचना पाठविल्या, आणि ते आल्यावर बादशहांची स्वारी परत येईपर्यंत, सर एडवर्ड त्यांच्याशीं बोलत बसले. धर्माधिकारी जोसफ हा धर्माध्यक्षांच्या ताब्यां-तील मनुष्य असल्यामुळें, त्यांच्या परवानगीशिवाय, किंवा निदान त्यांच्या कानांवर घातल्याशिवाय, जोसफला अटक करणें, त्या वेळच्या धार्मिक वर्चस्वाच्या काळीं, अयोग्य झालें असतें.

बऱ्याच वेळानें बादशहांची स्वारी प्रार्थनामंदिराकडून परत आली. त्यांची मुद्रा फिकट व उदास दिसत होती. आपल्या दरबारी मंडळीं-पैकीं कोणावर किती भरंवसा ठेवावा,हेंच त्यांना कळेनासें झालें होतें.ड्यूक लियॉनशियस व दर्यासारंग, नियॉफेटस यांच्यावर आजपर्यंत त्यांचा पूर्ण विश्वास होता, पण ते दोघेही पक्के राजद्रोही ठरले. जोसफचें सामान्य लोकांवर चांगलें वजन होतें. व त्याच्या वजनाचा आणि विद्वत्तेचा आपल्याला प्रसंगीं उपयोग होईल, असें बादशहांना वाटत होतें, पण तीही निराशा झाली. लॉर्ड मॅन्युअल तुर्कांच्या कैदेंत सांपडल्यामुळें निरुपयोगी झाले. सर एडवर्ड तर बोलून चालून परकी गृहस्थ, लॉर्ड फ्रांझांचा मोठा आधार, पण मॅन्युअल शत्रूच्या हातीं सांपडल्यामुळें त्यांचें मन उद्विग्न होऊन गेलें होतें. ह्याप्रमाणें बादशहांची स्थिति जवळ जवळ निराधार झाली होती.

बादशहांनीं परत आल्यावर धर्माध्यक्षांस कटाची सर्व हकीगत थोड-क्यांत सांगून, जोसफच्या अटकेस व चौकशीस त्यांची संमति मिळ-विली, आरोपित लोकांचा इनसाफ शक्य तितक्या गुप्तपणें व्हावा, अशी बादशहांची इच्छा होती व ती लोकक्षोभ टाळण्याकरितां, धर्माध्यक्ष आणि लॉर्ड फ्रांझा ह्या उभयतांनींही तत्काळ मान्य केली, बादशहांनीं आपल्या चिटणिसांस बोलावून आणविलें व त्यांनीं येऊन न्याय सभेच्या बैठकीची लागलींच तयारी केली.

चौकशीचें काम सुरू होण्यापूर्वी, खासगी बैठकीच्या खोलींत असतांच बादशहा धर्माध्यक्षांस म्हणाले—" जोसफवर जर अपराधाची शाबिती झाली, तर त्याला काय शिक्षा करावी अशी आपली इच्छा आहे ? अन्याय न होऊं देतां शक्य तितकी दया करण्यास मी तयार आहे ! "

धर्माध्यक्ष—" सरकार, जोसफ जरी विद्वान् वक्ता व धर्मशील आहे, तरी त्याच्यावर असलेल्या भयंकर आरोपाची शाबिती झाल्यास त्याला देहांत शासन करावें लागेल, हें मला माहीत आहे. तथापि हल्लींच्या बिकट परिस्थितीकडे लक्ष दिलें असतां, त्याला प्राणदंड न करितां जन्मठेपेची शिक्षा देणेंच अधिक श्रेयस्कर होईल, असें मला वाटतें. कारण, सामान्य लोकांची त्याच्यावर फार भक्ति आहे आणि ह्या वेळीं समेटाच्या दृष्टीनें लोकांचीं अंतःकरणें शक्य तितकीं शांत राखणें आवश्यक आहे ! "

सर एडवर्ड—" सरकार, न्याय देवतेच्या शुद्ध स्वरूपावर लोक-मताचें आवरण घालणें केव्हांही योग्य होणार नाहीं ! हा जोसफच सर्व कटवाल्यांमध्यें प्रमुख, किंबहुना कटाचा मुख्य प्राण आहे ! त्याला योग्य शासन झालेंच पाहिजे ! "

बादशहा—" सेनापति, तुमचें म्हणणें रास्त आहे. तथापि जोस-फला थोडीशी दया दाखविण्यास एक महत्त्वाचें सयुक्तिक कारणही आहे ! थियोडोराबद्दलच्या लियॉनाशियसच्या नीच मागणीस यानें शक्य तितका जोराचा विरोध केला आहे ! "

लॉर्ड फ्रांझा—" सरकार, माझ्या मुलीचा खासगी संबंध लक्षांत आणून, न्यायांत कमीपणा करावा अशी माझी मुळींच इच्छा नाहीं !

तो खासगी स्वरूपाचा स्वतंत्र गुन्हा असल्यामुळें, ह्या राजद्रोही कटाशीं त्याचा संबंध जोडण्याची कांहीं जरूरी दिसत नाहीं!"

धर्माध्यक्ष—"प्रधानसाहेब व सेनापति ह्या उभयतांचें बोलणें मला मान्य आहे! तथापि केवळ काटेतोल न्यायानेंच सर्व काळ सर्व कामें भागतात असें नाहीं. एकच न्याय सर्व ठिकाणीं सारखा लागू पडणें शक्य नाहीं. त्यांत देशकालपरिस्थितीप्रमाणें थोडा बहुत बदल करणें भाग असतें. अपराध शाबीत किंवा ना शाबीत ठरवितांना कायद्याचीं व शास्त्राचीं तत्वें सर्वत्र सारखींच उपयोगीं पडतात, पण शिक्षा ठरवितांना, आरोपीची योग्यता व शिक्षेचा त्याच्यावर आणि राष्ट्रावर होणारा परिणामही लक्षांत आणिला पाहिजे, अशी शास्त्राचीही आज्ञा आहे!"

बादशहा—"बरोबर! हें तत्व मला मान्य आहे! शिवाय, आपल्या अपराधाबद्दल ईश्वरानें आपल्याला क्षमा करावी, अशी जर आपली इच्छा असते, तर आपणही इतरांना शक्य तितकी क्षमा करण्यास तयार असलें पाहिजे! बरें त्या तुर्की लोकांची काय तजवीज करावयाची?"

इतक्यांत एका हुजऱ्यानें हळूच आंत येऊन, सर एडवर्डना बाहेर बोलावलें, तेव्हां बादशहांची आज्ञा घेऊन ते बाहेर आले. इकडे तुर्की कैद्यांच्या व्यवस्थेसंबंधानें बादशहा व लॉर्ड फ्रांझा ह्यांच्यामध्यें वाटाघाट सुरू झाली.

सर एडवर्ड बाहेर येऊन पाहतात तों रिचर्ड बस्टो व लेफटेनंट कॉटारी त्यांची वाट पहात उभे असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांना पाहून सर एडवर्डना फार आनंद झाला. ते त्या उभयतांचें प्रेमानें स्वागत करून, चकित स्वरानें म्हणाले—"गडे हो, तुम्ही आणि तुमच्याबरोबरची सर्व मंडळी शत्रूच्या अटकेंत सांपडून प्राणांस मुकलां असें आम्हीं ऐकलें होतें! तुम्ही त्यांच्या तावडींतून कसे सुटलां? आणि बाकीची मंडळी कोठें आहेत? सर्वांचीही मुक्तता झाली का?"

रिचर्डनें सर्व हकीगत थोडक्यांत सांगितली. बाकीची सर्व मंडळी सुटून आली, पण लॉर्ड मॅन्युअल मात्र सुलतानाच्या अटकेंत राहिले!

तीं मागतां आलीं तर स्वतंत्र व निष्कलंक राखावयाची, आणि लाटिन लोकांशीं आमचा होऊं घातलेला समेट, म्हणजे धार्मिक पारतंत्र्य, पत्करून घेऊं द्यावयाचें नाहीं. असा माझा निश्चय आहे! शिवाय, आज ना उद्यां, पण थोड्याच काळांत हें रोमन साम्राज्य खचित बुडणार, तें आतां फार दिवस टिकणें शक्य नाहीं हें मला उघड दिसत असल्यामुळें, तें वांचविण्याचा दुराग्रह धरून सर्वस्वाचा नाश करून घेण्यापेक्षां, पवित्र व परमपूज्य देवस्थानांचा शक्य तितका बचाव करण्याचा प्रयत्न करणें, हेंच माझें कर्तव्य आहे असें मी समजतों!"

"फादर जोसफ," बादशहा क्रुद्धस्वरानें म्हणाले—"तुमच्यावरील देशद्रोही कटाचा आरोप तुम्हांला मान्य आहे, एवढेंच सध्यां तुम्हांला कोणतीही शिक्षा देण्यास बस आहे! अशा प्रसंगीं कृतापराधाबद्दल पश्चात्तापपूर्वक क्षमा मागणें, हेंच तुम्हांला श्रेयस्कर होतें. परंतु तसें न करितां उलट त्याचीं कांहीं तरी भलतीं सलतीं भ्रामक कारणें पुढें करून आपल्या दुष्कर्माला सत्कृत्याचें स्वरूप देण्याची तुम्ही खटपट करीत आहां, हें पाहून आम्हांला फार आश्चर्य वाटतें! आमचें राज्य खचित बुडणार, असें तुम्ही म्हणतां! ठीक आहे! ईश्वराची तशीच इच्छा असेल तर, खुशाल बुडूं दे! सर्व शक्तिमान् परमेश्वराच्या इच्छेविरुद्ध वागण्याचें कोणाच्या अंगीं सामर्थ्य आहे? आम्हाला राज्याचा लोभ नाहीं, किंबहुना मरणाचीही भीति नाहीं, मी व माझे शूर आणि इमानी साह्यकर्ते, आपल्या देशाकरितां व पवित्र धर्माकरितां आपले प्राण देण्यास आनंदानें तयार आहोंत; किंबहुना, खऱ्या ख्रिस्तानुयायी प्रत्येक रोमन मनुष्याचें हेंच आद्य कर्तव्य आहे! परंतु ईश्वराची इच्छा आम्हां क्षुद्र मानवांच्या संकुचित बुद्धीला अगोदर समजणें शक्य नाहीं! असें असतां कांहीं तरी भ्रामक कल्पना करून, धडधडीत धर्मबाह्य व अनीतीचें कृत्य करण्यास प्रवृत्त होणें योग्य होईल काय?"

जोसफ—"सरकार, माझ्या समजुतीप्रमाणें मला जें खरोखर श्रेयस्कर वाटलें, तें मीं केलें आहे! त्याबद्दल मला मुळींच वाईट वाटत नाहीं! आपल्याला त्याबद्दल मला शासन करावयाचें असेल तर, खुशाल करावें.

पण ईश्वराच्या दरबारांत मी अपराधी ठरणार नाहीं, अशी माझी खात्री आहे ! ”

बादशहा—“ जोसफ, तुमच्या अपराधाबद्दल तुम्हांला देहांत शासनच योग्य आहे. तथापि, तुमचा धार्मिक अधिकार व सामान्य लोकांची तुमच्यावरील भक्ति लक्षांत आणून, त्यांचा असंतोष होऊं नये म्हणून, तुमची मागणी नसली तरी, आम्ही तुमच्यावर दया करीत आहों, आणि तुम्हांला जन्मठेपेची शिक्षा फर्मावण्यांत येत आहे ! ”

जोसफ—“ सरकार, माझ्या स्वतःबद्दल मला मुळींच कांहीं सांगाव-याचें नाहीं ! पण एवढें लक्षांत ठेवावें कीं, परकीय लाटिन लोकांशीं सलगट करून धार्मिक पारतंत्र्य स्वीकारण्याची खटपट कराल, तर ती आपल्याला, आपल्या देशाला व आपल्या धर्मसंस्कृतीला मुळींच श्रेयस्कर होणार नाहीं ! त्यामुळें लोकक्षोभ होईल इतकेंच नव्हे, पण ईश्वराचाही आपल्यावर कोप होईल ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ शिपाई, ह्याला घेऊन चला आणि पक्कें वारंट मिळे-पर्यंत देवडीवर बंदोबस्तानें ठेवा. ”

धर्माध्यक्ष—“ आतां ड्यूक लियॉनशियसला बोलवावयाचें ना ? ”

बादशहा—“ हो ! आतां अगोदर त्याचाच इनसाफ करूं ! पण हें काय ? ( उघड्या खिडकीकडे वळून ) उजाडलें वाटतें ? ”

सर एडवर्ड—“ होय सरकार, सर्वांच उजाडलें आहे ! हा पहा सूर्यो-दय होत आहे ! हें एक सुचिन्हच आहे असें मला वाटतें ! ”

पहारेवाल्यांनीं जोसफला देवडीवर पोंचवून, ड्यूक लियॉनशियसला न्यायसभेपुढें आणून हजर केलें तेथें येईपर्यंत तो एकसारखी धडपड करीत होता, पण बादशहांच्या तीक्ष्ण दृष्टीकडे अवलोकन करितांच त्याची सर्व गडबड थंड पडली. त्याचा चेहरा भीतीनें पांढरा फट-फटीत झाला होता, सर्वांग थरथर कांपत होतें, कावऱ्या बावऱ्या नजरेनें तो इकडे तिकडे पहात होता, बादशहा व उभयतां मंत्री ह्यांच्याकडे पाहण्याचेंही त्याला धैर्य होत नव्हतें, त्यानें वेषांतराकरितां घातलेला हीन पोषाख त्याच्या अंगांत होता, आणि भीतीनें व लज्जेनें तो मरून चूर झाला होता.

बादशहा क्रुद्ध दृष्टीनें त्याच्याकडे पहात तीव्रस्वरानें म्हणाले—"ग्रँड डयूक लियॉनशियस, तुम्ही रोमन साम्राज्यांतील अव्वल दर्जाचे सरदार, व राष्ट्राचे आधारस्तंभ असतां, निर्लज्जपणें हलकट लोभाला गुंतून, देशद्रोहासारखें नीच पातक करण्यास बेलाशक तयार व्हावें, हें पाहून आम्हांला शरम वाटत आहे! तुमच्याविरुद्ध इतका भरपूर व निःसंशय पुरावा आहे कीं, तुम्हाला आरोप नाकबूल करण्यास किंवा बचावाचा प्रयत्न करण्यास मुळींच जागा उरलेली नाहीं. तथापि तुम्हांला कांहीं सांगावयाचें असेल तर सांगा!"

लियॉनशियस हात जोडून अडखळत म्हणाला—"सरकार, मी महान् अपराधी आहें, पण मजवर दया करून जीवदान द्यावें!"

बादशहा—"नुसता देशद्रोहाचाच अपराध असता, तर कदाचित् तुमच्यावर दया करण्याचा विचार मनांत आला असता. पण तुम्ही एका कुलीन व सुशील कुमारिकेच्या बाबतींत जी हलकटपणाची इच्छा प्रदर्शित केली आहे, त्यामुळें तुम्ही दयेला पूर्णपणें अपात्र ठरलां आहां! तुम्हांला मरेपर्यंत फांशी देण्याची शिक्षा फर्मावण्यांत येत आहे! शिक्षा अमलांत येण्यापूर्वी तुम्हांला तुमच्या कुटुंबांतील मंडळीस व धर्मगुरूस भेटण्याची परवानगी देण्यांत येईल."

ही भयंकर शिक्षा ऐकतांच लियॉनशियस इतका भेदरून गेला कीं, पाहरेवाल्यांनीं त्याला चटकन् धरलें नसतें तर तो धाडकन् बेशुद्ध पडला असता. थोडया वेळानें तो पुनः हात जोडून दीन वाणीनें म्हणाला—"महाराज, मी महान् अपराधी आहें खरा, पण कृपा करून मला जीवदान द्या! माझी जहागीर, माझी संपत्ति, किंबहुना माझें सर्वस्व पाहिजे तर काढून घ्या, पण माझा प्राण वांचवा! ह्या आपल्या दयेबद्दल मी जन्मभर आपला ऋणी होईन!"

बादशहा—"लियॉनशियस, आतां करुणा भाकण्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं, आणि तुम्हांला असा बायकांसारखा शोक करणें शोभतही नाहीं! तुम्हांला खरोखरच पश्चात्ताप झाला असेल तर, ईश्वराची क्षमा मागा. तो तुमच्यासारख्या महा पातक्यावरही दया करण्यास समर्थ आहे!"

बादशहांनीं त्या वेळच्या वहिवाटीप्रमाणें शिक्षेच्या हुकुमावर लाल शाईनें सही केली. ती पहातांच लियॉनशियसनें भीतीनें एक हृदयद्रावक किंकाळी फोडली. पण तितक्यांत पहारेवाल्यांनीं त्याला ओढीत बाहेर नेलें.

त्यानंतर दोघां हलक्या प्रतीच्या कटवाल्यांस न्यायसभेपुढें हजर करण्यांत आलें. त्यांनीं आपला अपराध तत्काळ कबूल केला. तेव्हां बादशहांनीं त्यांना सांगितलें कीं, " तुम्ही सर्व खरी हकीगत सांगाल तर तुम्हांला देहांत शासन न करितां, जन्मठेपेची शिक्षा देण्यांत येईल. " तेव्हां त्यांनीं कटाची सर्व हकीगत सविस्तर सांगितली. तिजवरून त्या कटाचे धागे फार दूरवर पसरले असल्याचे त्यांच्या नजरेस येऊन, त्यांना सखेदाश्चर्य वाटलें ! दरबारच्या कित्येक मोठमोठ्या कामगारांचा त्यांत संबंध येऊं लागला. त्यावरून रोमन साम्राज्य आंतून किती पोकळ होऊन गेलें आहे, आणि त्याचा बचाव करण्याचा प्रयत्न करणें किती निरर्थक आहे, हें बादशहांना कळून चुकलें. तथापि त्यांनीं धैर्य सोडलें नाहीं.

त्या दोघां आरोपींना जन्मठेपेची शिक्षा सांगून बाहेर पाठवून दिल्यावर दर्यासारंग नियाफेटस यांची चौकशी झाली. त्यानें आपला अपराध कबूल केला व सर्व खरी हकीगत सांगितली. त्यावरून तो जोसफ व लियॉनशियस ह्यांच्या नादानें फसून त्या कटांत सामील झाल्याचें दिसून आल्यावरून, त्याला देहांत शासन न करितां, जन्मठेपेचीच शिक्षा देण्यांत आली.

ह्याप्रमाणें न्यायसभेचें काम संपतांच, बादशहा, धर्माध्यक्ष, लॉर्ड फ्रांझा व सर एडवर्ड पुनः कांहीं विचार करण्याकरितां बादशहांच्या खासगी महालांत गेले.

## प्रकरण १९ वें.

# लियॉनशियसची फितूरी.



डयूक लियॉनाशियस यांची पत्नी डचेस ॲना हिचें आपल्या पतीवर अत्यंत प्रेम होतें. पण ती स्वभावानें गरीब असल्यामुळें, त्याचीं राजद्रोही व धर्मबाह्य कृत्यें तिला मुळींच माहीत नसत. कुमारी थियोडोरासंबंधानें आपल्या पतीच्या मनांत दुष्ट वासना असेल, अशी तिची कल्पनाही नव्हती. लियॉनशियस कटवाल्यांत सांपडला व बादशहांनीं त्याला देहांत शासन फर्माविलें, ही बातमी दुसरे दिवशीं तिच्या कानांवर आली, तेव्हां तिला अत्यंत दुःख झालें. ह्या प्राणसंकटांतून आपल्या पतीचा बचाव करण्याचा शक्य तितका प्रयत्न करणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे असा विचार करून, ती त्या उद्योगाला लागली. सर एडवर्ड, लॉर्ड फ्रांझा, धर्माध्यक्ष व खुद्द बादशहा ह्यांच्या भेटी घेऊन, आपल्या पतीला माफी करण्याविषयीं, निदान थोडी दया करून त्याची शिक्षा कमी करण्याविषयीं, तिनें पुष्कळ आर्जवें व रदबदली केली, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. तथापि निराश न होतां, तिनें दुसऱ्या एका मार्गानें खटपट करून पाहण्याचें ठरविलें.

डचेस ॲनानें आपले सर्व दागदागिनें व जड जवाहीर एका मोठ्या सावकाराकडे गहाण टाकून, पन्नास हजार मोहोरांची रक्कम तयार केली, आणि ती सगळी तुरुंगावरील पहारेवाल्यास लांच देण्याचें कबूल केलें. एवढ्या मोठ्या रकमेचें आमिष दृष्टीस पडतांच पहारेवाल्याच्या तोंडाला पाणी सुटलें. त्या द्रव्याच्या लोभाला बळी पडून, तो निमकहराम पहारेवाला आपल्या धन्याशीं व आपल्या देशाशीं बेइमान होण्यास तयार झाला; आणि मध्यरात्रीनंतर त्याचा पाहरा येतांच, त्यानें लियॉनशियसला सोडून दिलें, व आपणही लांचाची रक्कम घेऊन फरारी झाला लियॉनाशियस तुरुंगांतून पळून गेल्याचा बोभाटा होईपर्यंत, तो आपल्या पत्नीसह गुप्त वेषानें शहरांतून बाहेर पडून आड्रियानोपलच्या रस्त्याला

देखील लागला होता.

पोप महाराजांचे प्रतिनिधि कार्डिनल इसिडोर हे लॅटिन व ग्रीक लोकांचा समेट करण्याकरितां कॉन्स्टांटिनोपल येथें आल्यापासून, शहरवासी लोकांत भयंकर दुफळी माजूं लागली होती. पोपचा धार्मिक अधिकार मान्य करून, त्यांच्या मार्फत युरोपांतील इतर राष्ट्रांची मदत मिळवावी, व आपल्या साम्राज्याचें तुर्कांपासून रक्षण करावें, अशा उद्देशानें बादशहा व प्रधानमंडळ पोपची धार्मिक सत्ता मान्य करण्यास तयार झालें होतें; पण धर्माधिकारी व सामान्य जनसमूह ह्या गोष्टीला कबूल नव्हते, कांहीं झालें तरी, आपलें धार्मिक स्वातंत्र्य गमावावयाचें नाहीं, असा त्यांचा दुराग्रह होता. धर्माधिकारी जोसफ तुरुंगांत पडल्यावर, जेनाडियस हा समेटाच्या विरुद्ध उघडपणें उपदेश करूं लागला. बादशहांच्या मदतीनें कार्डिनल इसिडोर ह्यांनीं सेंट सोफायाचें मुख्य प्रार्थनामंदिर आपल्या ताब्यांत घेतलें. परंतु त्यामुळें स्थानिक धर्माधिकारी व सामान्य लोक अधिकच चिडले; आणि त्या मंदिरावर अजीबात बहिष्कार घालून, कार्डिनल इसिडोराला उघडपणें धमक्या घालूं लागले. ह्याप्रमाणें एकी घडवून आणण्याकरितां जी खटपट करण्यांत आली, तिजमुळें अतिशय दुही मात्र माजली. हा प्रतिकूल काळाचा परिणाम!

बादशहा व प्रधानमंडळ ह्यांची समेटाच्या बाबतींत बहुतेक निराशा झाल्यामुळें, त्यांना बाहेरून मदत मिळण्याचीही फारशी आशा उरली नाहीं, तथापि धीर न सोडतां, त्यांनीं तुर्कांच्या वेढ्यापासून राजधानीचा बचाव करण्याची शक्य तितकी तयारी चालविली. अन्नसामग्री, दारूगोळा, हत्यारें वगैरे सर्व उपयुक्त व अवश्यक वस्तूंचा संग्रह शहरांत जितका व ज्या मार्गानें करितां येईल, तितका व त्या त्या मार्गानें करण्याचा त्यांनीं सपाटा चालविला होता. स्थानिक लष्करांतील सर्व लोकांना बढत्या व बक्षिसें देऊन संतुष्ट ठेवण्याची खटपट चालविलीच होती. शिवाय सेनापति जॉन जस्टीनियन ह्याच्या हाताखालीं जिनोवाचें दोन हजार सैन्य मदतीस आलें होतें, त्याचीही उत्तम बरदास्त ठेवण्यांत आली होती. त्याचप्रमाणें शहराची तटबंदी दुरुस्त करण्याचें कामही झपाट्यानें चालू होतें.

कॉन्स्टांटिनोपल शहराचा आकार साधारणपणें त्रिकोणाकृति किंवा अर्धचंद्राकृति आहे म्हटलें तरी चालेल. बॉस्परसची सामुद्रधुनी आणि केपहॉर्न बंदर ह्या त्याच्या दोन बाजू किंवा वर्तुलखंड असून, युरोपाकडील खुष्कीचा भाग हा पाया आहे. शहराच्या ह्या खुष्कीकडील भागाला साडेचार मैल लांबीचा भक्कम दुहेरी तट असून, त्याच्या बाहेर खोल व रुंद खंदक आहे. तुर्कांचा मारा प्रथम ह्या तटबंदीवरच होणार असल्यामुळें, ती शक्य तितकी दुर्भेद्य करण्याकडे रोमन एंजीनियर व कारागीर यांचें सर्व लक्ष लागलेलें होतें. त्याचप्रमाणें त्रिकोणाचा शिरोबिंदु किंवा वर्तुलखंडाची चावीची शिला, असा 'सुवर्णशृंग' नांवाचा बुरुज बास्परसची सामुद्रधुनी व केपहॉर्न बंदर ह्यांच्या मध्यभागीं असल्यामुळें, तो तर अभेद्यच करण्यांत आला होता. तेणेंकरून बास्परसच्या किंवा केपहॉर्नच्या बाजूनें शहरावर हल्ला होण्याची मुळींच भीति नव्हती.

शेवटीं सन १५५३ च्या एप्रिल महिन्याच्या सहाव्या तारखेस तुर्कांचें चंद्रांकित हिरवें निशाण कॉन्स्टांटिनोपल शहराच्या तटाबाहेर फडकूं लागलें. आणि तेव्हांपासून वेढ्याचें काम जारीनें सुरू झालें. थोडयाच दिवसांत तुर्कांनीं मोर्चेबंदी करून, शहरावर तोफा डागण्यास सुरुवात केली. सुलतानांनीं नवीन तयार करविलेल्या जंगी तोफांचा भयंकर मारा तटबंदीवर रात्रंदिवस होऊं लागला. त्याशिवाय तुर्की बंदुकांतील गोळ्यांचा व तिरंदाजांच्या तिरांचाही शहरांत वर्षाव होऊं लागला.

रोमन लोकांनींही धिमेपणानें व बचावाच्या धोरणानें तुर्कांस तोंड देण्यास आरंभ केला. तटबंदीच्या आश्रयानें त्यांनींही आपल्या जुन्या पद्धतीच्या तोड्याच्या बंदुकांनीं व बाणांनीं शत्रु-सैन्यावर एकसारखा मारा करून त्यास थोपवून धरिलें. रोमन सैनिकांना तटाचा आश्रय असल्यामुळें, त्यांना शत्रूंवर हळुहळू कां होईना, पण अचुक मारा करितां येत असे. त्यामुळें शत्रूची फारशी प्रगति होईना. हें पाहून रोमन लोकांना बचावाची बरीच आशा वाटूं लागली. तथापि अन्नसामाग्री व दारूगोळा दिवसेंदिवस कमी कमी होऊं लागल्यामुळें, आणि त्यांत नवीन भर पडण्याची आशा नसल्यामुळें मात्र त्यांची काळजी वाढत चालली.

ह्याप्रमाणें एप्रिल महिना गेला. तुर्क लोक अधीर स्वभावाचे असून,

त्यांचा पुरवठाही तितक्यापुरताच असावयाचा, त्याअर्थी त्यांच्या हातून वेढ्याचें काम फार दिवस चालणार नाहीं, आणखी फार तर दोन महिने आपण दम काढला म्हणजे तुर्क लोक आपोआपच वेढा उठवून परत जातील. अशी रोमन लोकांची समजूत होती व ती सर्वथैव खोटीही नव्हती. शिवाय, युरोपांतील कित्येक राजे कॉन्स्टांटिनोपलच्या मदतीस येण्याकरितां आपापलीं लष्करें तयार करीत आहेत, अशीही बातमी होती. तुर्की लोकांच्या आरमारांत जरी जवळ जवळ तीनशें जहाजें होतीं, तरी तीं सर्व मचव्यासारखीं लहान असल्यामुळें, त्यांना न जुमानतां, जिनोवाकडून आपल्याला अन्नसामग्री व इतर युद्धोपयोगी सामान आणवितां येईल, असेंही रोमन लोकांना वाटत होतें.

रोमन बादशहा कॉन्स्टांटाईन तर विजेसारखे हालत होते. घटकेंत ते सेंट रोमॅनसच्या बुरजावर फिरत असत, तर क्षणाभरानें तटबंदीच्या दुरुस्तीचें चाललेलें काम पहात फिरत. केव्हां सेंट सोफायाच्या मंदिरांत प्रार्थना करीत, तर केव्हां केपहॉर्नजवळच्या साराग्लियोपासून लाइमबेट पर्यंत उभ्या केलेल्या आरमाराच्या बंदोबस्ताचा तपास करण्यासाठीं बिनधोकपणें नावेंतून फिरत. मनुष्याच्या हातून होण्यासारखी कोणतीही तजवीज करण्याच्या कामीं त्यांनीं कधीं आळस केला नाहीं. ह्या कामीं त्यांना त्यांच्या प्रमुख कामगारांपैकीं चारपांच कामगारांचेंच काय तें मनःपूर्वक साह्य मिळत होतें. बाकीचे कांहीं सांगकामे व कांहीं चुकार होते.

मदतीस आलेल्या जिनोवाच्या सैन्यानें आपल्या पगाराबद्दल फारच ओरड चालविली, तेव्हां बादशहांनीं मठांतील रकमा चौपट फेड करण्याच्या करारानें कर्ज काढून त्यांचे पगार भागविले. ह्याप्रमाणें कॉन्स्टांटिनोपल शहरांत रात्रंदिवस एकसारखी धांदल चालली होती, तरी शेजारच्या राजांनीं त्याच्या मदतीकरितां एक पाऊलही उचललें नाहीं. कारण, कॉन्स्टांटिनोपल शहर हीच मुसलमानी विजयाची सीमा आहे, त्यापुढें ते येऊं शकणार नाहींत, असें एक जुनें भविष्य प्रसिद्ध होतें, त्यावर त्यांचा पूर्ण भरंवसा असल्यामुळें ते अगदीं निश्चिंत होते.

सेनापति सर एडवर्ड हे तर राजधानीच्या बचावाच्या कामगिऱ्यांच्या सर्व तजविजींचे मुख्य प्राण व प्रवर्तकच होते. थियोडोराच्या मागणी

संबंधानें लॉर्ड फ्रांझांनीं ठरविलेली अखेर निकालाची मुदत भरत आली, तसतसें त्यांचें अंतःकरण आपल्या प्रेमदेवतेच्या प्राप्तीसाठीं अधिक अधिक उत्कंठित होत चाललें. शहरास वेढा पडला असल्यामुळें व केव्हां कसा प्रसंग येईल ह्याचा नियम नसल्यामुळें, लॉर्ड फ्रांझानाही आपली कन्या सर एडवर्डना देऊन एकदां निष्काळजी व्हावें, असें वाटूं लागलें होतें; तथापि परकीयाशीं शरीरसंबंध जोडल्यास आपल्या कुळाचें महत्त्व कमी होईल कीं काय, अशा कल्पनेनें त्यांचें मन कचरत होतें. बादशहांना ही गोष्ट कळली तेव्हां, त्यांना तो शरीरसंबंध पूर्णपणें पसंत पडला, आणि त्यांनीं आपली पसंती एकदां पर्यायानें थियोडोराच्याही कानांवर घातली. आपलें प्रेमरहस्य खुद्द बादशहापर्यंत प्रसृत झालेलें पाहून, थियोडोरा मनांतल्या मनांत फार लज्जित झाली. परंतु बादशहा ह्या विवाहाला प्रतिकूल नाहींत, असें समजल्यावर तिला फार आनंद झाला. एका प्रसंगीं बादशहांनीं तिचें त्याबद्दल ममतेनें अभिनंदन केलें, आणि सर एडवर्डसारखा थोर व इमानी सरदार तिला सर्वथैव योग्य व अनुरूप पति असून, त्यांच्या ह्या विवाहास आपली पूर्ण संमति आहे, इतकेंच नव्हे, पण त्या कामीं उभयतांनाही आपण शक्य तितकी मदत करण्यास तयार असल्याचेंही उघड सांगितलें.

रशीदपाशाला सोडून देऊन, त्याच्या मोबदला लॉर्ड मॅन्युअलला सोडवून आणविण्याची पुष्कळ खटपट करण्यांत आली, पण सुलतान महमद ती गोष्ट मुळींच कबूल करीनात. सुलतानांनीं असें स्पष्ट सांगितलें कीं, लॉर्ड मॅन्युअलला मोबदला देऊन, रशीदपाशाला सोडवून घेण्याची आपल्याला मुळींच जरूर नाहीं; रशीदपाशाच्या अंगांत कसब व पराक्रम असेल तर, तो कसाही काफरांच्या तावडींतून सुटून येईल; आणि तसें नसेल तर, ईश्वराच्या इच्छेनें व पैगंबराच्या कृपेनें कॉन्स्टांटिनोपलच्या राजवाड्यावर तुर्की निशाण फडकूं लागेपर्यंत त्यानें तेथेंच स्वस्थ पडून राहिलें पाहिजे. अर्थात् लॉर्ड मॅन्युअलना सुलतानाच्या स्वारीबरोबर वेढ्याच्या ठिकाणीं यावें लागलें, आणि आपल्या आवडत्या जन्मभूमीची नासाडी करण्याच्या कामीं मुसलमानांचे चाललेले आटोकाट प्रयत्न मुकाट्यानें पहात बसणें भाग पडलें. तथापि त्यांतल्या त्यांत

आपल्या बांधवांना थोडी बहुत मदत करण्याची तजवीज त्यांनीं तेथें बसून चालविलीच होती. कालीलपाशा नांवाचा सुलतानाच्या सैन्यांतील एक कामगार त्यांनीं अंशतः प्रेमानें व अंशतः द्रव्यदानानें वश करून घेतला. त्या उभयतांची वारंवार एकांतीं समक्ष गांठ पडणें जरी शक्य नव्हतें, तरी पाशाच्या एका विश्वासू खोजाच्यानें त्यांचा विचारविनिमय गुप्त रीतीनें चालत असे.

युडोशिया आपल्या आईबापांसह लॉर्ड मॅन्युअलच्या वाड्यांतच रहात होती. परंतु लॉर्ड मॅन्युअल यांची नूर्त तरी मुक्तता होण्याचा संभव नाही असें समजल्यावर, तिला व तिच्या आईला त्या वाड्यांत राहणें पसंत पडेना. कोतवाल कॉनियॅटीस ह्यांनीं व सर एडवर्डनींही त्यांची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्या आपला आग्रह सोडीनात, तेव्हां नाइलाज होऊन, सर एडवर्डनीं त्यांची एका स्वतंत्र वाड्यांत सर्व तजवीज लावून दिली. सिलिव्हरी गांव मुसलमानांनीं काबीज केलें असल्यामुळें, व कॉन्स्टांटिनोपलला शत्रूचा वेढा पडला असल्यामुळें, त्यांना आतां शहर सोडून जातां येणें शक्यच नव्हतें.

लेफटेनंट कॉटारी आपल्या प्रियकर युडेशियाला व तिच्या आईला घेऊन कॉन्स्टांटिनोपलला परत आल्यानंतर थोड्याच दिवसांत त्याचा युडेशियाशीं विवाह झाला. धर्मगुरु डेमिट्रियस हेही त्यांच्या बरोबरच आले होते, त्यांनींच तो समारंभ शक्य तितक्या साध्या रीतीनें पार पाडला. सर एडवर्डकडून बादशहांना ती गोष्ट कळल्यावर त्यांनीं त्या वधुवरांना बहुमोल देणग्या दिल्या.

डयूक लियॉनशियस व त्यांची पत्नी कॉन्स्टांटिनोपलहून पळून गेल्यावर त्यांना पकडून आणण्याची पुष्कळ खटपट करण्यांत आली, पण ते कोणाच्या हातीं न लागतां आड्रियानोपलला सुरक्षित जाऊन पोंचले. तेथें लियॉनशियसनें सुलतानांचीं आर्जवें करून त्यांच्या लष्करांत नोकरी पत्करली. परंतु हें त्याचें हलकट वर्तन त्याची पत्नी ॲना हिला मुळींच आवडलें नाहीं. पतीच्या ह्या नीच व देशद्रोही कृत्याबद्दल तिला अतिशय वाईट वाटलें. लियॉनशियसनें कॉन्स्टांटिनोपल शहराची तटबंदीच्या कमकुवत भागाची, शहरांतील दुफळीची, आणि सांपत्तिक स्थितींची सर्व

अंतस्थ माहिती सुलतानांस उघड सांगितली. आणि शहर काबीज करण्याच्या कामीं पूर्ण मदत करण्याचें वचन दिलें, तेव्हां सुलतानांनीं त्याला आपल्या लष्करांत एक हुद्याची जागा दिली; तथापि त्याच्या हालचालींवर सक्त नजर ठेवण्याचीही एका विश्वासू पात्रास गुप्तपणें ताकीद करून ठेवली. सुलतानांनीं त्याला मुसलमानी धर्म स्वीकारण्याविषयींही फाराच आग्रह केला व त्यानेंही ती गोष्ट मान्य केली. पण कॉन्स्टांटिनोपल काबीज होईपर्यंत प्रत्यक्ष धर्मांतर न करितां, आपण ख्रिस्ती असल्याचें दाखविणेंच सुलतानास अधिक फायद्याचें होईल अशी त्यांची समजूत करून देऊन, लियॉनशियसनें तो प्रसंग त्या वेळेपुरता टाळला. त्याला स्वधर्माची कांहीं चाड होती, असें मुळींच नाहीं, पण सुलतानाला ह्या स्वारींत कितपत यश येतें हें निश्चित समजणें शक्य नसल्यामुळें, त्याचें मन अद्यापि थोडें कचरत होतें.

लेडी ॲना ह्या वेळीं गरोदर असून, तिचा प्रसूतिकाल समीप येत चालला होता. दिवसेंदिवस आपल्या पतीचें आपल्याकडे दुर्लक्ष होत आहे, किंबहुना तो आपला तिरस्कार करूं लागला आहे असें तिच्या नजरेस येऊं लागलें, तेव्हां तिला फार दुःख झालें. पुढें ती प्रसूत होऊन तिला पुत्र झाला, तेव्हांही लियॉनशियसनें तिची मुळींच वास्तपूस केली नाहीं. ह्यावरून त्याचें प्रेम आपल्यावरून उडून दुसरीकडे कोठें तरी गुंतलें असावें, अशी तिला शंका येऊं लागली. पुढें कांहीं दिवसांनीं ती हिंडूं फिरूं लागल्यावर तर एका तुर्की तरुणीला पतीनें आपल्या घरांतच आणून ठेवलें असून, तो पूर्णपणें तिच्या पाशांत सांपडला आहे, अशी तिची खात्री झाली. ह्या गोष्टीनें मात्र तिच्या दुःखाचा व संतापाचा कळस झाला. तिला आतां पतीजवळ राहणें असह्य वाटूं लागलें. शेवटीं पतीबरोबर भांडून व त्याची निर्भर्त्सना करून, ती आपल्या तान्ह्या मुलासह गुप्तपणें कॉन्स्टांटिनोपलला परत निघून आली. त्या वेळीं रशीदपाशा व लॉर्ड मॅन्युअल ह्यांच्या आदलाबदलीच्या संबंधानें वारंवार रोमन मंडळी सुलतानाच्या छावणींत येऊन परत जात, त्यांच्या बरोबर तिला शहरांत सुरक्षितपणें प्रवेश करितां आला. ॲना निघून गेल्याबद्दल लियॉनशियसला वाईट न वाटतां, उलटा आनंदच झाला. कारण त्याला

आतां मनमानेल तसा धिंगाणा घालण्यास मुळींच प्रतिबंध उरला नाहीं. ह्यानंतर लवकरच वेढ्याचें काम सुरू झालें. त्यांत लियॉनशियसची सुलतानास बरीच मदत होऊं लागली, त्यामुळें सुलतानाजवळ दिवसेंदिवस त्याचें महत्त्व वाढतच चाललें किंवा सुलतानांनीं तसें त्याला भासविलें व तें त्याला खरें वाटूं लागलें.

---

## प्रकरण १६ वें.

## जिवावरची कामगिरी.



एकदां तुर्की सैन्याचा जोराचा हल्ला सुरू झाला असतां कॉन्स्टंटाईन बादशहा आपल्या जवळच्या मुत्सद्यांकडे वळून म्हणाले—"सिलिव्हरी वेस कोणाच्या ताब्यांत आहे ?"

लॉर्ड फ्रांझा—"तेथें सेनापति स्वतः उभे आहेत."

बादशहा—"पण इकडे आड्रियानोपल वेशीकडे बचावाचें काम जोरांत दिसत नाहीं ! तेथें तोफा व बंदुका अगदींच बंद पडलेल्या दिसतात ! असें कां झालें ?"

इतक्यात सर एडवर्ड तेथें आले. बादशहांचे उद्गार ऐकून ते म्हणाले—"सरकार, दारूगोळ्यांचा खर्च काटकसरीनें करावा लागत आहे ! मी हा तिकडूनच आलों, तेथें शत्रूच्या हल्ल्याचा जोर बराच कमी झाला आहे, तेव्हां उगीच आपला दारूगोळा कां खर्च करावा ? गेल्या आठवड्याइतकी दारू ह्या आठवड्यांत खर्च झाली तर, पुढील आठवड्यास मुळींच कांहीं उरणार नाहीं !"

बादशहा खिडकींतून दूरवर पाहून म्हणाले—"तो पहा हरामखोर, बालथा ओगली ! आपल्या लोकांसह शहरावर सैतानासारखा तुटून पडत आहे ! चला चला, मित्रहो, आतां येथें बसून उपयोग नाहीं, तटबंदीकडे गेलें पाहिजे ! सर एडवर्ड, तुम्ही सुवर्णशृंगालकडे जा, आणि तेथील हुजुरातीच्या लोकांपैकीं आणतां येतील तितके लोक घेऊन या !

बंदराच्या बाजूनें कांहीं तूर्त भीति नाहीं !"

"आज्ञा सरकार !" असें म्हणून सर एडवर्ड निघून गेल्यावर, बादशहा व लॉर्ड फ्रांझा तटाकडे आले. तोफांचा गडगडाट चोहोंकडून कानठाळ्या बसवीत होता, धुरानें जिकडे तिकडे धुंद झालें होतें, बाणांचा व गोळ्यांचा एकसारखा वर्षाव होत होता, तथापि बादशहा व लॉर्ड फ्रांझा तटबंदीवरून आपल्या सैनिकांचा पराक्रम अवलोकन करीत व त्यांना उत्तेजन देत, धिमेपणानें व बेफिकिरीनें चालले होते.

युद्धाची चोहोंकडे धुमश्चक्री उडाली होती. तुर्कांच्या एखाद्या गोळ्याचा अचुक नेम लागला किंवा कोठें तट ढांसळला, कीं ते 'अल्लाहो अकबर!' अशी मोठ्यानें गर्जना करीत. त्याचप्रमाणें रोमन सैन्यानें तुर्की तोफ बंद पाडली, किंवा एखाद्या मुसलमानी तुकडीचा हल्ला परतविला, कीं ते ईश्वराचा व बादशहाचा जयजयकार करीत !

एका ठिकाणचा धुराचा लोट वाऱ्यानें उडून जातांच, बादशहा तिकडे चौकस दृष्टीनें पहात म्हणाले—"हें काय ? ही कांहीं तरी नवी योजना दिसते ! सेंट निकोलसच्या बुरजावर हल्ला चढविण्याचा मुसलमानांचा बेत आहे वाटतें !"

लॉर्ड फ्रांझा तिकडे लक्षपूर्वक पाहून म्हणाले—"होय सरकार ! तसाच त्यांचा उद्देश दिसतो ! आणि ही सल्ला त्यांना त्या हरामखोर देशद्रोही लियॉनशियसनेंच दिलेली असावी ! कारण, राजवाड्यांतील एका मेजवानीच्या प्रसंगीं अशा ठिकाणच्या व अशा प्रकारच्या हल्ल्याचें रहस्य सेनापति जस्टिनियन आपल्याला समजून सांगत होते, त्या वेळीं तो दगलबाज कोल्ह्यासारखे कान टवकारून, तें लक्षपूर्वक ऐकत होता!"

बादशहा—"सेनापति जस्टीनियन कोठें आहेत ?"

कॉंटारी जवळच होता, तो म्हणाला—"ते नुकतेच पलीकडील एका बुरजावर गेले आहेत. त्यांना बोलावूं का ?"

बादशहा—"नको नको ! हे पहा सर एडवर्ड आले ! तेच ही काम-गिरी बजावतील !"

सर एडवर्ड—"काय आज्ञा आहे सरकार ?"

बादशहा—"तें पहा ! तुर्की लोक सात आठ तोफा एकदम सेंट

निकोलसच्या बुरजावर रोखीत आहेत, त्या ताबडतोब बंद पाडल्या पाहिजेत. नाहीं तर हा बुरूज टिकण्याची आशा नाहीं ! ”

सर एडवर्ड–“ ठीक आहे सरकार, आतांच ती तजवीज करितों ! लेफ्टेनंट कॉटारी, रिचर्ड बस्टों पलीकडील बुरजावर आहे, त्याला पंचवीस हुजुरात स्वारांसह बोलावून आण, आणि तुझ्या हाताखालचे पंचवीस लोक घे ! आपण, एकदम त्या तोफखान्याच्या तुकडीवर हल्ला चढवूं ! आणि जो कोणी त्यानीच लियॉनशियसचें डोकें कापून आणील त्याला शंभर मोहोरा सरकारांकडून इनाम मिळतील ! ”

थोडयाच वेळांत सेंट निकोलसच्या बुरजाजवळची वेस एकदम उघडली गेली, आणि सर एडवर्ड आपले दोन सहायक व पन्नास स्वार ह्यांसह वेगानें बाहेर पडले, आणि तुर्की अंमलदार आपल्या तोफा रोखण्याच्या नादांत असतां, त्यांच्यावर एकदम चाल करून गेले. तुर्क बेसावध असल्यामुळें, ह्या आकस्मिक हल्ल्यानें प्रथम कचरले. सर एडवर्डच्या टोळीनें त्यांच्यावर जोराचा मारा करून, त्यांना तोफा सोडून मागें हटावयास लावलें. तेव्हां रोमन सैनिकांनीं मोठा जयजयकार केला.

इतक्यांत ड्यूक लियॉनशियसला तुर्की लष्करी वेषांत पाहून, सर एडवर्ड त्याच्या अंगावर धांवून जाऊन संतापानें ओरडले–“ अरे ए देशद्रोही, निमकहराम, हलकट कुतरडया, उभा रहा ! असा नामर्दासारखा पळून जाऊं नको ! तुला आपल्या नीच कर्मांचें प्रायश्चित्त भोगलेंच पाहिजे ! ”

पण लियॉनशियस नुसतें मागें वळून देखील न पाहतां, तडक पसार झाला. तुर्क लोकही कच खाऊन, तोफा सोडून पळून जाण्याच्या बेतांत आले, तोंच बालथा ओगली दोनशें बल्गेरियनस्वारांनिशीं त्यांच्या मदतीला धांवून आला. ह्यामुळें त्यांची संख्या चौपटीनें वाढली, तेव्हां त्यांनीं रोमन स्वारांवर उलट हल्ला चढविला. तथापि रोमन स्वार बिलकुल डगमगले नाहींत. तितक्यांत बालथा ओगली व सर एडवर्ड यांची समोरासमोर गांठ पडली. बालथा हा बल्गेरियन सरदार असून, तुर्कांना मिळाला होता. तो राक्षसासारखा गलेलठ्ठ असून, त्याचा घोडाही दणकट व मजबूत होता. त्यानें एकदम आपल्या जंगी तरवारीचा सर एडवर्डच्या

मस्तकावर वार मारला. तो जर लागला असता तर, सर एडवर्डचें मस्तक तत्काळ दुभंग होऊन गेलें असतें. पण सर एडवर्डनीं त्याचा वार मोठ्या शिताफीनें चुकवून आपल्या ढालीवर घेतला, आणि आपली तेजस्वी समशेर त्याच्या छातीवर फेंकली. तेणेंकरून बालथाच्या अंगांतील चिलखत तुटून जाऊन त्याला थोडीशी जखमही झाली. सर एडवर्डचें हें विलक्षण कौशल्य व आचाट धैर्य पाहून, बालथा ओगली आश्चर्यचकित होऊन मागें सरला.

हा युद्धचमत्कार बादशहा व लॉर्ड फ्रांझा तटावरून लक्षपूर्वक पहात होते. सर एडवर्डचा हा पराक्रम पाहून बादशहा म्हणाले—"खरोखर, ह्या परकीय सरदारानें आम्हां सर्वांना पुरें लाजविलें! जस्टीनियन शूर आहे खरा, पण सर एडवर्डच्या अंगचें धैर्य व साहस त्याच्या दसपट अधिक आहे! मला वाटतें, आपलीं जहाजें अद्यापि कां आलीं नाहींत, ह्याचा तपास करण्याची कामगिरी सर एडवर्डलाच सांगावी! तीं जहाजें लवकर आलीं तरच अन्नसामग्रीचा व दारूगोळ्यांचा पुरवठा होणार!"

लॉर्ड फ्रांझा—"पण सरकार, पुनः असाच एखादा जरूरीचा प्रसंग आला तर, दुसरे दहा-वीस कामगार मिळून तरी, एकट्या सर एडवर्डची जागा भरून काढूं शकतील कीं नाहीं, कोण जाणें!"

बादशहा—"तें पहा, आमचे लोक तुर्की तोफांचे काने फोडीत आहेत! शाबास वीर हो! तुमच्यावर टाकलेल्या भरंवशाचें तुम्हीं चीज केलें खरें! बरें, प्रधानजी, तुर्की आरमाराची फळी फोडून, आपल्या सामग्रीच्या जहाजांना वाट करून देण्याची माझी मसलत तुम्हांला कशी काय वाटते?"

लॉर्ड फ्रांझा—"साधली तर उत्तमच आहे सरकार, पण अवघ्या पांच जहाजांनीं, तीनशें तुर्की जहाजांची सांखळी तोडण्याचा प्रयत्न करणें फार धोक्याचें दिसतें!"

बादशहा—"पण धाडस केल्याशिवाय सामग्री तरी कशी मिळणार? मला वाटतें, ह्या तुर्की आरमाराच्या सांखळीमुळेंच आमचीं जहाजें अडकून राहिलीं असतील! त्यांना इकडून मदत पाठविल्याशिवाय तीं आंत येणें शक्य नाहीं! आणि कोणी तरी हें धाडस करणें

भागच आहे!"

" लॉर्ड फ्रांझा--" तर मग त्या कामाला सर एडवर्डशिवाय दुसरा कोणीही लायख नाहीं!"

बादशहा--" ओहो! ते पहा, आपले लोक तुर्की लोकांना मार्गे हाटवून परत फिरले! खरोखर, आज सर एडवर्डनें अजब पराक्रम केला! त्यांना त्यांच्या कामगिरीबद्दल कांहीं तरी योग्य बक्षीस दिलें पाहिजे!"

लॉर्ड फ्रांझा--"खरेंच सरकार, आजची त्यांची कामगिरी पहिल्या प्रतीचें बक्षीस देण्यासारखी झाली, ह्यांत शंका नाहीं."

बादशहा--" मी तुम्हांला एक विनंति करणार आहें, ती तुम्ही मान्य कराल का?"

लॉर्ड फ्रांझा--" हें काय सरकार? आपली आज्ञा ह्या दासाला शिरसामान्य आहे!"

बादशहा--" तें खरें, पण माझी ही सरकारी कामासंबंधीं आज्ञा नसून, तुमच्या खासगी गोष्टीविषयीं विनंति आहे!"

लॉर्ड फ्रांझा--" कसलीही असली तरी, आपण माझे धनी आहां, आपला शब्द मोडण्याची कल्पनाही माझ्या मनांत येणार नाहीं!"

बादशहा--" प्रधानजी, सर एडवर्ड याचें तुमच्या कन्येवर अत्यंत प्रेम जडलें आहे, आणि थियोडोराही त्यांना नापसंत करील असें मला वाटत नाहीं. ही गोष्ट मला बरेच दिवसांपासून माहीत आहे! ह्या शरीरसंबंधास तुमची कां हरकत असावी, हें कांहीं कळत नाहीं!"

लॉर्ड फ्रांझा कांहीं वेळ विचार करून म्हणाले--" सरकार, खुद्द सर एडवर्डसंबंधानें माझी कांहींच तक्रार नाहीं! परंतु आपल्या दरबारच्या एका जुन्या सरदार घराण्यांतील कन्या, एका परदेशस्थ अज्ञातकुल तरुणास दिली असतां, आपल्याला व दरबारच्या इतर सरदार मंडळीस तें पसंत पडणार नाहीं, अशी माझी समजूत होती."

बादशहा--" हेः! ही शंका व्यर्थ आहे! सर एडवर्डसारखा इमानी, पराक्रमी व दिलदार तरुण, हलक्या सलक्या कुळांत निर्माण होणें शक्यच नाहीं! ते परदेशस्थ असले तरी कुलीन आहेत ह्यांत

मुळींच संशय नाहीं! शिवाय, नुसतें कूळ पाहून काय उपयोग? लियॉनशियस्चें घराणें हलकें आहे कां? पण त्याची स्वतःची किंमत तुम्ही काय मानतां? प्रधानजी, मी खरोखर सांगतों कीं, सर एडवर्डसारखा जामात मिळणें हें महद्भाग्य होय! मला जर मुलगी असती, तर मीं ती एखाद्या राजपुत्राला देण्यापेक्षां सर एडवर्डलाच मोठ्या आनंदानें दिली असती!"

लॉर्ड फ्रांझा—"पुरे पुरे, सरकार, माझा सर्व संशय आतां दूर झाला! आपल्या मनाची जर इतकी तयारी आहे तर, मीही आतां त्या बाबतींत कांहीं शंका मनांत आणीत नाहीं. आपल्या इच्छेप्रमाणें मी आपली कन्या सर एडवर्डना देण्यास तयार आहें!"

बादशहा—"सेनापतींच्या आजच्या पराक्रमाबद्दल हेंच बक्षीस त्यांना योग्य आहे! ते पहा तुर्क लोक छावणीकडे परत निघाले! आजची कामगिरी पुरी झाली असें दिसतें!"

थोड्याच वेळांत सर एडवर्ड आपल्या विजयी तुकडीसह शहरांत परत आले, आणि बादशहांना मुजरा करून आदबीनें उभे राहिले.

"शाबास, सेनापति!" बादशहा त्यांचा हात धरून म्हणाले—"आज तुम्हीं साहसाची आणि शौर्याची शिकस्त केली! ईश्वरकृपेनें आज तर फत्ते झाली! आतां तुम्ही आणि प्रधानजी किल्ल्याकडे चला, तुमच्याशीं एका महत्त्वाच्या बाबतींत बोलावयाचें आहे!"

बादशहा पुढें निघाले व लॉर्ड फ्रांझा आणि सर एडवर्डही त्यांच्या पाठोपाठ चालले. तिघेही सेंट रोमॅनसच्या किल्ल्यांत आले. तेथें एका खोलींत बादशहाच्या खासगी दरबाराकरितां तात्पुरती व्यवस्था केलेली होती.

बादशहा आपल्या दोघां मंत्र्यांचें स्वागत करून म्हणाले—"सेनापति, तुमच्यासारखे इमानी व पराक्रमी सरदार अद्यापिही राजधानीचें संरक्षण करूं शकतील, असा मला भरंवसा आहे. पण अन्नसामग्री व दारूगोळा अगदींच संपत आला आहे, ह्याची जर लवकर भरती झाली नाहीं, तर पुढें कसें होणार? सामग्रीकरितां जिनोवाकडे पाठविलेलीं जहाजें लवकर बंदरांत सुरक्षित परत आलीं पाहिजेत, त्यावांचून कसें चालणार?"

सेनापति—" त्या जहाजांची कांहीं बातमी तरी आली आहे का ?"

बादशहा—" छे, मुळींच नाहीं ! तथापि ह्या तुर्की आरमाराच्या भीतीनें तीं मागें थबकून राहिलीं असावीं, असा माझा तर्क आहे. त्याशिवाय त्यांना इतका विलंब लागावयाचा नाहीं."

सर एडवर्ड—" तसें असेल तर त्यांना इकडून तावडतोब थोडीबहुत तरी मदत पाठविली पाहिजे !"

बादशहा—" होय ! पण ही कामगिरी अत्यंत धोक्याची आहे. ती पार पाडावयास अत्यंत निधड्या छातीचा वीर पाहिजे !"

सेनापति—" मला सरकारची आज्ञा झाल्यास, मी स्वतःला मोठा धन्य मानीन ! किंबहुना आजच्या माझ्या अल्पस्वल्प चाकरीचें हें बक्षिसच, असें मी समजेन !"

बादशहा स्मितपूर्वक म्हणाले—" छे छे, आजच्या तुमच्या पराक्रमाचें बक्षीस आम्हीं निराळेंच ठरविलें आहे, आणि तें तुम्हांलाही सर्वथैव पसंत पडेल, अशी आमची खात्री आहे ! होय ना प्रधानजी ?"

लॉर्ड फ्रांझा गंभीर स्वरानें म्हणाले—" सर एडवर्ड, माझ्या कन्येवर आपलें प्रेम जडलें असल्याचें आपण पूर्वी मला कळविलें होतें, आणि तें अजूनही तसें दृढ असेल, यांत शंका नाहीं, त्याप्रमाणें आपण ह्या कामगारींत यश मिळवून सुखरूप परत आल्यावर, मीं आपली कन्या तुम्हांला अर्पण करण्याचें योजिलें आहे ! आणि त्या बाबतींत सरकारांचीही पूर्ण संमति आहे !"

सर एडवर्ड—" आहाहा, प्रधानसाहेब, ही आपली मोठीच कृपा ! जन्मभर आपली सेवा करण्यांत, आणि आपल्या कन्येला सुख देण्यांत मी ह्या देहाचें सार्थक करीन ! सरकारांनीं तर ह्या कामीं आपली सहानुभूति दाखवून मला कायमचा ऋणी करून सोडलें आहे, आणि त्यामुळें सरकारची चाकरी बजावण्यास मला दसपट अधिक हुरूप आली आहे ! बरें, सरकार, मला केव्हां निघावयाची आज्ञा होत आहे ?"

बादशहा—" आज रात्रींच निघाल्यास बरें, असें मला वाटतें, हें काम फार सावधगिरीनें व गुप्तपणें व्हावयास पाहिजे, हें तुम्हांस सांगावयास नकोच !"

सर एडवर्ड—" आज्ञा सरकार ! मी निघण्याची तयारी करितों. रिचर्ड बर्स्टोला मात्र बरोबर नेण्याची परवानगी असावी. त्याचें इमान हुशारी व धाडस ह्यापूर्वींच सरकारच्या नजरेस आलेली आहे ! "

बादशहा—" ठीक आहे, खुशाल घेऊन जा; आणि ह्या कामगिरी-बद्दल त्याला मी उत्तम बक्षीस देणार आहें असें सांगा. जा आतां, आपल्या तयारीला लागा. संध्याकाळीं मला वाड्यांत भेटा, म्हणजे जिनोवाहून येणाऱ्या सर्व जहाजांचा पूर्ण अखत्यार तुमच्याकडे दिल्या-बद्दलचा हुकूम तुम्हांला देईन ! "

सर एडवर्ड—" प्रधानसाहेब, आतां आपल्याला एक विनंति आहे. ह्या जिवावरच्या कामगिरीवर निघण्यापूर्वीं, आपल्या कन्येची एकवार भेट घेऊन तिच्याशीं दोन शब्द बोलावयास परवानगी असावी. "

लॉर्ड फ्रांझा कांकू करूं लागले, हें पाहून बादशहा हंसून म्हणाले " काय हरकत आहे ? तरुण अंतःकरणांत प्रिय दर्शनानें विशेष उल्हास उत्पन्न होत असतो ! प्रधानजी आपण कृपा करून त्यांची विनंति मान्य कराल, अशी मला आशा आहे ! "

लॉर्ड फ्रांझा—" ठीक आहे. आपण खुशाल तिची भेट घेऊन व माझा आशीर्वाद घेऊन, मग आपल्या कामगिरीवर जा ! "

सर एडवर्ड मोठ्या आनंदानें बादशहांचा व लॉर्ड फ्रांझांचा निरोप घेऊन आपल्या बंगल्यांत परत आले, व तत्काळ रिचर्ड बर्स्टोला बोला-वणें पाठवून त्याची वाट पहात बसले.

थोड्याच वेळांत रिचर्ड बर्स्टो आंत येऊन मुजरा करून उभा राहिला. सर एडवर्डनीं त्याचें स्वागत करून, त्याला नवीन कामगिरीची हकीकत थोडक्यांत सांगितली. नंतर ते म्हणाले—" रिचर्ड, ह्या कामगिरीवर मीं तुलाच बरोबर नेण्याचें ठरविलें आहे. तूं किंवा कॉंटारी ह्यांच्या इतका तिसऱ्या कोणावरती माझा भरंवसा नाहीं. पण कॉंटारीचें नुकतेंच लग्न झालें असल्यामुळें, इतक्यांतच त्याची व त्याच्या पत्नीची ताटातूट करणें योग्य नाहीं, म्हणून मीं तुझीच योजना केली आहे ! "

रिचर्ड—" आहाहा, धनीसाहेब, मला आपण एवढा मान देऊन, ह्या महत्त्वाच्या कामगिरीवर माझीच निवड केली, ह्याबद्दल मला फार

आनंद होत आहे, आणि मी आपला अत्यंत आभारी आहें ! मला आपण बरोबर घेतलें नसतें, तर वाईट वाटलें असतें, किंबहुना रागही आला असता ! ”

सर एडवर्ड हंसून म्हणाले—“ जा तर, आपल्या तयारीला लाग. आपल्याला वेषांतर करून, गुप्तपणें बाहेर पडलें पाहिजे. हें लक्षांत ठेव. आड्रियानोपलच्या कामगिरींत जशी अक्कल व जितकें साहस करावें लागलें तसाच हाही प्रसंग आहे ! ”

रिचर्ड—“ पण त्या वेळीं मी एकटाच होतों ! आतां आपण बरोबर असल्यामुळें मला मुळींच काळजी उरली नाहीं ! ”

रिचर्ड निरोप घेऊन निघून गेल्यावर, सर एडवर्डनींही आपली निघण्याची थोडीबहुत तयारी केली. नंतर पोषाख बदलून, ते आपल्या हृदयेश्वरीच्या दर्शनास निघाले.

लॉर्ड फ्रांझांच्या वाड्यांत येतांच तेथील जुना नोकर बलारम त्यांचा दोस्तच त्यांना भेटला. त्याच्या जवळ चौकशी केल्यावर थियोडोरा; बागेंत एकटीच बसली असल्याचें त्यांना समजलें. तेव्हां ते तसेच मोठ्या उत्सुकतेनें बागेकडे गेले.

सायंकाळचा मंद वारा सुटला होता, आकाशांत एखाददुसरी चांदणी कोठें कोठें चमकूं लागली होती, बागेंतील नुकत्याच उमललेल्या सुवासिक फुलांचा सुगंध वायुलहरीबरोबर चोंहोंकडे पसरत होता, दिवसभर उडालेल्या दारूगोळ्यांच्या धुराचे अवशेष दक्षिणेकडील आकाशांत क्वचित् तरंगत होते, अशा वेळीं थियोडोरा बागेमध्यें आपल्याशींच विचार करीत हळू हळू फिरत होती. चालू असलेल्या लढाईसंबंधाचे विचार तिच्या मनांत घोळत होते. शहराचें रक्षण कसें होईल, आपले परमपूज्य बादशहा व प्रियसुहृज्जन ह्या संकटांतून सुरक्षितपणें कसे पार पडतील ह्याची तिला अत्यंत काळजी लागली होती.

थियोडोरा ह्याप्रमाणें विचार करीत फिरतां फिरतां, मागें सहा महिन्यांपूर्वीं ज्या ठिकाणीं सेनापति सर एडवर्ड यांची अकस्मात भेट झाली होती, त्या चौथऱ्याजवळ ती सहज आली. त्याबरोबर तिला त्या गोष्टीचें स्मरण होऊन, तरुण सेनापतींची मनोहर वीरमूर्ति तिच्या डोळ्यां-

पुढें उभी राहिली. इतक्यांत, " थियोडोरा, प्राणप्रिय थियोडोरा, " असे शब्द तिच्या कानांवर आले. त्याबरोबर ती दचकून मागें वळून पाहूं लागली, तों सेनापति सर एडवर्ड समोर उभे असलेले तिच्या दृष्टीस पडले. त्याबरोबर तिचें मुखकमल आनंदानें प्रफुल्लित व लज्जेनें आरक्त झालें आणि ती खालीं मान घालून स्तब्ध उभी राहिली.

सर एडवर्ड तिच्याजवळ येऊन म्हणाले—" प्रिये, तुझ्या वडिलांच्या परवानगीनें आणि संमतीनेंच मी आज तुझ्या दर्शनास आलों आहें. आतां तरी माझ्याशीं दोन शब्द बोलावयास कांहीं हरकत नाहींना ? "

थियोडोरा चोर दृष्टीनें आपल्या प्रियकराकडे पहात हळूच म्हणाली—" माझ्याकडून कधीं हरकत होती ? "

आपल्या परम प्रिय हृदयदेवतेच्या मुखांतील ही अमृतवाणीं एकतांच सर एडवर्डचें अंतःकरण हर्षानें भरून गेलें. ते थियोडोराचा हात धरून प्रेमभरानें म्हणाले—" लाडके, तूं आज मला धन्य केलेंस ! "

त्यानंतर तीं उभयतां परस्परांशीं प्रेमाच्या गोष्टी बोलत बागेंत फिरूं लागलीं. त्या प्रेमानंदांत त्यांचीं अंतःकरणें इतकीं एकरूप व तल्लीन होऊन गेलीं कीं, त्यांना क्षणभर बाह्य जगाचा पूर्णपणें विसर पडला.

कांहीं वेळानें वेशी बंद होण्याची सायंकाळची सातांची तोफ झाली. त्या आवाजानें भानावर येऊन, सर एडवर्ड आपल्या भावी पत्नीला गंभीर स्वरानें म्हणाले—"प्रिये, आतां मला तुझा निरोप घेतला पाहिजे ! आज रात्रींच मला एका कामगिरीवर जावयाचें आहे ! "

" कामगिरीवर ? " थियोडोरा चकित स्वरानें उद्गारली—"कोठें बाहेर-गांवीं जावयाचें आहे कीं काय ? म्हणजे आपण आज फक्त माझा निरोप घ्यावयासाठींच इकडे येण्याची तसदी घेतली वाटतें ? "

सर एडवर्ड—" लाडके, ह्यापुढें तुझा वियोग मला किती असह्य होणार आहे, हें तुझें शुद्ध अंतःकरणच तुला सांगेल ! तथापि कोणतीही सुखदुःखाची गोष्ट वीर पुरुषाच्या कर्तव्याच्या आड येऊं शकत नाहीं, हें तुला माहीतच आहे ! आणि ही महत्वाची कामगिरी जर माझ्याकडे आली नसती, तर इतक्या लवकर तुझें दर्शन होण्याचा संभव देखील

नव्हता ! ”

नंतर सर एडवर्डनीं आपल्या कामगिरीची हकीकत आपल्या भावी पत्नीला थोडक्यांत निवेदन केली व पुढें म्हणाले— “ एवढी कामगिरी करून परत येतांच तुझ्या वडिलांनीं तुझा हात माझ्या हातीं देण्याचें वचन दिलें आहे ! बादशहांच्या रदबद-लीनेंच ही गोष्ट इतकी सुसाध्य झाली असली पाहिजे ! आणि त्यांच्याच शिफारशीवरून आजच्या तुझ्या प्रिय दर्शनाचा मला लाभ झाला ! ”

थियोडोरा—“ पण हें बिकट काम आपल्या एकट्याच्या हातानें कसें पार पडणार ? एवढ्या मोठ्या तुर्की आरमाराची नजर चुकवून, आपण गुप्तपणें कसे बाहेर जाऊं शकणार ? आपण ह्या प्रयत्नांत कदाचित् शत्रूच्या तावडींत सांपडाल कीं काय, अशी मला भीति वाटते ! ”

सर एडवर्ड—“ छे छे, लाडके, इतकें भिण्याचें कारण नाहीं. रिचर्ड बर्स्टो माझ्याबरोबर आहे. तो इतका हुषार व धाडसी आहे कीं, त्याच्या मदतीनें मी कसल्याही संकटांतून पार पडेन, अशी माझी खात्री आहे ! शिवाय हें काम इतकें महत्वाचें आहे कीं, तें माझ्या हातून योग्य रीतीनें पार पडलें म्हणजे तुलाही त्याबद्दल अभिमानच वाटेल ! ”

थियोडोरा—“ प्रियकरा, आपल्या पराक्रमाबद्दल माझी पूर्ण खात्री आहे, पण शौर्याच्या नादांत अविचार किंवा बेसावधपणा होऊं नये एव-ढीच विनंति आहे ! ”

सर एडवर्ड—“ त्याची काळजी नको ! तुझी प्रेममय मूर्ति माझ्या अंतःकरणांत रात्रंदिवस वास करीत आहे. ती मला विवेकदीपिकेप्रमाणें योग्य मार्ग दाखवील. आणि ईश्वरकृपेनें पुनः आपली भेट लवकरच होईल ! येतों तर आतां उशीर झाला, बादशहा सरकार माझी वाट पहात असतील ! ”

सर एडवर्डनीं थियोडोराला आलिंगन देऊन, तिच्या अधरोष्ठाचें एक चुंबन घेतलें, आणि तत्काळ ते तेथून चालते झाले. लॉर्ड फ्रांझांच्या वाड्यां-तून बाहेर येतांच रिचर्ड बर्स्टो त्यांची वाट पहात उभा असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. नंतर ते दोघेही राजवाड्याकडे निघाले.

रिचर्ड जातां जातां हळूच म्हणाला—“ धनीसाहेब, मला वाटतें, आपण

होडींतून जाण्यापेक्षां खुष्कीच्या रस्त्यानें गेलों तर अधिक सोईचें होईल ! आपण उभयतांही तुर्की वेष धारण करूं ! मला तुर्की वेषांत कोणीही ओळखणार नाहीं, ही आपली खात्री आहेच. आपण फक्त तुर्की वेष घ्यावयाचा, आणि कोठें बोलण्याचा प्रसंग आलाच तर माझ्याकडे बोट दाखवावयाचें, म्हणजे झालें ! ”

सर एडवर्ड—“ कांहीं हरकत नाहीं, ही युक्तिही ठीक आहे, सरकारांना जर ती पसंत असली, तर तसेंच करूं ! ”

राजवाड्यांत गेल्यावर सेनापतींनीं आपण आल्याची वर्दी दिली. तत्काळ त्यांना बादशहाकडून बोलावणें आलें. तेव्हां रिचर्डला बाहेरील दालनांत बसवून ते एकटेच आंत गेले.

बादशहांनीं सर एडवर्डचें स्वागत केलें. त्यांच्याजवळ ह्या वेळीं लॉर्ड फ्रांझा, शहरचे सर कोतवाल, सेनापति जस्टीनियन व आणखी एक दोन प्रमुख कामगार होते.

समोरच्या मेजावरील एक कागद सर एडवर्डच्या हातीं देऊन बादशहा म्हणाले—“ हें तुमचें अधिकारपत्र ! नियॉस येथें असलेल्या सर्व जहाजांचा पूर्ण अधिकार तुमच्याकडेच सोंपविला आहे ! आतां शक्य तितकें लवकर सामग्री घेऊन या ! आपल्या दारूखान्याचें व धान्याच्या कोठाराचेंही बहुतेक दिवाळें निघण्याची वेळ आली आहे ! ! ”

सर एडवर्ड तो कागद घेऊन बादशहास मुजरा करून म्हणाले—“ सरकारची आज्ञा शिरसावंद्य आहे ! मी शक्य तितकें लवकर सामग्रीचीं जहाजें घेऊन येतों, सरकारांनीं त्याबद्दल काळजी करूं नये ! ”

नंतर त्यांनीं आपला बेत, व जलमार्गानें जाण्यापेक्षां खुष्कीच्या मार्गानें जाण्यांत विशेष सोई काय आहेत, हें बादशहास समजावून सांगितलें.

सेनापति जस्टीनियन म्हणाले—“ खरेंच, सरकार, ही युक्ति बरी आहे ! दोन्ही मार्ग धोक्याचेच आहेत, तरी पण जलमार्गापेक्षां खुष्कीच्या मार्गांत धोक्याचा संभव कमी दिसतो ! ”

बादशहा—“ ठीक आहे, त्या मार्गानें चला ! कोणीकडून तरी काम फत्ते करून लवकर माघारे या म्हणजे झालें ! ”

सर एडवर्ड—“ तर मग सेनापतिसाहेब, सिलिव्हरी वेशीनें मला

एका नोकरासह बाहेर जाऊं देण्यासाठीं आपण एक परवाना लिहून द्या!"

जस्टीनियननीं बादशहाकडे पाहिलें. त्यांनींही संमति दर्शवितांच, त्यांनीं परवाना लिहून सर एडवर्डच्या स्वाधीन केला. नंतर ते म्हणाले—" सर एडवर्ड, तुम्हांला ही महत्वाची सुसंधि मिळाल्याबद्दल मला देखील तुमचा हेवा वाटत आहे! तुम्ही यशस्वी होऊन परत आलां म्हणजे सर्व शहराला प्राणसंकटांतून मुक्त केल्याचें श्रेय तुम्हांला एकट्यालाच मिळणार आहे!"

सर एडवर्डनीं तो परवाना घेऊन. त्यांना स्मितपूर्वक प्रणाम केला. नंतर बादशहा गंभीर स्वरानें म्हणाले—" कर्तव्य करणें, एवढेंच आपलें काम! यश देणार परमेश्वर समर्थ आहे! आमचा सर्व भार त्याच्यावरच आहे!"

बादशहांचा व इतर सर्वांचा निरोप घेऊन सर एडवर्ड बाहेर आले व त्यांनीं रिचर्डला ते दोन्ही कागद दाखवून सर्व हकीगतही सांगितली.

रिचर्ड आनंदानें म्हणाला—"हें ठीक झालें! आतां पहिली गोष्ट वेषांतराची! मी घरीं जाऊन, आपणां उभयतांच्या वेषांतराचें सर्व साहित्य घेऊन येतों!"

" ठीक आहे!" असें म्हणून, सर एडवर्ड रिचर्डसह राजवाड्यांतून बाहेर पडले. रिचर्ड तसाच आपल्या खोलीकडे गेला, व सर एडवर्ड आपल्या बंगल्यांत परत आले.

त्यानंतर एक तासाच्या आंतच दोघे तुर्की प्रवासी सर एडवर्डच्या बंगल्यांतून बाहेर पडले. ह्या वेळीं रात्र झाली असल्यामुळें, रस्त्यांत फारशी रहदारी नव्हती. तथापि एक दोन ठिकाणीं पहारेवाल्यांनीं त्यांना आडकिलें, तेव्हां त्यांना आपली ओळख देऊनच तेथून सुटका करून घ्यावी लागली. शेवटीं ते दोघे सिलिव्हरी वेशींत आले. तेथील पहारेवाले मात्र कांहीं केल्या वेस उघडीनात. शेवटीं पहाऱ्यावरील हवालदारास सर एडवर्डनीं आपली ओळख देऊन परवानाही दाखविला, तेव्हां त्यानें सेनापतींची माफी मागून वेशीची दिंडी उघडली, आणि त्या दोघांना बाहेर जाऊं दिलें.

वेशींतून बाहेर पडल्यावर रिचर्ड म्हणाला—" धनीसाहेब, आतां

आपली कामगिरी संपली. येथून माझें काम सुरू झालें. माझी सूचना लक्षांत आहे ना? तोंडांतून एक अक्षर देखील काढावयाचें नाहीं, फक्त माझ्याकडे बोट दाखवावयाचें!"

सर एडवर्ड हंसून म्हणाले—"ठीक आहे. आतां मी तुझ्या ताब्यांत आहें! पण आपण कोण? आणि कोठें कशाला जात आहों?"

रिचर्ड—"माझें नांव मुस्तफा आणि आपलें नांव अबदुल्ला. आपण सख्खे भाऊ असून व्यापारी आहों. आपले वडील र्‍होडेस्टो बंदरीं असून ते फार आजारी आहेत, त्यांना भेटावयास जात आहों! तसाच प्रसंग आला तर मात्र 'हो, ना,' असें थोडक्यांत उत्तर द्या, म्हणजे झालें. पण होतां होईल तों, मी तसा प्रसंगच येऊं देणार नाहीं!"

ते दोघे अंधारांतून एका आड वाटेनें मुकाट्यानें पुढें निघाले. खंदक ओलांडून सुमारें पाव मैल जाईपर्यंत त्यांना कोणीं आडविलें नाहीं. तुर्की छावणीच्या एका बाजूनें ते चालले होते. आपण आतां बहुतेक पार पडलों, असें त्यांना वाटूं लागलें. इतक्यांत जवळच्या एका झोंपडींतून एक तुर्की शिपाई बाहेर धांवत येऊन ओरडला—"कोन है? खडे रहो!"

सर एडवर्ड व रिचर्ड तत्काळ उभे राहिले. तुर्की शिपाई त्यांच्या जवळ येऊन, त्यांच्याकडे निरखून पाहूं लागला. ते खरोखर तुर्क आहेत अशी त्याची समजूत होऊन तो म्हणाला—"परवल बोला!"

रिचर्ड आर्जवानें म्हणाला—"दोस्त, परवल आम्हांला काय ठाऊक? आम्हीं त्या दुष्ट खिस्ती दरवानास पुष्कळशी लांच देऊन कसे तरी मोठ्या मिनतवारीनें शहरांतून बाहेर पडलों! दिवसां तर आह्मांला घरांतून बाहेर पडण्याची देखील सोय नाहीं, इतकी आमच्यावर सक्त नजर असते! मग आम्हांला परवल कसा ठाऊक असणार? कृपा करून आम्हां गरिबांना जाऊं द्या, आमचे वृद्ध बाबा आमच्या वाटेकडे डोळे लावून पडले असतील; तुम्हीच त्यांची आमची, शेवटची भेट करून दिल्यासारखें होईल."

तुर्की शिपाई—"छे छे, कांहीं असलें तरी मला तसें सोडतां येत नाहीं! चला, आमच्या अंमलदाराकडे तुह्मांला नेलें पाहिजे."

रिचर्ड–" काय यार, तुह्मी मुसलमान असून, आह्मां गरीब धर्मबांधवांवर असे निष्ठुर होतां? मग तुमच्यांत आणि त्या खिस्ती काफरांत फरक तो काय? आह्मांला शहरांतून बाहेर पडावयास किती तरी त्रास पडला, आणि आतां तुह्मीही आणखी तसदी देतां? आमची व आमच्या वृद्ध वडिलांची भेटच होऊं नये अशी तुमची इच्छा आहे कीं काय? अल्लाची मर्जी!"

तुर्की शिपाई विचारांत पडला. त्याला रिचर्डचें सांगणें खरें वाटलें, आणि त्यांना सोडून द्यावें, असेंही त्याच्या मनांत आलें. इतक्यांत आणखी दोन इसम तेथें आले. ते लष्करी अंमलदार असावे, असें त्यांच्या पोषाखावरून दिसत होतें. त्यांपैकीं एक जण तुर्की पहारेवाल्याला म्हणाला–"काय गडबड आहे?"

तुर्की पहारेवाला सलाम करून म्हणाला––" साहेब, हे परवल न सांगतां चालले आहेत, ह्मणून त्यांना मीं आडविलें."

"काय रे?" तो अंमलदार रिचर्डकडे वळून ओरडला––" कोण तुह्मी? कोठें चाललां? आणि परवल कां सांगत नाहीं?"

रिचर्ड–" माझें नांव मुस्तफा. मी व माझा हा भाऊ अबदल्ला गरीब व्यापारी आहों! ऱ्होडोस्टो बंदरी आमचा वृद्ध पिता अत्यवस्थ आजारी आहे ह्मणून त्याला भेटावयास आह्मी निघालों आहों! शहरांतून आह्मी मोठ्या मिनतवारीनें बाहेर पडलों, आह्मांला परवल कोठून माहित असणार?"

अंमलदार–" इनषाल्ला! हे कोणी तरी गुप्त हेर असले पाहिजेत, ह्यांना आगासाहेबांकडे नेऊन गुदरा, ह्मणजे ते चौकशी करतील!"

रिचर्ड–" जनाब, आपल्याला आमच्याविषयीं शंका येत असेल तर, आह्मांला सुलतान साहेबांकडे न्या. अल्ला व पैगंबर त्यांचें नेहमीं रक्षण करो! ते आह्मांला तत्काळ सोडून देतील."

"तें कसें काय?" अंमलदार ह्मणाला–" तुमची व सुलतान साहेबांची कांहीं जान पछान आहे कीं काय?"

रिचर्ड–" त्यांची पछानच कशाला पाहिजे? ते खुद्द पैगंबराचे अंश आणि सद्धर्मपालक असल्यामुळें, त्यांना सर्व गोष्टींचें खरें ज्ञान असतें! आमचें ह्मणणें खरें असल्याविषयीं त्यांची तेव्हांच खात्री होईल! त्यांच्या

एका केसांत जी अक्कल आहे, ती शेंकडों आगा किंवा पाशा यांच्या डोक्यांत असणें शक्य नाहीं, अशी आमची खात्री आहे!"

रिचर्डची एवढी दृढ निष्ठा पाहून त्या अंमलदारास मोठें कौतुक वाटलें आणि त्यानें आपल्या सोबत्याकडे स्मितपूर्वक पाहिलें. सोबत्यानें त्याला कांहीं सूचना केली, तेव्हां त्यानें पहारेवाल्याला सांगून त्या दोघांना पुढें जाऊं दिलें, व आपण दोघे दुसरीकडे निघून गेले."

तुर्की छावणीच्या हद्दीबाहेर गेल्यावर सर एडवर्ड ह्मणाले—" रिचर्ड, तुझ्या प्रसंगावधानाची धन्य आहे, त्या तुर्की अंमलदाराला तुझी हकीगत खरी कशी वाटली? आणि त्याच्या बरोबर असलेला दुसरा अंमलदार कोण होता?"

रिचर्ड हंसून ह्मणाला—" धनीसाहेब, तो खुद्द सुलतान महंमदच होता त्याला मीं तत्काळ ओळखलें, ह्मणूनच मीं सुलतानाची इतकी स्तुति केली! गुप्त वेषानें शहरांत व छावणींत रात्रीं फिरावयाची ह्या सुलतानांची फार प्राचीन काळापासून, कालीफ हरून अलरशीदपासून वहिवाट आहे!"

सर एडवर्ड—" शाबास! तुझी ही युक्ति उत्तम साधली, म्हणूनच आह्मी या संकटांतून पार पडलों! बरें, आतां कोठें जावयाचें?"

रिचर्ड—" येथून जवळच आथीरा गांवीं माझा एक दोस्त आहे, तेथवर जाऊन, त्याच्याकडून दोन घोडे घेऊं. आणि सिलिव्हरीला जाऊं; ह्मणजे तेथून आपल्याला होडींतून पुढें जातां येईल."

सर एडवर्डना रिचर्डचा हा बेत पूर्णपणें पसंत पडला, आणि ते दोघे आथीराच्या मार्गानें झपाट्यानें पुढें निघाले.

# प्रकरण १७ वें.

## आरमारी कुमक.



समुद्रकिनाऱ्यास असलेल्या सेंट रोसॅनसच्या किल्ल्यांतील दरबारच्या दिवाणखान्यांत बादशहा कॉन्स्टंटाइन आपल्या प्रमुख सरदार मंडळी-सह विचार करीत बसले होते. प्रत्येक सरदार आपापल्या जवळ शिल्लक असलेल्या दारूगोळ्याचा हिशेब सांगत होता. त्यावरून दारू गोळ्याच्या बाबतींत रोमन लष्कराचें दिवाळें निघालेलें उघड दिसत होतें. ज्या सामग्रीच्या जहाजांच्या मदतीला सर एडवर्डना पाठविण्यांत आलें होतें, तीं जहाजें लवकर आलीं नाहींत तर मुकाट्यानें शहर शत्रूच्या स्वाधीन करावें लागतें कीं काय, अशी सर्वांना भीति पडली होती. सर एडवर्डना जाऊन आठ दिवस होऊन गेले तरी, अद्यापि त्यांचा पत्ता लागेना, म्हणून सर्वजण सचिंत अंतःकरणानें त्यांची मोठ्या आतुरतेनें मार्गप्रतीक्षा करीत होते. प्रतिकूल वाऱ्याच्या, व मार्गातील इतर अडचणींच्या सबबी सांगून, बादशहा व लॉर्ड क्रांझा सर्वांना धीर देण्याचा प्रयत्न करीत होते. इतक्यांत बंदर कामगार गडबडीनें येऊन म्हणाला—"सरकार दूर अंतरावरून कांहीं जहाजें येत असलेलीं दिसत आहेत! तीं फार दूर असल्यामुळें, कोणाचीं आहेत हें मात्र अद्यापि समजत नाहीं!"

बादशहा—"होय का? चला तर, मित्र हो, आपण सज्जावर जाऊन समक्षच पाहूं या!"

बादशहा व इतर सर्व सरदार दिवाणखान्यांतून उठून तिसऱ्या मजल्याच्या उंच सज्जावर आले. तेथून एकीकडे शहरांतील मंदिरें, वाडे, बागबगीचे, रस्ते, चौक, आणि शिखरें यांची व दुसरीकडे सामुद्रधुनी आणि त्या पलीकडील रम्य टेंकड्यांची अपूर्व शोभा एखाद्या सुंदर रंगीबेरंगी तसबिरींतील देखाव्याप्रमाणें मनोहर दिसत होती. पण ह्या प्रसंगीं तिकडे कोणाचेंही लक्ष गेलें नाहीं. सज्जावर जातांच प्रत्येक जणाची दृष्टि समुद्राच्या बाजूच्या क्षितिजाकडे वळली.

आपल्याला कोणत्या बाजूला शिडें दिसलीं, ती दिशा बंदरकामगारानें बादशहास दाखविली, तेव्हां सर्वजण सूक्ष्म दृष्टीनें तिकडे पाहूं लागले.

कांहीं वेळानें बादशहा म्हणाले—" अगदीं क्षितिजाजवळ कांहीं पांढरें दिसत आहे खरें, पण तें काय आहे हें पक्कें कळत नाहीं, कदाचित् पलीकडच्या किनाऱ्यावरील एखादी इमारत तर नसेल ? "

सेनापति जस्टीनियन–" नाहीं सरकार, तीं जहाजांचीं शिडें आहेत, ह्यांत तर शंकाच नाहीं. तथापि तीं आपलींच आहेत कीं नाहींत, हें मात्र इतक्यांत समजण्यास मार्ग नाहीं ! "

बादशहा–" आणखी अर्ध्या तासाच्या आंत काय तें समजतेंच आहे ! ईश्वर करो, आणि तीं आपलींच सामग्रीचीं जहाजें ठरोत ! "

सर्व मंडळी समुद्राकडे एकाग्र दृष्टि लावून मोठ्या उत्कंठेनें वाट पहात होती, कांहीं वेळानें दोन जहाजें स्पष्ट दिसूं लागलीं, त्यानंतर आणखी दोन दृष्टिपथांत आलीं, व शेवटीं पांचवेंही दृष्टीस पडलें. ही संख्या पूर्ण होतांच, तीं आपलींच सामग्रीचीं जहाजें आहेत, अशी सर्वांची खात्री झाली, आणि सर्वांना मोठा आनंद झाला.

काफिल्याच्या सुखरूप आगमनाबद्दल मंदिरांतून विशेष प्रार्थना व उपासना करण्याविषयीं बादशहांनीं धर्माध्यक्षाकडे निरोप पाठविला. थोड्याच वेळांत सर्व मुख्य मंदिरांत घंटा वाजूं लागल्या. तेव्हां सामग्रीचा काफिला आल्याची वातमी शहरांत प्रसृत झाली. लोकांना त्याची इतकी उत्कंठा लागून राहिली होती कीं, थोड्याच वेळांत समुद्रीकिनाऱ्याकडील सर्व लहान मोठ्या इमारतींच्या माड्या व सज्जे माणसांनीं फुलून गेले.

बादशहा त्या काफिल्याकडे पहात म्हणाले—" आपल्या ह्या काफिल्याच्या हालचाली आपल्याला येथल्यापेक्षांही अधिक स्पष्ट रीतीनें कोठून दिसतील बरें ? "

लॉर्ड फ्रांझा–" सरकार, आमच्या वाड्याच्या सज्जावरून, येथल्यापेक्षां अधिक स्पष्ट दिसेल, असें मला वाटतें ! "

बादशहा—" चला तर आपण तिकडेच जाऊं ! "

बादशहा तेथून निघाले, तेव्हां त्यांच्याबरोबरची सर्व मंडळी त्यांच्या पाठोपाठ लॉर्ड फ्रांझांच्या बंगल्याकडे आली.

कुमारी थियोडोरा तिसरे प्रहरीं आपल्या बागेंत एकटीच आपल्याशीं विचार करीत फिरत होती. तिला आपल्या प्रियकराच्या आगमनाची एकसारखी काळजी लागून राहिली होती. सर एडवर्ड तिचा निरोप घेऊन गेल्याला आठ दिवस होऊन गेले होते. हा आठवडा तिला एका वर्षापेक्षांही अधिक दीर्घ कालीन व कंटाळवाणा वाटत होता. आपल्या प्रियकराला सुखरूप ठेवून, त्यांच्यावरील सर्व संकटें दूर करण्याविषयीं ती नित्य परमेश्वराची प्रार्थना करीत होती.

ह्याप्रमाणें उद्विग्न व उत्कंठित अंतःकरणानें वारंवार समुद्राकडे पहात, थियोडोरा आपल्या बागेंत फिरत असतां, तिची दासी धांवत येऊन म्हणाली—" ताईसाहेब, सामग्रीचीं जहाजें दिसूं लागलीं, अशी बातमी आहे ! तीं पाहण्याकरितां किनाऱ्याकडील सर्व इमारतींवर लोकांची खूप गर्दी उसळली आहे ! "

" खरेंच का ? " थियोडोरा आनंदयुक्त स्वरानें म्हणाली—" तर मग आपल्या शहराचा बचाव होणार ? चल आपणही सज्जावर जाऊन पाहूंया! ईश्वर करो आणि सर्व सामग्री सुरक्षित येवो ! "

थियोडोरा आपल्या महालाच्या सज्जांत उभी राहून, मोठ्या उत्कंठेनें पश्चिमेकडे पाहूं लागली. सामग्रीवाहक काफिला आतां स्पष्टपणें दिसूं लागला होता. थोड्याच वेळांत तुर्की आरमारांतही हालचाल दिसूं लागली तुर्की दर्यासारंग कामिलपाशा याचें चंद्रांकित हिरव्या निशाणांनीं सजलेलें सुंदर जहाज डौलानें इकडे तिकडे फिरूं लागलें. त्यावरून रोमन काफिल्याला अटकाव करण्याची त्यांची तयारी चालू असल्याचें उघड दिसत होतें. तुर्की आरमारानें कॉन्स्टांटिनोपलपासून आशियाच्या किनाऱ्यापर्यंत आपल्या जहाजांचा अभेद्य तटच केला होता.

ही सर्व धांदल थियोडोरा एकाग्र दृष्टीनें पहात होती, तोंच बादशहांची स्वारी, लॉर्ड फ्रांझा, सेनापति जस्टीनियन, व आणखी कांहीं प्रमुख कामगार ह्यांसह तेथें येऊन दाखल झाली. बादशहांना पाहतांच थियोडोरा त्यांना नम्रपणें प्रणाम करून तेथून विनयानें जाऊं लागली. तेव्हां बाद-

शहा स्मितपूर्वक म्हणाले—थियोडोरा, जाऊं नको, येथेंच बैस. ह्या काफिल्याच्या सुरक्षित आगमनाची आमच्या इतकीच तुलाही उत्कंठा आहे, हें आम्हांला माहीत आहे; अर्थात् तुला आज येथें राहण्याचा हक्कच आहे!"

थियोडोरा मुकाट्यानें एका बाजूला उभी राहिली. नंतर बादशहा जस्टीनियन कडे वळून म्हणाले—"सेनापति, कोठारांत शिल्लक असेल तितका सर्व दारू गोळा, आणि आणतां येईल तितकें सैन्य आणून, आपल्या आरमारावर पोंचवा, आणि किनाऱ्यावरील तोफखान्यालाही सूचना देऊन ठेवा. कदाचित् आपल्या आरमाराची व तोफांचीही गरज लागण्याचा संभव आहे!"

थोड्याच वेळांत सामग्रीचा काफिला तुर्की आरमाराच्या सांखळी जवळ येऊन दाखल झाला. त्यांत सर्वांच्या पुढील जहाजावर जिनोवाचें निशाण फडकत होतें. ह्या जहाजाचें नांव 'युनिकॉर्न' असून, त्यावर दहा तोफा व कित्येक तिरंदाज होते. त्याच्या मागुन 'सेंट ऐरनी' नामक रोमन बादशाही जहाज शस्त्रास्त्रांनीं सुसज्जित होऊन डौलानें येत होतें. त्यानंतर 'डॉफिन' व 'सेंट फ्रान्सीस' हीं दोन छोटेखानी जहाजें चालली होतीं, आणि सर्वांच्या मागून बऱ्याच अंतरावर 'बुलेंटर' नांवाचें मोठें भक्कम व अवजड जहाज हळू हळू रखडत होतें.

तुर्की आरमाराची हालचाल दृष्टीस पडतांच, सर एडवर्डनीं आपल्या काफिल्यावरील सर्व कप्तान व इतर लष्करी कामगार ह्यांना, कॉन्स्टांटिनोपल शहराची उडालेली अन्नान्न दशा व दारूगोळ्याची टंचाई सविस्तर सांगून, शक्य तितक्या जोरानें, जिवावर उदार होऊन, तुर्की आरमाराची सांखळी तोडून पुढें घुसणें व शहरवासी लोकांना संकटमुक्त करणें किती अवश्य आहे, हें त्यांच्या मनांत भरवून दिलें. त्या वेळीं सर एडवर्डनीं जें उत्तेजनपर भाषण केलें, त्या योगानें सर्व योद्धयांचीं मनें उल्हासपूर्ण झालीं; आणि त्यांच्या अंगीं लढण्याची मोठी हुरूप येऊन, त्यांनीं ईश्वराच्या व बादशहांच्या नांवानें मोठ्यानें जयजयकार केला.

बादशहा निवडक मंडळीसह लॉर्ड फ्रांझांच्या वाड्यांतील सज्जावर उभे राहून एकाग्र व उत्कंठित दृष्टीनें सर्व प्रकार अवलोकन करीत

होते. आतां थोडयाच वेळांत झटापट सुरू होणार, असें पाहून बादशहा म्हणाले—“ तुर्की आरमारावर सेनापति कोण आहे ? ”

सेनापति जस्टीनियन—“ बाल्था ओगली मुख्य सेनापति असून, अहमदपाशा व कालीलपाशा हे त्याच्या मदतीला आले आहेत; शिवाय खुद्द सुलतान महमद आपल्या सफेत घोडयावर स्वार होऊन, हा युद्ध-चमत्कार पहात किनाऱ्यावर उभे आहेत, असें ऐकतों ! ”

तुर्की आरमाराच्या टप्प्यांत येतांच, सर एडवर्डच्या सूचनेप्रमाणें बादशाही जहाज ‘ सेंट ऐरनी ’ सर्वांच्या पुढें झालें. त्याच्या पाठोपाठ ‘ युनिकॉर्न ’ व ‘ डॉल्फिन ’ हीं जहाजें निघालीं, आणि सर्वांच्या मागून ‘ सेंट फ्रान्सीस ’ व ‘ क्रुसेडर ’ हीं जहाजें जोडीनें चालूं लागलीं. इतक्यांत आकाश निरभ्र होऊन सूर्याचा प्रकाश एकदम चोहोंकडे पसरला. त्याबरोबर शहरच्या तटावर उभ्या असलेल्या हजारों नागरिकांना रोमन काफिला स्पष्ट दिसूं लागला, आणि त्यांनीं मोठ्यानें जयघोष करून त्याचें स्वागत केलें.

थोडयाच वेळानें बाल्था ओगलीनें आपल्या आरमाराच्या दोन्ही बगलांना रोमन काफिल्यावर मारा सुरू करण्याचा हुकूम दिला. त्याबरोबर रोमन जहाजांकडे बाणांचा व गोळ्यांचा वर्षाव सुरू झाला. तो पाहतांच बादशहा म्हणाले—“ सेनापति जस्टीनियन, आपला बुरजावरील तोफखाना सुरू करावयास सांगा. आतां अधिक विलंब करणें योग्य नाहीं ! ”

जस्टीनियन प्रणाम करून तत्काळ निघून गेले, आणि थोडयाच अवकाशांत रोमन तोफांचा धडाका सुरू झाला. त्या धुराटीनें कोणास कांहींच दिसेनासें झालें. तथापि आरोळ्या, आरडाओरड व तोफा बंदुकांचे आवाज ऐकूं येत होते, त्यावरून लढाई जोरांत चालू आहे एवढें मात्र लोकांना निश्चित समजत होतें.

थियोडोरा सज्जाच्या कठड्याशीं उभी होती. तिच्याकडे वळून बादशहा म्हणाले—“ थियोडोरा भिऊं नको थोडयाच वेळांत ह्या लढाईचा निकाल लागेल, आणि ईश्वरकृपेनें तुझे विजयी भावी पति लवकरच तुला भेटतील ! ”

थियोडोरानें त्यावर कांहींच उत्तर न देतां, कृतज्ञ दृष्टीनें बादशहांकडे अवलोकन केलें. तिची खिन्न मुद्रा पाहून लॉर्ड फ्रांझा म्हणाले–“ बाळे, तूं पाहिजे तर आंत जाऊन बैस जा ! ”

थियोडोरा–“ नको बाबा, मी येथें आहें तीच बरी आहे ! वीरकन्या व वीरपत्नी युद्धाच्या भीषण देखाव्याला कधीं भीत नसतात ! ”

कांहीं वेळानें वाऱ्याची एक जोराची झुळूक आली. त्याबरोबर धूर एकदम नाहींसा होऊन युद्धाचा देखावा स्पष्टपणें लोकांच्या दृष्टीस पडला. बुसेंटर जहाज तुर्की आरमाराची फळी फोडून अलीकडे आलें होतें, आणि तें आतां शहरच्या बंदरांत लवकरच येणार असें दिसत होतें. तुर्की आरमारांतील पांच सहा होड्या त्याचा पाठलाग करीत आल्या होत्या, व त्याजवर चोहोंकडून जोराचा मारा करीत होत्या, पण बुसेंटरवरील शिपायांच्या मारापुढें त्यांचें कांहीं चालत नव्हतें. सेंट फ्रान्सीस, डॉल्फिन व युनिकॉर्न हीं जहाजेंही लवकरच तुर्कांची फळी फोडून बुसेंटरच्या मदतीस आलीं. सर्वांच्या पुढें प्रथम असलेलें बादशाही जहाज सेंट ऐरनी हें तुर्कांच्या माऱ्यांत एकटेंच सांपडल्यामुळें, सात आठ तुर्की जहाजांनीं एकदम चोहोंकडून त्याच्यावर लगट करून त्याला अगदीं जर्जर करून टाकलें होतें. तुर्की नावांनीं सेंट ऐरनी जहाजास चोहोंकडून वेढलें. तुर्की खलाशांनीं जहाजावर चढण्याचाही प्रयत्न केला, पण रोमन शिपायांनीं त्यांना मोठ्या शौर्यानें मागें हटविलें.

सेंट ऐरनीची ही धोक्याची अवस्था रोमन काफिल्यांतील इतर जहाजांच्या दृष्टीस पडली, पण तीं आपापल्या फिकीरींत असल्यामुळें, त्यांना सेंट ऐरनीच्या मदतीस जातां येईना. सर एडवर्ड हे सेंट ऐरनी वरच असून, आपल्या भोंवतालच्या इतर लोकांसही वरचेवर उत्तेजन व धीर देत होते. त्यांच्यावरील हें प्राणसंकट दृष्टीस पडतांच थियोडोरा अगदीं घाबरून गेली. ती हात जोडून ईश्वराची करुणा भाकूं लागली. बादशहा व त्यांच्या जवळची मंडळीही चिंताग्रस्त दिसूं लागली. इतक्यांत बूसेंटर जहाजावरील कप्तानानें आपल्या जहाजाचें तोंड एकदम सेंट ऐरनीकडे वळविलें. तें पाहतांच सर्वांनीं त्या जहाजाचा मोठा जयजयकार केला. बादशहांना व थियोडोरालाही बराच धीर आला,

सेंट ऐरनीच्या एका बाजूवर सर एडवर्ड तुर्कांचा प्रतिकार शौर्यानें करीत होते, तोंच बुसेंटर वरील सैनिकांनीं दुसऱ्या बाजूकडील तुर्कांवर एकदम जोराचा हल्ला केला. ह्याप्रमाणें दोहोंकडून मार बसूं लागल्यामुळें तुर्कांचें कांहीं चालेना. त्यांच्या नावा हळू हळू मागें हटूं लागल्या, व थोडयाच वेळानें सेंट ऐरनीवरील संकट टळलें. तोंपर्यंत इकडे सेंट फ्रान्सीस व डॉल्फिन हीं दोन जहाजें तुर्कांच्या तावडींतून मोठ्या शौर्यानें पार पडून सुवर्णशृंग बंदराजवळ येऊन दाखल झालीं. सेंट ऐरनी व बुसेंटर ह्यांनाही आतां भीति उरली नव्हती. फक्त युनिकॉर्न जहाज मात्र एकटेंच मागें तुर्कांच्या कचाट्यांत सांपल्यामुळें, अद्यापि पेचांत होतें.

युनिकॉर्नची ही दुरवस्था दृष्टीस पडतांच, सेनापति सर एडवर्ड ह्यांनीं सेंट ऐरनीच्या कप्तानास, युनिकॉर्नकडे जहाज वळविण्याल हुकूम केला. त्याबरोबर बुसेंटरनेंही आपलें तोंड तिकडे वळविलें. रोमन काफिल्यांतील एक तरी जहाज आपल्याला खचित पाडाव करितां येईल, असें तुर्कांना वाटूं लागलें होतें, इतक्यांत हीं दोन विजयी जहाजें युनिकॉर्नच्या दोहों बाजूंकडून धांवून आलीं. त्यांच्या जबर मारापुढें तुर्कांचें कांहीं चालेना. तुर्की सेनापति बालथा ओगली ह्यानें आपल्या शिपायांस मोठमोठ्या बक्षिसांचीं अभिवचनें दिलीं. व धमक्याही देऊन पाहिल्या, पण कशाचाच उपयोग झाला नाहीं. अखेरीस तुर्की नावा मागें हटल्या आणि युनिकॉर्न जहाजही त्यांच्या तावडींतून निसटून सुरक्षित पार पडलें. तें पाहून तटावरील हजारों लोकांनीं बादशहांचा व सर एडवर्ड यांचा पुनः जयजयकार केला.

बंदरांत येणाऱ्या जहाजांस प्रतिबंध करण्यासाठीं जो पोलादी साखळदंड पक्का बसविलेला होता, तो काढून, जहाजांस वाट करून देण्याच्या कामावर लेफटेनंट कॉन्टारीची नेमणूक झालेली होती. त्याप्रमाणें तो आपल्या लोकांसह किनाऱ्यावर तयार होता. धिसाडी व इतर कारागीर आपापलीं हत्यारें घेऊन, कॉन्टारीच्या हुकमाची वाट पहात उभे होते. रोमन काफिल्याचीं पांचही जहाजें सुवर्णशृंग बंदराजवळ आलेलीं दृष्टीस पडतांच, कॉन्टारीनें आपल्या लोकांस साखळदंड मोकळा करण्यास हुकूम दिला. तत्काळ घणाचे घाव बसूं लागले व थोड्यांच वेळांत साखळ-

दंड मोकळा होऊन, जहाजांचा मार्ग खुला झाला.

सर्व जहाजें शत्रूच्या तावडींतून सुरक्षित पार पडलेलीं पाहतांच बाद्-शहांना मोठा आनंद झाला. त्यांनी थियोडोराजवळ जाऊन प्रेमानें तिचा हात धरून, तिच्या भावीपतीच्या शौर्याचें अभिनंदन केलें. थियो-डोराच्या मनांतही एकदम बंदरावर जाऊन आपल्या प्रियकराचें दर्शन घ्यावें, अशी उत्कंठा उत्पन्न झाली होती, पण विनयामुळें तिला तसें करतां येणें शक्य नव्हतें.

बादशहांची स्वारी आपल्या परिवारासह बंदरावर आलेली पाहतांच लोकांनीं त्यांचें आनंदाच्या जयघोषानें स्वागत केलें. जहाजांवरील अन्न-सामग्री व दारूगोळा उतरून घेण्याची अगदीं धांदल उडून गेली होती. शहरांतील लहान मोठ्या दर्जाचे सर्व लोक ह्या कामीं मोठ्या उल्हासानें मदत करीत होते; आणि सेनापति एडवर्ड ह्यांनीं मोठ्या पराक्रमानें व विलक्षण धाडसानें शहराचें संरक्षण केलें, म्हणून त्यांना धन्यवाद देत होते.

बालथा ओगलीनें रोमन काफिला काबीज करण्याकरितां शक्य तितके प्रयत्न केले होते, परंतु त्याच्या मदतनिसांनीं त्याचे हुकूम योग्य रीतीनें व तत्परतेनें न बजावल्यामुळें, त्याला हार खाऊन माघारें जावें लागलें. ह्या पराजयामुळें सुलतान महंमदांच्या संतापाचा अगदीं संताप होऊन गेला होता. त्यांनीं बालथा ओगलीलाही टपका दिला, आणि त्याच्या मदतीस गेलेल्या दोघां पाशांनाही जबर शासन केलें.

सूर्यास्तापर्यंत सर्व सामग्री जेथील तेथें सुरक्षित पोंचती होऊन जहाजें रिकामीं झालीं, आणि पुनः साखळदंड बसविण्यांत आला.

## प्रकरण १८ वें.

## विवाह समारंभ.



मे महिन्यांतलि अखेरचे दिवस, संध्याकाळची शांत वेळ, अशा समयीं कॉन्स्टांटिनोपल शहरांतील सेंट सोफायाच्या प्रसिद्ध व भव्य मंदिराच्या शृंगारलेल्या पटांगणांत शहरांतील सरदार व थोर घराण्यांतील स्त्रीपुरुषांची गर्दी उडाली होती. कुमारी थियोडोरा फ्रांझा व सेनापति, सर एडवर्ड याचा वाग्निश्चय व विवाहसमारंभही आजच ह्या मंदिरांत व्हावयाचा होता.

आरमारी लढाईतील पराजयामुळें सुलतान महमद अगदीं क्रुद्ध होऊन गेला होता. तथापि त्या योगानें नाउमेद न होतां, वेढ्याचें काम त्यानें अधिकच जोरानें चालविलें होतें. सबब अशा आणीबाणीच्या प्रसंगा आपल्या कन्येचा एकदां ठरल्याप्रमाणें विवाह करून टाकून आपल्या वचनांतून व जबाबदारींतून मोकळें व्हावें, अशा विचारानें लॉर्ड फ्रांझांनीं हे दोन्ही विधि एकदमच उरकून घ्यावयाचें ठरविलें, आणि बादशहांनीं ही त्यांना आनंदानें संमति दिली.

अस्तमानाच्या सुमारास बादशहा, व लॉर्ड फ्रांझा इतर सरदार मंडळासह नवरदेवास मोठ्या समारंभानें मंदिराकडे घेऊन आले. त्यांच्या पाठोपाठच नवरी मुलगी आपल्या मैत्रिणी व परिवारासह तेथें येऊन पोंचली. जमलेल्या सरदार कुमारिकांनीं वधुवरांवर पुष्पवृष्टि केली. सर्व मंडळींनीं त्यांचें प्रेमपूर्वक स्वागत केलें. चॅलसेडनचे धर्माध्यक्षांनीं वधुवरांचे हात धरून व विधिपूर्वक वाग्निश्चयाचे मंत्र ह्मणून, परस्परांचे हात परस्परांच्या हातांत घातले, आणि ईश्वराच्या नांवानें उभयतांना आशीर्वाद दिले.

अंधार पडूं लागल्यावर मंदिरांत चोहोंकडे दिव्यांचा लखलखाट झाला. वधुवर एकमेकांचे हात धरून, धर्माध्यक्षांच्या मागून मंदिरांत गेले. त्यांच्या पाठोपाठ इतर सर्व मंडळीही आंत आली. बादशहांसह सर्व स्त्रीपुरुष

स्वस्थानीं विराजमान झाल्यावर विवाहविधीस आरंभ झाला. वधुवरांस ईश्वरी सिंहासनासमोर उभे केल्यावर, धर्माध्यक्ष व त्यांचे मदतनीस विवाह मंत्र ह्मणूं लागले. हा विधि आटोपल्यावर धर्माध्यक्षांनीं वधुवरांच्या मस्तकांवर पुष्पमुकुट घातले. नंतर वधुवरांनीं परस्परांच्या हातांत विवाहमुद्रिका घातल्या. मग धर्माध्यक्षांनीं त्या उभयतांना आशीर्वाद देऊन तीं दोघें ईश्वरासमक्ष धर्मशास्त्राप्रमाणें पतिपत्नी झाल्याचें जाहीर केलें. तेव्हां सर्व मंडळींनीं टाळ्यांच्या कडकडाटानें आपली सानंद संमति दर्शविली व स्त्रियांनीं त्या नवपरिणीत दंपत्यावर पुष्पवृष्टि केली.

ह्याप्रमाणें विवाहसमारंभ आटोपल्यावर मंडळी मंदिरांतून बाहेर निघाली. वधुवरांच्या मागून बादशहा, लॉर्ड फ्रांझा व धर्माध्यक्ष, आणि त्यांच्या मागून इतर सर्व समुदाय पुनः बाहेरील पटांगणांत आला. इतक्यांत बंदरकामगार रिचर्ड बर्स्टो गडबडीनें बादशहांजवळ येऊन मुजरा करून हळूंच म्हणाला—" सरकार, एक आश्चर्यकारक बातमी आहे! तुर्की आरमार खुष्कीच्या बाजूनें निघालें आहे ! "

" म्हणजे काय ? " बादशहा चकित स्वरानें म्हणाले—" ही कोणीं तरी गप्प उठविली असेल ! असें भलतेंच होईल तरी कसें ? "

धर्माध्यक्ष—" ही मुसलमानांची कांहीं जादू तर नव्हे ना ? "

लॉर्ड फ्रांझा—" रिचर्ड, तुम्हांला तरी ही गोष्ट खरी किंवा संभवनीय तरी वाटते का ? ही बातमी कोणीं आणिली ? "

रिचर्ड—" सरकार, इतर कोणीं ही बातमी सांगितली असती, तर मला ती मुळींच खरी वाटली नसती. पण लेफटेनंट कॉंटारीनीं ही बातमी स्वतः सांगितली. ते कधीं खोटी गोष्ट सांगणार नाहींत अशी माझी खात्री आहे. ते आणखी तपास करण्याकरितां गेले आहेत ! "

बादशहा—" तर मग त्यालाच वाड्याकडे घेऊन ये, म्हणजे त्याच्या तोंडून सर्व हकीगत खुलासेवार समजेल. "

रिचर्ड प्रणाम करून निघून गेल्यावर, तेथें तयार असलेल्या उपहाराचा थोडथोडा परामर्ष गडबडीनें घेऊन, सर्व मंडळी ऐकलेल्या बातमीसंबंधानें तर्कवितर्क करीत, तेथून आपापल्या स्थानीं चालती झाली. बादशहा आपल्या मंत्रिमंडळासह राजवाड्यांत गेले व लॉर्ड फ्रांझा कन्या

व जामातासह आपल्या वाड्यांत परत आले.

राजवाड्यांत लवकरच रिचर्ड बर्स्टो व लेफ्लेनंट कॉंटारी बादशहा-समोर हजर झाले. तेव्हां बादशहा म्हणाले—" काय हकीगत आहे, कॉंटारी ? "

कॉंटारी—" सरकार, सेनापतींच्या हुकमाप्रमाणें मी सूर्यास्ताच्या वेळीं शत्रुसैन्याची कांहीं विशेष हालचाल आहे कीं काय, हें पहाण्या-करितां, सेंट मिचेलच्या बुरजावर चढून चोहोंकडे पाहूं लागलों, तों दक्षिणेकडील बाजूला तुर्कांचें एकही जहाज दिसेना. तीं कदाचित् समु-द्रांत दूर गेलीं असतील असें मला वाटलें. नंतर मीं उत्तरेकडे वळून पाहिलें, तों तुर्की छावणींत चोहोंकडे पूर्ण शांतता दिसली. एकाही ठिकाणीं सैन्याची कांहीं हालचाल दृष्टीस पडली नाहीं. गोळीबार तर तिसरे प्रहरापासूनच अजीबात थांबला होता. त्यानंतर मीं गलाटा गांवाच्या बाजूला दृष्टि वळविली, तों बरींच तुर्की जहाजें एका मागून एक भराभर खुष्कीच्या व डोंगराळ मार्गानें चाललेलीं स्पष्टपणें माझ्या दृष्टीस पडलीं! "

बादशहा गंभीर स्वरानें म्हणाले—" कॉंटारी, तुला दृष्टिभ्रम तर झाला नाहीं ना ? कीं ही मुसलमानांची कांहीं जादू असेल ? हे मुसल-मान मोठे जादूगार व सैतानाचे दोस्त असतात, असें म्हणतात ! पण सैतान तरी आजपर्यंत कधीं घडली नाहीं व पुढेंही घडणें शक्य नाहीं अशी सृष्टी विरुद्ध अघटित गोष्ट घडवून आणावयास कसा समर्थ होईल ? "

कॉंटारी—" सरकार, ती जादू असो, किंवा कांहींही असो, पण मीं ती प्रत्यक्ष ह्या डोळ्यांनीं पाहिली, आणि त्याविषयीं मला भ्रम किंवा शंका मुळींच नाहीं ! "

बादशहा—" तर मग गलाटाकडे कोणाला तरी तपासास पाठविलें पाहिजे ! सर एडवर्डला कांहीं आज पाठवितां येणार नाहीं ! कॉंटारी, तूं जाऊन शहरकोतवालास बोलावून घेऊन ये ! "

तुर्की जहाजें खुष्कीच्या मार्गानें चालूं लागलीं, ही विलक्षण बातमी एका क्षणांत सर्व शहरभर पसरली. भोळे लोक अगदीं घाबरून गेले. धर्मोपदेशक म्हणूं लागले कीं, सैतानाचें राज्य सुरू झालें, आतां प्रलय-काळ जवळ आला ! ही बातमी लॉर्ड फ्रांझांच्या वाड्यांतही जाऊन

पोंचली. ती ऐकून सर एडवर्डना स्वस्थ राहवेना. खरी स्थिति काय आहे व पुढें काय करण्याविषयीं बादशहांची आज्ञा आहे, हें पाहण्याकरितां, ते आपल्या प्रिय पत्नीचा व श्वशुरांचा निरोप घेऊन राजवाड्यांकडे निघाले. शहर कोतवालांची व त्यांची वाड्यांतच गांठ पडली; नंतर दोघे मिळून बादशहाकडे गेले.

बादशहा म्हणाले—"कोतवाल, तुर्की जहाजांसंबंधाची विलक्षण बातमी तुम्हीं ऐकलीच असेल ? त्यांत काय तथ्य आहे हें बरोबर समजून घेण्यासाठीं तुम्ही गलाटापर्यंत जाऊन तपास करा. सेनापतींनाच ही कामगिरी सांगितली असती, पण आजच नुकता त्यांचा विवाह झाला असल्यामुळें, त्यांची व त्यांच्या प्रियपत्नीची इतक्यांतच ताटातूट करण्याची आमची इच्छा नाहीं! तुम्ही त्यांची जागा भरून काढाल व हें काम हुषारीनें व सावधगिरीनें कराल, अशी आम्हांस आशा आहे!"

सर एडवर्ड नम्रपणें म्हणाले—"सरकार, हा मान कोतवालसाहेबांस मिळत आहे, ह्याबद्दल माझी कांहीं तक्रार नाहीं, पण मला निदान त्यांच्या बरोबर त्यांच्या मदतीला जाण्याची तरी परवानगी असावी! इतर मंडळी असल्या महत्त्वाच्या राजकीय कामावर गुंतलेली असतां, मींच मात्र घरांत बसून रहावें, हें मला मुळींच पसंत नाहीं!"

बादशहा हंसून म्हणाले—"सेनापति, तुम्ही सर्व शूर वीर आहां, अशी आमची अनेक वेळां खात्री झालेली आहे! आजच्या तुमच्या आनंदाच्या दिवशीं तुम्हांला संकटांत घालणें आम्हांलाच योग्य वाटलें नाहीं! तथापि तुमचा आग्रहच असेल तर, तुम्हीही कोतवालांबरोबर खुशाल चला, आमची कांहीं हरकत नाहीं. इतकेंच नव्हे, पण ह्या तुमच्या कृतीनें आम्हांला तुम्ही अधिकच ऋणी करून ठेवीत आहां! दोघेही चला, आणि मला लवकर काय ती निश्चित हकीगत कळूं द्या!"

"आज्ञा सरकार," असें म्हणून ते दोघेही सरदार बादशहांना मुजरे करून आपल्या कामगिरीवर निघून गेले.

---

## प्रकरण १९ वें.

# अजब कल्पना.



लॉर्ड मॅन्युअल क्रिसोलरास हे सुलतानाच्या छावणींत कैदी असल्यामुळें, त्यांना आपल्या जन्मभूमीविरुद्ध चाललेलीं कारस्थानें स्वस्थपणें पहात बसण्याचा प्रसंग आला होता. त्यांची योग्यता लक्षांत आणून, सुलतानांनीं त्यांना छावणीच्या हद्दींत हिंडण्या फिरण्यास परवानगी दिलेली होती, तथापि त्यांच्या बरोबर दहा सशस्त्र स्वारांची एक तुकडी नेहमीं असे. तुर्की छावणींतून आरमारी लढाई त्यांनीं पाहिली, आणि रोमन काफिला विजयी होऊन राजधानीस सुखरूप पोंचल्याबद्दल त्यांना अत्यंत आनंद झाला. सर एडवर्ड यांच्या पराक्रमाचें त्यांना मोठें कौतुक वाटलें व ह्या प्रसंगीं आपल्या पराधीनतेबद्दल अतिशय खेद झाला. सुलतानांच्या दरबारीं युद्धासंबंधानें चाललेलीं खलबतें त्यांना बहुतेक कळत असत. वेढ्याच्या बाबतींत तुर्कांमध्यें मतभेद झाला होता. पावसाळा जवळ आला; एवढ्या अफाट सैन्याच्या भरतीची अन्नसामुग्री व दारूगोळा शिल्लक उरलेला नाहीं, शिवाय इतर खिस्ती राष्ट्रांतील सैन्य कॉन्स्टांटिनोपलच्या मदतीस येणार असल्याचीही बातमी आहे, अशा अडचणींत वेढ्याचें काम तसेंच पुढें चालविल्यास फार दिवस टिकाव लागणार नाहीं, आणि माघार घेण्याचा प्रसंग आल्यास, नुसतें कॉन्स्टांटिनोपलच नव्हे, पण आड्रियानोपलसुद्धां सर्व जिंकलेला युरोपियन मुलूख देखील हातचा सोडावा लागेल, ह्याकरितां तूर्त वेढा उठवून आड्रियानोपलला जावें, आणि पावसाळ्यांत सर्व तयारी करून नंतर पुनः वेढा घालावा, असें सरलष्कर कालीलपाशा यांचें म्हणणें होतें. परंतु वेढ्याचें काम असेंच नेटानें चालवून, समुद्राच्या व खुष्कीच्या अशा दोन्ही बाजूंनीं शहरावर एकदम मारा करावा, म्हणजे शहर लवकर सर होईल, असा सेनापति वालथा ओगली व अहंमदपाशा यांचा आग्रह होता. सुलतानास वालथा ओगलीचीच मसलत पसंत होती, पण समुद्राच्या

बाजूनें शहरावर हल्ला कसा करितां येणार, एवढीच काय ती मोठी अडचण होती.

मे महिन्यांतील एके दिवशीं संध्याकाळीं सुलतानांच्या डेऱ्यांतील खासगी दरबारांत ह्याच गोष्टीची वाटाघाट चालली होती. सरलष्कर कालीलपाशा यांनीं शेवटीं असें निश्चित सांगितलें कीं, समुद्राच्या बाजूनें शहरावर मारा करितां येण्यासाठीं, बंदर आपल्या ताब्यांत आल्यावांचून वेळचाचें काम यशस्वी होणें शक्य नाहीं. सुलतानासही ती गोष्ट पटली. परंतु तितक्यांत बाळथा ओगली उठून म्हणाले—" बंदर आतांच ताब्यांत आलें तर, मग तरी लढाई चालू ठेवावयास सरलष्कर तयार आहेत का ? "

कालीलपाशा—" हो हो, अलबत तयार आहे ! पण ती गोष्ट अशक्य आहे ! "

सुलतान—" बंदर तूर्त ताब्यांत येण्याची कांहीं तजवीज निघणें शक्य आहे का ? "

अहमदपाशा—" होय सरकार ! हे ग्रीक सरदार ड्यूक लियॉनशियस म्हणतात कीं, बंदर ताब्यांत येण्याचा इलाज आपण करूं ! "

सुलतान—" काय हो, लियॉनशियस, तुमची काय कल्पना आहे, सांगा पाहूं ? "

लियॉनशियस—" जहापन्हा, त्याला एकच उपाय आहे ! मारमोराच्या समुद्रांत असलेलीं आपलीं जहाजें वर बंदराच्या बाजूला आणिलीं पाहिजेत ! बंदरावर रोमन लोकांचा कडक बंदोबस्त आहे, आणि त्यांनीं समुद्रांत अभेद्य साखळदंड टाकला आहे, त्यामुळें जलमार्गानें जहाजें वर आणितां येणें शक्य नाहीं, म्हणून तीं खुष्कीच्या मार्गानेंच आणिलीं पाहिजेत ! "

सुलतान हंसून म्हणाले—" पण हें काम मानवी शक्तीच्या बाहेरचें दिसतें ! जहाजें जमिनीवरून येणार कशीं ? "

लियॉनशियस—" सरकार, मला जर आज्ञा झाली, आणि माणसांचा व सामग्रीचा भरपूर पुरवठा झाला, तर मी हें काम खात्रीनें करूं शकेन अशी मला उमेद आहे ! दहा हजार माणसें, छावणींत शिलक

असलेलें सर्व लांकूड व जरूर तितकी खर्चाची रक्कम माझ्या ताब्यांत मिळाली तर, आठ दिवसांत मी सरकारचीं जहाजें मारमोराच्या समुद्रांतून काढून खुस्कीच्या मार्गानें सुवर्णशृंग बंदराजवळ आणून पोंचवीन !"

कालीलपाशा रागानें म्हणाला—"एवढा मोठा स्वतंत्र अधिकार सेनापतींवांचून दुसऱ्याच्या हातीं देणें मला सुरक्षित दिसत नाहीं ! ड्यूक लियॉनशियस यांच्याबद्दल माझ्या मनांत शंका आहे असें नाहीं, तथापि त्यांनीं अद्यापि सद्धर्माचा स्वीकार केलेला नाहीं, आणि सरकारनींही त्यांना पाशाची पदवी अर्पण केलेली नाहीं !"

लियॉनशियस—"सरलष्कर साहेबांची एवढीच हरकत असेल, तर सरकारांनीं हा अधिकार माझे मित्र अहमदपाशा यांस द्यावा, म्हणजे वादच उरला नाहीं ! मी त्यांच्या हाताखालीं काम करण्यास तयार आहें !"

सुलतान—"ठीक आहे ! ही तोड पसंत आहे ! सेनापति अहमदपाशा ह्यांना आम्ही ह्या कामगिरीचा सर्व अधिकार देतों ! ड्यूक लियॉनशियस, तुम्हीं जर हें काम यशस्वी करून दाखविलें, तर तुम्ही मागाल तें बक्षीस मी तुम्हांस खुषीनें देईन ! पण जर त्यांत अपयश आलें, तर तुम्हांला कैद करून कॉन्स्टांटिनोपलला रोमन बादशहाकडे पाठवीन, आणि अहमदपाशाची सर्व संपत्ति जप्त करून त्याला हद्दपार करीन, हें मात्र पक्कें लक्षांत ठेवा ! हें तुम्हां दोघांनाही मान्य आहेना ?"

लियॉनशियसनें ती गोष्ट तत्काळ मान्य केली, व अहमदपाशालाही त्यानें आपली युक्ति अगोदर सविस्तर सांगून ठेवली असल्यामुळें त्यानेंही भीत भीत संमति दिली. तेव्हां सुलतानांनीं आपल्या हातांतील मोर्तबाची आंगठी काढून अहमदपाशाच्या स्वाधीन केली, आणि त्याला लियॉनशियसच्या मदतीनें कामास लागावयास हुकूम दिला.

दुसरे दिवशीं सकाळीं सूर्योदयापूर्वींच दहा हजार माणसें कामावर रुजू झालीं. मारमोराच्या किनाऱ्यापासून सुवर्णशृंगाचा किनारा सुमारें सहा मैल लांब होता. त्यावर प्रथम निशाणें रोंवून रस्ता आखण्यांत आला. नंतर पन्नास पन्नास माणसांच्या टोळ्या करून एकदम सर्व ठिकाणीं

रस्ता तयार करण्याचें काम सुरू झालें. कोठें उंचवटे होते, ते खणून काढून सखल भागांत भर घालण्याचें काम जारीनें सुरू झालें; कोठें मोठमोठ्या तुळया कापून त्यांचे जाड जाड तक्ते पाडण्यास सुरवात झाली; जंगलांतून लांकडें तोडून आणण्याच्या कामावर कांहीं टोळ्यांची नेमणूक झाली; बैलगाड्यांतून सामान व मालमसाला इकडून तिकडे पोंचविण्याची धांदल उडून गेली. ह्याप्रमाणें जिकडे तिकडे झपाट्यानें पण व्यवस्थित रीतीनें काम सुरू झालें. कामगार लोकांचा वेळ फुकट जाऊं नये व कामाचा खोळंबा होऊं नये म्हणून, रस्त्याच्या बाजूलाच ठिकठिकाणीं अन्न पाण्याची सोय करण्यांत आली. लियॉनशियस व अहमदपाशा घोड्यांवरून एकसारखे ह्या कामगिरीवर फिरत होते.

ह्या विलक्षण व अभूतपूर्व कामगिरीची बातमी तुर्की छावणींत जिकडे तिकडे प्रसृत झाली. सर्व लोक आश्चर्यानें थक्क होऊन गेले. लॉर्ड मॅन्युअलच्या कानांवर ही बातमी जातांच, काय चाललें आहे, हें पाहण्याकरितां तेही घोड्यावर बसून निघाले. त्यांच्या बाहेऱ्यावर ठेवलेले स्वारही अर्थातच त्यांच्याबरोबर होते. एवढी अवाढव्य कामगिरी इतक्या व्यवस्थित रीतीनें चाललेली पाहून, लॉर्ड मॅन्युअलनाही मोठें कौतुक वाटलें. काम पहात फिरत असतां, सुलतानसाहेबही आपल्या निवडक परिवारासह घोड्यावर बसून काम पहावयास आलेले त्यांच्या दृष्टीस पडले. सुलतानांची भेट घेण्याची लॉर्ड मॅन्युअलची मुळींच इच्छा नव्हती, पण सुलतान अगदीं जवळ आल्यामुळें त्यांचा नाइलाज होऊन, त्यांना सुलतानास मुजरा करणें भाग पडलें.

सुलतान स्मितपूर्वक म्हणाले—"का, सरदारसाहेब, पाहिली का ही कामगिरी ? आतां तुमच्या शहराचा काय परिणाम होणार ?"

लॉर्ड मॅन्युअल—"सरकार आमच्या पवित्र शहराचा परिणाम ईश्वराधीन आहे ! तो आपल्याही हातीं नाहीं व आमच्याही हातीं नाहीं !"

सुलतान—"पण आणखी दोनतीन दिवसांत आमचीं जहाजें सुवर्णशृंगाजवळ आलीं म्हणजे, शहराचा किती वेळ टिकाव लागणार ?"

लॉर्ड मॅन्युअल—"टिकाव लागो किंवा न लागो, आमचे शूर बांधव आपल्या मातृभूमीचें संरक्षण करण्याकरितां अखेरपर्यंत धैर्यानें

लढतील, ह्यांत मुळींच शंका नाहीं ! "

सुलतान शहराकडे पहात गंभीर स्वरानें म्हणाले—" खरेंच, हें शहर फार सुंदर आहे, आणि तें प्राचीन भविष्याप्रमाणें आमच्या ताब्यांत येणार, ह्यांत तर शंकाच नाहीं ! अल्लाचें भविष्य कधीं खोटें होणार नाहीं ! "

लॉर्ड मॅन्युअल—" असें काय भविष्य आहे ? "

सुलतान—" शंभर वर्षांपूर्वी एका अवलियानें असें भविष्य वर्तविलें आहे कीं, कॉन्स्टांटिनोपल शहर एका शतकानंतर सद्धर्मपालक मुसलमानांच्या ताब्यांत जाणार, आणि त्या शतकेपर्यंत तें इस्लामी धर्माचें मुख्य पीठ होणार ! हें खरें होण्याची वेळ आतां आलेली दिसत आहे ! "

लॉर्ड मॅन्युअल दीर्घ उसासा टाकून खिन्न स्वरानें म्हणाले—" सध्यां तरी तसा संभव दिसत आहे खरा. तथापि ईश्वराची इच्छा असली तर अजूनही युरोपियन राष्ट्रांकडून आम्हांला मदत मिळेल, आणि आमच्या पवित्र मातृभूमीचा बचाव होईल ! "

सुलतान—" ती आशा आतां व्यर्थ आहे ! तुमचे लोक कितीही हिम्मतीनें लढले तरी, शहर अखेरीस आमच्या ताब्यांत येणार ह्यांत शंकाच नाहीं ! तथापि असल्या सुंदर शहराचा नाश होऊं नये, आणि तेथील शूर रहिवाशांची विनाकारण प्राणहानि होऊं नये, अशी आमची अद्यापिही फार इच्छा आहे ! लॉर्ड मॅन्युअल, तुम्हांला आम्हीं परवानगी दिली तर, तुम्ही शहरांत जाऊन इकडील सर्व परिस्थिति तुमच्या बादशहाला कळवून त्याचें मन वळवून हा नाश व प्राणहानि थांबविण्याचा प्रयत्न कराल का ? आणि बारा तासांच्या आंत परत येऊन पुनः आमच्या स्वाधीन होण्याचें वचन द्याल का ? "

लॉर्ड मॅन्युअल—" सरकार, मी इकडील सर्व हकीगत बादशहांच्या कानांवर घालण्याचें व बारा तासांच्या आंत परत येऊन आपल्या स्वाधीन होण्याचें वचन देईन, पण मन वळविण्याविषयीं म्हणाल तर, मातृभूमीच्या संरक्षणार्थ अखेरपर्यंत धैर्यानें लढून आपले प्राण समर्पण करावयासच मी बादशहांना व माझ्या इतर मित्रांना उत्तेजन देईन ! "

सुलतान किंचित् क्रुद्ध स्वरानें म्हणाले—" लॉर्ड मॅन्युअल, तुम्ही

आमच्या तोंडावर माझ्या विरुद्ध बोलण्याचें साहस करीत आहां, पण तुम्ही राजकीय कैदी असल्यामुळें, तुमच्यावर मी रागावत नाहीं! तुम्ही आपल्या लोकांना वाटेल ती सल्ला द्या, पण येथील खरी परिस्थिति बरोबर त्यांना कळवाल तर, त्यांच्या मनावर परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं अशी माझी खात्री आहे! एवढें काम तुम्ही प्रामाणिकपणानें करून याल का!"

लॉर्ड मॅन्युअल—" तेवढ्याबद्दल मी खात्रीपूर्वक वचन देतों!"

सुलतान—" ठीक आहे! उद्यां पुनः येऊन कामगिरी पहा. दुपारीं तुम्हांला मी शहरांत जाण्याचा परवाना देईन, तो घेऊन चला, आणि मध्यरात्रीपर्यंत परत या!"

लॉर्ड मॅन्युअल प्रणाम करून दुसरीकडे चालते झाले. नंतर सुलतानांनीं अहमदपाशा व लियॉनारियस ह्यांना बोलावून आणून त्यांची तारीफ केली आणि रात्रींही काम बंद न ठेवतां आणखी पांच हजार माणसें रात्रपाळीलाही कामावर लावण्यास सांगितलें. ह्याप्रमाणें व्यवस्था सांगून सुलतानसाहेब आपल्या डेऱ्याकडे निघून गेले.

लॉर्ड मॅन्युअल फिरत फिरत मारमोराच्या किनाऱ्याजवळ आले. तेथें किनाऱ्यालगत शंभर जहाजें उभीं होतीं. कामगारांचें मुख्य ठिकाणही येथेंच होतें. तुर्की एंजिनियर लोक अहमदपाशाच्या भोंवतीं जमून त्यास आपापल्या कामांची माहिती सांगत होते. लियॉनारियस मात्र तेथें हजर नसून दुसरीकडे काम पाहण्यास गेला होता.

अहमदपाशा गडबडींत होते तरी लॉर्ड मॅन्युअल्ना पाहतांच त्यांनीं त्यांचें स्वागत केलें. तेव्हां लॉर्ड मॅन्युअल म्हणाले—" सुलतानसाहेबांच्या सूचनेवरून, मी तुमची कामगिरी पहावयास आलों आहें!"

अहमदपाशा—" अवश्य पहावी! आपण क्षणभर थांबाल तर, मी स्वतःच आपल्या बरोबर येऊन, आपल्याला सर्व कामें दाखवीन!"

लॉर्ड मॅन्युअलनीं तें मान्य केलें. नंतर अहमदपाशांनीं भराभर सर्वांच्या तक्रारी दूर करून सर्व कामांचा निकाल लावला. नंतर ते आपल्या घोड्यावर बसून लॉर्ड मॅन्युअलसह कामगिरी पहात निघाले. प्रत्येक ठिकाणीं झपाट्यानें व शिस्तीनें काम चाललेलें पाहून लॉर्ड मॅन्युअलनीं

मोठें कौतुक वाटलें, आणि त्यांनीं अहमदपाशाच्या हुषारीची प्रांजलपणें तारीफ केली.

प्रत्येक कामगिरीची चौकशी करीत व कोठें लोकांना उत्तेजन देत अहमदपाशा लॉर्ड मॅन्युअलसह चालले असतां, थोड्या वेळानें ड्यूक लियॉनशिअस समोरून घोड्यावरून दवडत येत असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. तो जवळ येतांच पाशास सलाम करून ह्मणाला—"मी आपल्याकडेच वर्दी कळविण्यासाठीं निघालों होतों! सुवर्णशृंगाच्या बाजूची सर्व कामगिरी पूर्ण होत आली आहे!"

अहमद पाशा—"ठीक आहे! पण रात्रपाळीला आणखी माणसें कामावर लावून, काम एकसारखें सुरू ठेवण्याविषयीं सुलतान साहेबांचा हुकूम झाला आहे! त्याकरितां मशालींची भरपूर तजवीज ठेवली पाहिजे त्याशिवाय काम बरोबर चालणार नाहीं!"

लियॉनाशियस—"हो, मीं ती तजवीज केली आहे. शंभर माणसांची एक तुकडी मशाली बांधण्याच्या कामास लावली आहेत. आणि तेल, राळ आणावयास स्कुटारीला व इतर आसपासच्या गांवांना गाड्या पाठविल्या आहेत, त्या सूर्यास्ताच्या अगोदर खास येतील. पन्नास पन्नास कदमावर एकेक मशाल ठेवली ह्मणजे बस होईल!"

लॉर्ड मॅन्युअल—"मला वाटतें, ही विलक्षण धाडसाची कल्पना ड्यूक लियॉनशियस यांचीच असावी!"

अहमदपाशा—"होय! त्यांनींच प्रथम ही युक्ति सुचविली, ह्याबद्दल आम्ही सर्व त्यांचे अत्यंत ऋणी आहों! त्यांनीं ही कल्पना काढली नसती तर, आम्हांला तूर्त वेढा उठवून परत जाणेंच भाग होतें!"

लॉर्ड मॅन्युअल—"अरेरे, नीच लियॉनाशियस, तूं इतका देशद्रोही हरामखोर बनलास ना? दुर्दैवानें माझ्या हातीं ह्या वेळीं शस्त्र नाहीं, हें तुझें नशीब! नाहीं तर येथल्या येथेंच तुझ्या पापाचें योग्य प्रायश्चित्त दिलें असतें, मग त्याबद्दल माझें कांहीं झालें असतें तरी मी मुळींच पर्वा केली नसती!"

लियॉनशियसला राग येऊन त्यानें तरवारीस हात घातला, पण अहमदपाशा मध्यें म्हणाले—"हां हां, लियॉनाशियस, लॉर्ड मॅन्युअल

हे राजकीय कैदी असून, माझ्या ताब्यांत आहेत! त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी खुद्द सुलतानसाहेबांच्या शिरावर आहे, हें विसरूं नका! आणि लॉर्ड साहेब, आपणही आमच्या छावणींत असेपर्यंत संभाळून व राग आवरून बोलावें, अशी आपल्यालाही नम्र सूचना आहे!"

लॉर्ड मॅन्युअल—"ठीक आहे, पाशासाहेब, मी आपल्या कैदेंत आहें तोंपर्यंत मला आपली सूचना मान्य करणें भागच आहे! पण लियॉनशियस, तुला मात्र खचित सांगतों कीं, ईश्वर तुला ह्या घोर कर्माबद्दल तितकेंच भयंकर शासन कोणत्या तरी रीतीनें केल्यावांचून राहणार नाहीं! निदान मी तरी, प्रसंग येईल तेव्हां, तुला शक्य तितकें तीव्र शासन केल्याशिवाय राहणार नाहीं!"

लियॉनशियस तिरस्कारानें हंसत तेथून दुसरीकडे चालता झाला, आणि लॉर्ड मॅन्युअल व अहमदपाशा कामगिरी महात पुढें निघाले.

---

## प्रकरण २० वें.

## सुष्कीनें नौकानयन.



दिवस मावळल्यावर बादशहांचा परवाना घेऊन सर एडवर्ड व रिचर्ड बर्स्टो कॉन्स्टांटिनोपल शहरांतून बाहेर पडले, व बंदरावर येऊन एका सरकारी बोटींतून गलाटाच्या किनाऱ्यास येऊन उतरले. गलाटा हें गांव कॉन्स्टांटिनोपल खालची एक वाडीच होतें, पण तेथें बहुतेक जिनो-वाच्या श्रीमान् व्यापाऱ्यांची वस्ती असल्यामुळें, आणि जिनोवाच्या प्रबळ राष्ट्राचा त्यांना पाठिंबा असल्यामुळें, ते रोमन बादशहाच्या अंमल मुळींच तालीत नसत. तेथील जिनोवी सुभेदारास दिवाणी फौजदारी व मुलकी कामांचा पूर्ण अखत्यार असे. त्यामुळें कॉन्स्टांटिनोपलच्या बादशहाकडे त्यांचा मुळींच संबंध येत नसे. अर्थात् गलाटा गांवावर कॉन्स्टांटिनोपलची सत्ता नुसती नांवाची होती. सांप्रतच्या तुर्की युद्धाच्या बाबतींत गलाटाचे लोक आपले हितसंबंध संभाळून, अगदीं स्वस्थ

राहिले होते. ते तुर्कांना मिळणें शक्यच नव्हतें, पण तुर्कांच्या भीतीनें कॉन्स्टांटिनोपलला मदत करण्याचीही त्यांची छाती नव्हती. तुर्की सुलतानालाही जिनोवा सारख्या स्वतंत्र बाण्याच्या प्रबल राष्ट्राशीं शत्रुत्व संपादन करणें श्रेयस्कर वाटत नसल्यामुळें त्यांनींही गलाटा गांवाला मुळींच धक्का लावला नाहीं.

सर एडवर्ड व रिचर्ड गलाटाच्या वेशींत येतांच, वेशी बाहेरील चौकीदारानें त्यांना हटकलें. तेव्हां त्यांनीं चौकीदारास आपला परवाना दाखविला, व वेस उघडण्यास सांगितलें. तेव्हां तो म्हणाला--"छे छे, साहेब, सूर्यास्ताबरोबर वेशी बंद केल्या म्हणजे दुसरे दिवशीं सूर्योदयापर्यंत कोणालाही वेस उघडूं नये, असा सुभेदारांचा सक्त हुकूम आहे!"

सर एडवर्ड---" पण हा बादशहांचा परवाना तुम्ही मानीत नाहीं का ? "

चौकीदार--" परवानाच काय, पण खुद्द बादशहांची स्वारी आली तरी देखील वेशी उघडण्याची आम्हांला परवानगी नाहीं ! "

सर एडवर्ड--" बरें, तुर्की छावणींत काय काम चाललें आहे ? "

चौकीदार--" तें मात्र मोठें विलक्षण काम आहे ! खुष्कीच्या मार्गानें जहाजें मारमोराच्या समुद्रांतून गोल्डन हॉर्नकडे आणण्याची तुर्कांची खटपट चालली आहे, आणि ती बहुतेक यशस्वी होणार असा रंग दिसूं लागला आहे ! "

सर एडवर्ड---" ही गोष्ट तुम्हीं बादशहांना कां कळविली नाहीं ? "

चौकीदार--" आम्हांला तरी आज संध्याकाळपर्यंत त्याचें खरें स्वरूप कोठें कळलें होतें ! तोफांचे गाडे नेण्यासाठीं रस्ता करीत असतील, अशी आमची समजूत होती. संध्याकाळीं एक तुर्की स्वार दारूसाठीं गांवांत आला होता, त्याच्या तोंडून समजलें कीं, ह्या रस्त्यावर मोठमोठे तक्ते टाकून, व जहाजांना चाकें बसवून तीं ह्या रस्त्यानें बैलांकडून ओढीत आणणार आहेत ! "

सर एडवर्ड--" ठीक आहे. आम्ही तेंच समक्ष पाहण्याकरितां आलों आहों ! गांवाबाहेरून जाण्यास तुमची कांहीं हरकत नाहीं ना ? "

चौकीदार--" नाहीं. छावणी जवळ आहे, सावधगिरीनें वागा ! "

सर एडवर्ड व रिचर्ड यांनीं जिनोवी व्यापाऱ्यांचे वेष घेतले होते, तथापि ते मोठ्या सावधगिरीनें अंधारांतून छपत छपत पुढें निघाले. ते एका टेंकडीवर चढून पाहूं लागले तों, मारमोराच्या किनाऱ्यापासून सुवर्ण-शृंगापर्यंत मशालीची रांगच्या रांग त्यांच्या दृष्टीस पडली. जिकडे तिकडे माणसांचा कलकलाट व हत्यारांचा खणखणाट चालला होता. मारमोराच्या किनाऱ्याकडे विशेष गर्दी व गलबला दिसत होता, म्हणून त्या बाजूस शक्य तितकें जवळ जाऊन, ते पाहूं लागले, तों एक जहाज यारीच्या सहायानें समुद्रांतून उचलून रस्त्यावरील तक्त्यांवर ठेवण्याचें काम चाललें होतें. चार बाजूंना चार यान्यांच्या जोरानें व कित्येक माणसांच्या मदतीनें तें हळूहळू उचललें जात होतें. कांहीं वेळानें तें किनाऱ्या लगतच्या चार खांबांवर उभें करण्यांत आलें. नंतर त्याच्या दोहों बाजूस मोठमोठीं लांकडी चाकें बसविण्यांत आलीं. मग खालचे खांब काढून घेऊन व पुढें बैलांच्या पन्नास जोड्या जुंपून वंगणानें गुळगुळीत केलेल्या तक्त्यांवरून तो जहाजाचा अगडबंब गाडा हळूहळू ओढला जाऊं लागला. मध्येंच एखादा दोर तुटे किंवा दुसरी कांहीं अडचण उत्पन्न होई, त्या वेळीं लियॉनशियस स्वतः येऊन ती दूर करून देई. तो एकसारखा घोड्यावरून इकडे तिकडे फिरतच होता.

जहाजाचा गाडा पुढें गेलेला पाहतांच, सर एडवर्ड आपल्या सोबत्याकडे वळून म्हणाले—" चल रिचर्ड, जाऊं या आतां परत ! "

रिचर्ड—" चला साहेब ! पण तो हरामखोर लियॉनशियस आपल्याला दिसला कां ? आपल्याच मातृभूमीच्या नाशाकरितां किती जिवाघाड खटपट करीत आहे ! "

सर एडवर्ड—" त्या पातकी सैतानाचें नाव देखील काढूं नको ! तो दृष्टीस पडतांच माझ्या अंगाचा इतका संताप झाला होता कीं, माझ्या आटोक्यांत असता तर मी तेथल्या तेथेंच त्याच्या पापमय जीविताचा तत्काळ शेवट करून टाकला असता ! "

त्यानंतर दोघेही मुकाट्यानें परत कॉन्स्टांटिनोपलकडे निघाले.

लॉर्ड मॅन्युअल दोनप्रहरींच कॉन्स्टांटिनोपल शहराकडे जाणार होते.

पण कांहीं जहाजें ह्या नव्या रस्त्यानें सुरक्षित गेलेलीं प्रत्यक्ष पाहून, मगच त्यांनीं जावें, असें अहमदपाशांनीं सुलतानास सुचविल्यामुळें, त्यांनीं लॉर्ड मॅन्युअलना रात्रीं शहरांत जाण्यास सांगितलें त्याप्रमाणें सायंकाळीं त्यांना परवाना मिळाल्यावर त्यांनीं निघण्याची तयारी केली.

लियॉनशियस संध्याकाळीं कामगिरीवरून गडबडीनें आपल्या तंबूंत परत आला. त्याच्या विश्वासू नोकरानें एक दारूचा पेला त्याच्या पुढें केला, तो तत्काळ झोकून तो म्हणाला--" निसिटस, मीं सांगितलेल्या कामाची काय तजवीज झाली ? "

निसिटस--" सर्व व्यवस्था बरोबर झाली आहे साहेब ! अल्ली व चेनुडा ह्या दोन इसमांना मारेकऱ्यांचें काम करण्यास तयार केलें आहे. दोघेही विश्वासू असून, त्यांना भरपूर बक्षीसही कबूल केलें आहे. तसेंच हें काम फसल्यास त्यांचीं डोकीं उडविलीं जातील, अशीही त्यांना जरब घातली आहे. ते मघांच त्याच्या पाळतीवर गेले आहेत. आतां त्या बाबतींत काळजी करण्याचें कारण नाहीं. "

लियॉनशियस--" ठीक झालें ! दे तर आणखी एक पेला ! मॅन्युअल, माझ्या अंमलदारासमक्ष माझा अपमान करून, मला धमकावीत होतास नाहीं का ? भोग आतां आपल्या कर्माचें फळ ! निसिटस, ते मारेकरी आपलें काम आटोपून परत येतांच मला कळीव ! "

लियॉनशियस पुनः घोड्यावर बसून कामगिरीवर निघून गेला.

बराच वेळ मुकाट्यानें मार्ग चालून गलाटाजवळ परत आल्यावर रिचर्डला स्वस्थ राहवेना. तो म्हणाला—" साहेब, आमचा किंवा तुर्कांचा, कोणाचाही ह्या युद्धांत जय झाला तरी, लियॉनशियसला योग्य शासन झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी माझी खात्री आहे ! "

सर एडवर्ड—" रिचर्ड, आतां आमचा जय होण्याची आशा तरी उरली आहे का ? आतां आमच्या हातून त्याला शासन कसें होणार ? "

रिचर्ड—" कां बरें ? अजून कांहीं तुर्कांचीं सर्व जहाजें सुवर्णशृंग बंदरांत आलेलीं नाहींत, तोंपर्यंतच जेवढीं आलीं आहेत तेवढ्यांवर तोफांचा मारा करून तीं बुडवितां आलीं तर, तुर्कांचे इतके श्रम व्यर्थ जातील, आणि त्यांची बरीच नाउमेद होईल ! "

सर एडवर्ड—" तोच विचार बादशहांच्या कानावर घालण्याचें मीं मनांत आणिलें आहे! ही मसलत साधली तर, तूर्त तरी आपला बचाव होईल, असें वाटतें! पण त्यांतही तो हरामखोर कांहीं आपल्या हातीं लागण्याचा संभव नाहीं!"

रिचर्ड—" जरी तो आपल्या हातीं लागला नाहीं, तरी सुलतान त्याला शासन केल्यावांचून राहणार नाहीं! त्याच्या सारख्या विश्वास-घातकी हलकट माणसावर विश्वास टाकण्याइतका, सुलतान कांहीं खुळा नाहीं! ही त्याची कल्पना फसली कीं, त्याचें आयुष्य संपलें!"

इतक्यांत त्यांच्यापासून जवळच तुर्की छावणीच्या बाहेर कांहीं अंतरा-वर आरडाओरड व मारामारी चालल्याचा आवाज त्यांच्या कानांवर आला. तो ऐकून रिचर्ड थबकून म्हणाला—" ऐका, साहेब, हा काय प्रकार असावा बरें?"

सर एडवर्ड लक्षपूर्वक ऐकून म्हणाले—" तुर्की शिपाई दारू पिऊन दंगामस्ती करीत असतील झालें!"

रिचर्ड—" छे छे, त्यांत एक ग्रीक आवाज ऐकूं येत आहे!"

सर एडवर्ड—" होय का? चला तर, काय आहे तें पाहूं या!"

दोघेही त्या दंग्याच्या धोरणानें झपाट्यानें पुढें गेले, तों एके ठिकाणीं एक मशाल जमिनीवर जळत पडली असून एक ग्रीक गृहस्थ जखमी होऊन अस्ताव्यस्त पडला आहे, व दुसरा एक सशस्त्र तुर्की शिपाई त्याच्या जवळ उभा असून, त्यांची चाहूल होतांच आणखी दोघे अंधा-रांत पळून गेल्याचें त्यांच्या दृष्टीस पडलें.

दोघे जिनोवी गृहस्थ जवळ आलेले पाहून तुर्की शिपाई त्यांना म्हणाला—" साहेब, कृपा करून ह्या सरदारसाहेबांना कोठें तरी जवळ-पास एखाद्या सुरक्षित ठिकाणीं नेण्यास मला मदत कराल का?"

रिचर्डनें तुर्की भाषेनें विचारलें—" हे कोण आहेत? आणि त्यांना काय झालें आहे? तुम्हींच त्यांच्यावर हल्ला केला कीं काय?"

तुर्क—नाहीं साहेब, ते आमच्या छावणींतील राजकीय कैदी असून, सुलतानसाहेबांच्या हुकमानें सरकारी कामाकरितां शहरांत जात होते. मी त्यांना शहरच्या हद्दीपर्यंत पोंचवावयास आलों होतों. छावणीच्या

बाहेर येथें येतांच दोघां बदमाष मारेकऱ्यांनीं त्यांच्यावर एकाएकीं हल्ला करून त्यांना जखमी केलें! त्यांना लॉर्ड मॅन्युअल किसोलरास म्हणतात!"

"अरे देवा!" असे उद्गारून सर एडवर्ड हे लॉर्ड मॅन्यूअलजवळ बसले. मॅन्युअल अगदीं बेशुद्ध होते. त्यांचा फक्त श्वास चालला होता. त्यांच्या मानेवर तरवारीचा वार लागलेला होता. रिचर्डच्या मदतीनें त्यांनीं मॅन्युअलची जखम तात्पुरती बांधली. नंतर ते तुर्की शिपायास म्हणाले---"हे सरदारसाहेब आमच्या पूर्ण माहितीचे आहेत. आम्ही ह्यांना आमच्या गलाटा गांवीं घेऊन जातों, तेथून त्यांना कॉन्स्टांटिनोपलला पोंचवितां येईल. तुम्ही पाहिजे तर गलाटाच्या शिवेपर्यंत आमच्याबरोबर या!"

तुर्की शिपाई---"छे छे, त्यांना छावणींत परत नेलें पाहिजे. उद्यां दुपारीं परत येण्याविषयीं त्यांना सुलतानसाहेबांचा हुकूम आहे; पण ते जगतील कीं नाहीं याचीच शंका आहे, मग उद्यां परत कसचे येणार? आणि मी सुलतानसाहेबांना काय जबाब देऊं?"

रिचर्ड---"भल्या माणसा, मारेकऱ्यांच्या तावडींतून एकटाच कसा तरी निसटून आलों म्हणून सांग! बऱ्या बोलानें परत जाशील तर तुला बक्षीस मिळेल; नाहीं तर खरोखरच तुलाही येथें लंबे करून टाकूं हें पक्कें समज! हे सरदारसाहेब मारेकऱ्यांच्या हातून जखमी झाले, तथापि त्यांना शहरांत पोंचविण्याची व्यवस्था केली आहे, असें सुलतानसाहेबांना कळाव. आम्हीही बादशहाकडून सुलतानसाहेबांस तसें कळविण्याची व्यवस्था करूं व तुझीही योग्य शिफारस करूं!"

तुर्की शिपायाला रिचर्डचें म्हणणें पटलें व तो त्यांच्या बरोबर गलाटाच्या शिवेपर्यंत त्यांना पोंचवून बक्षीस घेऊन माघारा गेला. मॅन्युअल अद्यापि शुद्धीवर आला नव्हता. त्याला सर एडवर्ड व रिचर्ड हळूच उचलून नेत होते. गलाटाच्या वेशींत चौकीदारानें पुनः हटकलें. सर एडवर्डनें त्याला परवाना दाखविला. पण तो दोन इसमांचा असल्यामुळें चौकीदार तिघांना जाऊं देईना. सर एडवर्डनीं मॅन्युअलचे खिसे चांचपून पाहिले, तों सुलतानाचा परवाना त्यांना सांपडला. तो चौकीदाराला

दाखविल्यावर त्यांची पुढें सुटका झाली. किनाऱ्याला त्यांची होडी तयारच होती, तींतून ते शहरांत आले.

लॉर्ड मॅन्युअलना तशाच बेशुद्ध स्थितींत सर एडवर्डनीं आपल्या बंगल्यांत नेलें. नंतर त्यांनीं कामगिरीची माहिती बादशहास कळविण्यास रिचर्डला पाठवून दिलें; आणि एक मनुष्य सरकारी शस्त्रवैद्याकडे व एक लॉर्ड फ्रांझाकडे पाठविला. शस्त्रवैद्य जवळच असल्यामुळें ते लवकर आले.

सर एडवर्डनीं वैद्याला मॅन्युअलच्या खोलींत नेलें. त्यांना तेथें एका बिछान्यावर निजविलें होतें. शस्त्रवैद्यानें त्यांच्या मानेची जखम बराच वेळ लक्षपूर्वक पाहिली, नंतर त्यांची छाती व नाडी तपासली व एक दीर्घ सुस्कारा सोडला.

सर एडवर्ड भीत भीत म्हणाले—" कसें काय वैद्यबुवा, जखम कितपत भयंकर आहे ? "

वैद्य—" जखम तर प्राणघातक आहे, पण रोगी तरुण व सशक्त आहे म्हणून कांहीं तरी आशा वाटते ! प्रयत्न करणें आपलें काम आहे, यशापयश परमेश्वराच्या हातीं ! "

सर एडवर्ड—" वैद्यबुवा, वाटेल तितका खर्च होवो, पाहिजे तितकी खटपट पडो, पण माझा मित्र लॉर्ड मॅन्युअल ह्यांतून बरा झाला पाहिजे ! "

वैद्य गंभीर स्वरानें म्हणाले—" सेनापतिसाहेब, माझ्याकडून औषधांत किंवा उपचारांत यत्किंचित्‌ही कसूर होणार नाहीं. तथापि आयुष्याचा धनी मी नाहीं, हें तुम्हांस सांगावयास नकोच ! "

इतक्यांत प्रधानसाहेब खालीं आले असल्याची एका नोकरानें वर्दी दिली, तेव्हां शक्य तितके प्रयत्न करण्याविषयीं पुनः एकवार वैद्यास विनंति करून, सर एडवर्ड लॉर्ड फ्रांझांना भेटावयास गेले.

" कसें काय ? " लॉर्ड फ्रांझा उत्कंठित स्वरानें म्हणाले—" मॅन्युअल जखमी होऊन परत आला असें ऐकलें, हें काय प्रकरण आहे ? "

सर एडवर्डनीं सर्व हकीकत थोडक्यांत सांगितली, व शस्त्रवैद्य आले असून उपचार करीत असल्याचेंही कळविलें.

लॉर्ड फ्रांझा—“ तर मग मला एकदां त्याला भेटूं द्या तरी ! त्याचे कांहीं बरें वाईट झालें तर, जन्मभर माझें मन मला खात राहील ! ”

सर एडवर्ड—“ जखम भयंकर आहे खरी, तथापि ते त्यांतून बरे होण्याची पुष्कळ आशा आहे, असें वैद्यांचें मत आहे ! त्यांच्या परवानगीशिवाय आपल्याला रोग्याच्या खोलींत जातां येणार नाहीं ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ छे, तो माझ्या मुलासारखा आहे, त्याला पाहिल्यावांचून मला मुळींच चैन पडणार नाहीं ! ”

“ आतांच नको ! ” वैद्यबुवा आंत येऊन म्हणाले—“ मीं त्यांची जखम बांधली आहे; ते शुद्धीवर आले आहेत; मीं त्यांना थोडक्यांत सर्व स्थिति सांगितली आहे; ते फार अशक्त झाले असल्यामुळें, त्यांच्या अंतःकरणाला यत्किंचित्‌ही धक्का सोसणार नाहीं. मीं त्यांना झोंपेचें औषध दिलें आहे; त्यांना सकाळपर्यंत स्वस्थ निजूं द्या, कोणीही तिकडे जाऊं नका. माझा मनुष्य मीं तेथें बसविला आहे, तो विशेष कांहीं दिसल्यास मला तावडतोब कळवील. नाहीं तर मी सकाळीं पुनः येईन ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ पण त्याला आतां कांहीं भीति तर नाहीं ना ? ”

वैद्य—“ त्याच्या जिवाला कांहीं धोका दिसत नाहीं, पण जखम बरी होण्यास मात्र बरेच दिवस लागतील. त्याच्या शुश्रुषेची फार काळजी घेतली पाहिजे ! बरें, युफ्राशिया कोण आहे ? तिची त्यांनीं बरेच वेळां आठवण केली, आणि तिला आपला समाचार कळविण्याचीही इच्छा प्रदर्शित केली ! ”

सर एडवर्ड—“ ती त्यांची वाग्निश्चित वधू आहे ! मी तिला कळविण्याची तजवीज करितों ! ”

वैद्यबुवा निरोप घेऊन निघून गेल्यावर सर एडवर्ड म्हणाले—“ प्रधानसाहेब, रात्र फार झाली, आपण आतां घरीं चला. थियोडोरा जागी असली तर मी सुखरूप परत आलों आहें, असें तिला कळवा ! ”

लॉर्ड फ्रांझा—“ तिला झोंप कुठली ? बिचारी तुमच्या वाटेकडे डोळे लावून बसली आहे ! पण तुम्हीच तिकडे येत नाहीं का ? ”

सर एडवर्ड—" छे, आतां सवड नाहीं ! बादशहा माझी वाट पहात असतील, त्यांची भेट घेऊन त्यांना सर्व हकीगत अगोदर कळविली पाहिजे ! आपणही तिकडे याल तर, पुढील विचार ठरवावयास बरें पडेल ! "

लॉर्ड फ्रांझा—" ठीक आहे, तुम्ही पुढें व्हा, मी घराकडे जाऊन येतों ! "

दोघेही बंगल्यांतून बाहेर पडले. सर एडवर्डनीं राजवाड्यांत येऊन वर्दी दिली. तत्काळ बादशहांनीं त्यांना आंत बोलावलें. रिचर्ड बर्स्टो अगोदरच तेथें आला असून, त्यानें बादशहांना सर्व हकीगत कळविली होती.

सर एडवर्डचें स्वागत करून बादशहा म्हणाले—" सेनापति, तुमच्या धैर्याच्या व हुषारीच्या कामगिरीबद्दल आम्ही तुमचे अत्यंत ऋणी आहों ! तुमच्या विचाराप्रमाणें, सुवर्णशृंग बंदरांत आलेल्या तुर्की जहाजांवर तावडतोब मारा सुरू केला पाहिजे, असेंच आमचेंही मत आहे ! एकदां शत्रूंनीं ती बाजू व्यापली म्हणजे, आपल्याला बचावाची आशाच उरली नाहीं ! "

सर एडवर्ड—" होय सरकार, पण ही सर्व तजवीज तावडतोब होणें शक्य नाहीं ! आपला सर्व तोफखाना बंदराच्या बाजूला चांगल्या माऱ्याच्या ठिकाणीं आणिला पाहिजे, शिवाय आपलीं जहाजेंही सर्व ह्या बाजूला गोळा केलीं पाहिजेत, म्हणजे प्रथम तोफांचा मारा सुरू करून त्याच्या आश्रयानें जहाजांचाही हल्ला चढवितां येईल ! "

बादशहा—" ठीक आहे ! ती सर्व व्यवस्था आम्ही तुमच्यावरच सोंपवितों ! बरें, लॉर्ड मॅन्युअलचें कसें काय आहे ? "

सर एडवर्ड—" त्यांची जखम जबर आहे, पण त्यांच्या जिवास बहुतेक धोका नाहीं असें वैद्यांनीं सांगितलें आहे ! त्यांना फक्त बारा तासांच्या मुदतीनें इकडे येण्यास परवानगी मिळाली होती, असें ऐकलें आहे, पण आतां त्यांना परत जातां येणें शक्य नाहीं. ही गोष्ट सुलतानास कळविली पाहिजे, म्हणजे त्यांच्यावर वचनभंगाचा आरोप येणार नाहीं ! "

बादशहा—"ठीक आहे, हलकारा सुलतानाकडे पाठवा, आणि पाहिजे तर त्यांची खात्री पटविण्याकरितां त्यांच्या दरबारच्या हकीमासही बोलावा, शिवाय अशा स्थितींत लॉर्ड मॅन्युअलना परत पाठविण्यापेक्षां त्यांच्या ऐवजीं रशीदपाशाला परत घेण्यास ते तयार असतील तर आम्ही कबूल आहों, असेंही त्यांना कळवा. अशा रीतीनें तरी त्यांची सुटका झाल्यास पाहूं!"

सर एडवर्ड—"होय सरकार, ही कल्पना उत्तम आहे! मी त्याप्रमाणें तजवीज करितों! येतों तर आतां, रात्र फार झाली!"

इतक्यांत प्रधानसाहेब आल्याची वर्दी आली. तत्काळ त्यांना आंत बोलावण्यांत आलें. बादशहांनीं त्यांना आपला ठरलेला विचार थोडक्यांत सांगितला. लॉर्ड फ्रांझानींही तो पसंत केला.

नंतर लॉर्ड फ्रांझा सर एडवर्डकडे वळून म्हणाले—"सेनापतिसाहेब, तुम्ही तोफखान्याच्या व जहाजांच्या तजविजीला लागा; बाकीची सर्व व्यवस्था मी करितों!"

बादशहा—"ठीक आहे, तसें करा. बरें आणखी काय खबर बात?"

लॉर्ड फ्रांझा—"कोतवालसाहेब, आपल्या हुकमानें तुर्कांच्या टेहेळणीवर गेले होते, ते तुर्कांच्या हातीं लागून कैद झाले, अशी बातमी आहे, पण अद्यापि खात्रीशीर हकीगत कळली नाहीं!"

बादशहा—"अरेरे, तो फार शूर व इमानी कामगार होता! असे विश्वासू लोक आतां आपल्याजवळ थोडेच आहेत! प्रधानजी त्याचा पुरता तपास करून आम्हांला काय तें कळवा! कोतवालासारखा भरंवशाचा कामगार अशा प्रसंगीं हातचा जाणें, हें मोठेंच नुकसान!"

लॉर्ड फ्रांझा—"मी त्याबद्दल नक्की तपास करून लवकरच सरकारांस काय तें कळवितों! येतों तर आतां!"

सर्वजण बादशहांचा निरोप घेऊन आपापल्या स्थानीं निघून गेले.

## प्रकरण २१ वें.

# घरभरणी.



दुसरे दिवशीं सकाळीं एक निराळाच देखावा दिसूं लागला. केप हॉर्नच्या वरच्या बाजूला सुमारें शंभर तुर्की जहाजें, आपलीं चंद्रांकित हिरवीं निशाणें फडकावीत डौलानें उभीं होतीं. मारमोराचा समुद्र बहुतेक ओस पडला होता. उत्तरेकडील तटाबाहेरची तुर्की छावणीही शून्य झाली होती. बहुतेक घोडेस्वार, तोफखाना व पायदळ शहरच्या पूर्वभागीं गोल्डन हॉर्न (सुवर्णशृंग) बंदराच्या बाजूला जमूं लागलें होतें. मोठमोठीं लांकडें, धोंडे व दारूगोळा गाड्यांतून ह्याच बाजूला येऊं लागला होता. ह्या एकंदर तयारीवरून, आज पूर्व बाजूनें शहरांवर हल्ला होणार, हें उघड दिसत होतें.

हा प्रकार शहरांतील लोकांच्या दृष्टीस पडल्यावर तेही कांहीं स्वस्थ बसले नाहींत. ह्या बाजूनें चढाई होणें अशक्य वाटत असल्यामुळें, त्यांनीं इकडील तटबंदीच्या बंदोबस्ताकडे आजपर्यंत विशेष लक्ष दिलें नव्हतें, पण आतां त्यांनीं एकदम शेंकडों मजूर व गवंडी कामाला लावून, तटाची व बुरजाची दुरुस्ती झपाट्यानें चालविली. बादशाही आरमारांत शिल्लक असलेलीं दहाही जहाजें सुवर्णशृंग बंदरांत आणून, लढाईच्या तयारीनें उभीं केलीं. चोहोंकडील तोफा आणून पूर्व तटबंदी व बुरजांवर मोक्याच्या ठिकाणीं रोंखून ठेवल्या. सर एडवर्ड, जस्टीनियन, व स्वतः बादशाहा देखील एकसारखे फिरून, लोकांना काम करण्यास उत्तेजन देत होते.

बादशहांकडून आलेल्या सूचनेप्रमाणें सुलतानांनीं आपल्या दरबारच्या हकीमास लॉर्ड मॅन्युअलची स्थिति समक्ष पाहण्यासाठीं पाठविलें. त्यांनीं मॅन्युअलची तपासणी करून, सुलतानास कळविलें कीं, लॉर्ड मॅन्युअलच्या जिवास कांहीं धोका नाहीं, तथापि त्यांची जखम बरी होण्यास बरेच दिवस लागतील. त्यावरून सुलतानांनीं त्यांच्या मोबदला रशीदपाशास स्वीकारण्याचें साफ नाकारलें, व लॉर्ड मॅन्युअल हिंडण्या फिरण्या-

सारखे बरे होतांच त्यांनीं परत येऊन आपल्या स्वाधीन झालें पाहिजे, असें बादशहांस कळविलें.

लॉर्ड मॅन्युअलना ही हकीकत कळेपर्यंत त्यांचें मन अतिशय अस्वस्थ होतें. परंतु बादशहांनीं स्वतः येऊन त्यांना सुलतानाचा निरोप कळविला, तेव्हां त्यांचें समाधान झालें. आपल्याला कैदेंत परत जावें लागणार ह्याबद्दल त्यांना फारसें वाईट वाटलें नाहीं, शहराच्या संरक्षणाच्या कामीं आपल्याला कांहीं करितां येत नाहीं, एवढ्यामुळेंच त्यांचें मन उद्विग्न झालें होतें. परंतु वचनभंगाचा दोष तरी आपल्यावर आतां येणार नाहीं, हें पाहून त्यांचें मन बरेंच शांत झालें. वैद्यबुवांच्या संमतीनें त्यांची प्रियकर भावी पत्नी युफ्रासियाही त्यांना भेटली. तिचें विलक्षण धैर्य पाहून त्यांनाही धीर आला.

संध्याकाळची वेळ झाली. थियोडोरा आपल्या पतीची वाट पहात आपल्या महालांत एकटीच चिंतित बसली होती. संध्याकाळपर्यंत आपल्याला घरीं येण्यास सवड होणार नाहीं, असें सकाळींच त्यांनीं तिला सांगितलें होतें. लॉर्ड कांझाही दिवसभर कामांत गुंतलेले होते, त्यामुळें तिला एकटीला तो कंटाळवाणा दिवस जातां जाईना. दिवस मावळला तरी देखील सर एडवर्ड आले नाहींत, तेव्हां रात्रीं तरी येण्यास सवड होते कीं नाहीं अशी तिला शंका वाटूं लागली. इतक्यांत महालाचें दार उघडून सर एडवर्ड आंत आले. त्यांना पहातांच थियोडोराची सर्व चिंता एकदम दूर होऊन, तिचें मुखकमल प्रफुल्लित झालें. ती चटकन् उठून त्यांच्या जवळ आली. सर एडवर्ड तिचा हात धरून प्रेमभरानें म्हणाले—“ लाडके, सगळ्या दिवसांत तुझी भेट घेण्यास मला सवड झाली नाहीं, त्यामुळें माझ्या मनाला किती तरी तळमळ लागून गेली होती. पण माझा नाइलाज झाला. शहर—कोतवाल दुर्दैवानें शत्रूच्या हातीं सांपडून कैद झाले, त्यामुळें त्यांच्याही कामाची जबाबदारी माझ्यावरच पडली ! ”

“ अरेरे ! ” थियोडोरा खिन्न स्वरानें उद्गारली—“ कालची बातमी खरीच ठरली तर ! आपला एक मोठाच आधार तुटला म्हणावयाचा ! बरें, लॉर्ड मॅन्युअलची प्रकृति कशी काय आहे ? ”

सर एडवर्ड—" त्यांची प्रकृति आतां ठीक आहे त्यांच्यासंबंधानें आतां काळजी उरली नाहीं ! मी आतां त्यांना पाहूनच इकडे आलों ! "

थियोडोरा—" ईश्वरानें ही मोठीच कृपा केली. मी नुकतीच युफ्राशियाला भेटून तिचें समाधान करून आलें ! त्या बिचारीबद्दल मला फार काळजी वाटत होती ! बरें, आपली कामगिरी पुरी झाली का ? कीं लागलेंच जावयाचें आहे ? "

सर एडवर्ड—" छे छे, आतां रात्रीं कांहीं काम नाहीं ! सर्व लोक दिवसभर श्रम करून थकून गेले असल्यामुळें, सर्वांनांच विश्रांति दिली आहे ! आणि शत्रूच्या छावणींतही फारशी हालचाल दिसत नाहीं ! शिवाय आज आपला गृहप्रवेश–समारंभ उरकून घ्यावयाचा असल्यामुळें, मी बादशहांची आज्ञा घेऊनच इकडे आलों आहें ! "

इतक्यांत लॉर्ड फ्रांझा गडबडीनें आंत येऊन म्हणाले—" हं, आटपा सर एडवर्ड ! सर्व नोकर लोक तुम्हांला पोंचविण्यास तयार होऊन उभे राहिले आहेत ! मलाही फार वेळ सवड नाहीं ! मशाली पेटवून तयार आहेत ! थियोडोरा, बाळ तुझी तयारी झाली ना ? तुझी दासी तुझ्याबरोबर येतच आहे ! वरातीचा समारंभ मोठ्या थाटाचा करावयाची माझी हौस होती पण ह्या गडबडीच्या प्रसंगीं तें शक्य नाहीं ! "

थियोडोरा—" बाबा, आपला आशीर्वाद आणि पतिप्रेम ह्या दोन गोष्टी मला पूर्ण लाभल्यावर, त्यापुढें बाह्य समारंभांची काय मातबरी आहे ! पण आपल्याला सोडून जाणें माझ्या जिवावर येत आहे ! "

सर एडवर्ड—" लाडके, तसें मनांत आणण्याचें कांहीं कारण नाहीं ! इतके दिवस तूं एकटीच त्यांची काळजी वहात होतीस, पण आतां आपणां उभयतांवरही त्यांचा सारखाच हक्क आहे ! शिवाय आपण कांहीं त्यांच्यापासून दूर जात नाहीं ! त्यांच्या घरांतच असल्यासारखें आहे ! "

लॉर्ड फ्रांझा—" खरेंच बाळ, ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं तुला योग्य पतीच्या स्वाधीन करून मी पूर्ण निष्काळजी झालों ! आतां तुझ्या घरभरणीचा मला चिंता उरली नाहीं, शिवाय मलाही सर एडवर्ड यांचा आधार झाला ! ते तुला पूर्ण सुखांत ठेवतील अशी माझी खात्री आहे ! आणि मीही तुमच्या जवळच आहें ! "

सर एडवर्ड व थियोडोरा ह्या उभयतांनीं लॉर्ड फ्रांझांना प्रणाम केला. त्यांनीं दोघांनाही पितृप्रेमानें आलिंगन शुभाशीर्वाद दिले. नंतर सर्व मंडळी सर एडवर्ड यांच्या बंगल्याकडे निघाली.

---

## प्रकरण २२ वें.

## प्रार्थनामंदिरांतील अपघात.



सुलतानाच्या सैन्याची व आरमाराची सर्व तयारी होण्यास चार दिवस लागले. सामुद्रधुनीच्या अगदीं अरुंद भागीं तुर्कांनीं एक पन्नास हात लांबीचा लांकडी पूल तयार केला, त्या पुलाच्या एका बाजूला तुर्की जहाजें उभीं केलीं व दुसऱ्या बाजूला नव्या अवाढव्य तोफांचे मोर्चे बांधले. शिवाय सेंट रोमेनसच्या बुरजावर पायदळ आणि घोडेस्वार यांचा हल्ला करण्याची तयारी केली. शहराच्या ह्या बाजूची तटबंदी अगदींच कच्ची होती, तरी रोमन लोकांनीं तिची शक्य तितकी दुरुस्ती केली होती. शिवाय तुर्कांची तयारी हाणून पाडण्याकरितां रोमन लोकांनीं त्यांच्यावर आपल्या तोफखान्याचा एकसारखा मारा चालविला होता, पण तुर्कांनीं त्याला मुळींच दाद दिली नाहीं.

तुर्कांच्या जंगीं तोफांचा व जहाजांवरील लहान तोफांचा एकसारखा मारा सुरू होतांच शहरचा जुना तट ठिकठिकाणीं हादरून ढासळूं लागला. शहरवासी लोक घाबरून जाऊन त्यांचा धीर खचत चालल्यामुळें, दुरुस्तीचें कामही वक्तशीर होईनासें झालें. तथापि भरपूर द्रव्याच्या आणि सर एडवर्ड, जस्टीनियन, लॉर्ड फ्रांझा व खुद्द बादशहा यांच्या उत्तेजनाच्या जोरावर शक्य तितकें काम चाललेंच होतें.

पांचव्या दिवशीं सायंकाळीं तुर्की पुलासमोरच्या तटबंदीच्या एका चौकींत रोमन बादशहाच्या सर्व लष्करी अंमलदारांची सभा भरली होती. बादशहासह सर्व मोठमोठे अंमलदार तेथें हजर होते, आणि पडत्या काळच्या सामान्य नियमास अनुसरून, आजच्या हल्ल्याच्या

अपयशाचें खापर एकमेकांच्या माथीं फोडण्याचा प्रयत्न करीत होते.

लष्करी एंजीनियर क्रुद्ध स्वरानें म्हणाले—" सेनापति जस्टीनियन, तुम्ही व तुमच्या जिनोवी सैनिकांनीं आज मनापासून आपलें कर्तव्य बजावलें असतें तर, निसेटस-बुरूज खास ढांसळला नसता, अशी माझी खात्री आहे!"

" लॉर्ड नोटारस, " जस्टीनियन रागानें उद्गारले —" दगड माती आंवळून धरणें हें कांहीं सैनिकांचें काम नव्हे ! तुम्ही जर त्या बुरजाकडे थोडें लक्ष पुरविलें असतें, आणि त्याची दुरस्ती केली असती, तर तो पहिल्याच धडाक्याला तरी निदान ढांसळला नसता! हल्ला चढवि-णाऱ्या शत्रूला पुढें येऊं न देणें, एवढेंच आमचें काम होतें, आणि तें आम्हीं बरोबर बजावलें !

व्हेनिसच्या सैन्याचा अधिकारी लोरेंझो उठून संतापानें ओरडला— " लॉर्ड नोटारस, तुम्ही आपल्या चुकीचा बोजा जिनोवी सेनापतीवर लादीत आहां ! बुरजाची स्थिति टिकाव धरण्यासारखी नव्हती, हें कोणीही सांगेल ! असें असतां जिनोवी सैन्यानें कुचराई केली असा तुम्ही त्यांच्यावर खोटा आरोप करीत आहां, ह्याबद्दल तुम्हांला योग्य जबाब द्यावा लागेल ! "

" खामोष ! " बादशहा हात वर करून अधिकाराच्या स्वरानें म्हणाले—" दोस्तहो, असें एकमेकांचें उणें काढून आपसांत भांडत बसण्याची ही वेळ नव्हे ! कोणी बरोबर काम केलें, किंवा कोणाची चूक अगर कुचराई झाली, हें ठरविण्याचें काम आमचें आहे, आणि योग्य वेळीं आम्ही त्या गोष्टींचा निकालही करूं ! सध्यां असा परस्परांचा अपमान करून आपसांत फूट पाडण्याचा जे कोणी प्रयत्न करतील, ते लष्करी कायद्याप्रमाणें देशद्रोही गुन्हेगार समजले जातील ! "

नोटारस—" पण सरकार, असले खोटे आरोप उघडपणें—"

" सबूर ! " बादशहा तीव्र स्वरानें म्हणाले—" आतां त्याची कांहीं वाटाघाट नको ! बुरूज कसा ढांसळला, हें ठरविण्याची ही वेळ नव्हे, तुर्कांनीं उभारलेला पूल आपल्याला पाडतां येईल कीं नाहीं ह्या गोष्टीचा

अगोदर विचार केला पाहिजे! सेनापति, तुम्हीं एंजिनियरांच्या मदतीनें तटबंदीची पाहणी केली कां?"

सर एडवर्ड—" होय सरकार! तुर्की तोफांच्या माऱ्यापुढें तटबंदी फार तर दोन दिवस टिकाव धरील, असें आमचें मत आहे!"

बादशहा—" मग मात्र तलवारीशिवाय आपल्याला दुसरा आधार नाहीं! बरें प्रधानजी, आपली काय सल्ला आहे?"

लॉर्ड फ्रांझा—" सरकार मला वाटतें, तुर्कांच्या ह्या लांकडी पुलाला आग लावून देण्याची कांहीं तरी खटपट करावी!"

जस्टीनियन—" बरोबर! त्याशिवाय दुसरा इलाजच दिसत नाहीं!"

बादशहा—" पण हें काम जिवावरचें व अत्यंत धोक्याचें आहे!"

जस्टीनियन—" सरकार मला आज्ञा झाली तर, मी तें काम बजावण्यास तयार आहें! रात्र काळोखी आहे व वाराही अनुकूल आहे! मी एका जहाजांतून मुकाट्यानें तुर्की काफिल्याजवळ जातों, आणि पुलावर व काफिल्यावर एकदम आगीचा वर्षाव करितों. एक जहाज पेटलें कीं, सर्व जळून खाक होतील, इतकीं तीं जवळजवळ आहेत! पूल पेटला नाहीं तर मात्र तोडून पाडण्याचा प्रयत्न करावा लागेल!"

सर एडवर्ड—" ही सल्ला ठीक दिसते! काम धोक्याचें आहे, पण ईश्वरकृपेनें साधलें तर, आपला बचाव होण्याचा संभव तरी आहे! नाहीं तर येथें स्वस्थ बसून काय होणार? तटबंदी ढांसळल्यावर मुकाट्यानें शत्रूच्या स्वाधीन व्हावें लागणार! त्यापेक्षां साहस करणें काय वाईट?"

इतर सर्व सभासदांनींही ह्या गोष्टीला आपली संमति दिली. इतक्यांत लेफ्टेनंट कॉंटारी गडबडीनें आंत आला. बादशहा त्याच्याकडे चकित दृष्टीनें पहात म्हणाले—" कां, लेफ्टेनंट, काय खबर?"

कॉंटारी—" सरकार, तुर्कांची जंगी तोफ इतक्यांतच चालू होण्याचा रंग दिसत असून, माऱ्याचा रोख ह्याच ठिकाणावर आहे, तेव्हा यापुढें येथें राहणें सुरक्षित नाहीं!"

बादशहा—" चला तर, बुरजावरच जाऊं या! जस्टीनियन, तुमची

सल्ला सर्वांना पसंत आहे, त्याअर्थी त्याप्रमाणें तजवीज करण्याच्या तयारीला लागा! चला, दोस्त हो बुरजावर जाऊन सर्व स्थिति प्रत्यक्षच पाहूं या!"

बादशहा निघाले, त्याबरोबर इतर सर्व मंडळीही त्यांच्या पाठोपाठ चालूं लागली. बुरजावर जाऊन पाहतात तों, विलक्षण देखावा त्यांच्या दृष्टीस पडला. पुलाच्या एका बाजूला तुर्की जहाजें हल्ला करण्याच्या तयारीनें उभीं असून, दुसऱ्या बाजूला भयंकर तोफा रोंखून ठेवल्या होत्या. स्वतः सुलतान आपल्या निवडक दरबारी पाशांसह घोड्यावर बसून, सर्व व्यवस्था पहात होते. पुलाच्या पलीकडे अफाट तुर्की सेना चढाईच्या हुकमाची वाट पहात सज्ज होऊन उभी होती. जय्यत तयारी दृष्टिस पडतांच बादशहासह सर्व मंडळींचीं अंतःकरणें उद्विग्न होऊन गेलीं.

ह्या बुरजाकडे शत्रूंचा मारा आजपर्यंत फारसा नसल्यामुळें, त्याच्या शेजारीं असलेल्या सेंट जॉनच्या मंदिरांत सर्व लष्करी अंमलदारांच्या माता भगिनी व स्त्रिया प्रार्थनेकरितां जमत असत, सायंकाळच्या प्रार्थनेची घंटा वाजूं लागतांच एक स्त्रियांचा घोळका मंदिरांत शिरूं लागला. त्यांत आपली प्रिय पत्नी युडोशियाही असलेली पाहून, कॉंटारीला मोठें कौतुक वाटलें.

तुर्की तोफ डागण्याची तयारी चालली होती, तिकडे सर्वांचें लक्ष होतें. इतक्यांत कॉंटारी गडबडीनें जवळ येऊन म्हणाला "सरकार, आपण तोफेच्या समोर उभे आहां, येथें उभें राहणें सुरक्षित नाहीं! सरकारच्या जीवितावर सर्व अवलंबून आहे!"

बादशहा किंचित हंसले व थोडे बाजूला झाले. इतक्यांत तुर्की गोलंदाज तोफेचा काना भरूं लागले. पुलाची व तोफेच्या मोर्चाची व्यवस्था पाहून बादशहा म्हणाले—"मुद्दाम ह्याच ठिकाणीं मारा करण्याची सल्ला तुर्कांना कोणीं दिली असावी बरें?"

सर एडवर्ड—"सरकार, तो हरामखोर, मात्रागमनी लियॉनशियस आहे ना तिकडे? त्याचेंच हें काम! इकडील तटबंदी मजबूत नाहीं, हें त्याला पूर्ण माहीत होतें!"

टीनियन—" तो हरामजादा माझ्या तावडींत सांपडला तर, त्याला चेरून टाकीन ! "

क्यांत तुर्की गोलंदाजांनीं तोफेचा काना पेटविला, पण तो वांया तोफ उडाली नाहीं. तेव्हां गोलंदाज व त्यांचे अंमलदार पुनः जवळ जमून पाहूं लागले. इतक्यांत बुरजावरील रोमन तोफ न् उडाली, आणि तुर्की गोलंदाजांपैकीं दोन तीन इसमांच्या या उडाल्या.

शाबास ! " बादशहा उद्गारले—" ही तोफ कोणाच्या ताब्यांत ? "

ॉटारी—" ही रिचर्ड वर्स्टांच्या ताब्यांतील तोफ आहे सरकार !"

र एडवर्ड—"हां सरकार, सावध रहावें, पुनः तुर्की तोफ डागण्याची दिसते ! "

तक्यांत तुर्कांची जंगी तोफ उडाली त्या दणक्यानें सर्व जमीन न गेली. त्या हादऱ्यानें तटाचा बराच भाग ढांसळून पडला. तोफेच्या व तटाच्या धुरळ्यानें दिशा धुंद होऊन गेल्या. परंतु तोफेचा प्रत्यक्ष तटाला न लागतां, तो तटावरून जाऊन, पलीकडील सेंट मंदिराच्या घुमटावर थडकला व तो घुमट ढांसळून खालीं पडला बर मंदिरांत प्रार्थनेकरितां जमलेल्या बायकांची एक हृदयद्रावक र किंकाळी ऐकूं आली, हा सर्व गोंधळ इतक्या थोड्या अवका- उडून गेला कीं, बुरजावरील सर्व मंडळी एकदम चकित व स्तब्ध . काय झालें व काय करावें, हें कोणासच सुचेना.

ादशहा प्रथम भानावर येऊन ओरडले—" चला चला, सर एडवर्ड, तील तितकीं माणसें घेऊन सेंट जॉन मंदिराकडे चला ! बिचाऱ्या चे प्राण वांचविण्याची अगोदर शक्य तितकी तजवीज केली पाहिजे!"

त्रयांची किंकाळी कानावर येतांच कॉंटारी तत्काळ सेंट जॉन मंदिराकडे ठ होता. बादशहा व इतर मंडळी त्याच्या पाठोपाठ तेथें जाऊन पोंचली. ंत एकच गोंधळ उडून गेला होता. घुमट कोसळून पडल्यामुळें, ाखालीं कित्येक बायका चिरडून तत्काळ मरण पावल्या होत्या. चे हातपाय मोडले होते व कांहीं घाबरून बेशुद्ध झाल्या होत्या.

ज्या शुद्धीवर होत्या त्या दारांतून बाहेर घुसत होत्या, पण सर्वांनाच बाहेर पडण्याची गडबड झाल्यामुळें, त्या एकमेकींना ढकलूं लागल्या. त्यांत ज्या अशक्त होत्या, त्या चेंगरून, खालीं पडून व तुडविल्या जाऊन ओरडूं लागल्या, त्यामुळें अधिकच आरडाओरड सुरू झाली. बादशहांनीं व त्यांच्या बरोबरच्या मंडळींनीं त्यांना शांत करण्याचा प्रयत्न चालविला होता, तथापि बराच वेळ त्यांच्याकडे कोणाचें लक्षही गेलें नाहीं.

कॉंटारी मात्र त्या गर्दीत घुसून बायकांना बाजूला सारून दारांतून आंत घुसला. त्याला त्याची पत्नी युडेशिया कोठें दिसेना, तिचीच त्याला अत्यंत काळजी लागली होती. आंतील भयंकर देखावा दृष्टीस पडतांच कॉंटारीच्या अंगावर शहारे आले. कित्येक स्त्रिया दगडांखालीं अर्धवट अडकून राहिल्यामुळें, रक्तबंबाळ होऊन ओरडत होत्या. धर्मोपदेशक व त्याच्या हाताखालचे दोघे इसम त्यांना दगडांखालून सोडविण्याचा शक्य तितका प्रयत्न करीत होते.

कॉंटारीनें गडबडीनें चोहोंकडे पाहिलें तों त्याची प्रियपत्नी युडेशिया एका खांबाजवळ पडलेली त्याला दिसली. तिचे डोळे मिटलेले असून, चेहरा फिकट पण शांत होता. तिचे दोन्हीं हात छातीवर होते. त्यावरून ती प्रार्थना करीत असतां, तशीच पडली असावी असें दिसत होतें. कॉंटारी तिच्या जवळ धांवत जाऊन पाहतो, तों तिचें प्राणोत्क्रमण झालेलें त्याच्या दृष्टीस पडलें. तिला कोठें जखम वगैरे लागलेली दिसत नव्हती. कॉंटारीनें तिच्या छातीवर हात ठेवून एक दीर्घ निश्वास सोडला नंतर त्यानें दोहों हातांनीं तोंड झांकून घेतलें. तशा स्थितींत दोन तीन मिनिटें गेल्यावर तो पुनः एक उसासा टाकून उठला त्याचा चेहरा शांत पण निस्तेज झाला होता. जवळच असलेल्या धर्मोपदेशाकडे वळून तो म्हणाला—" गुरुजी तुम्हाला कांहीं मदत पाहिजे का ? मी तयार आहे ! "

धर्मोपदेशक—" नको, बाबा, तुझें तुला कांहीं थोडें काम नाहीं ! शिवाय आतां बरीच मंडळी मदतीला आली आहे ! "

कॉंटारी पुनः युडेशियाच्या प्रेताजवळ आला, आणि तें प्रेत उचलून

पाठीवर घेऊन, आपल्या घराकडे निघाला. दारांतील गर्दी आतां कमी झाली असल्यामुळें, त्याला मंदिरांतून बाहेर पडण्यास फारसा त्रास पडला नाहीं. घरीं आल्यावर त्यानें युडेशियाचें प्रेत तिच्या बिछान्यावर ठेविलें. युडेशियाची आई घरांत नव्हती. ती कोठें गेली होती हें कॉंटारीला मुळींच माहीत नव्हतें. कॉंटारी आपल्या प्रिय पत्नीचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन स्तब्ध बसला.

रिचर्ड वर्स्टोंही मंदिरांत आला होता. त्याला कॉंटारी आपल्या पत्नीचें प्रेत घेऊन घराकडे गेल्याचें समजतांच. तो त्याचें सांतवन करण्यासाठीं त्याच्या घरीं आला. कॉंटारीच्या खोलीजवळ येऊन त्यानें दारावर हळूच थाप मारली. बराच वेळ झाला तरी आंतून कांहीं जबाब आला नाहीं, म्हणून त्यानें पुनः एकदां थाप मारून कॉंटारीला हाक मारली.

कॉंटारी ती हाक ऐकतांच दचकून भानावर आला, आणि चटकन् उठून दार उघडून बाहेर आला. त्याची विलक्षण निस्तेज व निर्विकार मुद्रा पाहतांच रिचर्ड भीतीनें दचकला. कॉंटारी त्याचा हात धरून गंभीर स्वरानें म्हणाला—" पुलावर हल्ला करण्याचा बेत आज रात्रीचाच ठरला आहे ! "

रिचर्ड—" कॉंटारी, त्या गोष्टी तूर्त राहूं देत ! तुझ्या पत्नीची हकीगत अगोदर सांग. तिला जबर जखमा झाल्या होत्या का ? "

कॉंटारी—" छे छे, त्या बाबतींत एक अक्षरही बोलण्याची माझी इच्छा नाहीं, व आतां जरूरही नाहीं ! "

रिचर्ड—" पण मला एकदां तिचें तोंड तरी पाहूं देशील कीं नाहीं ? "

कॉंटारी—" चल, अगोदर सेनापति साहेबांकडे जाऊन, पुढील तजवीज काय काय ठरली तें पाहिलें पाहिजे ! उगीच वेळ दवडण्यांत अर्थ नाहीं, आणि मला तरी सवडही नाहीं ! "

कॉंटारी घरांतून एकदम बाहेर पडून तटबंदीकडे निघाला. तेव्हां रिचर्डही त्याच्या पाठोपाठ चालला. कॉंटारी दुःखातिशयामुळें कांहीं अविचार करील कीं काय, अशी त्याला भीति होती, त्यामुळें त्याला

आपल्या दृष्टिआड होऊं द्यावयाचें नाहीं असा त्याचा निश्चय होता.

दोघे बुरजावर आले, तों सर एडवर्ड नुकतेच आपल्या बंगल्याकडे गेले असल्याचें त्यांना समजलें. तेव्हां कॉटारी त्यांच्या बंगल्याकडे निघाला व रिचर्डही त्याच्या पाठोपाठ तिकडे गेला.

सर एडवर्ड नुकतेच घरीं येऊन, आपल्या पत्नीला सेंट जॉनच्या मंदिरांतील अपघाताची हकीगत सांगत होते. कॉटारीच्या पत्नीच्या मृत्यूची हकीगत ऐकून थियोडोराला अतिशय वाईट वाटलें. ती अश्रूपूर्ण दृष्टीनें पतीकडे पहात म्हणाली—" बिचाऱ्या कॉटारीवर हा मोठाच गहजब गुदरला ! आपण त्याला भेटून त्याचें शांतवन तरी केलें का ? "

सर एडवर्ड—" नाहीं, त्याची अद्यापि गांठच पडली नाहीं ! मी मंदिरांत गेलों, तों तो आपल्या पत्नीचें प्रेत घेऊन घराकडे गेल्याचें समजलें ! त्याचें शांतवन तरी कोणत्या शब्दांनीं करावें ! सरकारी कामांत देखील त्याची अत्यंत जरूर होती, पण ह्या प्रसंगीं मीं त्याला बोलावलें नाहीं ! "

इतक्यांत सिरील दाराशीं येऊन हळूच म्हणाला—" लेफटेनंट कॉटारी भेटावयास आले आहेत ! "

सर एडवर्ड चटकन् आपल्याशींच उद्गारले—" इतक्यांतच तो मुद्दाम माझ्याकडे का आला असावा बरें ! लाडके, मी त्याची भेट घेऊन, मग परत येऊन तुला काय तें सांगेन ! त्याला ह्या वेळीं शक्य ती मदत केली पाहिजे ! "

सर एडवर्ड बैठकीच्या खोलींत येतांच कॉटारी त्यांना प्रणाम करून आदबीनें उभा राहिला. रिचर्ड बर्स्टोही त्याच्याबरोबर होताच !

सर एडवर्ड कळकळीच्या स्वरानें म्हणाले—" कॉटारी, तुझ्यावर गुदरलेल्या दुर्धर प्रसंगाबद्दल मला अत्यंत वाईट वाटत आहे ! मी त्यावेळीं सरकारी कामाच्या अडचणींत नसतों तर तत्काळ तुझ्याकडे धांवत आलों असतों ! "

कॉटारी—" साहेब, आपल्या ह्या सहानुभूतीबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहें ! पण मी सध्यां आपल्याकडे दुसऱ्याच एका कामाकरितां आलों आहें. आज रात्रीं तुर्कीपुलावर हल्ला करून, त्याला आग

लावून देण्याचा बेत ठरला आहे, असें मीं ऐकलें आहे ! तें खरें असेल तर; त्या कामगिरीवर जाण्यास मलाच हुकूम व्हावा, अशी माझी प्रार्थना आहे ! ”

सर एडवर्ड—“ कांहीं हरकत नाहीं ! पण एवढें लक्षांत ठेव कीं, ह्या प्रसंगीं आपल्या जिवाला मुद्दाम अपाय करून घेण्याचा कोणाचाही अधिकार नाहीं ! प्रत्येकाचा प्राण त्याच्या एकट्याचा मालकीचा नसून, ह्या वेळीं सर्व राष्ट्राची त्यावर सत्ता आहे ! शिवाय दुःखाला भिऊन प्राण देण्यास तयार होणें हें खरें शूरत्व नसून, नामर्दपणाचें लक्षण आहे ! ईश्वरानें ज्या स्थितींत आपल्याला ठेवलें, त्या स्थितींत राहण्याचें आपल्या अंगीं धैर्य नाहीं, असें त्यावरून सिद्ध होतें ! ”

कॉटारी —“ पण धनीसाहेब, युद्धाच्या प्रसंगीं जिवावर उदार होऊन साहसांत उडी घालणें, हें कांहीं नामर्दपणाचें ठरणार नाहीं ! मुद्दाम आत्महत्या करण्याची माझी इच्छा नाहीं, तथापि प्राणाची पर्वा न ठेवतां वाटेल तें साहस करण्याची मात्र माझी तयारी आहे ! म्हणून, तुर्की पुलावर जाऊन, त्याला आग लावण्याची कामगिरी मजकडे सोंपवावी, एवढीच माझी विनंति आहे ! ”

सर एडवर्ड—“ ठीक आहे. तूं व रिचर्ड दोघेही आतां येथेंच कांहीं वेळ विश्रांति घ्या. इतर कामगारांनाही मी त्या गोष्टीची वाटाघाट करण्याकरितां येथें बोलावलें आहे; ते लवकरच येतील. मग आपण सर्वांच्या विचारानें पुढील कार्यक्रम निश्चित करूं ! रिचर्ड, तुलाही आज रात्रीं बरेंच जबाबदारीचें काम पडणार आहे ! ”

रिचर्ड—“ हुकूम होईल तो योग्य रीतीनें बजावण्यास मी केव्हांही सिद्ध आहें ! कर्तव्यापुढें इतर कोणताही विचार माझ्या मनांत कधीं यावयाचा नाहीं ! ”

सर एडवर्ड—“ त्याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे ! जा आतां, देवडीवर खुशाल विश्रांति घ्या ! ”

दोघेही सर एडवर्डना प्रणाम करून बाहेर गेल्यावर तेही आंतल्या खोलींत चालते झाले.

## प्रकरण २३ वें.

## पुलावर हल्ला.



रात्रींच्या वेळीं लियॉनशियस आपल्या तंबूंत एका वृद्ध मुसलमानाशीं एकांतीं बोलत बसला होता. कांहीं वेळ विचार करून तो एकदम म्हणाला—" आजचें संकट फार मोठें आहे म्हणतां ? "

तो मुसलमान सुलतान महमदाचा मुख्य ज्योतिषी होता. आपल्यापुढें असलेल्या कुंडलीकडे पाहून तो म्हणाला—" होय, सरदारसाहेब, ही कुंडली जर चूक नसेल तर, आजची वेळ आपल्याला अत्यंत अनिष्ट आहे ! "

लियॉनशियस—" आणखी एकदां गणित करून पहा ! त्यांत बचावाचा कांहींच मार्ग निघणें शक्य नाहीं का ? माझ्या आयुष्याची समाप्ति आजच निश्चित दिसते का ? "

ज्योतिषी—" डयूकसाहेब, आयुष्यमर्यादा परमेश्वरावांचून कोणाला ही निश्चित कळणें शक्य नाहीं ! आमच्या पवित्र शास्त्राप्रमाणें आपल्या कुंडलीवरून व आजच्या ग्रहस्थितीवरून जें मला दिसतें, तें मी सांगतों ! आजची वेळ तुम्हांला अग्नीपासून किंवा शस्त्रापासून अपमृत्यु येण्याची आहे ! कदाचित् हा अपमृत्यु टळेलही ! त्याचा कोणी नियम सांगावा ! तथापि आजची रात्र तुम्ही आपल्या तंबूतून बाहेर न पडाल तर बरें, असें मला वाटतें ! त्यावांचून दुसरा कांहीं इलाज दिसत नाहीं ! "

इतक्यांत एक सेवक गडबडीनें आंत येऊन म्हणाला—" सरदारसाहेब, सुलतानसाहेबांनीं आपल्याला आतांच्या आतां बोलाविलें आहे. "

लियॉनशियस चटकन् उठून म्हणाले—" ठीक आहे, हा मी निघालोंच, तूं पुढें हो ! हें पाहिलेंत मौलवीसाहेब, तंबूंत पडून राहणें माझ्या स्वाधीनचें आहे का ? तुमची सल्ला माझ्या काय उपयोगी पडणार ? "

ज्योतिषि—" ग्रहांच्या पुढें कोणाच्यानेंही जाववणार नाहीं, हें मी

जाणून आहें! तथापि एवढें तरी करा, नेहमीं सावध व सशस्त्र असा, आणि हाणामारीच्या गर्दींत होतां होईल तों शिरूं नका. विशेषतः आगीपासून शक्य तितकें दूर रहा! आजची रात्री निभावली तर पुढें मात्र तुम्हांला फारशी भीति नाहीं, किंबहुना तुमचा उत्कर्षच होईल!"

लियॉनशियस व ज्योतिषि एकदमच तंबूंतून बाहेर पडले ज्योतिषि आपल्या बिन्हाडीं गेला व लियॉनशियस सुलतानच्या दरबारीडेऱ्याकडे चालता झाला. डेऱ्यांत कित्येक पाशा जमले होते व सुलतान स्वतः कांहीं त्यांना गोष्टी समजावून सांगत होते.

लियॉनशियस आंत येऊन सुलतानास कुर्निसात करून उभे राहिल्यावर सुलतान त्याला म्हणाले—"या, लियॉनशियस, आज दरबारला यावयाचा विचार नव्हता वाटतें? तुमची इतका वेळ वाट पाहून मग मुद्दाम बोलावणें पाठविलें! असो, आज रात्रीं आपल्या लांकडी पुलावर शत्रूचा हल्ला करण्याचा बेत आहे, अशी बातमी आली आहे! तुम्ही व अहमदपाशा यांनीं जहाजें आणण्याची महत्त्वाची कामगिरी यशस्वी करून दाखविली आहे, त्याअर्थी आजचा हल्ला परतवून पुलाचा बचाव करण्याची कामगिरीही आम्ही तुम्हां उभयतांवरच सोंपविणार आहों!"

सुलतानसाहेबांचें फर्मान कानांवर पडतांच लियॉनशियस दचकला. त्याला मौलवीच्या भविष्याची आठवण झाली. पण सुलतानी फर्मान नाकारणें म्हणजे तत्काळ प्राणास मुकणेंच होय, हें त्याला पक्कें माहीत असल्यामुळें, त्यानें सुलतानसाहेबांस मुजरा करून आपली संमति दर्शविली, आणि हा मान आपल्याला दिल्याबद्दल त्यांचे आभार मानिले. नंतर इतर कांहीं गोष्टींचा खुलासा करून घेऊन, लियॉनशियस तेथून अहमदपाशाला जाऊन मिळण्याकरितां तसाच लांकडी पुलाकडे चालता झाला.

सर एडवर्ड यांच्या बंगल्यांत प्रमुख मंडळी जमल्यावर फारशी वाटाघाट न होतां, त्यांचा कार्यक्रम निश्चित झाला, व त्याप्रमाणें मंडळी तत्काळ आपापल्या तयारीला लागली. सर एडवर्डनीं कॉटारी व रिचर्ड यांना आपल्याबरोबर आपल्या जहाजांत न्यावयाचें ठरविलें.

नंतर मध्यरात्रीच्या सुमारास ते आपल्या प्रिय पत्नीचा निरोप घेऊन, आपल्या दोघां अनुचरांसह बंदरावर आले. रोमन लोकांनीं ही बातमी जरी अगदीं गुप्त ठेवली होती, तरी ती तुर्की सुलतानास कळल्याशिवाय राहिली नाहीं. ती कशी फुटली हें मात्र अखेरपर्यंत कोणास कळलें नाहीं. सुलतानानें बचावाची जय्यत तयारी गुप्तपणें करून ठेवली. ती बातमी मात्र रोमन लोकांस मुळींच समजली नाहीं.

मध्यरात्रीच्या सुमारास रोमन जहाजें काळोखांतून मुकाट्यानें तुर्की पुलावर हल्ला करण्याकरितां निघालीं. कॉंटारीच्या हाताखालीं दहा शिपाई देण्यांत आले होते. त्या प्रत्येकाजवळ ज्वालाग्राही राळ व डांबरबत्ती दिलेली होती. शिवाय पुलाला आग नच लागली तर, तो तोडून पाडण्याकरितां प्रत्येकानें एकेक कुऱ्हाडही घेतली होती. कॉंटारी आपल्या कामगिरीविषयीं अतिशय उत्सुक होऊन गेला होता. त्याला दुसरें कांहीं सुचत नव्हतें.

सेनापति जस्टीनियन सर एडवर्डना हळूच म्हणाले—“ पुलाकडील बाजूला तर अगदीं सामसुम दिसत आहे ! तुर्की लोकांना आपल्या हल्ल्याची कल्पनाही नसावी असें दिसतें ! ”

सर एडवर्ड—“ पण आज रोजच्यापेक्षांही अधिक शांतता दिसत आहे ! कोठें एखादी मशाल किंवा यत्किंचित् हालचालही दिसत नाहीं ! रोज गस्ती पहारे असावयाचे, तेही आज दिसत नाहींत ! येथें एवढ्या मोठ्या सैन्याची छावणी असेल, अशी कोणाला कल्पनाही येणार नाहीं ! हें चिन्ह कांहीं बरें नव्हे. मला ह्याबद्दल शंका येत आहे ! ”

जस्टीनियन—“ त्यांना आपल्याकडील बातमी कळली असल्याचें कांहीं चिन्ह दिसत नाहीं ! असो, लवकरच काय तें समजेल ! आतां बाकीच्या जहाजांना तुर्की जहाजांच्या रोखानें जाऊं द्या व आपण पुलाकडे वळूं या ! कॉंटारी आपल्या लोकांसह तयार रहा ! पुलाजवळ जातांच एकदम पुलावर उड्या टाका ! ”

थोड्याच वेळांत जहाज पुलाजवळ आलें खलाशांनीं पुलाच्या. कठड्यास लोखंडी आकडे अडकावून जहाज थांबविलें, त्याबरोबर कॉंटारी

व त्याचे लोक आपल्या सरंजामानिशीं पुलावर उतरले. इतक्यांत तुर्की छावणींत हालचाल सुरू झाली. पांच मिनिटांच्या आंत ठिकठिकाणीं अनेक मशाली पेटल्या आणि जिकडे तिकडे लखलखीत प्रकाश पडला. त्याबरोबर तुर्की सैन्य बचावाच्या तयारीनें सिद्ध असल्याचें उघड दिसून आलें. त्यावरून आपला सर्व बेत तुर्कांना आगाऊच कळलेला आहे, अशी रोमन लोकांची खात्री झाली. अर्थात आकस्मित हल्ला करण्याचा बेत फसला. आतां हातघाईचीच झटापट करणें भाग पडलें.

" अल्लाहो अकबर " अशी गर्जना करीत शेंकडों तुर्क लोक पुलाच्या बचावाकरितां धांवले. कॉंटारी आपल्या लोकांस म्हणाला, " गडे हो, पांचच मिनिटें गनीमांस थोपवा. तोंपर्यंत मी पुलाला आग लावतों. "

पूल अरुंद असल्यामुळें, पुष्कळ तुर्कांना एकदम पुलावर येतां येणें शक्य नव्हतें. त्यामुळें रोमन शिपायांना त्यांना बराच वेळ थोपवून धरितां आलें. पण तुर्क शिपायांच्या जागा वरचेवर भरून काढल्या जात होत्या तशी सोय मात्र रोमन लोकांना नव्हती. त्यांच्या जहाजावरील सर्व लोक हळू हळू आपल्या सोबत्यांच्या मदतीला पुलावर उतरले. त्यांची झटापट सुरू असेपर्यंत कॉंटारीनें थोड्या लोकांच्या मदतीनें पुलावर राळ ओतून ठिकठिकाणीं तो पेटवून दिला.

रोमन लोक जिवावर उदार होऊन लढत असल्यामुळें तुर्क लोकांचा प्रथम त्यांच्या माऱ्यापुढें टिकाव लागेना. लियॉनशियस त्यांचा अधि- कारी होता. तो सौलवीच्या भविष्याच्या भीतीनें मागेंच राहिला होता. परंतु ती गोष्ट सुलतानांच्या नजरेस येतांच, त्यांनीं त्याला असा निरोप पाठविला कीं, ' ह्या वेळीं कुचराई करशील तर तुलाच अगोदर तोफेच्या तोंडीं देण्यांत येईल ! " सुलतानांचा हुकूम ऐकतांच लियॉनशियस निराश होऊन, प्राणाची पर्वा न ठेवतां, आपल्या लोकांना उत्तेजन देत एकदम पुलावर घुसला. कॉंटारी इतका वेळ त्यालाच हुडकीत होता. लियॉनशियस दृष्टीस पडतांच कॉंटारी एकदम त्याच्या अंगावर धांवला. तत्काळ उभयतांचें द्वंद्व युद्ध सुरू झालें. लियॉनशियस युद्धकलेंत कांहीं

कच्चा नव्हता, पण मौलवीच्या भविष्यामुळें आज त्याचें मन कचरत होतें. तो आपला बचाव करीत एकेक पाऊल मागें सरकूं लागला. थोड्याच वेळांत तो पुलाच्या एका कडेला आला. त्याबरोबर कॉंटारीनें त्याच्या कमरेला मिठी मारून त्याला एकदम उचलून पुलाच्या कठड्यावरून खालीं समुद्रांत फेंकून दिलें. लियॉनशियसनें एक हृदयभेदक किंकाळी फोडली आणि दोन्ही हात पसरले. सुदैवानें त्याच्या हाताला एक साखळदंड लागला. तो त्यानें बळकट धरला, आणि तसाच आधांतरी लोंबत राहिला. हें कॉंटारीच्या दृष्टीस पडतांच त्याचा हात तोडण्याकरितां त्यानें आपली तलवार उगारली, पण तितक्यांत अहमदपाशानें मागून एकदम त्याच्या मानेवर जोराचा वार केला, त्याबरोबर तो गतप्राण होऊन खालीं पडला. लियॉनशियसचें अंग आगीनें होरपळून गेलें होतें, आणि धुरानें त्याचा जीव अगदीं गुदमरून गेला होता; आणखी क्षणभर त्याला मदत मिळाली नसती तर तो बेशुद्ध होऊन आपोआपच खालीं पडला असता, पण अहमदपाशानें त्याला हात धरून वर उचलून घेतलें. ह्याप्रमाणें त्याचा अपमृत्यु टळला.

कॉंटारीनें आत्मसमर्पण करून बजावलेली कामगिरी थोड्याच वेळांत सिद्धीस गेली. पुलानें चोहोंकडे एकदम पेट घेतला, त्या आगीच्या भयंकर ज्वालांत कित्येक लोक होरपळूं लागले. आगीच्या प्रचंड धडाक्यांत व जळक्या लांकडांच्या कडकडाटांत, लढणाऱ्या लोकांच्या आरोळ्या व हत्यारांचे खणखणाटही ऐकूं येईनासें झाले. पुलाजवळच्या रोमन जहाजांवरही आगीच्या जिभळ्या येऊं लागल्या, तेव्हां तेथें उभे राहणें ह्यापुढें सुरक्षित नाहीं असें पाहून, जस्टीनियन व सर एडवर्ड यांनीं आपले उरलेले लोक माघारे जहाजावर बोलावले. तुर्की सैनिकही आगींतून बचावण्याकरितां मागें सरूं लागले.

रोमन जहाजांनीं तुर्की जहाजावर हल्ला केला खरा, पण तुर्की खलाशी सावध व युद्धाच्या तयानें उभे असल्यामुळें, त्यांच्या पुढें रोमन जहाजांचें कांहीं चालेनासें होऊन, लवकरच त्यांना मागें परतावें लागलें. सर एडवर्ड व जस्टीनियन उरलेले लोक जहाजावर घेऊन तेथून माघारे आले.

शहराच्या तटावर नागरिक स्त्रीपुरुषाचे थवे हा युद्ध चमतकार पहात

उभे होते. स्वतः बादशहाही आपल्या मंत्रिमंडळासह सेंट रोमॅनसच्या बुरु-जावर उभे राहून हा सर्व प्रकार पहात होते. तुर्कांवर आकस्मिक हल्ला करण्याचा बेत फसला, त्यांना अगोदरच ती बातमी समजल्यामुळें ते सावध राहिले, तेणेंकरून ह्या चकमकींत कित्येक शूर रोमन वीर कामास आले, आणि बऱ्याच रोमन जहाजांचेंही नुकसान झालें.

थियोडोरा आपल्या महालांत एकटीच सचिंत बसली होती. महालांत एकच दिवा मंद मंद जळत होता. थियोडोरानें झोंप लागण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न करून पाहिले, पण तिचा क्षणभरही डोळा लागला नाहीं. ती कांहीं वेळ बिछान्यावर बसे, व पुनः अस्वस्थ चित्तानें महालांत इकडे तिकडे फिरूं लागे. आपले पति ज्या साहसाच्या कामगिरीवर गेले आहेत, त्या कामगिरीचें काय झालें, हें जाणण्याची तिला अत्यंत उत्कंठा लागून राहिली होती. दूर चाललेला दंगा व गोंगाट तिला अस्पष्ट ऐकूं येत होता. वारंवार ती महालाच्या खिडकींतून बाहेर डोकावून पाही. पूर्वेकडील बाजूला धूर व प्रकाश दिसत होता, पण किंवा काय स्थिति आहे, हें तिला समजण्यास मुळींच मार्ग नव्हता.

पहाटे चार वाजल्यावर जिन्यांत पावलें वाजूं लागलीं, तेव्हां थियोडोराची छाती धडधडूं लागली. ती चटकन् उठून कानोसा घेत उभी राहिली. थोड्याच वेळांत सर एडवर्ड हळूच महालांत येऊन, सुकाट्यानें एका सुखासनावर पडले. त्यांची खिन्न व श्रांत मुद्रा पाहून, थियोडोराला त्यांच्याशीं एकदम बोलण्याची छाती होईना.

कांहीं वेळानें थियोडोरा पतीजवळ येऊन अधीर स्वरानें हळूच म्हणाली—"आपण सुखरूप येऊन भेटलां, हे ईश्वराचे मोठेच उपकार! आपल्याला अतिशय श्रम झालेले दिसतात! काय काय झालें?"

सर एडवर्ड दीर्घ निश्वास सोडून म्हणाले—"काय व्हावयाचें? आमचा पूर्ण पराजय झाला! कोणीं तरी हरामखोरानें विश्वासघात केला! आमची गुप्त मसलत त्यांना अगोदरच समजल्यामुळें, ते जय्यत तयारीनें आमची वाटच पहात होते, त्यामुळें आमचें फार नुकसान झालें! आमच्या अवघ्या आकरा जहाजांपैकीं चार जहाजें जळून खाक झालीं, आणि तीन तुर्कांनीं पाडाव केलीं! शिवाय जवळ जवळ पांचशें वीर

कामास आले ! त्यांत बिचारा कॉँटारीही रणांगणांत पडला ! ”

थियोडोरा—“ अरेरे, त्याचाही शेवटीं अंत झालाना ? ह्या वेळचें नुकसान फारच असह्य होय ! तथापि आपण ईश्वरकृपेनें सुखरूप आहां शहराच्या बचावाकरितां आपल्याला अद्यापिही टिकाव धरितां येईल ! ”

सर एडवर्ड—“ आतां तुर्कांच्या माऱ्यापुढें शहराचा फार दिवस टिकाव लागण्याचा संभव दिसत नाहीं ! तथापि अखेरपर्यंत आम्ही प्रयत्नांत कसूर करणार नाहीं ! ”

थियोडोरा—“ आजचा पराजय व नुकसान ऐकून बादशहांना फार वाईट वाटलें असेल ! किंबहुना त्यांचा धीरही खचला असेल ! ”

सर एडवर्ड—“ छे छे, त्यांच्यासारखा निधड्या छातीचा, बाणेदार व दिलदार मनुष्य जगांत दुसरा क्वचितच सांपडेल ! आमचा पराभव झालेला त्यांनीं प्रत्यक्ष पाहिला होता. जहाजांचें व सैनिकांचें भयंकर नुकसान त्यांच्या डोळ्यांपुढें दिसत होतें, तथापि आम्ही परत येतांच त्यांनीं मोठ्या आनंदानें आमचें स्वागत करून, आमच्या मर्दुमकीबद्दल व कर्तव्यनिष्ठेबद्दल आम्हाला शाबासकीच दिली. त्यांचा त्या वेळचा उत्साह पाहून, कोणाला वाटेल, आम्ही विजय संपादन करून आलों आहों कीं काय ! त्यांच्या तोंडून नाउमेदीचा एक शब्दही निघाला नाहीं ! सर्वांना हुरूप देण्याकारितांच त्यांनीं वर्तन केलें ! शेवटीं निरोप देतांना ते म्हणाले—“ आपण व आपलें शहर परमेश्वराच्या हातीं आहे ! त्याची इच्छा असेल तसें तो घडवून आणील. आपण त्याच्या आज्ञेप्रमाणें एकनिष्ठेनें कर्तव्य करावयाचें, एवढेंच आपलें काम; यशापयशाचा धनी तो आहे ! तो आपल्या धैर्याची व दृढनिश्चयाची कसोटी पहात आहे ! ह्या परीक्षेस आपण उतरलों तर, तो एका क्षणांत युद्धाचें सर्व फासे फिरवून टाकील ! त्याच्यावर सर्व भार ठेवून आपापलें कर्तव्य प्रामाणिकपणानें करा, म्हणजे झालें ! यश आलें तर सुख मिळेल, आणि अपयश आलें तरी अक्षय कीर्ति होईल ! ”

“ तथास्तु ! ” थिओडोरा वर डोळे करून, हात जोडून उद्गारली.

प्रकरण २४ वें.

## मरावें, परी कीर्तिरूपें, उरावें.



दुसरे दिवशीं सकाळींच बादशहाकडून बोलावणें आल्यावरून सर एडवर्ड गडबडीनें बादशहाकडे गेले. बादशहा त्यांची वाटच पहात होते. ते येतांच बादशहा त्यांचें स्वागत करून म्हणाले—" सेनाधिप, तुर्की सुलतानाकडून नुकताच एक निरोप आला आहे! तो निरोप ऐकून मला तर बरें वाटलें नाहींच, पण कोणाही स्वाभिमानी मनुष्याला संताप आल्यावांचून राहणार नाहीं, अशी माझी खात्री आहे! "

सर एडवर्ड—" सुलतानाचें म्हणणें तरी काय आहे, सरकार? "

बादशहा—" सुलतानाचें असें म्हणणें आहे कीं, हें शहर आम्हीं त्यांच्या स्वाधीन करून, कियास किंवा लेसबास, अगर दुसऱ्या एखाद्या वाटेल त्या बेटांत आपल्या सर्व परिवारासह जाऊन रहावें. शहरांतील पाहिजे तितक्या लोकांनीं आपल्या सर्व संपत्तीसह आमच्या बरोबर त्या ठिकाणीं जाऊन रहावें! हें आम्हीं कबूल न केल्यास, ते एकदम मारा करून शहर जमीनदोस्त करणार, आणि सर्व ख्रिस्ती लोकांची कत्तल उडविणार, आणि ह्याचें पूर्व चिन्ह म्हणून, आजपर्यंत पाडाव केलेल्या सर्व ख्रिस्ती कैद्यांचीं डोकीं शहरच्या तटासमोर भर दिवसा उडविणार! "

सर एडवर्ड क्रुद्ध स्वरानें म्हणाले—" असल्या उद्धटपणाच्या व बेह-ज्जतीच्या निरोपाला काय जबाब द्यावयाचा, याची कांहीं वाटाघाट कर-ण्याचें मुळींच कारण दिसत नाहीं! "

बादशहा—" कां बरें! आपला व आपल्या प्रियजनांचा, आणि शहरांतील इतर थोर कुलीन व श्रीमान होतकरू तरुणांचा बचाव कर-ण्याचा हा एक सोपा मार्ग नाहीं का? तुर्कांच्या माऱ्यापुढें आतां आपला फार दिवस टिकाव लागणें शक्य नाहीं, हें तर उघडच दिसत आहे! शिवाय आतां बाहेरून मदत येण्याचीही आशा उरली नाहीं! अशा स्थितींत ह्या सुंदर शहराचा व तेथील हजारों लोकांचा

काही काळ घेण्यापेक्षां बचाव करणेंच शहाणपणाचें नाहीं कां ?"

सर एडवर्ड—" सरकार, दहा वीस हजार मर्त्य लोकांच्या क्षणभंगुर प्राणापेक्षां, किंवा शें दोनशें सुंदर इमारतींपेक्षां, प्राचीन काळापासून चालत आलेल्या, व पुढें अनंत काळ टिकणाऱ्या कीर्तीचा विचार अधिक महत्वाचा आहे, असें मला वाटतें ! आपला बचाव कसा होईल हा महत्वाचा प्रश्न नाहीं ! रोमन राष्ट्राचा नाश होणार, हें तर उघड दिसत आहे ! आज दोन हजार वर्षे अव्याहत चालत आलेल्या ह्या प्रसिद्ध राष्ट्राचा नाश कशा रीतीनें झाला असतां, त्या राष्ट्राच्या आजपर्यंतच्या नांवलौकिकाला साजेसा कीर्तिकारक होईल, ह्या एकाच गोष्टीचा काय तो विचार करावयाचा पाहिजे ! प्रख्यात व पवित्र रोमन सिंहासनावरील शेवटच्या बादशहांनीं प्राणभयानें आपला राजदंड मुकाट्यानें मुसलमानांच्या स्वाधीन करून, सिंहासन सोडून पळ काढला, असें इतिहासांत नमूद होईल, आणि पूर्वजांनीं संपादन केलेल्या सर्व कीर्तीची राखरांगोळी उडून जाईल ! शिवाय सुलतान तरी आपलें वचन प्रामाणिकपणानें पाळून आपल्याला स्वस्थ राहूं देईल ह्याचा तरी काय भरंवसा ? जेत्यांच्या मनांत जितांचा नायनाट करण्याची इच्छा असली, म्हणजे फंदफितुरी, राजद्रोह, दंगे, बंड इत्यादि वाटेल तें निमित्त काढून, न्यायान्याय गुंडाळून ठेवून, वाटेल तसा धिंगाणा त्यांना घालतां येतो, असा जगाचा अनुभव इतिहासांत ठिकठिकाणीं आढळतो ! ह्या सर्व गोष्टींचा विचार करितां तुर्कांच्या अटी मान्य करणें मुळींच श्रेयस्कर ठरणार नाहीं !"

" शाबास, सर एडवर्ड !" बादशहा सर एडवर्डचा हात धरून उत्तेजित स्वरानें म्हणाले—" तुम्ही परदेशस्थ असून तुम्हांला ह्या राष्ट्राचा जो अभिमान आहे, तो वंशपरंपरेनें रोमन म्हणविणाऱ्या आमच्या सरदार मंडळींत अंशतः जरी असता, तरी असा विकट प्रसंग खचित आला नसता ! असो, तुमचें म्हणणें मला अक्षरशः मान्य आहे ! माझेंही मत तसेंच आहे ! तथापि अभिमान थोडा बाजूला ठेवून, व प्रसंगाकडे लक्ष देऊन आम्ही अशी तडजोड मनांत आणिली आहे कीं, सुलतान महमद उठवून परत जाण्याचें कबूल करील तर,

त्याला दरसाल दहा लक्ष खंडणी कबूल करावी, आणि सेंट सोफाबंदि-रासींबतालच्या दहा मैलांचा प्रदेश हें रोमन राष्ट्र समजून त्यास त्यानें उपसर्ग न लावण्याची कुराणावर हात ठेवून शपथ घ्यावी.

सर एडवर्ड—" कांहीं हरकत नाहीं ! सुलतान ही गोष्ट मान्य करील तर ठीक आहे ! त्यांत आपला दर्जा जरी थोडा कमी झाला तरी, इज्जत कांहीं फारशी नष्ट होत नाहीं ! पण त्यानें आपलाच हेका धरला, आणि ही तडजोड अमान्य केली तर ? "

बादशहा—" तर मग दुसरा तिसरा विचारच नाहीं ! शस्त्र तेथवर शहराचा बचाव करावयाचा, आणि अखेरीस आपली उज्वल कीर्ति कायम राखण्याकरितां ह्या आपल्या पूर्वजांच्या तटाखालींच प्राण समर्पण करावयाचे ! "

" फार उत्तम ! " सर एडवर्ड उत्तेजित स्वरानें म्हणाले—" आतां माझें पूर्ण समाधान झालें ! "

बादशहा—" तर मग तहाचें निशाण घेऊन तुम्ही सुलतानाच्या छावणींत जाऊन त्याच्याशीं ह्याबद्दल वाटाघाट कराल का ? "

सर एडवर्ड—" हो हो, आज्ञा होईल तर मी आतांच्याआतां तिकडे जाण्यास तयार आहें ! "

बादशहांनीं तत्काळ पत्र लिहून तयार केलें, व सर एडवर्ड हे रिचर्ड बस्टोला व आणखी दोन इसमांना बरोबर घेऊन, तुर्की वकिलासह सुलतानाच्या छावणीकडे निघाले. छावणींत पोंचतांच तत्काळ सुल-तानाची व त्याची दरबारी डेऱ्यांत भेट झाली. तुर्की वकिलानें सुलतानास त्यांची माहिती सांगून ओळख करून दिली.

सुलतानांनीं योग्य स्वागत केल्यावर सर एडवर्ड गंभीर स्वरानें म्हणाला—" सुलतानसाहेब, मी रोमन बादशहांचा निश्चित निरोप घेऊन समेट करण्याकरितां आलों आहें ! आमच्या बादशहांचें म्हणणें जर आपल्याला मान्य झालें नाहीं, तर आमचें बोलणें संपलें ! मग उगीच वाटाघाट व प्रश्नोत्तरें वाढवीत बसण्याची कांहीं गरज नाहीं ! "

सुलतान—" ठीक आहे ! रोमन बादशहाचें काय म्हणणें आहे तें

कळला. आजपर्यंतच्या अनुभवावरून, तुम्हांला आमचें सामर्थ्य व अंतीम परिणामही दिसून आलाच असेल ! ”

सर एडवर्ड–“ होय, सुलतानसाहेब, आपलें अवाढव्य सैन्य व असंख्य तोफखाना यांच्यापुढें आमचा टिकाव फार दिवस लागणार नाहीं, हें आम्ही जाणून आहों ! तथापि कॉन्स्टांटिनोपल शहर सहजासहजीं हातीं येण्यासारखें नाहीं, हे आपल्याही अनुभवास आलेंच असेल ! तें काबीज करावयास अपरिमित दारूगोळा व असंख्य सैनिकांचे प्राण खर्ची घालावे लागतील, ह्या गोष्टीही आपण विचारांत घेतल्या पाहिजेत.

सुलतान–“ हां, सरदारसाहेब, ह्या गोष्टीचा विचार करूनच आम्हीं तुमच्याकडे तहाचा निरोप पाठविला होता ! शहर काबीज करणें आम्हांस अशक्य नाहीं, तथापि असल्या सुंदर शहराची नासाडी आणि उभयपक्षांकडील हजारों लोकांची विनाकारण प्राणहानि होऊं नये अशी आमची इच्छा आहे. ”

सर एडवर्ड–“ युद्धाच्या निर्णयासंबंधानें कोणींही कधीं फाजील विश्वास बाळगूं नये, तो ईश्वराधीन आहे ! इंग्लंड, फ्रान्स, स्पेन, इटली, ग्रीस इत्यादि बलाढ्य राष्ट्रांनीं आम्हांस मदत पाठविण्याचीं आश्वासनें दिलीं आहेत, त्यांपैकीं एखाद्या राष्ट्राकडून जरी ईश्वरकृपेनें वेळेवर मदत आली तरी लढाईचें स्वरूप तत्काळ पालटेल ! ”

सुलतान–“ तें असो, पण तुमच्या बादशहांचें म्हणणें तरी काय ? ”

सर एडवर्ड–“ बादशहांचें म्हणणें एवढेंच आहे कीं, शहर तर आपल्या स्वाधीन करणें आमच्या हातून कधींच होणार नाहीं ! कॉन्स्टांटिनोपल शहरांत रोमन बादशहांचें सिंहासन तरी राहील, किंवा तेथें त्यांची कबर तरी होईल ! तथापि शहराचा नाश व विनाकारण प्राणहानि होऊं नये, अशी आपल्याप्रमाणेंच त्यांचीही इच्छा असल्यामुळें, आपण वेढा उठवून परत जाण्यास तयार असाल, तर बादशहा आपल्याला दरसाल एक लक्ष खंडणी देण्यास कबूल आहेत ! शिवाय––”

“ पुरे पुरे ! ” सुलतान क्रुद्ध स्वरानें म्हणाले–“पुढें कांहीं ऐकण्याची जरूरच उरली नाहीं ! शहर तर आमच्या स्वाधीन झालेंच पाहिजे. ही अट मान्य असेल तर, पुढें काय तें बोला, नाहीं तर आलां तसेच

माघारे जाऊन तुमच्या बादशहास कळवा कीं, आणखी दोन तास आम्ही वाट पाहूं. तेवढ्या मुदतींत तुमच्याकडून अनुकूल जबाब आला नाहीं तर, सेंट निसीटसच्या बुरजासमोर सर्व ख्रिस्ती कैद्यांची कत्तल उड-विण्यांत येईल ! "

सर एडवर्ड उठून रागानें म्हणाले—" ठीक आहे, मी आपला निरोप बादशहांना कळवितों, पण त्यांच्या उत्तराची वाट पहाण्याची मुळींच आवश्यकता नाहीं ! तें मी अगोदरच कळवून ठेवलें आहे ! कैद्यांची कत्तल उडविण्याचा अमानुष क्रूरपणा आपल्याकडून झाल्यास, त्याचें उत्तर तितक्याच निर्दयपणानें आमच्याकडूनही मिळेल, हें मात्र विसरूं नये ! कारण, आपल्या ताब्यांत जितके ख्रिस्ती लोक आहेत, त्यांच्यापेक्षां किती तरी अधिक तुर्क लोक आमच्या ताब्यांत आहेत ! "

सुलतान—" त्याची आम्हांला मुळींच पर्वा नाहीं ! तथापि आम्हीं ठरविल्याप्रमाणें दोन तास तुमच्या जबाबाची वाट पहाण्यांत येईल.

सर एडवर्ड—" ठीक आहे ! आपल्या ताब्यांतील कांहीं कैद्यांची मला थोडा वेळ भेट घेण्यास परवानगी मिळेल का ? "

सुलतान—" सर्वांच्या भेटी घेण्यास परवानगी देतां येणार नाहीं, तथापि त्यांतील एकदोन इसमांची पाहिजे तर भेट घ्या ! "

सर एडवर्ड—" बरें तर, शहर कोतवाल लॉर्ड नोटारस आणि सर अँगोलाईन ह्यांना बोलावून आणयावें, त्यांची तेवढी भेट घेऊन जाईन ! "

सुलतानांनीं एका शिपायास पाठवून त्यांना बोलावून आणविलें, आणि शेजारच्या राहुटींत त्यांची भेट घेण्यास सर एडवर्डला परवानगी दिली. बाहेरच्या बाजूला पहाऱ्याचा बंदोबस्त मात्र होताच.

दोघां मित्रांना पाहतांच सर एडवर्ड उद्विग्न स्वरानें म्हणाले, "मित्र हो, तुम्हांला एक दुःखकारक बातमी कळविण्याचें माझ्या नशीबीं आलें आहे तथापि तुमच्यासारखे शूर व पाणीदार वीर त्या गोष्टीला मुळींच भिणार नाहींत, अशी माझी खात्री आहे ! "

दोघेही चकित स्वरानें म्हणाले—" काय ? बादशहांनीं शहर स्वाधीन करून, सुलतानाशीं तह करण्याचें मनांत आणिलें आहे कीं काय ? "

सर एडवर्ड—" छे छे, आपले स्वाभिमानी व परमपूज्य बादशहा अशी अपमानास्पद गोष्ट कधीं करतील, असें तुम्हांला वाटतें का ? त्यांनीं ती गोष्ट साफ नाकारली. म्हणून सुलतानांनीं तुम्हां सर्व ख्रिस्ती कैद्यांची कत्तल करण्याचें ठरविलें आहे ! आणखी दोन तासांनीं तुम्हां सर्वांना मृत्यूला तोंड द्यावयास तयार झालें पाहिजे ! "

सर अँगोलाइन—" एवढेंच ना ? मग त्यांत खेद मानण्याचें कांहींच कारण नाहीं ! शिपाई गड्याला ह्यापेक्षां अधिक सन्मानाचा शेवट दुसरा आणखी कोणता असणार ! "

लॉर्ड नोटारस—" आमच्या धर्माकरितां, देशाकरितां आणि बादशहाकरितां प्राण समर्पण करण्याचा मान आम्हांला मिळत आहे, हें आम्ही महद्भाग्यच असें आम्ही समजतों ! "

सर एडवर्ड—" शाबास, वीर हो, तुमचें हें धैर्य पाहून मला मोठें कौतुक वाटतें ! तुमचें उदाहरण पाहून, इतर ख्रिस्ती गिरफदारांस आम्हांलाही अधिक हुरूप येईल ! बरें, तुमचा कोणास कांहीं निरोप कळवावयाचा आहे का ? "

सर अँगोलाइन—" माझी एवढीच इच्छा आहे कीं, माझ्या मृत्यु-समयीं माझ्या हाताखालचे सर्व शिपाई तटबंदीवर माझ्या समोर असावे, म्हणजे त्यांच्या देखत मृत्यूला तोंड देण्यास मला अधिक उल्हास वाटेल आणि त्यांनाही जिवावर उदार होऊन आपलें कर्तव्य दृढनिश्चयानें बजा-वण्यास हुरूप येईल ! "

लॉर्ड नोटारस—" माझ्या वृद्ध पित्याला व दोघां भावांना माझ्या मृत्युसमयीं तटावर हजर रहावयास सांगा, म्हणजे त्यांच्या कुलांत जन्म घेतल्याचें मीं सार्थक केलें, अशी त्यांची खात्री होईल, आणि माझ्या मृत्यूबद्दल हळहळ न वाटतां, उलट अभिमानच वाटेल ! "

दोघे—" आणि गुरुजींनाही त्या वेळीं तेथें कृपा करून येण्यास विनंति करा, म्हणजे ते आमच्याबद्दल प्रार्थना करून आम्हांला शेवटचा आशीर्वाद देतील. "

सर एडवर्ड—" ठीक आहे, त्याप्रमाणें सर्व तजवीज करितों ! तुम्हीही इतर ख्रिस्ती कैद्यांना असेंच उत्तेजन द्या ! येतों तर आतां,

आपली सर्वांची भेट लवकरच पुनः स्वर्गलोकीं होईल अशी माझी खात्री आहे ! "

सर एडवर्ड आपल्या दोघां मित्रांना प्रेमपूर्वक आलिंगन देऊन, त्यांचा निरोप घेऊन तेथून निघाले व सुलतानांची परवानगी घेऊन, तुर्की छावणींतून परत शहरांत आले. सुमारें अर्ध्या तासाच्या आंत राज-वाड्यांत येऊन, त्यांनीं बादशहांना सर्व हकीगत निवेदन केली. लॉर्ड कोक्स व इतर मंत्रीही तेथेंच होते, त्या सर्वांच्या विचारें असें ठरलें कीं, आतां अखेरपर्यंत लढाई करून प्राण समर्पण करण्यावांचून गत्यंतर नाहीं. सर्व मंडळी त्याप्रमाणें शेवटच्या लिव्वालिस्वीच्या तजविजीस लागली. ही बातमी शहरांत तत्काळ चोहोंकडे प्रसिद्ध झाली व तेणेंकरून सर्व नागरि-कांची अगदीं निराशा होऊन गेली.

---

प्रकरण २५ वें.

## वाग्वधूची कर्तव्य पराकाष्ठा.



युफ्राशिया थियोडोराच्या महालांत सकाळींच येऊन बसली होती. आपल्या भावी प्रियपतीला भेटण्याची तिला अत्यंत उत्कंठा लागली होती. परंतु वैद्यबुवा लॉर्ड मॅन्युअलना पहावयास अगोदरच आले असल्यामुळें, ते परत जाईपर्यंत तिला वाट पहात बसणें भाग पडलें. रात्रींच्या हल्ल्याबद्दल व कॉंटारीच्या मृत्यूबद्दल त्या दोघींचें बोलणें चाललें होतें. त्यांत पति सुरक्षित परत आल्याबद्दल थियोडोरानें, व वडील वचावून आल्याबद्दल युफ्राशियानें परमेश्वराचे आभार मानले.

थोड्याच वेळांत वैद्यबुवा परत आले, आणि लॉर्ड मॅन्युअलची तब्बेत ठीक आहे, आतां त्यांना कोणत्याही प्रकारची भीति नाहीं, असें सांगून व त्या दोघींचा निरोप घेऊन ते निघून गेले. नंतर त्या दोघी लॉर्ड मॅन्युअलच्या खोलींत गेल्या. त्यांना पाहतांच लॉर्ड मॅन्युअल हळूच बिछा-न्यावर उठून बसले, आणि त्यांनीं स्मितपूर्वक दोघींचेंही स्वागत केलें.

युफ्राशिया बिछान्याजवळ धांवत गेली. मॅन्युअलनीं तिचा हात धरून त्याचें प्रेमभरानें चुंबन घेतलें. इकडे थियोडोरा खिडकीशीं बसलेल्या वैद्याच्या शिष्याजवळ जाऊन म्हणाली—" वैद्यबुवा, आतां एक नवीन औषध तयार करून देतों म्हणाले तेवढें चटकन् आणा पाहूं ! "

शिष्य— " पण वैद्यबुवांनीं मला तर आतांच सांगितलें कीं, औषध चालू आहे तेंच रोजच्याप्रमाणें चालू दे त्यांत बदल करावयास नको ! "

थियोडोरा—" पण मी सांगतें ना, नवीन औषध आणावयाचें आहे म्हणून ! जा तुम्ही आपले मुकाट्यानें, आणि औषध घेऊन या ! "

बिचारा शिष्य हिरमुसलें तोंड करून तेथून चालता झाला. हा हेलपाटा फुकट आहे असें त्याचें मन त्याला सांगत होतें, पण आपल्याला येथून कां घालविलें हें त्याच्या मद्ठ डोक्यांत शिरलें नाहीं.

शिष्य बाहेर निघून गेल्यावर थियोडोरा एका खिडकीचा पडदा बाजूला करून त्याच्या आड बाहेरची समुद्र किनाऱ्याची शोभा पहात व आपल्याशींच विचार करीत उभी राहिली. लॉर्ड मॅन्युअल व युफ्राशिया ह्या उभयतांना प्रेमाच्या गोष्टी मनमोकळें करून बोलावयास कांहीं वेळ एकांत मिळावा, एवढाच थियोडोराचा उद्देश होता.

युफ्राशिया लॉर्ड मॅन्युअल जवळ उभी राहून त्यांच्याकडे स्निग्ध दृष्टीनें पहात म्हणाली—" प्रियकरा, आतां आपली तब्येत बरी आहेना ! "

मॅन्युअल—" होय, लाडके, मला आतां पुष्कळ बरें वाटत आहे ! पण थोड्याच दिवसांत मला आपल्या वचनाप्रमाणें तुम्हांला सोडून सुलतानाच्या छावणींत जाऊन त्याच्या स्वाधीन होणें भाग आहे ! "

युफ्राशिया—" छे छे, आतां ती गोष्ट मनांत देखील आणावयास नको ! आपल्याला आतां तिकडे परत जाण्याचें मुळींच कारण उरलें नाहीं ! मी प्रेमांध होऊन असें म्हणतें, असें समजूं नये; बाबानींही असेंच सांगितलें, आणि सेनापति सर एडवर्ड ह्यांचेंही मत तसेंच आहे ! शिवाय थियोडोरा देखील सांगते कीं, बादशहांनीं व लॉर्ड फ्रांझांनी, आपल्याला तुर्कांच्या छावणींत परत जाण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं, आपण वचनांतून मुक्त झालां आहां, असेंच ठरविलें आहे ! "

मॅन्युअल—" कोणीं कांहीं म्हटलें तरी, सर एडवर्ड खास असें म्हण णार नाहींत ! ते माझ्या स्थितींत असते तर, त्यांनीं काय केलें असतें, हें तूंच त्यांना पाहिजे तर विचार ! "

युफ्रासिया—" विचारीन, पण ते सांगतील तसें वागण्याचें आपण अगोदर कबूल केलें पाहिजे, तर विचारीन ! "

लॉर्ड मॅन्युअल विचारांत पडले. त्यांच्याकडून कांहीं उत्तर येत नाहीं असें पाहून युफ्रासिया पुढें म्हणाली—" दुसऱ्याची सल्ला घेण्या- पेक्षां आपला आपणच थोडासा विचार केला तरी, माझ्या म्हणण्याच्या सत्यत्वाविषयीं आपली खात्री होईल ! सुलतानानें जो आज आपला राक्षसी व क्रूर निश्चय जाहीर केला आहे, त्याचा विचार केला म्हणजे, त्यांच्याशीं न्यायानें वागण्याचें कांहीं तरी कारण उरतें का ? लढाईत केलेल्या कैद्यांची कत्तल करण्याचा कोणच्या न्यायशास्त्रानें सुलतानास अधिकार दिला आहे ? अशा रीतीनें धडधडीत अन्याय करणाराशीं न्यायानें वागण्याचें मनांत आणणें हा कांहीं शहाणपणा खास ठरणार नाहीं ! सुलतानानें आपला क्रूर निश्चय जर अमलांत आणिला, तर तो आपल्याला त्यांतून वगळील का ? अशा स्थितींत समजून उमजून काळ मुखांत उडी घालणें, ही आत्महत्या होणार नाहीं का ? माझें एक असो, आज आपल्यावर आपल्या बादशहांची, आणि आपल्या राष्ट्राची सत्ता नाहीं का ? त्यांच्या ऋणांतून आपण कसे मुक्त होणार ? "

युफ्रासियाचे डोळे अश्रूंनीं भरून आले. तें पाहून लॉर्ड मॅन्युअल तिचा हात धरून सद्गदित स्वरानें म्हणाले—" ठीक आहे, लाडके, बादशहा लॉर्ड फ्रांझा, सर एडवर्ड व तुझे वडील, हे मला जशी आज्ञा करतील तसें वागण्यास मी कबूल आहे ! आतां तरी झालें ना ? "

युफ्रासिया डोळे पुसून स्मितपूर्वक म्हणाली—" आपणासी एक विनंति आहे ! वेळच आली म्हणून निर्भिड होणें भाग पडत आहे, पण त्या- वरून मला निर्लज्ज मात्र समजूं नये ! इतकेंही करून तुर्कांच्या छावणींत जावयाचेंच ठरलें तर, अगोदर विवाहविधि उरकून मग जाव- याचें ! म्हणजे आपल्या सुखदु:खाची मला कायदेशीर भागीदारीण तरी होतां येईल ! "

मॅन्युअल तिचा पुनः हात धरून कृतज्ञ स्वरानें म्हणाले—" अहाहा, लाडके, माझ्या प्रेमाकरितां हा तूं केवढा स्वार्थत्याग करीत आहेस! तुला व तुझ्या वडिलांना आपणच ही विनंति करावी, असें कधी पासून किती वेळां तरी माझ्या मनांत आलें, पण त्यांत माझी केवळ स्वार्थपर क्षुद्रबुद्धि दिसेल अशी भीति वाटून मी बोलण्याचें साहस केलें नाहीं! तुझ्या वडिलांची व आईची संमति असेल तर, माझी आज देखील तयारी आहे!"

इतक्यांत खोलीचें दार उघडून खुद्द बादशहांची स्वारी आंत आली. त्याबरोबर युफ्राशिया लज्जित होऊन बाजूला उभी राहिली. तें पाहून बादशहा दारांतच उभे राहून स्मितपूर्वक म्हणाले—"वा! आज आमचा रोगी नव्याच परिचारिकेच्या शुश्रूषेंत दिसतो! पण तुमच्या मधुर एकांताचा भंग करण्यापेक्षां, आपणच माघारें जावें हें बरें!"

मॅन्युअल—" छे छे, सरकार, परत जाण्याचें कारण नाहीं! आम्हां उभयतांना, किंबहुना सर्व रोमन राष्ट्राला आपण परमपूज्य पित्यासमान आहां! आपल्या आगमनाची आम्हांला, किंवा कोणाला तरी, अडचण कशी वाटेल!"

युफ्राशिया—" विशेषतः ह्या वेळीं तर सरकारच्या दर्शनाची फारच जरूर होती! कारण, सरकारच्या मतावरून, एका महत्त्वाच्या प्रश्नाचा निकाल लागणार आहे! मी स्वतःच सरकारांस प्रार्थना करण्यासाठीं येणार होतें!"

बादशहा मॅन्युअलच्या बिछान्याजवळ एका खुर्चीवर बसून म्हणाले—" असा कोणता बिकट प्रश्न येऊन पडला आहे? समजूं द्या तरी!"

युफ्राशिया—" दुसरें कांहीं नाहीं; आतां मुलतानाच्या छावणींत परत जाण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, असें मी सरदारसाहेबांना पुष्कळ प्रकारांनीं समजून सांगतें आहें, पण त्यांची कांहीं केल्या समजूत पडत नाहीं! आपल्या वचनाप्रमाणें आपल्याला शत्रूच्या स्वाधीन होणें भाग आहे, असेंच अद्यापि त्यांना वाटत आहे! शेवटीं ह्या बाबतींत सरकारची आज्ञा होईल तसें करावयाचें असें त्यांनीं कबूल केलें आहे!"

बादशहा हंसून म्हणाले—" एवढेंच ना? ह्यांत आतां विचार

करण्यासारखा प्रश्नच उरलेला नाहीं ! लॉर्ड मॅन्युअल, तुम्ही आजारी झाल्यामुळें, आम्ही तुम्हांला सुलतानाच्या तर्फे आपल्या ताब्यांत घेतलें आहे ! त्या अर्थी तुम्ही आमचे कैदी आहां ! आमच्या परवानगी-वांचून तुम्हांला शहराच्या हद्दीबाहेर जातांच येणार नाहीं ! तुम्ही तसें वचन द्याल तरच तुम्हांला प्रत्यक्ष प्रतिबंध करण्याचें कांहीं कारण नाहीं ! नाहीं पेक्षां, तुमच्या अंगीं शक्ति येतांच तुमच्यावर सक्त पहारा ठेवावा लागेल ! झाला कीं नाहीं, दुकाशिया, तुझ्या प्रश्नाचा निकाल ?"

दुकाशिया—"आतां मला मुळींच काळजी उरली नाहीं !"

मॅन्युअल—"सरकारांनीं ही कल्पना मात्र बिनतोड काढली ! ह्यावर उत्तर देण्यास सवडच उरली नाहीं ! धन्य आहे सरकारच्या बुद्धिमत्तेची ! सरकारची आज्ञा मला केव्हांही शिरसावंद्यच आहे !"

थिओडोरा हळूच पुढें येऊन म्हणाली—"ही तोड मात्र फार उत्तम निघाली ! ह्यांत आतां नीति अनीतीचा किंवा इमान बेइमानाचा प्रश्न उरत नाहीं ! सरकारांनीं ह्या निरुत्तर मार्गानें ह्या गोष्टीचा समाधानकारक निकाल लावल्यामुळें, बाबांच्या व आणखी कित्येकांच्या मस्तकावरील जबाबदारी पूर्णपणें उडाली !"

बादशहा—"थियोडोरा, तूंही येथेंच आहेस का? ठीक ! लॉर्ड मॅन्यूअलचा समाचार कालपासून कळला नव्हता, म्हणून मी स्वतः मुद्दाम त्यांना पहावयास आलों ! त्यांची प्रकृति झपाट्यानें सुधारत चाल-लेली पाहून मला अत्यंत आनंद होत आहे ! मुलींनो, तुमच्यासारख्या प्रेमळ परिचारिका लाभत असल्यावर चांगल्या मनुष्याला देखील आजारी पडावेंसें वाटेल ! असो, त्यांना जपावयास तुम्हांला सांगावयास नकोच ; येतों मी आतां ।"

---

## प्रकरण २६ वें.

## शेवटच्या हल्ल्याची तयारी.



बादशहांना सर्वांनीं नम्रपणें प्रणाम केले, तेव्हां त्यांना आशीर्वाद देऊन, ते सर्वांचा निरोप घेऊन तेथून राजवाड्यांत परत आले.

दुसरे दिवशीं म्हणजे मेच्या २७ व्या तारखेस रात्रीं तुर्की छावणींत व कॉन्स्टांटिनोपल शहरांतही चोहोंकडे सामसूम होतें. चंद्र अद्यापि उगवला नव्हता. आकाश निरभ्र असल्यामुळें, आकाशांत असंख्य तारे व ग्रह आपल्या पूर्ण तेजानें चमकत होते. अशा वेळीं तुर्की सुलतान आपल्या डेऱ्यापुढील पटांगणांत बसून आकाशस्थ ग्रहांची स्थिति अवलोकन करीत होते आणि त्यांचे मुख्य ज्योतिषि त्यांना ग्रहांची माहिती व फळें समजावून सांगत होते.

कांहीं वेळानें सुलतान उत्कंठित स्वरानें म्हणाले—" मौलवीसाहेब, ह्या एकंदर ग्रहस्थितीचा परिणाम काय, तो आतां सांगा पाहूं ! "

मौलवी—" सर्व ग्रह ह्या वेळीं आपल्याला अनुकूल व रोमन लोकांना प्रतिकूल आहेत ! आपला जय होणार, व शहर आपल्या ताब्यांत येणार, ह्यांत तर शंकाच नाहीं ! तथापि नक्की परिणाम गणित करून सांगतों, आपण क्षणभर स्वस्थ असावें ! "

मौलवीसाहेबांनीं कागदावर कांहीं आकृति काढल्या व बरेच आंकडे मांडले; नंतर त्या आंकड्यांच्या बेरजा, वजाबाक्या, गुणाकार, भागाकार करण्यांत ते अगदीं गढून गेले. सुलतानसाहेब त्यांच्याकडे उत्सुक व कंपित दृष्टीनें पहात स्वस्थ बसले. फलज्योतिषविषयक शास्त्राच्या सत्यतेबद्दल त्यांची निःसंशय खात्री होती. [illegible] त्यांचें भविष्य अक्षरशः खरें ठरल्यामुळें तर, त्यांच्यावर सुलतानांचा अविचल विश्वास बसला. तथापि सेनापति व इतर मंत्रिमंडळी मात्र केवळ ज्योतिषशास्त्रावर इतकी अवलंबून नव्हती. ज्योतिषावर त्यांचा अविश्वास होता असें नाहीं, पण शहरावर अखेरचा हल्ला करण्याची वेळ ज्योतिषावरून

ठरविण्यापेक्षां, अनुभविक सेनापतींच्या धोरणानें ठरविणें विशेष श्रेयस्कर होईल, असें त्यांचें मत होतें. परंतु सुलतानसाहेबांच्या मर्जीविरुद्ध बोलण्याचें साहस करण्याची कोणाचीच छाती नव्हती. शहरावर अखेरचा हल्ला करण्यास उद्यांचीच संधि योग्य आहे, असें सर्व मुत्सद्दी मंडळींचें मत होतें. पण मौलवीची संमति मिळाल्याशिवाय सुलतानसाहेब कांहींच निश्चित ठरविण्यास तयार नव्हते.

सर्व मंत्रिमंडळी दरबारच्या डेऱ्यांत हळू हळू बोलत बसली होती, आणि बाहेर मौलवी साहेबांचें गणित चाललें होतें. शेवटीं एकदां गणित होऊन मौलवीच्या मतानें नवांचा दिवस विशेष अनुकूल ठरला. तो निर्णय मान्य करून, मौलवीला निरोप देऊन, सुलतानसाहेब डेऱ्यांत आले.

सर्वांची हजेरी नाजीम व पुढे आल्यावर सुलतान आपल्या सिंहासनावर बसले. नंतर सर्व मंडळी आपापल्या स्थानीं बसून सुलतानांच्या तोंडाकडे उत्सुकतेनें पाहूं लागली. सुलतान गंभीर स्वरानें म्हणाले—" दोस्तहो, अल्लाच्या प्रेरणेनें नवांचा दिवस शेवटच्या हल्ल्याकरितां निश्चित ठरला आहे ! त्या दिवशीं सूर्योदयानंतर शहरावर खुष्कीच्या बाजूनें व समुद्राच्या बाजूनें, असा दोहोंकडून एकदम हल्ला चढवावयाचा, म्हणजे शहर आपल्या ताब्यांत आलेंच असें समजा ! "

सुलतानाचें भाषण ऐकून सर्व मंडळींनीं अल्लाच्या व सुलतानाच्या नांवाचा जयजयकार केला. नंतर मुख्य सेनापति कालीलपाशा म्हणाले— " अल्लाच्या प्रेरणेनें ज्याअर्थी हल्ल्याची वेळ निश्चित ठरली आहे, त्याअर्थी विजयाचीं साधनेंही त्याच्याच प्रेरणेनें उपलब्ध होतील, असा आम्हांला पूर्ण भरंवसा आहे ! "

सुलतान—" त्या साधनांचाच आतां आपल्याला विचार करावयाचा आहे ! ह्या बाबतींत कोणाच्या काय सूचना असतील त्या त्यांनीं पुढें मांडाव्या, म्हणजे त्यांचा सर्वानुमतें योग्य विचार होईल ! "

बाल्था ओग्ली—" माझी पहिली सूचना अशी आहे कीं, उद्यां दिवसभर मौलवी लोकांनीं सर्व छावणींत फिरून सर्व सैनिकांना असें सम-

जाबून सांगावें कीं, हें युद्ध सद्धर्म प्रसाराकरितां असून, अल्लाचें व पैगंबराचें पवित्र कार्य आहे ! अर्थात् ह्या कामीं जे आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावतील, त्यांना अल्लाकडून व सुलतान खलीफसाहेबांकडून योग्य बक्षीस मिळाल्यावांचून राहणार नाहीं ! ”

सुलतान—“ फार उत्तम ! ही गोष्ट आम्हांला पसंत आहे ! त्याप्रमाणें अवश्य तजवीज करण्यांत येईल ! बरें, आणखी काय ? ”

कालीलपाशा—“ शहरावर हल्ला एकदम तीन ठिकाणीं सुरू करावा ! सेंट रोमॅनसच्या बुरजावर, सिलिव्हरीच्या पडक्या वेशीवर आणि सुवर्णशृंगावर. ”

ह्या सूचनेला सुलतानासह सर्वांनींच एकमतानें संमति दिली. नंतर सुलतान म्हणाले—“ अहमदपाशा व लियॉनशियस ह्यांनीं सुवर्णशृंगाकडील तटबंदीवर हल्ला करावा, आणि तुर्की जहाजें तेथें शक्य तितकीं तटाजवळ आणून त्यांची मदत घ्यावी.

दुसरी ओगली, दुसऱ्याकडे आम्ही सिलिव्हरी वेशीची कामगिरी सोंपवितों. अर्थात् सेंटरोमॅनसच्या बुरजाचा महत्त्वाचा भाग सेनापति कालीलपाशा यांच्या वांट्याला आला. आणि राखून ठेवावयाच्या हुजुरात सैन्याचें आधिपत्य आम्ही स्वतःकडे घेतों ! ”

कालीलपाशा—“ सरकारची आज्ञा शिरसावंद्य आहे ! त्यांत माझी एवढीच विनंति आहे कीं, सरकारची अजस्र तोफ माझ्या ताब्यांत मिळावी. उद्यां सकाळपासूनच सेंटरोमॅनसच्या बुरजावर त्या तोफेचा मारा सुरू केला पाहिजे, त्याशिवाय तो बुरूज सर होण्याची मुष्कील पडेल ! पूर्वीच्या माऱ्यानें तो थोडासा ढांसळला आहे खरा, पण तो फारच मजबूत असून, त्याच्या जवळचा खंदकही फार भयंकर आहे ! ”

सुलतान—“ ठीक आहे ! ती तोफ तुमच्या ताब्यांत मिळेल ! आतां सर्वजण आपापल्या तजविजीला लागा ! पण दोस्तहो, सर्वांना माझी अशी सूचना आहे कीं, शहरावर हल्ला करितांना, शहरांतील प्रसिद्ध व सुंदर इमारती, आणि निःशस्त्र नागरिक यांचा नाश न होईल, अशी शक्य तितकी खबरदारी घ्या ! अल्ला पैगंबर आपल्या पवित्र कार्यांत यश देवो ! ”

" अमीन ! अमीन ! " असा चोहोंकडून गंभीर उद्गार निघाला. दरबार बरखास्त करून सुलतानसाहेब उठले व सर्व मंडळी आपापल्या स्थानीं निघून गेली. शेवटच्या हल्ल्याची ही बातमी तत्काळ सर्व तुर्की छावणींत पसरली. कोणकोणत्या ठिकाणीं कसकसा हल्ला होईल, ह्यासंबंधानें शिपाईलोक ठिकठिकाणीं जमून वादावाद करूं लागले. बहुतेक सैनिकांची ती रात्र झोंपेशिवायच गेली.

दुसरे दिवशीं सकाळपासून मुसलमानी धर्मोपदेशक सर्व सैनिकांना उपदेश करीत छावणीभर हिंडूं लागले. त्या योगानें लोकांच्या अंतःकरणांतील उत्साह बराच वाढून, त्यांना विशेष हुरूप आला. हल्ल्याच्या ठिकाणीं मोर्चेबंदीची तयारीही झपाट्यानें सुरू झाली.

सेनापति सर एडवर्ड आपल्या दिवाणखान्यांत आपल्या प्रियपत्नीशीं प्रेमाच्या गोष्टी बोलत बसले होते. पूर्वीच्या शुभ्र प्रेमाच्या आठवणी काढून, तीं उभयतां एकमेकांशीं मधुर विनोद करीत बसलीं होतीं; इतक्यांत लॉर्ड फ्रांझा दिवाणखान्यांत आले. त्यांना पाहतांच उभयतांनीं उठून त्यांचें आदरपूर्वक स्वागत करून त्यांना बसवून घेतलें. नंतर सर एडवर्ड म्हणाले—" काय, प्रधानसाहेब, काय नवीन खबरबात ? "

लॉर्ड फ्रांझा—" विशेष कांहीं नाहीं, पण हा जेनेडियसनें मात्र अनर्थ मांडला आहे ! कार्डिनलइसिडोर हा कसा झाला तरी पोपमहाराजांचा प्रतिनिधि आहे ! त्याला कुतरडा, सैतान, ढोंगी, बदमाष, धर्मलंड असा उघड उघड हजारों लोकांत शिव्या देणें म्हणजे केवढें साहस ! ह्या गोष्टीला लवकर आळा घातला नाहीं तर, ह्याचा परिणाम कांहीं चांगला होणार नाहीं ! "

प्रिंसेस—" आणि अशा संकटाच्या प्रसंगीं लोकांचा बुद्धिभेद करणें तर फारच भयंकर महत्पाप ! "

सर एडवर्ड—" आपण बादशहांना विनंति करून, त्याला एकदम कैद करण्याची परवानगी मिळवूं या ! त्याशिवाय त्याचें तोंड बंद होणार नाहीं ! "

लॉर्ड फ्रांझा—" पण लोकांची त्याच्यावर भक्ति असल्यामुळें त्याला कैद केलें असतां लोक अधिकच चिथरतील ! त्यापेक्षां त्याला त्याच्या

मठांतच अडकावून टाकावें, असें मला वाटतें !"

सर एडवर्ड—" हो, ही तोड ठीक दिसते ! बरें सुलतान महंमद आज दिवसभर स्वस्थ कसा बसला आहे ? आज आमचा सणाचा दिवस आहे, आम्ही प्रार्थना व मेजवान्यांत आज गुंतलेले असावयाचें, हें त्याला त्या हरामखोर लियॉनाशियसकडून तरी कळल्यावांचून खास राहिलें नसेल ! या संधीचा फायदा घेण्याची त्यानें कां हयगय केली असेल कोण जाणे !"

लॉर्ड फ्रांक्षा—" त्याचेंच मला विशेष भय वाटत आहे ! तुर्की जहाजें सुवर्णशृंगाकडे खुष्कीच्या मार्गानें त्यानें आणलीं. त्या वेळींही आदल्या दिवशीं अशीच स्तब्धता होती ! ही खरी शांतता नसून, नवीन एखाद्या संकटाचें पूर्व चिन्ह आहे ! सुलतानाच्या डोक्यांत नवीन कांहीं तरी कल्पना घोळत असावी, असें वाटतें ! तथापि हल्ली उन्हाळा कडक पडत आहे, ही एक आपल्याला अनुकूलच गोष्ट आहे. आणखी थोडे दिवस आपण असाच टिकाव धरला तर, सुलतानाला वेढा उठवून परत जावें लागेल असें वाटतें ! कारण, हा उन्हाळा तुर्की शिपायांना सहन होणार नाहीं, त्यांच्यांत कांहीं तरी भयंकर रोग उत्पन्न होऊं लागतील. मग पावसाळा संपेपर्यंत तो पुनः इकडे येण्याची भीति बाळगावयास नको ! तितकी सवड आपल्याला मिळाली तर, पुष्कळ तयारी करितां येईल !"

सर एडवर्ड हंसून म्हणाले—" वेढा उठला तर पुढचा विचार आहे!"

इतक्यांत एक नोकर दाराशीं येऊन हळूच म्हणाला—" रिचर्ड बल्लों खालीं आले आहेत, आपल्याकडे जरूरीचें काम आहे म्हणतात !"

सर एडवर्ड—" ठीक आहे, त्याला इकडेच पाठवून दे !"

थोड्याच वेळांत रिचर्ड दिवाणखान्यांत आला. त्याकडे कौतुकानें पहात सर एडवर्ड म्हणाले—"कां रिचर्ड, हें काय आणलें आहेस !"

रिचर्ड—" साहेब, हें एक पाळीव कबूतर आहे ! त्याच्या गळ्यांत एक चिठ्ठी आहे तें थेट आमच्या चौकींत उडून आलें ! चिठ्ठी काढूं का ?"

सर एडवर्डनीं संमति दिल्यावर, कबूतराच्या गळ्यांतील चिठ्ठी

काढून त्यांच्या हातीं दिली, व कबूतर सोडून दिलें.

तें कबूतर मेजावर बसून कावऱ्याबावऱ्या दृष्टीनें इकडे तिकडे पाहूं लागलें. तेव्हां थियोडोरा त्याच्याकडे हात पसरून कोमल स्वरानें म्हणाली "ये ये, गरीब पांखरा, भिऊं नको. असल्या भयंकर रक्तपाताच्या कार्यांत तुझ्यासारख्या निरुपद्रवी प्राण्याची मदत घेण्यास देखील माणसें कमी करीत नाहींत, हें मोठेंच आश्चर्य !"

थियोडोरा त्या कबूतराला हातावर घेऊन कुरवाळूं लागली !"

सर एडवर्ड त्या चिठीवरील पत्ता पाहून, लॉर्ड फ्रांझांकडे वळून गंभीर स्वरानें म्हणाले—" ही चिठी आपल्याला उघडतां येत नाहीं. ती बादशहांच्या नांवाची असून, फार जरूरीची दिसते !"

लॉर्ड फ्रांझ त्या चिठीकडे पाहून म्हणाले—" हो ! कांहीं तरी महत्त्वाची बातमी असली पाहिजे ! अक्षर आपल्या त्या मित्राचेंच दिसते ! ही चिठी घेऊन आपण तावडतोब बादशहांकडेच जावें, हें बरें !"

सर एडवर्ड उठून म्हणाले—" हो, चलाच ! रिचर्ड, तूंही आमच्या बरोबर चल, कदाचित् तुझीही गरज लागेल !"

दोघेही थियोडोराचा निरोप घेऊन बाहेर निघाले, तेव्हां रिचर्डही कबूतर घेऊन त्यांच्या पाठोपाठ चालला.

जातां जातां सर एडवर्ड म्हणाले—" प्रधानसाहेब, आपण नुकतेंच म्हणत होतां, तसाच कांहीं प्रकार दिसतो ! महत्त्वाची व जरूरीची बातमी असल्याशिवाय, आपला मित्र असल्या अनिश्चित व धोक्याच्या मार्गांचा अवलंब कधीं करणार नाहीं, अशी माझी खात्री आहे !"

लॉर्ड फ्रांझ—" मला वाटतें, आकस्मिक छापा घालण्याचा तुर्कांचा बेत असावा ! आतां बादशहांची भेट झाल्यावर काय तें कळेलच ! तसें कांहीं असलें तर मात्र आपल्याला तजविजीला रात्र देखील पुरणार नाहीं !

राजवाड्यांत जाऊन चौकशी करितां, सरकार स्वारी सेंट रोमनोच्या मंदिराकडे गेली असून, परत येण्याची वेळ झाली आहे, असें कळलें, तेव्हां त्यांना वाट पहात बसणें भाग पडलें.

थोड्याच वेळांत बादशहांची स्वारी प्रार्थनामंदिरांतून परत आली. त्यांनीं उभयतां सैन्यांचें स्वागत करून विचारलें– कां ? प्रधानजी, सेनापति, आज इतक्या रात्रीं एकाएकीं कां आलां ? कांहीं नवीन खबर आहे कीं काय ?"

सर एडवर्ड—" होय सरकार, कबूतराच्या गळ्यांतून एक चिठी आली आहे ! "

बादशहा चकित स्वरानें म्हणाले—" खरें कीं काय ? त्या चिठींत काय मजकूर आहे ? "

सर एडवर्ड—" ती सरकारच्या नांवची असल्यामुळें आम्हीं उघडून पाहिली नाहीं ! "

बादशहा—" बरें तर, वाचा आतां ! "

सर एडवर्ड चिठी उघडून वाचूं लागले–मंगळवारीं सकाळीं सूर्योदया-बरोबर शहरावर चोहोंकडून एकदम हल्ला होणार ! बालथा ओगली आपल्या बल्गेरियन सैन्यासह किल्ल्याच्या वेशीवर चढाई करणार; काली-लपाशा मुख्य लष्कर व तोफखाना ह्यांसह सेंटरोमॅनसच्या बुरजावर मारा करणार, आणि अहमदपाशा व लियॉनाशियस हे सुवर्णशृंगाच्या बाजूनें जहाजांच्या मदतीनें हल्ला करणार ! एकंदर सैन्य अडीच लाख आहे. शिवाय पंधरा हजार हुजुरातीच्या राखीव सैन्याचें आधिपत्य खुद्द सुलता-नांनीं स्वीकारलें आहे ! बातमी निश्चित आहे ! हा प्रयत्न फसूं नये म्हणून, शक्य तितक्या तजविजी करण्यांत आल्या आहेत ; तथापि एवढ्या संक-टांतून पार पडल्यास शहराचा खचित बचाव होईल. कारण, पुढें युद्ध चालणार नाहीं !

## प्रकरण २७ वें.

## संरक्षणाची तजवीज.



तारीख २८ मे सोमवार सायंकाळची वेळ. दिवसभर बचावाची शक्य तितकी सिद्धता करण्याच्या कामीं गढून गेलेले सर्व लहान मोठे कामगार क्षणभर विश्रांति घेण्याकरितां तटावर बसले होते. इतक्यांत सर एडवर्ड सेंटपीटरच्या बुरजाकडून गडबडीनें येत असलेले पाहून, लॉर्ड फ्रांझा त्यांच्या समोर जाऊन म्हणाले—" कां, सेनापति, अजून काम आटोपलें कीं नाहीं ? सकाळपासून तुम्हांला बोलावयास देखील फुरसत नाहीं ! असे श्रम कसे सोसतील ! "

सर एडवर्ड—" काय करावें, प्रधानसाहेब, हल्ल्याच्या सर्व ठिकाणीं बचावाची शक्य तितकी तजवीज झाली आहे कीं नाहीं, ह्याबद्दल समक्ष खात्री करुन घेऊन त्याची वर्दी बादशहांना कळवावयाची आहे ! त्यामुळें माझ्या ठिकाणाची सर्व सिद्धता करून शिवाय बाकीच्या ठिकाणांकडेही मला लक्ष पुरविणें भाग पडलें !

लॉर्ड फ्रांझा—" पण कालपासून तुम्ही एकदां सुद्धां घरीं गेलां नाहीं ! बिचारी थियोडोरा एकसारखी काळजी करीत बसली आहे ! "

सर एडवर्ड—" खरेंच, मामासाहेब, तिच्या संरक्षणाची काय तजवीज करावी बरें ? ह्या गोष्टीचा विचार करावयास पुनः आपल्याला कदाचित सवडही होणार नाहीं !

लार्ड फ्रांझा—" बरोबर त्या बाबतींत माझा विचार असा आहे कीं, दुर्दैवानें शहर पडलेंच तर ती शत्रूच्या हातीं लागूं नये, अशी तजवीज केली पाहिजे. तूर्त आमचा वृद्ध नोकर बलारम ह्याच्या संरक्षणाखालीं तिला ठेवावें ! त्याचें तिच्यावर बाळपणापासून मुलीप्रमाणें प्रेम असून त्याला शहराची खडानखडा माहिती आहे. शिवाय तो पूर्ण विश्वासू आहे !

सर एडवर्ड—" प्रथम वाईट धरून चालूं या ! आपण दोघेही उद्यांच्या लढाईत पडलों, तर तिनें काय करावें ? बिचारा बलारम त्या

लांडग्यांपासून तिचें कसें संरक्षण करूं शकणार ? तसा प्रसंग आला तर तिनें तेथेंच छपून रहावयाचें, कीं बाहेर निघून जावयाचें हें ठरलें पाहिजे !

लार्ड फ्रांझा—" छपून राहण्यांत अर्थ नाहीं ! आणि जन्मभर छपून राहणें शक्यही नाहीं व इष्टही नाहीं ! त्यापेक्षां निघून जाण्याचीच कांहीं तरी तजवीज करून ठेविली पाहिजे ! "

सर एडवर्ड—" थांबा, हे कोतवाल कॉनियाटिस इकडेच येत आहेत, त्यांनाही आपल्या कन्येच्या बचावाची तजवीज करणें भाग आहे, तेव्हां त्यांचाही आपण विचार घेऊं !

कोतवाल कॉनियाटिस यांचें स्वागत करून लॉर्ड फ्रांझांनीं त्यांना आपला विचार कळवून, त्यांचें मत विचारलें, तेव्हां कोतवाल म्हणाले—"पहिली गोष्ट मला ही इष्ट वाटते कीं, थियोडोरा व युफ्राशिया ह्या दोघींनीं एके ठिकाणीं असावें, म्हणजे त्यांना थोडासा सुरक्षितपणा वाटून धीरही येईल !

सर एडवर्ड—"फार उत्तम ! शिवाय लॉर्ड मॅन्युअलना युद्धाच्या कामीं भाग घेतां येणें शक्य नाहीं, तेव्हां त्यांनीं त्यांच्या संरक्षणाकरितां त्यांच्याजवळ रहावें, असें मला वाटतें !

लॉर्ड फ्रांझा—" तर मग आतां असें ठरवूं ! आमच्या बागेंतील छोटया बंगल्याखालीं एक तळघर आहे, त्याची गुप्तवाट बल्डारसला मात्र माहीत आहे, त्या तळघरांत दोघी मुलींना ठेवावें, आणि मॅन्युअल व बल्डारस ह्यांनीं त्यांचें संरक्षण करावें. मॅन्युअल तेथें असले म्हणजे बल्डार-सला वरचेवर युद्धाची बातमी समजून घ्यावयास येण्याची सवड होईल ! "

सर एडवर्ड—" ठीक आहे, असेंच ठरवावयाचें ! युद्धाच्या निकाला-नंतर जर आपण हयात राहिलों तर, आपण पुढील व्यवस्था करूंच ! पण जर आपण तिघेही पडलों, तर लॉर्ड मॅन्युअलनीं त्यांना घेऊन बाहेर जाण्याची शक्य तितकी खटपट करावी ! "

लॉर्ड फ्रांझा—" तर मग हीच व्यवस्था कायम ठरली ! कोत-वालांच्या पत्नीनेंही त्याच तळघरांत दोघी मुलींच्या बरोबर रहावें ! "

कोतवाल—" ठीक आहे ! त्यांत आणखी असेंही निश्चित करूं या. कीं, उद्यां मध्यरात्रीं आपणांपैकीं जे कोणी हयात राहतील, त्यांनीं तळघराजवळ यावें, आणि त्या बायकांना घेऊन जाण्याची तजवीज

करावी. त्या वेळीं आपणांपैकीं कोणीच येऊं शकला नाहीं, तर आपण सर्वजण लढाईंत पडलों, किंवा कैद झालों असें समजून बलारसनें जुळेल ती व्यवस्था करावी, त्यानंतर वाट पाहूं नये!"

सर एडवर्ड—"फार उत्तम! मला वाटतें रिचर्ड वर्स्टोलाही आपण ह्या विचारांत घ्यावें! तो जरी जिवंत राहिला तरी, आपल्या हुषारीनें सर्वांना कसेंही संकटांतून पार करील अशी माझी खात्री आहे!"

लॉर्ड फ्रांझा व कोतवाल ह्यांनीं ती गोष्ट तत्काळ मान्य केल्यावर सर एडवर्डनीं रिचर्डला बोलावून आणून त्याला सर्व विचार कळविला. त्यानें ती गोष्ट आनंदानें मान्य करून, आपल्यावर इतका भरंवसा टाकल्याबद्दल त्यांचे आभार मानले. नंतर तो लॉर्ड फ्रांझांना म्हणाला—"मीं तें तळघर अद्यापि पाहिलेलें नाहीं, तेव्हां कृपा करून मला तें एकदां पाहून ठेवण्याची परवानगी मिळावी!"

लॉर्ड फ्रांझा—"ठीक आहे, आतांच आमच्या बंगल्यांत जाऊन बलारसची एकांतीं गांठ घे, आणि त्याला आपला हा ठरलेला विचार कळीव, म्हणजे तो तुला तें तळघर दाखवील. मात्र ही गोष्ट तिसऱ्या कोणालाही कळतां कामा नये, हें लक्षांत ठेव!"

"त्याविषयीं काळजी नको!" असें म्हणून रिचर्ड निघून गेल्यावर कोतवाल त्याच्याकडे पहात उद्गारले—"फार हुषार, इमानी, आणि धैर्यवान् मनुष्य! बिचारा काँटारीही असाच होता!"

लॉर्ड फ्रांझा—"बरें, येथून त्यांनीं कोठें जाणें श्रेयस्कर होईल? मला वाटतें, मोरिया किंवा लेसबास बेटांत जाऊन रहावें!"

सर एडवर्ड—"छे छे, इतक्या जवळ राहून निभाव लागावयाचा नाहीं! कारण, कॉन्स्टांटिनोपल पडल्यावर हीं शेजारचीं बेटें तरी किती दिवस स्वतंत्र राहणार? तीं लवकरच तुर्कांच्या ताब्यांत जातील! त्यापेक्षां, मी म्हणतों, एकदम इंग्लंडचा किनारा गांठावा, म्हणजे कोणत्याही प्रकारची काळजी करावयास नको! शिवाय तेथें माझें घर व जहागीर असल्यामुळें, थियोडोराला आपल्या योग्यतेप्रमाणें सुखानें राहतां येईल, आणि इतरांचाही संभाळ करितां येईल!"

लॉर्ड फ्रांझा—" हा विचार चांगला आहे, पण इतक्या दूरच्या प्रवासाची सोय अशा गडबडीच्या व संकटाच्या प्रसंगीं कशी होणार ? "

सर एडवर्ड—" त्यांत कांहीं फारशी अडचण नाहीं; एखादें व्हेनीशियन जहाज गांठलें म्हणजे, महिन्याच्या आंत इंग्लंडला पोंचतां येईल ! एकदां तेथें पोंचल्यावर, कसलीच काळजी नाहीं ! "

लॉर्ड फ्रांझा—" ठीक आहे ! व्हेनीशियन जहाज मिळालें तर इंग्लंडला जावयाचें, पण तसें आयत्या वेळीं नच मिळालें तर, तूर्त लेसबासला जाऊन, तेथून सावकाश सोय पाहून इंग्लंडला जावयाचें, असें ठरलें ! हें रिचर्डलाही सांगून ठेवा ! कां, कोतवाल असेंच ना ? "

कोतवाल—" कांहीं हरकत नाहीं ! येथून सुरक्षित बाहेर पडणें हें पाहिलें महत्वाचें काम ! तें साधल्यावर पुढची तजवीज कशीही होईल. "

लॉर्ड फ्रांझा—" काय करावें, शहरांतले सर्व लोक जर ह्या वेळीं एक दिलानें मदत करण्यास तयार होतील, तर अजून देखील शहराचा बचाव होण्याची पुष्कळ आशा आहे ! पण त्या मूर्ख धर्मोपदेशकांनीं भोळ्या लोकांची अशी भलतीच समजूत करून दिली आहे कीं, तटबंदी फोडून तुर्क लोक सेंट सोफायाच्या मंदिराजवळ येईपर्यंत आपलें कांहीं चालणार नाहीं, पण ते मंदिराजवळ येऊन पोंचले कीं, ईश्वर त्यांचें पारिपत्य करील; आणि आपल्या पवित्र मंदिराचें संरक्षण करील ! लोकांना हें खरें वाटून, ते मदतीला येत नाहींत ! विनाशकाले विपरीत बुद्धिः ! "

सर एडवर्ड—" जेनोडियस आपल्या लोकांना भलभलत्या गोष्टी सांगून भिथावीत आहे, त्यापेक्षां सर्वांना शहराचा बचाव करावयास उत्तेजन देईल तर ! पण त्याला अशी सद्बुद्धि होणार नाहीं ! "

कोतवाल—" ह्या अशक्य गोष्टी मनांत आणण्यांत कांहीं अर्थ नाहीं ! मला आतां बादशहांच्याकडे जावयाचें आहे, मी येतों आतां ! "

लॉर्ड फ्रांझा—" होय का ? चला तर, आम्हांलाही तिकडे यावयाचें आहे ! बादशहा ह्या वेळीं कोठें असतील बरें ? "

सर एडवर्ड—" सेंट रोमॅनस जवळच्या तटबंदीच्या दुरुस्तीचें काम चाललें आहे, तेथेंच ते फार करून असतील ! मला त्यांनीं तेथेंच यावयास सांगितलें आहे ! चला, प्रथम तिकडेच जाऊं ! "

तिघेही पुनः युद्धासंबंधीं वाटाघाट करीत निघाले. तेथें शेंकडों मजूर तटाच्या दुरुस्तीचें काम गडबडीनें करीत होते. व बादशहा स्वतः तेथें उभे राहून त्या कामाची देखरेख करीत होते.

---

## प्रकरण २८ वें.

## दगलबाज सेवक.

रिचर्ड बस्टौ लॉर्ड फ्रांझांची आज्ञा घेऊन निघाला तो थेट राजवाड्याकडे आला. रस्त्यांत स्त्रीपुरुषांची एकच गर्दी उडाली होती. कोणी तटबंदीच्या दुरुस्तीचीं ठिकठिकाणीं चाललेलीं कामें पहावयास चालले होते, कोणी आपापली मालमत्ता सुरक्षित स्थळीं नेऊन ठेवण्याच्या धांदलींत होते, आणि कोणी प्रार्थनामंदिराकडे गडबडीनें चालले होते. सर्वांच्या तोंडांवर खिन्नतेची, भीतीची व निराशेची छाया पसरलेली होती. रिचर्ड आजूबाजूच्या कोणत्याही गोष्टीकडे लक्ष न देतां, राजवाड्याकडे चालला होता. ह्या वेळीं त्याच्या मनांत, आपल्यावरची नवीन जबाबदारी कशी पार पाडतां येईल, हेच विचार चालले होते.

प्रधानसाहेबांच्या बंगल्याजवळच बलारम त्याला भेटला. त्याबरोबर रिचर्ड त्याला प्रणाम करून म्हणाला—" बलारम, तुझी गांठ घेण्याकरितांच मुद्दाम मी आलों आहें ! "

बलारम—" होय का ? काय काम आहे ? आमच्या धनीसाहेबांचा कांहीं जरूरीचा निरोप आहे की काय ? सांगा काय तें. "

रिचर्ड—" होय, प्रधानसाहेबांचेंच एक महत्त्वाचें काम आहे ! पण तें एकांतीं सांगावयाचें आहे ! "

बलारम—" ठीक आहे, चला आमच्या ह्या देवडींत. तेथें कोणी आपला एकांत भंग करणार नाहीं ! "

दोघेही शेजारच्या देवडीच्या खोलींत गेल्यावर, रिचर्डनें बलारमला सर्व हकीगत थोडक्यांत सांगून आपला हेतुही कळविला. ती हकीगत

ऐकून घेतल्यावर बलराम कांहीं वेळ विचार करून, एक लांब सुस्कारा सोडून म्हणाला—" केव्हां असा प्रसंग येणार? ईश्वराची इच्छा! मी धनीसाहेबांच्या सेवेंतच वृद्ध झालों आहें, ताईसाहेबांना मीं अंगाखांद्यावर खेळविलें आहे, माझ्या अंगांत जरी फारसें सामर्थ्य उरलेलें नाहीं, तरी असेल तेवढें सर्व सामर्थ्य त्यांच्या सेवेंत खर्च व्हावें, एवढीच माझी इच्छा आहे! चला माझ्याबरोबर बागेंत, म्हणजे मी तुम्हांला तें ठिकाण दाखवितों!"

दोघेही देवडींतून बाहेर पडून बागेंत गेले. जातांना बलरामनें इकडे तिकडे चौकस दृष्टीनें पाहिलें, पण वाड्यांतील सेवक जोसीमस एका खिडकीच्या आड दबा धरून त्यांच्याकडे पहात होता, तो बलरामला दिसणें शक्य नव्हतें. बागेंत आल्यावर बलरामनें रिचर्डला तेथील छोटा बंगला व त्या खालचें तळघरही दाखविलें. ती सर्व जागा पाहून रिचर्ड म्हणाला—" ठीक आहे, ही जागा फार उत्तम आहे! मात्र तळघराच्या दाराला आंतून कडी दिसत नाहीं, तेवढी लावण्याची कांहीं तरी तजवीज कर, आणि तेथें कांहीं पांघरुणें व थोडें अन्नपाणीही नेऊन ठेव, म्हणजे त्यांची गैरसोय होणार नाहीं!"

बलराम—" बरें आहे, ती सर्व व्यवस्था करून ठेवतों."

रिचर्ड—" मात्र ही गोष्ट कोणालाही कळतां कामा नये! बोभाटा झाला तर सर्वच मसलत फसेल!"

बलराम—" त्याबद्दल कांहीं काळजी करूं नका! ह्यांतील एक अक्षर देखील वाऱ्याला सुद्धां कळणार नाहीं!"

दोघे बोलत बोलत बागेंतून बंगल्यांत आले, नंतर रिचर्ड तटबंदीकडे निघून गेला, व बलराम आपल्या तजवीजीला लागला.

ते दोघे बागेंतून दृष्टीआड होतांच, बंगल्याजवळच्या एका झुडपाच्या आडून जोसीमस बाहेर येऊन आपल्याशींच हंसत हंसत उद्गारला—" वाऱ्याला न कळेना, पण मला तर सर्व समजलें! आतां ह्या बातमीचा उपयोग करून, आपल्या जन्माचें कल्याण करून घेण्यास कांहीं हरकत नाहीं! लॉर्ड लियॉनार्डियस आमच्या ताईसाहेबांकरितां फार दिवस टपून बसला आहे! त्याला हें रहस्य कळविलें, म्हणजे त्याच्याकडून

यथेच्छ द्रव्य प्राप्त होईल! त्यांत बिचाऱ्या लाईसाहेबांचें नुकसान होईल, पण त्याला कांहीं इलाज नाहीं! ह्या प्रसंगीं ज्यानें त्यानें आपल्या पुरतें अगोदर पाहिलें पाहिजे! लाईसाहेबांकडून मला हा फायदा होण्याचा संभव असता, तर मी त्यांचें हें रहस्य फोडलेंही नसतें, पण तसें साधणें शक्य नाहीं! त्या अर्थी लियॉनाशियसला तें कळवून, त्याच्या कडूनच होईल तितका फायदा करून घेणें भाग आहे! आणि हें काम आजच्या आजच साधलें पाहिजे! कारण, कदाचित् उद्यांच्या लढाईंत लियॉनाशियस मेला तर मग काय उपयोग होणार! कसा तरी शहरांतून बाहेर पडून, तुर्की छावणींत प्रवेश करून घेतला पाहिजे, मग तेथून परत येण्याची कांहीं घाई नाहीं! तुर्कांनीं शहर काबीज केल्यावर नायकाला माघारी येतां येईल!"

ह्याप्रमाणें विचार ठरवून, झोसीमस पुढील तजविजीस लागला. सुवर्णशृंगाकडील बाजू तुर्कांच्या ताब्यांत आली होती तरी पश्चिमेकडील म्हणजे तटांच्या सारागिल्योकडील बाजूला रोमन लोकांचाच अंमल होता. तिकडे कांहीं रोमन लढाऊ जहाजें व कांहीं जिनोवी व व्हेनीशियन व्यापारी जहाजें उभीं होतीं. झोसीमस बंदरावर गेला; तेथें त्याला पहारेवाल्यानें अडविलें, तेव्हां तो म्हणाला—"मी लॉर्ड क्रॉहा प्रधानसाहेबांचा नोकर आहे, सरकारी जहाजावरील कप्तानास त्यांचा महत्त्वाचा व जरूरीचा निरोप कळवावयाचा आहे, यासाठीं मला जाऊं द्या! जर हरकत कराल तर, मी प्रधानसाहेबांना तुमचें नांव सांगेन, याचा विचार करा!"

पहारेवाला विचारांत पडला. परवान्याशिवाय कोणालाही सोडूं नये, असा त्याला हुकूम होता, पण प्रधानसाहेबांच्या कामाला हरकत केल्यास आपल्यावर टपका येईल, अशी त्याला भीति वाटूं लागली. शेवटीं त्यानें आपल्या नायकास हाक मारून, त्याला सर्व हकीगत सांगितली. झोसीमस प्रधानसाहेबांचा नोकर असल्याचें नायकाला माहीत होतें. त्यावरून त्याचें सांगणें खरें असावें, असें नायकाला वाटून, त्यानें झोसीमसला जाण्याची परवानगी दिली. मात्र सूर्यास्ताच्या आंत परत येण्याविषयीं बजावून सांगितलें.

झोशीमसनें तें तत्काळ मान्य केलें, पण सरकारी जहाजावर जाण्यास होडी मागितली. पण आपल्या जवळ खलाशी कोणी हजर नाहीं, या करितां आपली आपणच वल्हवून न्यावयास सांगितलें. झोशीमसनें कुरकुरत तें कबूल केलें. व होडींत बसून तो समुद्रांत चालता झाला.

सरकारी आरमारापैकीं अगदीं कडेच्या जहाजाजवळ जाऊन, झोशीमसनें कप्तानास विचारलें—" सेनापति सर एडवर्ड येथें आहेत का ?"

कप्तान हंसून म्हणाला—" मूर्खा तुला वेड लागलें आहे कीं काय ! अशा गडबडीच्या वेळीं सेनापति आपलें महत्वाचें काम सोडून इकडे कशाला येतील ! त्यांना उद्योग नाहीं म्हणून संध्याकाळची हवा खावयास येतील कीं काय ! आणि तुला त्यांची काय जरूर आहे ? "

झोशीमस—" कप्तानसाहेब, असे रागावूं नका; मी प्रधानसाहेबांचा नोकर आहें, त्यांचा एक जरूरीचा निरोप सेनापतिसाहेबांना कळवावयाचा आहे, ते आरमाराची व्यवस्था पहावयास इकडे आले असतील, अशा समजुतीनें मी इकडे आलों ! येथें नसतील तर, मी दुसरीकडे त्यांचा शोध करितों ! "

कप्तान—" बरें बरें, जा. सेनापतिसाहेब साऱ्या दिवसांत इकडे आलेले नाहींत, आणि येण्याचा संभवही नाहीं ! असल्या जरूरीच्या कामाला तुझ्यापेक्षां शहाणा नोकर प्रधानसाहेबांना मिळाला नाहीं का ?"

झोशीमस त्याला कांहींच उत्तर न देतां मुकाट्यानें तेथून निघाला. कप्तान साहेबांचें लक्ष दुसरीकडे जातांच त्यानें आपल्या होडीचें तोंड फिरविलें, आणि तो झपाट्यानें तुर्की आरमाराकडे होडी वल्हवूं लागला.

सूर्य अगदीं मावळण्याच्या बेतांत आला होता. रोमन आरमार व तुर्की आरमार यांच्यामध्यें अफाट समुद्रांत झोशीमसची एकटीच होडी हेलकावे खात चालली होती. त्या वेळचा समुद्राचा मनोहर देखावा अवलोकन करून कोणाचेंही मन प्रसन्न व उदात्त झालें असतें. पण झोशीमसचें अंतःकरण द्रव्यलोभाच्या स्वार्थबुद्धीनें भरून गेलें असल्यामुळें, त्याचें त्या सुंदर देखाव्याकडे मुळींच लक्ष गेलें नाहीं. तो आपल्याच नीच मनोराज्यांत गर्क होऊन, एकसारखा होडी वल्हवीत पुढें चालला होता.

थोड्याच वेळांत सूर्यास्त झाला. झोशीमसची होडीही तुर्की आरमाराजवळ येऊन पोंचली. इतक्यांत सूर्यास्ताची तोफ झाली. त्याबरोबर छावणींत उभारलेल्या तात्पुरत्या मशीदींतून, "ला इलाह इल्लिल्ला महमद रसूलल्ला" अशी आरोळी सुरू झाली, सर्व लोक तत्काळ सायंकालच्या प्रार्थनेच्या तयारीस लागले.

---

## प्रकरण २९ वें.

## बचावाची तजवीज.



लॉर्ड नोटारा, सर एडवर्ड, जस्टीनियन, वगैरे प्रमुख मंत्री मंडळी सेंट रोमॅनसच्या बुरजावर जमल्यावर, बादशहा सर्वांस उद्देशून गंभीर स्वरानें म्हणाले—" मित्रहो, मानवी प्रयत्नांनीं बचावाच्या जितक्या तजविजी करितां येणें शक्य होतें, तितक्या बहुतेक करण्यांत आल्या आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं ! आतां हल्ल्याचीं कोणतीं ठिकाणें कोणाच्या ताब्यांत द्यावयाचीं, हें सर्वानुमतें ठरवावयाचें आहे ! त्यासंबंधानें कोणाच्या काय सूचना असतील त्या सांगा ! "

जस्टीनियन प्रथम म्हणाले—"सरकार, तुर्की सुलतानानें हल्ल्याचीं जरी तीन निरनिराळीं ठिकाणें ठरविलीं आहेत, तरी त्याचा मुख्य रोख ह्या सेंट रोमॅनसच्या बुरजावरच दिसत आहे ! कारण, मुख्य सेनापति कालीलपाशा आणि त्यांच्या हाताखालचें लढाऊ सैन्य यांची नेमणूक ह्याच ठिकाणीं झालेली आहे. शिवाय सुलतान स्वतः आपल्या हुजुरातीच्या राखीव सैन्यासह ह्याच ठिकाणीं हजर राहणार आहेत ! ह्याकरितां आपल्यालाही ह्याच ठिकाणीं विशेष तयारी ठेवली पाहिजे असें मला वाटतें ! "

लॉर्ड नोटारा—" सेनापति जस्टीनियन यांचें अनुमान सयुक्तिक दिसतें. सुवर्णशृंगाच्या बाजूला तटबंदी फारशी मजबूत नाहीं, हें खरें, पण तिकडे महमदपाशा आणि तो बदमाष लियॉनार्डस यांची नेमणूक आहे ! त्यांच्या हाताखालचें सैन्य जरी मोठें आहे, तरी ते अगदीं अव्यवस्थित भाडोत्री, निवळ बाजारबुणगें आहे ! त्यांना आरमाराची मदत आहे

खरी, पण तटबंदी फोडून शहरांत प्रवेश करावयास आरमाराचा विशेष उपयोग होण्यासारखा नाहीं. तिकडील बाजू सर करावयाची म्हणजे, तुर्कांना असंख्य सैनिक व अपार युद्धसामग्री खर्ची घालावी लागेल ! ”

सर एडवर्ड—“ आणि सिलिव्हरी वेशीकडील बाजू तर इतकी भक्कम आहे कीं, वाटल्या ओंगळीनें त्या बाजूला कितीही जोराच्या धडक्या मारल्या तरी, त्याची तेथें मुळींच दाद लागणार नाहीं. असें वाटतें ! ”

बादशहा—“ माझेंही मत तसेंच आहे ! तुर्कांचा विशेष जोर ह्याच ठिकाणीं पडणार, आणि स्वतः सुलतान तेथें हजर राहणार असल्यामुळें, तेथील सैनिकही विशेष हुरुपानें लढणार ! त्याअर्थीं आम्ही स्वतः ह्याच ठिकाणीं राहणें इष्ट आहे ! सेनापति जस्टीनियन, हें ठिकाण आम्ही तुमच्या स्वाधीन करतों, आणि आम्ही आमच्या राखीव सैन्यासह येथें तुमच्या मदतीला राहतों ! ”

जस्टीनियन नम्रपणें प्रणाम करून म्हणाले—“ सरकारांनीं मला हा मान दिल्याबद्दल मी सरकारचा अत्यंत ऋणी आहें ! मजवर टाकलेली जबाबदारी मी योग्य रीतीनें बजावून दाखवीन, अशी मला उमेद आहे ! मला माझें कर्तव्य पार पाडण्यास परमेश्वर सद्बुद्धि देवो व सामर्थ्य देवो!

बादशहा—“ ठीक आहे ! सेनापति सर एडवर्ड, तुम्ही व लॉर्ड क्रांझा मिळून सुवर्णशृंगाचें संरक्षण करावें. असें आमचें मत आहे ! तुर्कांचा मुख्य रोख कोठेंही असला, तरी सुवर्णशृंग हें सर्वांत महत्वाचें ठिकाण आहे ! तेथें तुमच्या शौर्याची, साहसाची व कौशल्याची चांगलीच कसोटी लागणार आहे ! ”

लॉर्ड क्रांझा—“ आज्ञा सरकार ! आपल्या हुकमाप्रमाणें मी त्याच ठिकाणीं माझें कौशल्य व करामत दाखवीन ! ”

सर एडवर्ड—“ सरकारचा हुकूम शिरसावंद्य आहे ! मात्र मला एवढेंच सुचवावयाचें आहे कीं, त्या बाजूला खंदक नसल्यामुळें, तुर्क लोक तटाला शिड्या लावण्याचा प्रयत्न करतील. तो हाणून पाडण्यासाठीं आमच्या जवळ शक्य तितकें अधिक मनुष्यबळ पाहिजे ! ”

बादशहा—“ बरोबर आहे ! त्या ठिकाणीं तोफा किंवा इतर युद्धसामग्रीपेक्षां मनुष्य संख्येचीच अधिक आवश्यकता आहे ! आणि इतर ठिकाणांचा जरूर तितका पुरवठा होऊन उरेल तें सर्व सैन्य

तुमच्याच स्वाधीन करण्यांत येईल ! " बरें, सिलिव्हरी वेशीची जबाबदारी सिलिव्हरीचे कोतवाल कॉनिएटस यांच्यावरच सोंपवावी. आणि हल्लींचे शहरकोतवाल रिचर्ड बर्स्टो यांनीं त्यांना मदत करावी ! "

कॉनिएटस—" आज्ञा सरकार ! ह्या वृद्ध शरीरांत जोपर्यंत रक्ताचा एक बिंदु तरी शिल्लक आहे, तोंपर्यंत आपलें कर्तव्य बजावण्यास मजकडून कसूर होणार नाहीं ! "

रिचर्ड बर्स्टो—" ह्या गरीबावर जी ही कृपा झाली आहे, तिचें उतराई होण्यास माझा हा एकच जन्म खास पुरा पडणार नाहीं ! "

बादशहा—" ठीक आहे ! चला आतां, असेच तटावरून दुरुस्तीचीं कामें पहात सुवर्णशृंगाकडे जाऊं ! तेथें एंजीनियर निसेफोरस यांनीं नवीन तोफ पाहण्यासाठीं मुद्दाम बोलावलें आहे, तीहि पाहूं ! "

बादशहांच्या मागून सर्व मंडळी तटावरून पुढें निघाली. उत्तरेचा तट संपून पूर्वेचा तट लागतांच, सायंकाळचा समुद्राचा शांत देखावा त्यांच्या दृष्टीस पडला. अर्थातच सर्वांची दृष्टि त्या मनोहर देखाव्याकडे वळली. सूर्य अगदीं अस्तास चालला होता, इतक्यांत दूर, तुर्की आरमाराजवळ एकटीच एक होडी एक मनुष्य वल्हवीत नेत असलेली दिसली. एंजीनियर निसेफोरस पुढें येऊन बादशहास प्रणाम करून म्हणाला—" सरकार, नवीन तोफ बसवून तयार आहे, सरकारांनीं ती कृपा करून पहावी, आणि पाहिजे तर तिचा अचुक नेमही पहावा. "

बादशहा—" ठीक आहे, चला पाहूं या !

सर्वांनीं ती तोफ व तिची यांत्रिक रचना पाहून एंजीनियर निसेफोरसची तारीफ केली. इतक्यांत तुर्की छावणींत सूर्यास्ताची तोफ झाली, तेव्हां सर्वांची दृष्टी छावणीकडे साहजिकच वळली. सूर्यास्त नुकताच झाला होता तथापि आकाश निरभ्र असल्यामुळें संधिप्रकाश स्वच्छ होता.

रिचर्ड समुद्राकडे टक लावून पहात म्हणाला—" ओ हो, मोठाच चमत्कार ! सरकार, ती तुर्की आरमाराकडे चाललेली एकटी होडी आपलीच दिसते, आणि तिच्यांतील मनुष्यही ग्रीक दिसतो ! कोणाला कांहीं कामगिरीकरितां तुर्की छावणींत पाठविलें आहे कीं काय ? "

सर्व मुत्सद्दी एकदम चकित स्वरानें म्हणाले---" छे छे, आम्ही तर कोणाला पाठविलेलें नाहीं! मग हा कोण व कां जात असावा!"

बादशहा---" तर मग तो खचित कोणी तरी फितुरी बदमाष असला पाहिजे! हं, निसेफोरस, तुमच्या नव्या तोफेची परीक्षा पाहण्याची आयतीच वेळ आली आहे! उडवा पाहूं, ती होडी!"

" आज्ञा सरकार " असें म्हणून निसेफोरसनें तोफ भरली, आणि परिवीक्षण यंत्रांतून ती होडी पाहून व तिचा वेग ताडून, तोफ रोखली. तोंच बार उडाला, आणि तोफेचा गोळा होडीपासून चार हातावर समुद्रांत पडला. त्यामुळें पाणी हेलकावून होडी एकदम डळमळूं लागली.

सर एडवर्ड---" एंजीनियरसाहेब, आपला नेम थोडक्यांत चुकला!"

एंजीनियर---" थांबा, अद्यापि तोफेंत दोन गोळे शिल्लक आहेत! ह्या वेळीं प्रकाश भरपूर नसल्यामुळें, रोंखण्यांत फरक पडला असेल!"

इतक्यांत दुसरा गोळा उडाला. तो मात्र बरोबर होडीच्या नाळेवर जाऊन हापटला. त्यासरशी होडी फुटून तिचे तुकडे तुकडे झाले, आणि आंतील मनुष्य समुद्रांत गटकळ्या खाऊं लागला.

जस्टीनियन---" शाबास! हा गोळा मात्र बरोबर लागला!"

एंजीनियर---" छे छे, तरी चुकलाच! तो त्या माणसाला लागावयास पाहिजे होता!"

इतक्यांत तिसरा गोळा उडाला. तो मात्र त्या गटकळ्या खात असलेल्या माणसाला लागला कीं नाहीं हें स्पष्ट दिसलें नाहीं, तथापि तो मनुष्य पुनः समुद्राच्या पृष्ठभागावर दिसेनासा झाला.

बादशहा---" कांहीं हरकत नाहीं! एकंदरींत तोफ चांगली तयार झाली आहे! अशीच आणखी एक तोफ सेंट रोमॅनस व सिलिव्हरी वेस यांच्यामध्यें नेऊन लावा, म्हणजे दोन्ही ठिकाणावर मारा करण्यास उपयोगी पडेल! चला, मित्रहो असेच पुढें जाऊं!"

बादशहा पुढें निघाले, तेव्हां त्यांच्या मागून इतर सर्व मंडळी चालूं लागली. कांहीं वेळानें लॉर्ड फ्रांक्षा सचिंत स्वरानें म्हणाले---" हा एकटाच फितुरी बदमाष कोण असावा, कांहीं कळत नाहीं!"

जस्टीनियन—" कोणी कां असेना, त्याचा बहुतेक निकाल लागला आहे, आतां त्याच्या हातून आपलें नुकसान होण्याची काळजी नको ! "

सर एडवर्ड—" छे, मला नाहीं वाटत, तो मेला असेल ! त्याला पोहावयास येत असल्याशिवाय कांहीं त्यानें एकटयानें होडी घेऊन जाण्याचें धाडस केलें नसेल ! आणि पोहणारा असल्यावर तो ह्यांतूनही बचावून जाण्याचा बराच संभव आहे ! "

रिचर्ड बर्स्टो—" आपण सर्व बंदराकडे आलोंच आहों, तेथें तपास करूं, म्हणजे कांहीं तरी माहिती समजेल ! "

बादशहासह सर्व मंडळी तटावरून खालीं उतरून बंदरावर आली. बादशहांनीं बंदरच्या अधिकाऱ्याला सर्व व्यवस्था विचारून, तेथील बंदोबस्ताची चौकशी केली; आणि कांहीं सूचनाही केल्या. इतक्यांत पहाऱ्यावरील नाईक लॉर्ड फ्रांझाजवळ येऊन हळूच म्हणाला—" प्रधान साहेब, आपला नोकर आपल्या कामगिरीवर नुकताच होडी घेऊन गेला; त्याला सूर्यास्ताच्या आंत परत येण्याविषयीं बजावलें होतें, पण अजून पत्ता नाहीं ! तो रात्रीं परतला तर दरवाजा उघडावयाचा का ? "

लॉर्ड फ्रांझा चकित दृष्टीनें नायकाकडे पहात म्हणाले; " माझा नोकर ? आणि माझ्या कामगिरीवर गेला? कोण तो? कसली कामगिरी?"

नाईक—" आपला झोशीमस, आपला जरूरीचा निरोप आरमाराचे सेनापतिसाहेबांना सांगण्यासाठीं म्हणून येथून होडी घेऊन गेला. "

लॉर्ड फ्रांझा—" छे, अगदींच खोटी गोष्ट ! मीं झोशीमसला पाठविलें नव्हतें, मला सेनापतीकडे निरोपही पाठवावयाचा नव्हता ! "

सर एडवर्ड—" मी तर प्रधानसाहेबांच्या जवळच किती वेळ तरी आहें ! खचित ह्यांत कांहीं तरी लबाडी आहे ! "

जस्टीनियन—" तर मग होडीवाला झोशीमसच असला पाहिजे ! "

रिचर्डनें पुढें होऊन त्या नायकाला झोशीमसच्या पोषाखाची व होडीच्या रंगाची माहिती विचारली. ती ऐकतांच, तो होडीवाला झोशीमसच असला पाहिजे, अशी सर्वांची खात्री झाली.

सर एडवर्डना पूर्वीच्या एका प्रसंगाची आठवण होऊन ते म्हणाले—" प्रधानसाहेब, तो बदमाष जर तुर्की छावणींत जिवंत पोंचला असेल,

तर कांहीं तरी दगा केल्याशिवाय खचित राहणार नाहीं, अशी माझी खात्री आहे ! त्याच्या दुष्ट बुद्धीचा मला पूर्वी थोडासा अनुभव आलेला आहे ! त्या वेळींच मीं आपल्या कानावर ती गोष्ट घालावयास पाहिजे होती, पण, मला तसें करितां आलें नाहीं ! त्या हरामखोराला आपल्याकडची कोणती गुप्त बातमी समजली आहे, कोण जाणें ! "

लॉर्ड फ्रांझा खिन्न स्वरानें उद्गारले—" हाय हाय, झोशीमस, तूं माझ्या निर्मल राजनिष्ठेला अखेरीस डाग लावलास ! "

बादशहा—" जाऊं द्या, प्रधानजी, तुमच्या प्रत्येक नोकराचें मन देखील तुमच्यासारखेंच निर्मल कोठून असणार ? शिवाय त्या यःकश्चित् मनुष्याच्या हातून आपलें आतां विशेष नुकसान तरी काय होणार ? चला आतां रात्र झाली ! आपापल्या तजविजीला लागा ! "

तेथेंच बादशहांचा निरोप घेऊन, सर्व मंडळी आपापल्या स्थानीं निघून गेली. लॉर्ड फ्रांझा, सर एडवर्ड, कॉनियाटस ह्यांच्या मनांत मात्र झोशीमसच्या दगलबाजीबद्दलचेच विचार घोळूं लागले.

---

## प्रकरण ३० वें.

## दगलबाजीचें बक्षीस.



सूर्यास्त होऊन तोफ झालेली ऐकतांच, झोशीमसला बराच धीर आला होता. आपला कोणी पाठलाग करीत येईल कीं काय, अशी त्याला इतका वेळ भीति वाटत होती. परंतु आतां संध्याकाळ झाली, आणि तुर्की आरमारही जवळ दिसूं लागलें, तेव्हां त्याला वाटलें कीं, आपण आतां बहुतेक पार पडलों. इतक्यांत मागें तोफेचा आवाज झाला, आणि एक गोळा त्याच्या होडीजवळ येऊन पडला. त्यामुळें होडीला हेलकावा बसला. त्याबरोबर झोशीमस घाबरून मागें वळून पाहूं लागला. सेंट रोमॅनसच्या बुरजावर मंडळी उभी असून तेथूनच तोफ उडाली, हें त्याच्या लक्षांत आलें, आणि त्यांनीं आपल्याला ओळखून

आपल्यावर तोफ डागली असावी, अशी त्याची समजूत झाली. पुनः तोफ भरून उडवीपर्यंत तोफेच्या गोळ्याच्या टप्याबाहेर गेलें पाहिजे. असा विचार करून, तो झपाट्यानें पुढें निघाला, तोंच दुसरा गोळा झाडीवर लागून होडी फुटून गेली आणि झोझीमस पाण्यांत पडून गटंकळ्या खाऊं लागला. आतां मात्र आपण मरणार असें त्याला वाटूं लागलें, इतक्यांत तिसरा गोळा, आला, तो तर त्याच्यापासून अगदींच जवळ पडला. त्यामुळें त्याच्या जोरासरशी तो पाण्यांत बुडाला. पण तो पोहोणारा असल्यामुळें पुनः वर येऊन धडपड करूं लागला. इतक्यांत दैवयोगानें होडीची एक फळी त्याच्या हातीं लागली. तोफेंतून इतके भराभर एकामागून एक गोळे सुटलेले त्यानें आजपर्यंत कधींच पाहिलेले नव्हते. आणखी असे किती गोळे येणार ह्याचाही त्याला अंदाज नव्हता. ह्यास्तव फळीचा आधार घेऊन, व आपली सर्व शक्ति एकवटून, तो तसाच पुढें निघाला. त्यानंतर आणखी गोळा आला नाहीं, व थोड्याच वेळांत झोशिमस सुवर्णशृंगाच्या पूर्वेस थोड्या अंतरावर तुर्की किनाऱ्यास लागला. पण तो इतका थकून गेला होता कीं, किनाऱ्यावर येतांच त्याला किती वेळ तरी धापा टाकीत स्वस्थ पडून रहावें लागलें.

रोमन तटबंदीवरून तोफेचे गोळे आपल्या छावणीकडे येत असलेले पाहून तुर्की छावणींतील त्या भागाचा अंमलदार अहमदपाशा यानें एक स्वार तपासाकरितां बंदरावर पाठविला होता. तो किनाऱ्यावर आला. तो झोशीमस उठून उभा राहिला. त्याला पाहतांच तुर्की स्वाराला आश्चर्य वाटलें. तो ग्रीक असल्याचें त्या स्वारानें तत्काळ ओळखून, “ कोण कोठें जाणार, ” इत्यादि चौकशी केली.

झोशीमस दीनवाणीनें म्हणाला—“ मेहेरबान, मला उगीच त्रास देऊं नका ! मी शहरांतून गुप्तपणें आलों आहें. तोफेच्या तडाख्यांतून मरतां मरतां वांचलों आहें, आणि अगदीं थकून गेलों आहे ! कृपा करून मला ड्यूक लियॉनशियस यांचा पत्ता सांगा, त्यांच्याकडे माझें फार जरूरीचें व महत्त्वाचें काम आहे ! ”

तुर्की स्वार—“ ड्यूकसाहेब ह्याच छावणींत आहेत, पण त्यांच्याकडे तुला एकट्याला जाऊं देतां येत नाहीं ! माझ्याबरोबर येण्यास तयार

असशील तर चल, मी तुला त्यांच्याकडे घेऊन जाईन ! "

झोशीमसनें ती गोष्ट तत्काळ मान्य केली, आणि तो हळूहळू त्या स्वाराच्या बरोबर निघाला. कांहीं वेळानें दोघेही लियॉनशियसच्या तंबू-जवळ येऊन पोंचले. त्या वेळीं रात्र झाली असल्यामुळे, छावणींत जिकडे तिकडे मशाली पेटल्या होत्या.

झोशीमसला एका चौकीवर पाहरेवाल्याच्या नजरेखालीं ठेवून, तो स्वार लियॉनशियसला वर्दी द्यावयास गेला. पाहरेवाले झोशीमसकडे पाहून आपापसांत त्याची कुचेष्टा करीत होते, पण तिकडे लक्ष न देतां, झोशीमस आगटीशेजारीं उभा राहून, आपल्या अंगावरील ओले कपडे वाळवूं लागला. थोड्या वेळानें त्या स्वारानें परत येऊन झोशीमसची एकदां झडती घेतली, आणि त्याच्या कमरेची सुरी काढून घेऊन, त्याला लियॉनशियसच्या तंबूंत पाठवून दिलें.

तंबूंत आल्यावर, झोशीमस लियॉनशियसला प्रणाम करून, आदबीनें उभा राहिला. त्याच्याकडे लक्षपूर्वक पाहून लियॉनशियस म्हणाला— " कोण, झोशीमस ? तुझें माझ्याकडे काम आहे ?. मोठेंच आश्चर्य ! तूं हल्लीं लॉर्ड फ्रांक्सांच्या नोकरींत नाहींस कां ? "

झोशीमस—सरदारसाहेब, मी त्यांच्या नोकरींत होतों, म्हणूनच मला आज तिसरे प्रहरीं एक महत्त्वाची बातमी समजली ! ती बातमी आपल्याला कळणें अत्यंत महत्त्वाचें आहे, म्हणून मी अत्यंत संकटांतून येथवर येण्याचें धाडस केलें ! "

अशी कोणती बातमी आहे ? ती राजकीय स्वरूपाची असेल तर, मला सांगण्यापेक्षां सुलतानसाहेबांना कळविणें अधिक श्रेयस्कर आहे ! "

झोशीमस—" छे छे, सरदारसाहेब, ती राजकीय बातमी नसून अंतर खासगींतील, थियोडोरताईसाहेब म्हणजे सेनापतिसाहेबांच्या पत्नी ह्यांच्यासंबंधाची आहे ! "

लियॉनशियस—" काय ? तिचें लग्न झालें ? आणि हीच की बातमी सांगवयास तूं इतक्या संकटांतून येथवर आलास ? "

झोशीमस—" तसें नाहीं साहेब, उद्यां शहर काबीज होतांच ती

आपल्या हातीं अखुक कोठें व कशी लागेल, हें मी आपल्याला सांगावयास आलों आहें ! आहे कीं नाहीं महत्त्वाची बातमी ? "

लियॉनशियस–" खरें कीं काय ? तसें असेल तर ती बातमी दुप्पट महत्त्वाची आहे ! कारण, एक माझ्या फार दिवसांच्या इच्छेप्रमाणें थियोडोरा माझ्या ताब्यांत मिळेल, शिवाय सर एडवर्ड जिवंत राहिला तर त्याचीही चांगली खोड मोडेल. ही बातमी खरी ठरली तर, झोशीमस, तूं मागशील तें बक्षीस देईन ! "

झोशीमस–" आपण काय बक्षीस द्याल ?

लियॉनशियस–" एक हजार सुवर्ण मुद्रा ! मग तर झालें ? "

झोशीमस–" छे, एवढ्या महत्त्वाच्या कामगिरीला असलें किरकोळ बक्षीस काय उपयोग ? मला निदान पांच हजार सुवर्णमुद्रा तरी हव्याच. त्याशिवाय त्यांतील एक माझ्या तोंडून बाहेर पडणार नाहीं ! "

लियॉनशियस–" अरे चोरा ! दम खा, तूं आतां माझ्या ताब्यांत सांपडला आहेस ! शिपायाकडून तुला येथल्यायेथें कोरड्याखालीं बडवितों, म्हणजे कशी तुझ्या तोंडून बातमी बाहेर पडत नाहीं, तें पाहतों ! "

झोशीमस–" छे छे, सरदार साहेब, त्या फंदांत पडण्याचें मनांत देखील आणूं नका. नाहींतर थियोडोराताईची आशा मुळींच सोडावी लागेल ! आपण असा कांहीं भलता प्रकार करूं लागाल तर, मी साफ सांगेन कीं. ती सुंदरी सुलतानसाहेबांच्या चरणीं अर्पण करण्याची खटपट असतां हे ड्यूक ती आपल्याला मिळावीसें म्हणत आहेत ! "

लियॉनशियस—" अरे हरामखोरा ! मला धमकी घालतोस होय ? पण तुझ्या असल्या पोकळ धमक्यांना मी मुळींच भिणार नाहीं पण सध्यां मला वेळ नाहीं. अजून पुष्कळ महत्त्वाचें काम आहे. म्हणून तुझेंच म्हणणें तूर्त मान्य करतों ! बरें पांच हजार सुवर्णमुद्रा ! सांग आतां !

झोशीमस–" सरदारसाहेब, आपल्या वचनावर माझा पूर्ण भरंवसा आहे, तथापि ही लढाईची धांदलीची व अनिश्चित वेळ आहे, तेव्हां माझ्याजवळ आपलें लेखी वचन असलेलें बरें ! "

लियॉनशियसनें रागानें त्याच्याकडे पहात तोंडांतल्यातोंडांत चार दोन

शिव्याही हांसडल्या. पण मुकाटयानें कागदावर काहीं मजकूर लिहून त्या-वर सही करून, तो झोशीमसच्या अंगावर टाकला.

झोशीमसनें तो वाचून पाहिला. त्यांत पुढील मजकूर होता—

" कॉन्स्टांटिनोपल शहर सुलतानसाहेबांच्या हस्तगत होतांच, रोमन प्रधान लॉर्ड फ्रांझा यांचा नोकर झोशीमस यास पांच हजार सुवर्णमुद्रा बक्षीस देण्याचें मीं वचन दिलें आहे. "

" ड्यूक लियॉनशियस. "

झोशीमसनें तो कागद घडी करून काळजीपूर्वक आंतील खिशांत ठेवला. नंतर त्यानें लॉर्ड फ्रांझांच्या बागेंतील तळघराची सर्व बातमी व ती आपल्याला कशी कळली, हें लियॉनशियसला सविस्तर सांगितलें.

सर्व हकीकत लक्षपूर्वक ऐकल्यावर लियॉनशियस म्हणाला—" ठीक आहे ! ही तुझी हकीगत खरी ठरली तर, तुला कबूल केल्याप्रमाणें बक्षीस मिळेल ! पण जर खोटी गोष्ट झाली, तर तेथल्या तेथें तुझा मुडदा पडेल, हें पक्कें लक्षांत ठेव. शिवाय कॉन्स्टांटिनोपल सर होई-पर्यंत तुला माझ्या ताब्यांत राहिलें पाहिजे ! तुला मी कैदेंत ठेवीत नाहीं, तरी तुझ्यावर सक्त नजर राहील ! यत्किंचित् दगा करण्याचें मनांत आणशील तर, तत्काळ मरशील ! "

झोशीमस—" ह्या सर्व गोष्टी मला मान्य आहेत ! मला आतां शहरांत परत जातां येणें शक्यच नाहीं ! माझें काम झालें, आतां दगा करण्याची कल्पना तरी माझ्या मनांत कशाला येईल !

लियॉनशियसनें झोशीमसची आपल्या नोकर मंडळींत तजवीज लावून दिली, व तो आपल्या कामाला लागला.

## प्रकरण ३१ वें.

## निरवानिरव.



बरीच रात्र झाल्यावर सर एडवर्ड घरीं आले. त्यांची प्रियपत्नी थियोडोरा त्यांची वाट पहात बसली होती ते आल्यावर उभयतांनीं भोजन आटोपलें नंतर महलांत उभयतांच्या त्या दिवशींच्या तयारी संबंधानें कांहीं वेळ गोष्टी झाल्यावर, सर एडवर्ड एकदम म्हणाले–"प्रिये, उद्यां दुर्दैवानें जर शहर पडलें, आणि त्यांत माझा अंत झाला, व बहुतेक तसेंच होणार असें माझी मनोदेवता मला सांगत आहे, तर तूं पुढें काय करावेंस अशी माझी इच्छा आहे, हें मी तुला आतां सांगणार आहे ! कारण पुनः अशी स्वस्थपणें बोलावयास संधि मिळेल कीं नाहीं कोण जाणें !

थियोडोरा अश्रुपूर्ण दृष्टीनें पतीकडे पहात करुण स्वरानें म्हणाली–" नको नको नाथ, असलीं भयंकर अक्षरें माझ्यानें ऐकवत देखील नाहींत ! ईश्वराची कृपा झाल्यास अद्यापिही ह्या संकटांतून पार पडूं !

सर एडवर्ड–" ईश्वरकृपेनें तसेंच होवो, अशी आमची सर्वांची इच्छा आहे, पण तसें घडून येण्याची मात्र आशा उरलेली नाहीं. म्हणून आपल्याला आतां पुढचा विचार करणें भाग आहे ! "

थियोडोरा—" पण आपण होऊन अशी अभद्र वाणी कां बोला ? "

सर एडवर्ड—" वेडीच आहेस ! वीर पुरुषाला युद्धांत मृत्यु येणें हें अभद्र नसून स्वर्गप्रद आहे, हें तुला ठाऊक नाहीं का ? तूं वीर-कन्या आहेस, वीरपत्नी आहेस आणि वीरमाताही होण्याचा संभव आहे ! तुला त्याबद्दल भीति किंवा दुःख वाटण्याचें कांहींच कारण नाहीं ! शिवाय ज्या वेळीं व ज्या स्थितींत आपला विवाह झाला, त्या परिस्थितीवरूनही ह्या गोष्टी दिसत होत्या. त्या कांहीं नव्या नाहींत ! "

थियोडोरा—" प्रियकरा, तें सर्व मला कळतें आहे, पण आपल्या वियोगाची कल्पना माझ्या दुर्बल मनाला असह्य होते ! "

सर एडवर्ड—" धैर्याची खरी परीक्षा अशा प्रसंगींच होत असते !

ह्या वेळीं जर तुझें धैर्य नष्ट झालें, तर तुला माझी पत्नी म्हणण्याची देखील मला लाज वाटेल !"

थियोडोरा—" छे छे, अशी कल्पनाही मनांत आणूं नये ! आपला वियोग झाला तरी तो क्षणिक आहे ! स्वर्गलोकीं पुनः आपला संयोग होईल, आणि तो अक्षय टिकेल, असा माझा दृढविश्वास आहे ! सांगावें काय तें, मी ऐकण्यास तयार आहें, आणि आपली आज्ञा मला मान्य आहे !"

थियोडोराच्या धैर्याबद्दल व निष्ठेबद्दल सर एडवर्डनीं तिची तारीफ केली. नंतर लॉर्ड फ्रांझांच्या संमतीनें ठरलेला सर्व बेत त्यांनीं तिला सविस्तर कळविला, आणि शेवटीं म्हणाले—" मी, लॉर्ड फ्रांझा, कॉनिरॅटिस किंवा रिचर्ड बर्स्टो ह्या चौघांपैकीं जो कोणी हयात व मोकळा असेल, तो मध्यरात्रीं तळघराजवळ येईल, आणि तुम्हांला तेथून बाहेर नेण्याची तजवीज करील. आम्हांपैकीं कोणालाच येतां आलें नाहीं तर, क्लारस शक्य ती तजवीज करील ! मात्र त्यानंतर आमचा तपास करण्याकरितां देखील एक क्षणभरही थांबूं नका. म्हणजे बहुतेक शत्रूंच्या हातीं लागण्याचा संभव नाहीं !"

थियोडोरा—" ईश्वर करो, आणि तसा प्रसंग न येवो ! पण दुर्दैवानें आलाच तर, मी आपल्या आज्ञेप्रमाणें अक्षरशः वागेन !"

सर एडवर्ड—" ठीक आहे, ही एक मोठी काळजी दूर झाली ! आतां दुसरी गोष्ट, तुझ्याजवळ दागदागिनें काय काय आहेत ?"

थियोडोरा—" आपण दिलेले आणि माझ्या आईचे असे सर्व दागिने माझ्याजवळ आहेत, ते मी आपल्याला दाखवितें !"

थियोडोरानें एक कपाट उघडून त्यांतून एक लोखंडी संदूक काढून आणिली, आणि ती पतीच्या समोर मेजावर ओतली.

त्यांत सर एडवर्डनीं दिलेले जिन्नस फारसे नव्हतेच, पण थियोडोराच्या आईचे जे जवाहिराचे बहुमोल अलंकार होते, ते पाहून मात्र त्यांचे डोळे दिपून गेले. युरोपांतल्या कोणत्याही राणीजवळ देखील इतके सुंदर, तेजस्वी व मूल्यवान् अलंकार नसतील, असें त्यांना वाटूं लागलें.

सर्व अलंकार पाहून व ते पुनः संदुकेंत भरून ठेवून, सर एडवर्ड

म्हणाले—" ठीक आहे! एवढें तुला आपल्याबरोबर सहज नेतां येतील. आतां आणखी एक गोष्ट तुला सांगावयाची आहे. ईश्वरकृपेनें मला तुझ्याबरोबर येतां आलें, तर मी तुला इंग्लंडास माझ्या घरीं घेऊन जातच आहें! पण तसें घडलें नाहीं, तरी तूं माझ्या वडिलांकडेच जा, म्हणजे ते तुझा आपल्या कन्येप्रमाणें प्रतिपाळ करतील, आणि माझ्या दोघी बहिणीही तुझ्यावर सख्या बहिणीप्रमाणें प्रेम करतील, अशी माझी खात्री आहे! इकडील सर्व हकीगतीचें एक पत्र व आपल्या विवाहाचे दाखले मीं आजच एका व्हेनीशियन जहाजाच्या कप्तानाकडे पाठविले आहेत. तो कप्तान माझा मित्र असून विश्वासू आहे. उद्यां मध्यरात्रीनंतर एक तासभर तो आमची वाट पाहील, नंतर तो आपलें जहाज इटलीकडे हांकारील. तेथून तो तसाच पुढें इंग्लंडला जाणार आहे. तेथें पोंचल्यावर तो माझे कागदपत्र माझ्या वडिलांच्या स्वाधीन करील."

थियोडोरा—" आपली आज्ञा अक्षरशः पाळण्याचें मीं वचन दिलेंच आहे! आतां एवढीच विनंति आहे कीं, उद्यां वरचेवर मला युद्धाची बातमी मात्र समजली पाहिजे, नाहीं तर मला चैन पडणार नाहीं."

सर एडवर्ड—" ठीक आहे! ती आम्ही वरचेवर कळवीत जाऊं! शिवाय लॉर्ड मॅन्युअल रिकामेच आहेत. त्यांना युद्धांत प्रत्यक्ष भाग घेतां आला नाहीं तरी, ते बातम्या आणण्याचें काम करूं शकतील."

थियोडोरा—" आणखी एक प्रार्थना आहे कीं, होतां होईल तों अविचार करूं नये व जरूर नसतांना संकटांत उडी घालूं नये! आपलें कर्तव्य आपण योग्य रीतीनें बजावलेंच पाहिजे, त्यांत कसूर मुळींच होतां कामा नये; तथापि संतापानें चिडीनें किंवा मानापमानाच्या भ्रामक कल्पनेनें भलतेंच साहस करण्यास प्रवृत्त होऊं नये!"

सर एडवर्ड—" प्रिये, हें काय मला मुद्दाम सांगावयास पाहिजे? आपला हा थोडया दिवसांचाच सहवास, आपणां उभयतांस किती सुखकर झाला आहे, ह्याचें मला क्षणभर तरी विस्मरण होणें शक्य आहे का? तुझें हें शुद्ध सात्विक प्रेमच मला सर्व काळ मार्गदर्शक होईल आणि अयोग्य साहसापासून किंवा अविचारापासून परावृत्त करील!"

थियोडोरा—“ ईश्वर करो, आणि आपली सेवा माझ्या हातून अक्षय घडो ! ”

सर एडवर्ड—“ बरें तर येतों मी आतां ! उद्यां सकाळीं सवड झाली तर येऊन भेटून जाईन, नाहीं तर निरोप तरी पाठवीन ! ”

थियोडोरा—“ होईल तितकी सवड काढून क्षणभर तरी उभाउभीं भेटून जावें, म्हणजे माझ्या मनाला बराच धीर येईल ! ”

इतक्यांत एका दासीनें हळूच दारांतून सांगितलें—“ मेरियाबाई आणि युफ्राशियाताई आल्या आहेत ! ”

थियोडोरा—“ येऊं देत त्यांना, इकडेच पाठवून दे. ”

दासी निघून गेल्यावर थोड्याच वेळानें त्या दोघी महालांत आल्या. त्यांच्या पाठोपाठ लॉर्ड मॅन्युअलही तेथें येऊन बसले. त्या प्रसंगीं युद्धाच्या तयारीच्या गोष्टींशिवाय दुसऱ्या गोष्टी सुचणेंच शक्य नव्हतें. ती मंडळी कांहीं वेळ परस्परांशीं बोलत बसली, तोंच लॉर्ड फ्रांझा व कोतवाल कॉनियाटिस आले असल्याची वर्दी आली, आणि थोड्याच वेळांत ते उभयतांही तेथें येऊन बसले.

आणखी कांहीं वेळ सामान्य गोष्टी झाल्यावर, तळघरांत स्त्रियांनीं छपून बसण्याच्या मसलतीचा पुनः एकवार सविस्तर उहापोह झाला. कारण, मेरियाबाई व युफ्राशिया ह्यांना ती हकीगत अद्यापि कळलेली नव्हती. तो विचार त्या दोघींनाही पूर्णपणें मान्य झाला.

लॉर्ड फ्रांझा म्हणाले—“ युद्धासंबंधीं कसलीही बातमी तुम्हांला समजली तरी, आम्हांपैकीं कोणीं, किंवा लॉर्ड मॅन्युअलनीं सांगितल्या शिवाय तुम्ही त्या तळघरांतून मात्र मध्यरात्रीपर्यंत हालूं नका ! कारण, त्या धांदलींत जर कां तुम्ही बेपत्ता झाला, तर पुनः तुमचा आम्हांला तपास लागणें देखील शक्य नाहीं ! ”

त्याप्रमाणें वागण्याचें तिघींनींही कबूल केल्यावर, लॉर्ड मॅन्युअलनींही वरचेवर युद्धक्षेत्रावरून बातम्या आणण्याचें काम पतकरलें.

सर एडवर्ड—“ झालें आतां, सांगावयाचें कांहीं उरलें नाहीं, असें वाटतें ! अकरा वाजून गेले. बारा वाजतां बादशहांच्या दरबारास जावयाचें आहे ! ”

कोतवाल—“ हो, चलाच आतां, वेळ झाली ! ईश्वरकृपेनें आजचा हा रोमन बादशहांचा शेवटचा दरबार न होवो, म्हणजे झालें ! ”

सर्व मंडळी उठली. लॉर्ड मॅन्युअलनींही आपण दरबारास येणार, असा आग्रह धरल्यामुळें, त्यांना लॉर्ड फ्रांझांनीं येण्यास परवानगी दिली. नंतर परस्परांचा निरोप घेण्याचा हृदयद्रावक प्रकार झाला. तो निरोप शेवटचाच, असें प्रत्येकाचें मन ज्याला त्याला सांगत होतें, तथापि प्रत्येक जण आपले अश्रु आवरण्याचा व दुसऱ्याला धीर देण्याचा शक्य तितका प्रयत्न करीतच होते. शेवटीं कसा तरी तो हृदयद्रावक प्रसंग आटोपून, मंडळी राजवाड्याकडे बादशाही दरबारास निघून गेली.

---

## प्रकरण २९ वें.

## स्वप्न कीं दृष्टांत.



रात्रीं थोडी तरी झोंप लागावी म्हणून, थियोडोरानें पुष्कळ खटपट केली, परंतु पहांटेपर्यंत तिला मुळींच झोंप लागली नाहीं. पहांटेच्या वेळीं तिचा अंमळ डोळा लागला, पण त्यांत तिला नानातऱ्हेचीं स्वप्नें पडूं लागलीं. शेवटीं खोलींत कोणी तरी येत आहे असा तिला भास झाला. आपले पतीच आपल्याला भेटावयास आले असावे, अशा समजुतीनें ती चटकन् उठून बसली व इकडे तिकडे पाहूं लागली, पण महालांत कोणीही नव्हतें. दार बंद असून मेजावरील चांदीचा दिवा मंद जळत होता. ती चांगली जागी झाल्यामुळें, शहरांत चाललेला गोंगाट तिला अस्पष्ट ऐकूं येऊं लागला. पूर्वेकडील खिडकीच्या पडद्यांतून प्रकाशकिरण आंत डोकावूं लागले. त्यावरून, रात्र संपून उजाडलें अशी तिची खात्री झाली. पुनः झोंप घेण्याची तिला इच्छाही उरली नाहीं. ती आपल्याशींच विचार करीत बसली. पतींना घराकडे येण्यास सवड होईल कीं नाहीं, त्यांचें आपल्याला दर्शन होईल कीं नाहीं, आजच्या युद्धाचा परिणाम काय होईल, ह्या प्राणसंकटांतून पतीचा बचाव

होईल की नाहीं, आणि मध्यरात्रीं तरी त्यांची भेट होईल कीं नाहीं, इत्यादि विचार तिच्या मनांत एकसारखे घोळूं लागले.

ह्या विचारांच्या तंद्रेंत थियोडोरा इतकी गुंग होऊन गेली कीं, ती आपलें देहभानही विसरली. त्या विचारांच्या भ्रमणामुळें असो किंवा स्वप्नसृष्टींतील असो, महालाच्या एका अंधकारमय कोपऱ्यांत तिला एक आकृति दिसूं लागली. ती आपल्या मृत मातेची मूर्ति आहे असें तिला वाटलें. आईवर तिचें अत्यंत प्रेम असल्यामुळें तिची आई वारंवार तिला स्वप्नांत दिसत असे, "थियोडोरा, आज तळघरांत जाऊं नको, तेथें तुझ्यावर संकट येईल !" असे अस्पष्ट शब्द थियोडोराच्या कानावर आले, आणि ती आकृति तत्काळ तेथल्या तेथें अदृश्य झाली.

ह्या देखाव्यानें थियोडोरा इतकी घाबरून गेली कीं, तिच्या तोंडांतून शब्द निघेना, किंवा तिला हातपायही हालवितां येईना. तिची छाती जोरानें धडधडूं लागली आणि सर्वांग घामाधुम झालें थोड्या वेळानें अमळ शांत झाल्यावर तिनें शेजारच्या मेजावरची घंटा जोरानें वाजविली, त्याबरोबर तिची दासी धांवत महालांत आली. धांननीची बावरलेली व निस्तेज मुद्रा पाहून, ती दासी दचकून म्हणाली "काय झालें, ताई-साहेब ? आपल्याला काय होत आहे कीं काय ?"

थियोडोरा—"कांहीं नाहीं, तो दिवा मोठा कर आणि माझे कपडे अगोदर आण ! मला आतांच्या आतां युफ्राशियाच्या खोलींत जावयाचें आहे ! सांपडतील ते कपडे आण अगोदर !"

दासी तेथें जवळच एका खुर्चीवर असलेले कपडे धनिनीच्या अंगा-वर घालीत असतां हळूंच म्हणाली—"युफ्राशियाताईंना इकडेच बोलावून आणूं का ?"

थियोडोरा—"नको नको ! तूं येथून जाऊं नको ! एक दिवा लावून घे, आणि माझ्याबरोबर तिकडेच चल !"

दासीनें दुसरा दिवा लावून घेतला आणि त्या दोघी तेथून मेरिया-बाईच्या खोलींत आल्या. मेरियाबाई व युफ्राशिया एकाच खोलींत निजत असत. खोलीजवळ येतांच थियोडोरानें दारावर थाप मारली मेरियाबाई अगोदरच जाग्या झाल्या होत्या. त्यांनीं चटकन उठून दार उघडलें.

थियोडोराची भयभीत व निस्तेज मुखचर्या दृष्टीस पडतांच त्याही दचकल्या. थियोडोरानें दासीला परत जावयास सांगून, आंत जाऊन खोलीचें दार लावून घेतलें. ही चाहूल ऐकून युफ्राशियाही जागी झाली. उठून बसली होती.

मेरियाबाई थियोडोराला आपल्याजवळ बसवून घेऊन कळकळीच्या स्वरानें म्हणाल्या—" काय झालें थियोडोराताई ? तुम्ही अशा बावरल्यासारख्या कां दिसतां ? तुमच्या पतिसंबंधानें किंवा पित्यासंबंधानें कांहीं अनिष्ट स्वप्न पडलें कीं काय किंवा विशेष कांहीं बातमी कानांवर आली कीं काय ? "

थियोडोराचा गळा दाटून आल्यामुळें तिच्या तोंडून एक शब्दही निघेना, ती मोठमोठ्यानें हुंदके देऊन रडूं लागली तेव्हां युफ्राशिया तिच्या जवळ बसून म्हणाली—" ताई, असें काय वेड्यासारखें करितेस ? काय झालें तें सांगत नाहींस का ? "

कांहीं वेळानें मेरियाबाई म्हणाल्या—" बलारसला पाठवून, सेनापति साहेबांना ताबडतोब बोलावून आणूं का ? "

थियोडोरा अस्पष्ट स्वरानें म्हणाली—" नको नको, तुम्हांला सर्व हकीगत सांगण्यासाठींच मी मुद्दाम इकडे आलें आहे ! पण त्या आकस्मिक गोष्टीनें मी अगदीं घाबरून गेल्यामुळें इतका वेळ मला बोलतांच येईना ! "

नंतर थियोडोरानें आपल्या दृष्टांताची सर्व हकीगत हळूहळू त्यांना सविस्तर सांगितली. ती ऐकून त्या दोघीही आश्चर्यचकित झाल्या.

मेरियाबाई—" पण बाळ, हें स्वप्न तर नव्हे ना ? "

थियोडोरा—" छे हो, मीच चांगली जागी होऊन उठून बसलें होतें, आणि स्वप्न कसें असेल ? जागेपणीं स्वप्नें कशीं दिसतील ? "

युफ्राशिया—" मग ? आतां पुढें काय करावयाचें ? "

थियोडोरा—" तेंच तर मला कांहीं सुचेना, म्हणून इकडे आलें ! "

मेरियाबाई कांहीं वेळ विचार करून म्हणाल्या—" स्वप्न असो, कीं दृष्टांत असो, भ्रम असो कीं सत्य असो, कांहीं असलें तरी ही एक प्रकारची दैवी सूचना आहे आणि तिचा अवश्य विचार केला पाहिजे ! तथापि पुरुष मंडळींना कळवून, त्यांची सल्ला घेतल्याशिवाय आप-

त्याला ह्या बाबतींत कांहींच ठरवितां येणें शक्य नाहीं ! "

थियोडोरा—" हो ! बलारमला पाठवून त्यांना तावडतोब बोलावून आणिलें पाहिजे ! नाहीं तर एकदां युद्धाचें काम सुरू झालें म्हणजे त्यांना इकडे यावयास क्षणभरही सवड होणार नाहीं ! बहुतकरून सर्व मंडळी अद्यापि दरबारांतच असतील ! "

युफ्रासिया—" ठीक आहे, मी बलारमला तिकडे पाठवून देतें ! "

युफ्रासियानें खालीं जाऊन बलारमला हांक मारली, आणि दरबारच्या दिवाणखान्यांत जाऊन, सेनापतिसाहेबांना थियोडोराताईनीं एक क्षणभर उभाउभीं वरीं येऊन जावयास सांगितलें आहे, अत्यंत महत्वाचें व जरूरीचें काम आहे, असा हळूच निरोप कळविण्यास सांगितलें. त्याप्रमाणें बलारम तत्काळ राजवाड्याकडे धांवत गेला.

ह्या वेळीं सकाळचे सहा वाजले होते शहराच्या बाहेर उत्तरेच्या बाजूला तुर्की छावणीत हजारों आगट्या पेटलेल्या होत्या. दिवसभर हल्ल्याचें काम चालणार असल्यामुळें, शिपाई लोक प्रथम आपल्या पोटापाण्याच्या तजविजीला लागले होते. हजारों बैल व खेचरें यांच्या पाठीवरून व गाड्यांतून आणलेल्या मुरमाचे ढीग उचलून खंदकांत भर घालण्याचें काम शेंकडों मजूरदार रात्रभर करीतच होते सुवर्णशृंगाकडील बाजूला ऐंशी तुर्की जहाजें हल्ल्याच्या तयारीनें बंदराजवळ जय्यत उभीं होतीं. अहमदपाशा व लियॉनाशियस ह्यांनीं रात्रभर मेहनत करून मोर्चे-बंदीचीं सर्व कामें सूर्योदयाच्या आंत पूर्ण केलीं होतीं. शिवाय त्यांनीं तटबंदीला लावण्याकरितां सुमारें दीडशें शिड्याही तयार करून ठेवल्या असून, प्रत्येक शिडीला दोन हमाल, बारा शिपाई व एक नाईक अशी नेमणूक करून दिली होती. सर्व सैनिकांना भरपूर शस्त्रास्त्रें व दारूगोळा पुरविण्यांत आला होता. जहाजांवरील कप्तान, आपापल्या तोफा शहराच्या तटावर रोखून लावण्याच्या कामांत गढून गेले होते. ह्याप्रमाणें तुर्की छावणींत चोहोंकडे धांदल चालली होती.

शहरांतही जिकडे तिकडे धांवपळ चालली होती. अद्यापि पुरतें उजाडलें नव्हतें, तरी तुर्की छावणींतील आगट्यांच्या परिवर्तनानें शहरांत भयंकर व उदासवाणा उजेड पडला होता. त्या आगीच्या प्रकाशांत

मंदिरांचे उंच उंच घुमट विशेषच निस्तेज दिसत होते. स्त्रीपुरुषांचे जमाव वेड्यासारखे इकडून तिकडे धांदलीनें जात येत होते. सर्वांचे चेहरे खिन्न व उदास दिसत होते, त्यामुळें शहरास एक प्रकारची पिशाच्चकळा आल्यासारखें दिसत होतें.

[illegible] हा सर्व देखावा खिन्न अंतःकरणानें पहात पहात, दरबारच्या दिवाणखान्याकडे चालला होता. वाड्यांत येतांच देवडीवर त्याला समजलें कीं, बादशहांची स्वारी सेनापति, प्रधान व इतर मंत्रिमंडळासह नुकतीच प्रार्थनेकरितां सेंट सोफायाच्या मंदिरांत गेली आहे, पण लवकरच परत येईल. तेव्हां [illegible] सेनापतिसाहेबांची वाट पहात देवडीवर बसून रहावें लागलें.

---

## प्रकरण ३२ वें.

## शेवटचा दरबार.



लॉर्ड कांझा, सर एडवर्ड, लॉर्ड मॅन्युअल व कोतवाल कॉनियाटिस हे दरबारांत येऊन बसल्यावर थोड्याच वेळांत इतरही सर्व मंडळी आपापल्या स्थानीं येऊन बसली. नंतर बादशहाही आपल्या सिंहासनावर अधिष्ठित झाले. आजच्या दरबारास शहरांतील सर्व कुलीन व सन्मान्य गृहस्थांस बोलावण्यांत आलें होतें. रोमन साम्राज्यांतील बहुतेक थोर घराण्यांतील श्रीमंत लोक जरी चैनी, दुर्व्यसनी, क्षुद्र, स्वार्थी व स्वाभिमानशून्य बनलेले होते, तथापि आजच्या आणीबाणीच्या प्रसंगानें मात्र त्यांचा अभिमान निराशेच्या धगीनें प्रदीप्त झाला. जयाची तर आशा कोणालाच उरली नव्हती, परंतु शहर तुर्क लोकांच्या स्वाधीन झाल्यावर आपले व आपल्या बायकामुलांचे अनन्वित हाल डोळ्यांनीं पहाण्यापेक्षां मरून जाणेंच अधिक श्रेयस्कर, असा विचार करून, सर्वजण मृत्यूला तोंड देण्यास तयार झाले होते. दरबारांत आज कोणत्याही गोष्टीची सूचना किंवा वाटाघाट व्हावयाची मुळींच

उरलेली नव्हती. कारण विचाराची वेळ केव्हांच निघून गेली होती. ऐहिक सुखदुःखाचा विचार किंवा मरणाची भीति कोणाच्याही चेहऱ्यावर दृग्गोचर होत नव्हती. सर्वांची ऐहिक संसारयात्रा समाप्त झाली असून, ते शांतपणें परलोकाच्या मार्गाला लागले आहेत असें दिसत होतें. कोणाला कशाचीही पर्वा उरलेली नव्हती.

बादशहांची मुद्रा तर ह्या प्रसंगीं विशेषच शांत व गंभीर दिसत होती. तथापि त्यांची तीव्र व चंचल दृष्टि, निस्तेज गाल व थरथरणारे ओंठ ह्यावरून, त्यांच्या अंतःकरणाला किती यातना सोसाव्या लागल्या आहेत व अजूनही आपल्या देशाकरितां कष्ट सोसण्यास आणि प्राणहि समर्पण करण्यास त्यांची किती तयारी आहे हें उघड दिसत होतें.

सर्व मंडळींचे मुजरे झाल्यावर बादशहा उभे राहून गंभीर स्वरानें म्हणाले—" सरदार, मानकरी व मंत्री मित्र हो! हल्लीं आपल्यावर कोणता भयंकर प्रसंग गुदरला आहे, हें सर्वांना माहीतच आहे! त्याचप्रमाणें हा प्रसंग आनंदपर्यवसायी करण्याविषयीं आम्हीं शक्य तितकी खटपट केली, पण दुर्दैवानें तो शोकपर्यवसायीच होणार हेंही उघड दिसत आहे! त्याचप्रमाणें उद्यांचा तुर्कांचा हल्ला आपणास यशस्वी रीतीनें परतवितां येईल, अशी आशा करणेंही निवळ आत्मवंचना होय! ह्या सर्व गोष्टी जरी खऱ्या व निश्चित आहेत, तथापि निराश व नाउमेद होऊन, मुकाट्यानें शहर शत्रूच्या स्वाधीन करणें, म्हणजे रोमन ह्या पवित्र नांवास काळिमा फांसणें व आपल्या महाविख्यात परमपूज्य वाडवडिलांच्या शुद्ध कीर्तीची राखरांगोळी करणें आहे. हें महत्पाप करून अक्षय नरकास जाण्याचें साधन तुम्ही कोणीही पतकरणार नाहीं अशी माझी पूर्ण खात्री आहे! सृष्टिनियमाप्रमाणें प्रत्येक गोष्टीला केव्हां तरी क्षय हा आहेच! त्याप्रमाणें ईश्वरेच्छेनें रोमन साम्राज्याच्या नाशाची वेळ आलेली दिसत आहे! जयापजय आपल्या स्वाधीन नाहींत, त्या गोष्टी ईश्वराधीन आहेत! परंतु आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावून, वाडवडिलांचें व देशाचें नांव राखणें आणि कीर्तिरूपानें अमर होणें हें मात्र आपल्या स्वाधीन आहे! आपल्या अंगांत खेळत असलेलें रक्त हें शुद्ध रोमन रक्त आहे, असें जगाला दाखविण्याची संधि

आलेली आहे! शत्रूला शरण जाऊन, आपलीं बायकामुलें आपल्या हातानें त्यांच्या स्वाधीन करून नामर्द म्हणून घेऊन जगण्यापेक्षां, देशसेवेच्या कामीं अखेरपर्यंत पराक्रम गाजवून, शूर वीर म्हणवून घेऊन, व शेवटीं धारातिर्थी देह समर्पण करून अक्षय कीर्ति व स्वर्ग ह्यांचा लाभ करून घेणें लाखो पटीनें श्रेयस्कर होय, हें कोणीही कबूल करील. आज आपल्यापुढें, शत्रूला जिंकावें कसें, हा प्रश्न नसून, योग्य रीतीनें मरावें कसें, हा प्रश्न आहे, हें लक्षांत ठेवा! उद्यांचीच आपल्याला शेवटची संधि आहे! अपण आपलें कर्तव्य कसें काय बजावतों, हें आपले वाडवडिल स्वर्गांतून पहात राहतील; आपण त्यांना संतुष्ट केलें तर, ते आपलें प्रेमपूर्वक स्वागत करावयास तयारच आहेत! त्यांचा असंतोष केला तर मात्र ते आपल्याला भयंकर शाप दिल्यावांचून कधीं राहणार नाहींत! ह्यासाठीं तो सर्वशक्तिमान् सर्वसाक्षी व सर्वांतर्यामी परमेश्वर आपणां सर्वांना आपलें कर्तव्य योग्य रीतीनें पार पाडण्याचें धैर्य व सामर्थ्य देवो, अशी मी अनन्य भावानें प्रार्थना करितों!"

"सेनापति जस्टीनियन, व इतर फ्रँक, जिनोवी, व्हेनीशियन सरदार मित्र हो, ह्या शहराशीं तुमचा फारसा संबंध नसतां, तुम्ही केवळ आमच्याकरितां, आपापलीं घरेंदारें व आप्त स्वजन सोडून जिवावर उदार होऊन ह्या प्रसंगीं आमच्या मदतीला धांवून आलां, ह्या तुमच्या उपकाराची फेड आतां माझ्या हातून होणें शक्य नाहीं! तथापि तुम्हीं सर्वांनीं धैर्यानें व शौर्यानें आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावलें आहे, व तें ईश्वराच्या दरबारीं रुजू आहे! तो दयासागर राजाधिराज प्रभु तुमच्या सत्कर्मांचें फळ तुम्हांला दिल्यावांचून राहणार नाहीं! ह्या शहराचें संरक्षण होणें शक्य असतें तर, तें तुमच्या साहसानें व चिकाटीनें खचित झालें असतें, अशी माझी खात्री आहे! परंतु ईश्वरी इच्छाच निराळी दिसते, आणि त्याच्या इच्छेला नम्रपणें अनुसरणें हेंच आपलें कर्तव्य आहे!"

" आतां शेवटची एकच गोष्ट सांगावयाची आहे! तुम्हांपैकीं कोणाचाही मीं जाणून बुजून किंवा गैर समजुतीनें कधीं अपमान केला

असेल किंवा कोणाला त्रास दिला असेल; अगर कोणाचें नुकसान केलें असेल, तर त्यांची मी अंतःकरणपूर्वक व पश्चात्तापपूर्वक क्षमा मागतों! कृपा करून माझ्यावरील राग द्वेष सोडून द्यावा, आणि आपला कळकळीचा मित्र व सेवक समजून, मजवर प्रेम ठेवावें एवढीच विनंति आहे!"

बादशहा सर्वांना प्रणाम करून खालीं बसले. त्यानंतर किती वेळ तेथें पूर्ण स्तब्धता होती. सर्वांचीं अंतःकरणें सात्त्विक भावनांनीं भरून आल्यामुळें कोणाच्याच तोंडून एक शब्दही निघेना. सर्वांची दृष्टि बादशहांच्या ठिकाणीं खिळून गेली होती, कांहीं तरी बोलावें असें प्रत्येकाला वाटत होतें, पण काय बोलावें हें कोणालाही सुचेना शेवटीं बादशहाच पुनः गद्गद स्वरानें म्हणाले—"मित्र हो, तुम्हां सर्वांना माझें बोलणें पटलें आहे आणि तुमचें मजवर पूर्ण प्रेम आहे, अशी तुमच्या दृष्टीवरूनच माझी खात्री झाली आहे! प्रत्यक्ष शब्दांनीं तें व्यक्त करण्याची किंवा एकमेकांचे आभार मानण्याची कांहीं आवश्यकता नाहीं; आतां दरबार बरखास्त करून सर्वांनीं परस्परांचे निरोप घेऊन, सेंट सोफायाच्या मंदिरांत प्रार्थनेला यावें, प्रार्थना झाल्यावर सर्वांनीं आपापल्या कामाला लागावें! आतां चार वाजले आहेत, बरोबर पांच वाजतां प्रार्थना सुरू होईल!"

बादशहा उठून आपल्या महालांत गेले. त्यानंतर तेथें जो हृदयद्रावक प्रकार झाला, त्याचें यथातथ्य वर्णन करितां येणें शक्यच नाहीं! जे आजपर्यंत एकमेकांचा द्वेष करीत होते, ते देखील परस्परांना आलिंगन देऊं लागले, एकमेकांची क्षमा मागूं लागले, आणि प्रेमानें अश्रुपूर्ण-दृष्टीनें एकमेकांचा निरोप घेऊं लागले. त्या वेळीं तेथें लहान थोर, वृद्ध तरुण, वरिष्ठ कनिष्ठ इत्यादि कोणताही भेद उरला नाहीं!

सुमारें तासभर ह्याप्रमाणें तेथें करुणरसपूर्ण देखावा चालला होता. नंतर सेंट सोफायाच्या मंदिरांतील घंटा वाजूं लागल्या. त्याबरोबर सर्व मंडळी मंदिराकडे निघाली. बादशहाही आपला दरबारी पोषाख उतरून, विनीत वेषानें प्रमुख मंत्रिमंडळासह मंदिराकडे गेले. थोड्याच वेळांत मंदिर सर्व प्रकारच्या व सर्व दर्जाच्या लोकांनीं अगदीं फुलून

गेलें. आंतील सर्व जागा भरून गेल्यामुळें, पुष्कळ मंडळींना बाहेरच्या पटांगणांतच उभें रहावें लागलें. मुख्य धर्मोपदेशक बरोबर पांच वाजतां व्यासपीठावर येऊन उभे राहिले. सर्व मंडळींनीं त्यांचा पूज्य भावानें सत्कार केला. नंतर त्यांनीं प्रार्थनेला आरंभ केला. ह्या प्रसंगीं मात्र सर्वांचें लक्ष एकाग्रतेनें परमेश्वराकडे लागलें होतें. आजच्या प्रार्थनेंत यशप्राप्तीबद्दल किंवा शत्रुनाशाबद्दल एकही शब्द नसून, सर्वांना आपापलें कर्तव्य करण्याचें धैर्य, वाडवडिलांचें नांव राखण्याची सद्बुद्धि आणि अंतीं सद्गति देण्याविषयीं मागणी होती. धर्माधिकाऱ्यांच्या त्या वेळच्या अंतःकरणपूर्वक चाललेल्या प्रार्थनेचा बहुतेक श्रोत्यांच्या मनांवर सात्विक परिणाम होऊन कित्येकांच्या नेत्रांतून अश्रुवर्षावही होऊं लागला.

ह्याप्रमाणें एक तासभर ईश्वरस्तुति व प्रार्थना झाल्यावर धर्माधिकाऱ्यांनीं सर्वांना आशीर्वाद दिला व ते व्यासपीठावरून खालीं उतरले. नंतर बादशहांनीं पुनः एकदां सर्वांचा प्रेमपूर्वक अखेरचा निरोप घेतला. तेव्हां सर्वांनीं ईश्वराचा, बादशहांचा व रोमन साम्राज्याचा जयजयकार केला. त्या जयघोषानें दशदिशा दणाणून गेल्या. नंतर बादशहा आपल्या परिवारासह राजवाड्याकडे निघून गेल्यावर सर्व मंडळी आपापल्या स्थानीं हळूहळू जाऊं लागली.

---

## प्रकरण ३४ वें.

## भोळी समजूत.



बादशहांना महालापर्यंत पोंचवून, सर एडवर्ड राजवाड्यांतून बाहेर पडतात तोंच बलारम त्यांच्या समोर येऊन, प्रणाम करून उभा राहिला. त्याजकडे चकित दृष्टीनें पहात सर एडवर्ड म्हणाले—" कां रे, बलारम ? ह्या वेळीं इकडे कां आलास ? "

बलारम—" धनीसाहेब, आपल्याकडे अत्यंत महत्वाचें व जरूरीचें काम असल्यामुळें, उभाउभीं घरीं येऊन जावें, अशी ताईसाहेबांची

विनंति आहे!"

सर एडवर्ड—" छे छे, मला आतां क्षणभर देखील सवड नाहीं! आतांच्या आतां माझ्या नेमणुकीच्या ठिकाणीं जाऊन मला सर्व तजवीज करणें भाग आहे!"

बलारम—" पण धनीसाहेब, ताईसाहेब, मेरियाबाई व युफ्राशियाताई पहाटेपासून उठून एके ठिकाणीं बोलत बसल्या आहेत, आणि त्यांनीं मला इतक्या घाईनें आपल्याकडे पाठविलें, ह्यावरून कांहीं तरी विशेष प्रकार घडला असावा, असें वाटतें, ह्याचा विचार करावा!"

सर एडवर्ड कांहीं वेळ आपल्याशींच विचार करून म्हणाले—" बरें तर, तूं पुढें होऊन, मी येतों म्हणून कळीव; तोंपर्यंत मी रिचर्ड बर्स्टोला जरूरीपुरती कांहीं व्यवस्था सांगून येतों!"

बलारम आनंदानें धन्यास प्रणाम करून, तेथून धांवतच घराकडे परत आला. आपली कामगिरी यशस्वी झाल्याबद्दल त्याच्या मनाला मोठें समाधान वाटत होतें.

सर एडवर्ड बर्स्टोला आणून म्हणाले—" रिचर्ड, मी आणखीं पंधरा मिनिटांत फानार वेशीजवळ येतों. तोंपर्यंत तूं एंजीनियर निसीफोरसकडे जाऊन त्यांना तेथें बोलावून घेऊन ये! तेथील तटबंदी अगदींच कम-कुवत आहे असें मला वाटतें. मी तेथें नसलों तर, सेंट पीटर बंदराजवळ असेन, तेथें येऊन मला कळीव! अगदीं वेळ गमावूं नको, घोड्यावरून दवडत जा!"

" हा निघालोंच, धनीसाहेब!" असें म्हणून रिचर्ड बर्स्टो तेथून चालता झाला, आणि सर एडवर्ड गडबडीनें आपल्या बंगल्याकडे आले. दाराशींच बलारम उभा होता. " ताईसाहेब आपल्या महालांतच मेरियाबाईशीं बोलत बसल्या आहेत," असें त्याच्याकडून समजल्या-वरून, सर एडवर्ड एकदम महालाकडे गेले. ते आंत आलेले पाहतांच दोघीही उठून उभ्या राहिल्या.

थियोडोरा पुढें येऊन उत्तेजित स्वरानें म्हणाली—" बरें झालें, आपण सवड करून येथवर आलां, ही ईश्वराची मोठी कृपाच झाली!"

सर एडवर्ड पत्नीचा हात धरून तिच्याकडे पहात म्हणाले—" काय झालें, प्रिये ? तुझ्या चेहऱ्यावरून तूं फार घाबरलेली दिसतेस ! कांहीं विशेष भीतिप्रद गोष्ट घडून आली आहे कीं काय ? सांग, सांग लवकर !"

थियोडोरा—" दुसरें कांहीं नाहीं प्रियकरा, तळघरांत आम्हांला नेऊन ठेवण्याचा बेत रहित करा ! तेथें जाऊन राहणें सुरक्षित नाहीं ! "

सर एडवर्ड चकित दृष्टीनें तिच्याकडे पहात म्हणाले—" तळघरांत राहणें सुरक्षित नाहीं ? तें कां ? "

थियोडोरा—" रात्रीं माझी स्वर्गवासी आई माझ्याजवळ आली होती, आपण जसे आतां माझ्यासमोर उभे आहां, तशीच ती माझ्या जवळ दिसली, तिनें मला त्या ठिकाणीं न जाण्याविषयीं मोठ्या कळ-कळीनें बजावून सांगितलें, आणि ती अंतर्धान पावली !"

सर एडवर्ड हंसून म्हणाले—" लाडके, हें निवळ स्वप्न असावें ! रात्रंदिवस काळजी करीत बसल्यामुळें, तूं अगदीं थकून गेली आहेस ! त्या तळघराचेच विचार तुझ्या डोक्यांत एकसारखे घोळत असतील, आणि अशा संकटसमयीं आईची आठवण होणेंही साहजिक आहे, ह्या दोन्ही गोष्टी एकत्र होऊन तुझ्या कल्पनेनें तें दृश्य उत्पन्न केलें ! त्यांत कांहीं अर्थ नाहीं ! "

थियोडोरा करुण स्वरानें म्हणाली—" छे छे, नाथ. तो भ्रम किंवा स्वप्नांतील भास मुळींच नव्हता ! अजून माझ्या आईची ती मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें दिसत आहे ! अजून तिचे खोल शब्द माझ्या कानांत गुण-गुणत आहेत ! तळघराबद्दलचा आपला विचार मला पूर्ण पसंत होता, त्याच्याविरुद्ध माझ्या मनांत यत्किंचितही कल्पना केव्हां आली नाहीं, असें असतां, अगदीं विरुद्ध स्वप्न तरी कसें पडेल ? मला वाटतें, ही कांहीं तरी दैवी सूचना आहे, आणि तिचा आपण विचार केला पाहिजे; नाहीं तर मागाहून पश्चात्तापास कारण होईल ! "

सर एडवर्डना मोठी पंचाईत पडली. कांहीं वेळ विचार करून ते म्हणाले—" लाडके, हा निवळ भ्रम आहे अशी जरी माझी खात्री आहे, तथापि तुझ्या संतोषाकरितां, मीं शक्य असतें तर, दुसरी तजवीज अवश्य केली असती. पण आतां तसें करण्यास सवड आहे का, ह्याचा

तूंच विचार कर! ठरलेला बेत बदलून नवा ठरवावयाचा म्हणजे, तुझ्या वडिलांना, कोतवालांना व रिचर्ड बर्स्टोला प्रथम बोलावून आणिलें पाहिजे आणि दुसरी कोणती तजवीज ठरवावयाची, ह्याचा विचार केला पाहिजे! पण ते ह्या वेळीं कोठें सांपडणार? आणि सांपडले तरी, त्यांना आपापलीं कामें सोडून इकडे यावयास सवड कशी होणार? आणि मला तरी आपलें काम सोडून, येथें किती वेळ थांबतां येणार? आतां लढा केव्हां सुरू होईल, ह्याचा कांहीं नियम नाहीं! अशा स्थितींत आम्ही आपापल्या कामावर हजर नसलों तर, बादशाहा काय म्हणतील? आणि एकदां युद्धाची घाई सुरू झाली म्हणजे कोणाचा कोणाला पत्ता सुद्धां लागणार नाहीं, सल्लामसलती बोलावयास फुरसद कोठून होणार? बरें, मीं एकट्यानेंच ठरलेली व्यवस्था बदलावी तर, बाकीच्यांना ती बरोबर कळणार नाहीं, आणि कदाचित् पसंतही पडणार नाहीं! ह्याप्रमाणें आयत्या वेळीं सगळाच गोंधळ उडून जाईल! त्यापेक्षां ठरली आहे तीच तजवीज, कांहीं असलें तरी, अमलांत आणणें भाग आहे; त्याशिवाय आतां दुसरा इलाज नाहीं!"

थियोडोराला ह्यावर कांहींच बोलतां येईना. तिनें विचार करून पाहिला; पण तिला कांहीं तोड सुचेना. तेव्हां तिनें मेरियाबाईकडे वळून पाहिलें. तिचा उद्देश ओळखून मेरियाबाई गंभीर स्वरानें म्हणाल्या, "ताई तुझा हट्ट खरा असला तरी, सेनापतिसाहेब म्हणतात तें अगदीं बरोबर आहे! अशा ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं ते तरी काय करूं शकणार? आणि पुरुषमंडळींची व आमची जर चुकामूक झाली, तर आपला बचाव होण्याची आशाच नको! ह्यासाठीं ईश्वरावर भरंवसा टाकून, आलेल्या प्रसंगाला तोंड देणें भाग आहे! त्याची कृपा असली म्हणजे सर्व संकटें आपोआप दूर होतात!"

थियोडोराचीही समजूत पटली. ती पतीकडे वळून नम्रस्वरानें म्हणाली "बरें तर, नाइलाज झाल्यावर काय करावयाचें!; परमेश्वरावर माझा पूर्ण भार आहे, तसाच आपल्यावरही आहे! आपल्या आज्ञेबाहेर वागण्याचा विचार देखील माझ्या मनांत येणार नाहीं!"

पत्नीची समजूत पडलेली पाहून सर एडवर्डच्या मनालाही समाधान

वाटलें. नंतर त्या दोघींचाही निरोप घेऊन ते गडबडीनें तेथून चालते झाले. सर एडवर्ड तटावर आले तों नुकताच सूर्योदय होत होता. आकाश निरभ्र असल्यामुळें चोहोंकडे स्वच्छ प्रकाश पडला होता. सर एडवर्ड तटावरून व्यवस्था पहात पहात सेंट पीटर बंदराकडे जात होते, तोंच बादशहा व लॉर्ड फ्रांझा समोरून येत असलेले दिसले.

सर एडवर्डचा प्रणाम स्वीकारून बादशहा म्हणाले—" हा हा ! सेनापति, तुम्हीच ह्या कामाला योग्य आहां ! धर्माधिकारी जेनेडियस आपल्या मठापुढें लोक जमवून सांगत आहे कीं, आपल्या लष्कराचा पराभव होऊन, तुर्क शहरांत शिरणार, आणि ते सेंट सोफायाचे मंदिराजवळ आले कीं, ईश्वर त्यांचें शासन करणार ! ह्या त्याच्या उपदेशानें भोळ्या लोकांना असें वाटूं लागलें आहे कीं, आपल्या सैन्याचा जितका लवकर मोड होईल तितका बराच म्हणजे आपण लवकर ह्या संकटांतून मुक्त होऊं ! ह्या वेड्या समजुतीमुळें हे खुळे लोक मदतीला येत नाहींत, आणि इतरांनाही येऊं देत नाहींत ! तेव्हां तुम्ही आतांच्या आतां जाऊन जेनेडियसला त्याच्या मठांत पाठवून द्या आणि तो पुनः मठाच्या बाहेर न येईल, असा बंदोबस्त ठेवा, म्हणजे लोक तेथून आपोआपच निघून जातील ! "

सर एडवर्ड—" आज्ञा सरकार; मी तिकडचा बंदोबस्त करितों ! तोंपर्यंत प्रधानसाहेबांना फानार वेशीकडे पाठवून द्यावें. तेथील तटबंदी अगदींच कमकुवत असल्यामुळें, शक्य तितकी दुरुस्ती तातडीनें करून घेण्यासाठीं मी एंजीनियरास बोलावलें आहे ! "

लॉर्ड फ्रांझा—" ठीक आहे, मी तिकडे निघालोंच ! पण तुम्ही ह्या कामाला अगदीं विलंब करूं नका ! कारण, त्याचा परिणाम भयंकर होईल ! "

सर एडवर्ड प्रणाम करून निघून गेल्यावर बादशहा म्हणाले—" चला तर, मीही फानार वेशीकडेच येतों ! तें ठिकाण फारच महत्त्वाचें असल्यामुळें त्याच्याकडे दुर्लक्ष करून उपयोग नाहीं ! "

दोघेही फानार वेशीकडे निघाले, इतक्यांत रिचर्ड वस्टों गडबडीनें धांवत येऊन प्रणाम करून म्हणाला—" सरकार, आणखी एक चिठी

कबूतराच्या गळ्यांतून आली आहे, ती मी घेऊन आलों आहे, ही पहावी!"

बादशहा ती चिठी घेऊन दोरी सोडीत म्हणाले—" हीदेखील तुर्की छावणींतूनच आलेली दिसते ! सुलतानानें आपला बेत बदलला कीं काय, कोण जाणें ! "

ती चिठी उघडून बादशहांनीं वाचून पाहिली. तींत पुढील मजकूर होताः—" शहर काबीज झाल्यावर तीन दिवसपर्यंत वाटेल तितकी लूट करण्यास, सुलतानानें आपल्या सर्व सैन्यास सरास परवानगी दिली आहे ! फक्त सरकारी व सार्वजनिक मालमत्तेला मात्र धक्का लावावयाचा नाहीं, एवढीच त्यांत अट आहे ! प्रथम जो कोणी शहराच्या तटावर तुर्की निशाण लावील, त्याला मोठी जहागीर व शहरची कोतवाली देण्याचें सुलतानांनीं अभिवचन दिलें आहे ! शहरवासियांनीं सावध होऊन, शक्य ती बचावाची तजवीज करावी, ह्या हेतूनें ही सूचना पाठविली आहे ! "

बादशहांनीं ती चिठी लॉर्ड फ्रांझांच्या हातीं देऊन, मोठ्यानें वाचावयास सांगितलें. त्याप्रमाणें ती वाचल्यावर, ते म्हणाले—" सरकार, ही बातमी तावडतोब चोहोंकडे प्रसिद्ध केली पाहिजे, म्हणजे लोकांना कांहीं चीड आली तर येईल ! "

बादशहा—" हो ! प्रयत्न करून पाहूं ! रिचर्ड, शहरांतील सर्व चौक्यांवरून ही बातमी आतांच्या आतांच पाठविण्याची तजवीज करा, म्हणजे सर्व लोकांत ती तत्काळ प्रसिद्ध होईल ! लोकांना आपल्या घरादारांची काळजी असेल, व आपल्या बायकामुलींच्या अब्रूची चाड असेल, तर अद्यापि आम्हांला योग्य मदत करण्याची त्यांना हुरूप येईल ! आणि तसें झालें तर अजून देखील उपयोग होण्याचा संभव आहे ! "

रिचर्ड प्रणाम करून निघून गेल्यावर, बादशहा व लॉर्ड फ्रांझ फानार वेशीकडे चालते झाले.

प्रकरण ३९ वें.

## शेवटचा हल्ला.



सूर्योदयाबरोबर तुर्की लष्करांत जोराची गडबड व हालचाल सुरू झाली. तोफखान्यावरील गोलंदाज आपापल्या मोर्चावर येऊं लागले, स्वारांचीं पथकें आपापल्या सिसलीनें उभीं राहिलीं. पायदळ लष्करें तटाखालीं पण माऱ्याच्या बाहेर हल्ल्याच्या तयारीनें जमूं लागलीं, निरनिराळ्या ठिकाणचे सेनापति आपल्या सैन्याच्या व्यूहरचनेच्या गडबडीस लागले, अशी जिकडे तिकडे एकच धांदल उडून राहिली.

ह्या तुर्की सैन्यांत—बल्गेरियन शिपाई, थेसअरेबियांतील सैनिक, अझोफच्या समुद्रांतील कोळी, डाल्माशियांतील रानटी लोक, बोसनियांतील बाजारबुणगे, आर्मीनियांतील बारगीर, वालेशियांतील वीर, आरब सांडणीस्वार व आनाटोलियांतील ऐटबाज शिलेदार, असे अनेक प्रकारचे लोक असून, शहाराच्या उत्तरेच्या बाजूला त्यांचा पूर्णपणें वेढा पडलेला दिसत होता. नानाप्रकारचीं रणवाद्यें वाजत होतीं, घोडे खिंकाळत होते, आणि लष्करी हुकमांचीं शिगेंही मधून मधून कर्णकठोर आरोळ्या टोकींत होती. ह्या मिश्रध्वनीनें चोहोंकडे एक प्रकारचा गंभीर पण अस्पष्ट गोंगाट माजून राहिला होता.

रोमन तटबंदीवरही ख्रिश्चन लष्कराची अशीच धांदल सुरू होती. ह्या लष्करांत ग्रीक, व्हारीजयन, फ्रांक, बाव्हेरियन जिनोवी इतक्या प्रकारचे लोक होते. प्रत्येक पथकाचे सेनानायक आपापल्या तुकड्या व्यवस्थेनें उभ्या करण्यांत व त्यांना आवश्यक सूचना देण्यांत गुंतले होते; तोफखान्यावरील गोलंदाज आपापल्या तोफा माऱ्याच्या जागीं रोखून ठेवण्याच्या धांदलींत होते; दारुगोळ्यांच्या गाड्या उतरून घेऊन, युद्ध सामग्री सुरक्षित रीतीनें सांठवून ठेवण्याच्या कामीं त्या खात्याचे कामगार गढून गेले होते, एंजीनियर लोक कोठें कांहीं हरकत किंवा अडचण आल्यास ती दूर करण्यासाठीं आपापल्या कामकरी लोकांसह धांवपळ

करीत होते; आणि तटबंदीवरील रणवाद्यें, मंदिरांतील घंटानाद व लष्करी सूचनांचीं शिंगुलें यांचा मिश्र ध्वनि आकाशांत भरून राहिला होता.

शहराच्या पूर्व बाजूला सुवर्णशृंग बंदराजवळ तुर्की जहाजांची रांगची रांग हल्ल्याच्या तयारीनें उभी होती; त्यांजवरील तोफा तटावर रोखून ठेवलेल्या होत्या; दारूगोळे पुरविण्याची गडबड चाललेली होती. शेजारच्या तुर्की कोठारांतून युद्धसामग्री भरून घेऊन ती प्रत्येक जहाजावर नेऊन पोंचविण्याचें काम लहान लहान होड्या करीत होत्या. त्या बाजूच्या तुर्की छावणीपुढें, तटावर चढण्यासाठीं तयार केलेल्या उंच उंच शिड्यांचे ढीगचे ढीग पडलेले होते. तुर्की जहाजांच्या समोर कांहीं अंतरावर रोमन आरमाराचीं ग्रीक व जिनोवी जहाजेंही आपापल्या तयारीनें उभीं होतीं.

सूर्योदयाचे वेळीं बादशहा सेंट रोमॅनसच्या बुरजावर उभे होते. त्यांच्या अंगावर ह्या वेळीं लष्करी पोषाख होता. त्यांच्या मागें सर एडवर्ड व कोतवाल कॉन्स्टॅटस आदबीनें उभे होते. सर्वांचे पोषाख त्यांच्या त्यांच्या लष्करी हुद्यांचे दर्शक होते. उगवत्या सूर्याकडे पाहून बादशहा म्हणाले—" हं, मित्र हो, आतां आपापल्या मिसलीवर जाऊन हजर रहा ! हल्ला लवकर सुरू होईल असें वाटतें ! ईश्वर तुमचें संरक्षण करो ! "

सर एडवर्ड व कोतवाल, बादशहांना प्रणाम करून तेथून निघाले इतक्यांत तुर्की छावणीच्या मध्यभागीं असलेलें चंद्रांकित उंच निशाण कोमल सूर्य किरणांत फडकूं लागलें. ती खूण मिळतांच चोहोंकडे एकदम दंगल उडाली, आणि सर्व बाजूंनीं तुर्की लष्कर शहरावर चाल करून येऊं लागलें. जहाजांवरील व जमिनीवरील तोफांचा एकदम धडाका सुरू झाला. धुराचे लोटच्या लोट दशदिशा धुंद करूं लागले. गोळ्यांचा व बाणांचा वर्षाव होऊं लागला. इकडे रोमन सैन्यानेंही आपला तीनही ठिकाणचा तोफखाना एकदम सुरू केला. चाल करून येणाऱ्या पुढील रांगांतील शिपाई पटापट मरून खंदकांत पडूं लागले. बाण, गोळ्या व गोफणगुंडे ह्यांचा मारा तटावरून चांगला होत असल्यामुळें, थोड्याच वेळांत तुर्की लष्कराच्या पुढील रांगांतील शिपायांच्या प्रेतांनीं ठिकठिकाणीं खंदक भरून येऊं लागले.

लोकांच्या दंग्याला व आरडाओरडीला तर सीमाच उरली नाहीं. सेनापतीचे हुकमांचे शब्द, सैनिकांच्या रागाच्या आरोळ्या, जखमी लोकांच्या किंकाळ्या, कामकऱ्यांच्या शिव्यागाळी, आणि त्यांतच कोठें मारा साधला म्हणजे होणारा जयघोष, ह्यांच्या योगानें जिवंत माणसांच्या तर कानठळ्याच बसून गेल्या, पण मेलेलीं माणसें देखील दचकून उठतील कीं काय, असें वाटूं लागलें.

सुवर्णशृंगाच्या बाजूची झटापट तर एकदम हातघाईवरच आली. शेंकडों तुर्की सैनिक झपाट्यानें तटाजवळ येऊन एकदम तटाला शिड्या लावून वर चढण्याचा प्रयत्न करूं लागले. जहागिरीच्या लोभानें व कोतवालीच्या आशेनें, त्यांना आपल्या प्राणांचीही पर्वा वाटेनाशी झाली. परंतु सर एडवर्डच्या हाताखालील व्हेरंजियन सैनिक त्यांचें कांहीं न चालूं देतां शूरपणानें बचाव करीत होते. कित्येक शिड्याखालीं लोटून देत होते तर कित्येक वर चढून येणाऱ्या सैनिकांचे एका घावासरशीं दोन तुकडे करून पाडीत होते.

इतक्यांत तुर्की लोकांना पुनः पुनः शिडया लावून उत्तेजन देत असलेला लियॉनशियस सर एडवर्डच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर शेजारच्या गोलंदाजाकडे वळून तो म्हणाला—" त्या हरामखोर लियॉनशियसवर नेम मार पाहूं !

गोलंदाज—" होय साहेब, मी त्याच प्रयत्नांत आहें. पण तो बदमाष क्षणभर देखील एके ठिकाणीं ठरत नाहीं! विजेप्रमाणें एकसारखा इकडे तिकडे धावतो आहे, त्यामुळें माझा अद्यापि इलाज चालत नाहीं ! तरी पण पुनः खटपट करून पाहतों !

तिकडे अहमदपाशा आपल्या सैनिकांना तटावरील रोमनशिपायांवर बाणांचा व गोळ्यांचा जोराचा मारा करावयास उत्तेजन देतच होता. त्याचप्रमाणें तुर्की गोलंदाजांनीं तटावर एकाच ठिकाणीं एकसारखा तोफांचा भडीमार चालविला होता.

लियॉनशियस कामकऱ्यांना ओरडून म्हणाला—" एका शिडीवर उभें राहून दुसरी शिडी खिळे ठोकून तटाला पक्की बसवा. म्हणजे ती खालीं पडणार नाहीं. "

कामकरी लोक त्याप्रमाणें तजविजीला लागले, तोंच तटावरील रोमन सैनिकांनीं त्यांच्या अंगावर मोठमोठे धोंडे लोटून दिले, त्यामुळे ते शिडी-सुद्धां कोसळून खालीं पडले, आणि एकच गोंधळ उडाला.

अहमदपाशा त्यांना पुनः उत्तेजन देऊन म्हणाला--" दोस्त हो, पुन्हा प्रयत्न करा ! जो प्रथम तटावर निशाण लावील, त्याला मोठी जहागीर मिळावयाची आहे, हें लक्षांत ठेवा ! "

पुनः एकदम दहा वीस शिड्या लावण्यांत आल्या व तुर्की शिपाई मोठ्या धाडसानें त्यावर चढूं लागले. तितक्याही ठिकाणीं रोमन सैनिक त्यांचा जोरानें प्रतिकार करीत होते, इतक्यांत एके ठिकाणीं एक तुर्की अंमलदार छाती करून तटावर चढला, पण त्याला एका रोमन कामगारानें मिठी घालून तेथेंच धरलें. दोघांची कुस्ती सुरू झाली. तुर्की अंमलदार दांडगा असल्यामुळें, त्यानें थोड्याच वेळांत रोमन कामगाराला दूर लोटून दिलें, पण त्या चपळ रोमन वीरानें आपला तोल संभाळून पुनः त्यांच्यावर चाल केली, आणि आपल्या खंजीराचा त्याच्या छातीवर असा जोराचा व सफाईचा वार केला कीं, त्याबरोबर तो तुर्की अंमलदार एक किंकाळी ठोकून एकदम तटाखालीं कोसळला. सुवर्णशृंगाजवळ अशा प्रकारच्या हातघाईच्या झटापटी किती तरी चालू होत्या.

---

## प्रकरण ३६ वें.

## हल्ल्याचें पूर्वरूप.



सर एडवर्ड बाहेर गेल्यावर, थियोडोरा, युफ्राशिया व मेरियाबाई ह्या तिघीही दिवाणखान्यांत एके ठिकाणींच बोलत बसल्या होत्या. आजच्या हल्ल्यासंबंधानेंच त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या; इतक्यांत, तुर्की लष्कर तीन दिवस लूट करणार, ही बातमी बलारमनें सांगितली. ती ऐकून त्यांना फार वाईट वाटलें. दुर्दैवानें शहर तुर्कांच्या हातीं पडलें तर, येथील बायकांमुलांचे किती हाल होतील आणि त्यांच्यावर कसे अनन्वित

अत्याचार होतील, ह्याविषयींच त्यांचे विचार सुरू झाले.

कांहीं वेळानें तोफांचे आवाज ऐकूं येऊं लागले, त्यावरून युद्धाला सुरुवात झाली, असें त्यांना कळून आलें. तत्काळ त्या तिघींनींही आपापल्या प्रिय जनांना सुरक्षित राखण्याविषयीं परमेश्वराची अनन्यभावानें प्रार्थना केली. तोफांचे आवाज, बंदुकांचे बार व लोकांचा गोंगाट ह्यांचा एवढा भयंकर ध्वनि दुमदुमूं लागला कीं, त्यामुळें त्यांचीं डोकीं धुंद होऊन गेलीं. थोड्या वेळानें लढाईची बातमी घेऊन येण्यासाठीं त्यांनीं बलारमला पाठविलें, पण रस्त्यांत इतकी गर्दी झाली होती कीं, बिचाऱ्या बलारमचा प्रवेश तटापर्यंत होणें अशक्य होऊन गेलें. त्यामुळें जवळपासचे लोक काय सांगतील तेवढीच ऐकीव बातमी मिळवून त्याला घराकडे परत येणें भाग पडलें. पण तसल्या अर्धवट बातमीनें थियोडोराचें समाधान होईना. शेवटीं दहा वाजण्याच्या सुमारास लॉर्ड मॅन्युअल घाईघाईनें दिवाणखान्यांत आले. त्यांच्या उत्तेजित चेहऱ्यावरून ते आनंदाची खबर घेऊन आले असावे, अशी तिघींचीही समजूत झाली.

युफ्रोशिया धांवत पुढें येऊन म्हणाली—" काय, प्रियकरा, काय बातमी आहे ? "

लॉर्ड मॅन्युअल—" ईश्वराच्या कृपेनें आतांपर्यंत तरी सर्व ठीक आहे! तुर्कांचा हल्ला मात्र जबरदस्त आहे! तथापि जितक्या ठिकाणीं त्यांनीं जोरानें चढाई केली, तितक्या सर्व ठिकाणीं आमच्या शूर वीरांनीं मागें हटविलें ! त्यांना एक पाऊलही पुढें सरकूं दिलें नाहीं ! विशेषतः सेंट रोमॅनस बुरुजावर त्यांचा फार जोराचा मारा होता, पण सेनापति जस्टीनियन व स्वतः बादशहा ह्यांनीं तेथें अद्यापपर्यंत शत्रूचें कांहीं चालूं दिलें नाहीं! सिलिव्हरी वेशींत कोतवाल कॉनियॅटिसनीं तुर्कांना जेथल्या तेथेंच थोपवून धरलें आहे ! बंदराकडील बाजूला मात्र सर एडवर्डनीं पराक्रमाची कमाल केली, म्हणून अजूनपर्यंत बचाव झाला आहे ! "

थियोडोरा—आपली सर्व मंडळी सुखरूप आहेत ना ? "

लॉर्ड मॅन्युअल—" होय ! ईश्वरकृपेनें सर्व जण अजूनपर्यंत सुरक्षित आहेत ! कोतवाल व सर एडवर्ड ह्यांना मी समक्षच भेटून आलों ! लॉर्ड फ्रांझांना तर तूर्त मुळींच भीति नाहीं. कारण, बादशहांनीं त्यांना

दुसऱ्या एका कामगिरीवर पाठविलें असल्यामुळें, ते ह्या हाणामारीच्या वेळींत नाहींतच !"

मेरियाबाई—"तर मग अजून देखील आपला जय होण्याचा संभव आहे म्हणावयाचा !"

लॉर्ड मॅन्युअल—"हो, ईश्वरकृपेनें अशीच परिस्थिति अखेरपर्यंत टिकून राहिली तर, आपला जय होईल, निदान तूर्त बचाव तरी होईल अशी आशा आहे ! काय ह्या वेळीं एकेकाला आपल्या धर्माकरितां, देशाकरितां व बादशहांकरितां शौर्य, धैर्य व कौशल्य दाखविण्याची अमोल संधि प्राप्त झाली आहे, पण मला मात्र दुर्दैवानें मागें मागें राहावें लागत आहे, इलाज नाहीं !"

सुफासिया—"पण आमचें संरक्षण करण्याची आणि लढाईच्या बातम्या वरचेवर आणण्याची कामगिरी कांहीं कमी महत्वाची नाहीं ! देवाच्या दयेनें आपला त्या संकटांतून प्राण वांचला. आणि योग्य शुश्रूषा झाली, म्हणून आज इतपत तरी अंगांत शक्ति आली आहे ! आठ पंधरा दिवसांपूर्वींपर्यंत आम्हाला इतकी देखील खात्री वाटत नव्हती."

ह्याप्रमाणें ती मंडळी सुमारें अर्धा तास बोलत बसली. त्या अवधींत तोफांचे आवाज व गोंगाट एकसारखा चाललाच होता. लॉर्ड मॅन्युअलला जरी युद्धाच्या कामांत प्रत्यक्ष सामील होतां येणें शक्य नव्हतें, तरी रणक्षेत्रावर गेल्यावांचून त्यांना चैन पडेना. म्हणून ते सर्वांचा निरोप घेऊन पुनः तटबंदीकडे निघून गेले.

तुर्कांकडील हल्ल्याचें काम आतां चोहोंकडे अगदीं जोरांत चाललें होतें. विशेषतः सुवर्णशृंगाकडील बाजूला तर त्यांचा अधिकच जोराचा मारा चालू होता. तथापि रोमन सैनिकांनीं त्यांना कोणत्याही ठिकाणीं एक पाऊलभर देखील पुढें सरकूं दिलें नव्हतें. लॉर्ड मॅन्युअल सिलिव्हरी वेशीकडे प्रथम आले, तों त्यांना त्या बाजूला शत्रूची हालचाल थोडी मंदावलेली दिसली.

थोडयाच वेळांत रिचर्ड बर्टो त्यांना भेटला. तेव्हां ते त्याला हाक मारून म्हणाले—"कसें काय रिचर्ड, काय खबर आहे ?"

रिचर्ड—"सरदारसाहेब, आतांपर्यंतची खबर एकंदरींत समाधान-

कारक आहे; पण एक गोष्ट मात्र अनिष्ट झालेली माझ्या नजरेस येत आहे ! "

लॉर्ड मॅन्युअल—" ती कोणती ? शत्रु कोठें आंत घुसलेली की काय ! "

रिचर्ड—" छे छे, तसें कांहीं अद्यापपर्यंत कोठें झालेलें नाहीं ! पण सकाळपासून दोनदां दोन ठिकाणीं ओरोमिस माझ्या दृष्टीस पडला, आणि प्रत्येक वेळीं लियॉनरियस त्याच्या बरोबर होता ! त्या दोघांचें कांहीं तरी नीच खलबत चाललें असावें, असें वाटतें ! "

लॉर्ड मॅन्युअल सचिंत होऊन म्हणाले—" तो काय करील असें तुला वाटतें ? "

रिचर्ड—" अमुकच करील असें कांहीं सांगतां येत नाहीं, तथापि इकडच्या कांहीं गुप्त बातम्या व तटबंदीची अंतर्गत माहिती सांगून, तो आमच्या शक्य तितका विश्वासघात करावयास कमी करणार नाहीं ! "

इतक्यांत तुर्की सैन्यांत पुनः जोराची हालचाल सुरू झाली, ती दृष्टीस पडतांच रिचर्डनें आपल्या लोकांना सावध राहण्याविषयीं ओरडून सूचना दिली. लवकरच लढाईचें काम पुनः जोरांत सुरू झालें. रिचर्ड पुनः आपल्या कामाच्या नादाला लागला.

लॉर्ड मॅन्युअल पुनः त्याला हांक मारून म्हणाले—" रिचर्ड, आणखी एक गोष्ट तुला विचारतों ! ह्या ओरोमिस संबंधानें मला कांहीं तजवीज करतां येणें शक्य आहे का ? "

रिचर्ड—" आपण प्रधानसाहेबांच्या वाड्यांत जाऊन, ओरोमिस काल केव्हांपर्यंत वाड्यांत होता आणि कोठें काय करीत होता, ह्याचा बारकाईनें तपास केला तर, कांहीं तरी विशेष माहिती मिळेल व त्यावरून त्याचा उद्देश कदाचित् समजून येईल, असें वाटतें ! "

लॉर्ड मॅन्युअलनीं त्याप्रमाणें तपास करण्याचें कबूल केलें व रिचर्ड आपल्या कामाच्या धांदलींत गढून गेला. नंतर मॅन्युअलनीं असा विचार केला कीं, अगोदर एकदां सर्व तटावरून फिरून सर्व ठिकाणची परिस्थिति स्वतः नजरेनें पहावी आणि नंतर प्रधानसाहेबांच्या वाड्याकडे जावें. त्याप्रमाणें ते तटावरून युद्धचमत्कार पहात पुढें निघाले.

कांहीं वेळानें लॉर्ड मॅन्युअल सुवर्णशृंगाच्या बाजूला आले, तों तेथें

सर एडवर्ड हल्ल्याच्या प्रतिकाराच्या कामांत अगदीं गढून गेलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांचा आवाज ओरडून ओरडून घोगरा होऊन गेला होता, आणि एकसारखी धांवाधांव चालली असल्यामुळें ते अगदीं घामाघुम होऊन गेले होते, तथापि त्यांचा उत्साह यत्किंचितही कमी झालेला दिसत नव्हता.

लॉर्ड मॅन्युअल त्यांच्या जवळ जाऊन म्हणाले—" कसें काय चाललें आहे, सेनापतिसाहेब ? "

सर एडवर्ड—" कांहीं इलाज नाहीं बुवा ! तुर्कांच्या संख्याबला-पुढें आमचें कांहीं चालेनासें झालें ! त्यांना आपल्या लोकांच्या प्राण-हानीची मुळींच पर्वा दिसत नाहीं, आणि त्यांची चिकाटीही दांडगी आहे ! आम्हीं किती वेळां त्यांच्या शिड्या उलथून पाडल्या, पण त्यांचा प्रयत्न एकसारखा चालू आहे ! शेवटीं कांहीं ठिकाणीं त्यांनीं शिड्या पक्क्याही केल्या ! त्यामुळें आतां हातघाईवर प्रसंग येणार ! "

लॉर्ड मॅन्युअलनीं पुढें जाऊन पाहिलें, तो तीन चार ठिकाणीं तुर्कांनीं उंच उंच शिड्या तटबंदीशीं भक्कम खिळ्यांनीं पक्क्या उभ्या केलेल्या त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्यावरून कित्येक तुर्क लोक वर चढ-ण्याची खटपट करीत होते, व रोमन सैनिक त्यांचा शक्य तितका प्रति-कारच करीत होते. अहमदपाशा व लियॉनशियस आपल्या लोकांना केव्हां धमक्या व केव्हां उत्तेजन देतच होते. इतक्यांत रोमन शिपा-यांनीं एक मोठी धोंड तटावरून एका शिडीवर लोटून दिली, त्याबरोबर ती शिडी मोडून कोसळली, आणि तिजवरून चढत असलेले कित्येक शिपाई खालीं पडले- त्यांपैकीं कांहीं तत्काळ मेले व कांहीं जायबंदी झाले, परंतु तितक्यांत आणखी दोन ठिकाणीं नवीन दोन शिड्या उभ्या केलेल्या दृष्टीस पडूं लागल्या.

सर एडवर्ड त्या नव्या शिड्या लॉर्ड मॅन्युअलना दाखवून म्हणाले—" हें पाहिलें, सरदारसाहेब ? त्यांच्या संख्याबळावर त्यांना ह्या गोष्टी वेळा-शक करितां येतात, तेथें आमचे मूठभर लोक कोठवर निभावणार ? तथापि आम्ही अखेरपर्यंत होईल तितकी खटपट करण्यास कसूर करणार नाहीं ! "

लॉर्ड मॅन्युअल—" त्याविषयीं सर्वांची खात्री आहे. बरें, मी सर्व ठिकाणीं फिरून कोठें कांहीं लोक तुमच्या मदतीला पाठविण्यासारखे रिकामे होणें शक्य आहे कीं काय तें पाहतों !"

लॉर्ड मॅन्युअल तेथून सेंट रोमॅनसच्या बुरजावर आले. तेथें तर युद्धाची अगदीं धुमश्चक्री उडालेली त्यांच्या दृष्टीस पडली. खंदकापलीकडे जितकी लांब नजर पोंचेल, तितक्या दूरवर तुर्की सैन्यसागर पसरलेला दिसत होता. धुरानें व धुरळयानें दिशा इतक्या व्यापून गेल्या होत्या कीं, सैनिकांचीं तोंडेंही स्पष्ट दिसत नव्हतीं. तुर्की तोफखान्याचा धडाका बुरजावर एकसारखा सुरू असल्यामुळें, वरचेवर दगड मातीं कोसळून पडत होती, आणि तटावरील तोफांच्या माऱ्यानें व बाणांच्या गोळ्यांच्या वर्षावानें तुर्की सैनिक एकसारखे पटापट मृत्युमुखी पडत होते, त्यांच्या प्रेतांनीं व दगड मातीनें तेथील खंदक बहुतेक भरून आला होता. तथापि तुर्की लष्कराचा जोर लेशभरही कमी झालेला दिसत नव्हता ! मेलेल्या सैनिकांच्या जागा दुसरे शिपाई तत्काळ भरून काढीत होते खुद्द सुलतानसाहेब आपल्या सफेत घोड्यावर स्वार होऊन, आपल्या राखीव तुकडीसह एका बाजूला उभे होते, व ते स्वतः आणि मुख्य सेनापति कालीलपाशा आपल्या लोकांना एकसारखे उत्तेजन देत होते.

लॉर्ड मॅन्युअल हा सर्व प्रकार चकित व चिंतित दृष्टीनें पहात उभे होते, इतक्यांत बादशहा समोरून येत असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांना प्रणाम करून लॉर्ड मॅन्युअल नम्र स्वरानें म्हणाले—" सरकारस्वारी क्षेम आहे ना ?"

बादशहा—" हो, शरीरानें अजूनपर्यंत क्षेम आहे, पण मन तितकें स्वस्थ राहणें शक्य नाहीं, हें तुम्हांला दिसतच आहे ! तुर्की लष्कर किती चिकाटीनें व बेदरकारपणें लढत आहे हें तुम्ही पहातच आहां ! त्यांच्या सैतानी जोरापुढें आमचा फार वेळ निभाव लागेलसें दिसत नाहीं !"

लॉर्ड मॅन्युअल—" पण आपले शूर सैनिकही तितक्याच धाडसानें व दृढ निश्चयानें शत्रूचा प्रतिकार करीत आहेत !"

बादशहा—" होय, त्याबद्दल मुळींच शंका नाहीं ! आजचा आमच्या लोकांचा पराक्रम पाहून मी देखील चकित होऊन गेलों आहें ! त्यांना

बक्षिसें द्यावयास आतां सवड असती तर, मी आपल्या सगळ्या जामदार-खान्या त्यांना मोठ्या खुषीनें वाहून देऊन, वर त्यांचे आभारही मानले असते! पण उपयोग काय? तुर्कांच्या सैन्याचलापुढें आमचें कांहीं चालत नाहीं!"

इतक्यांत एका ठिकाणीं धुरक्यांचा बराच मोठा भाग धडधड ढांसळ-ल्याचा आवाज होऊन, तिकडे लोकांचाही गोंगाट झाला, तेव्हां बाद-शहा त्या बाजूला धांवत गेले नंतर लॉर्ड मॅन्युअल तेथून खिन्न अंतः-करणानें निघाले व हळूहळू प्रधानसाहेबांच्या वाड्याकडे येऊं लागले.

लॉर्ड फ्रांसीसांच्या वाड्यांत आल्यावर मॅन्यूअलनीं सर्व नोकरांस बोला-वून आणून क्षोशीमससंबंधानें चौकशी केली, परंतु त्यांच्याकडून विशेष माहिती कांहीं मिळाली नाहीं; तथापि एवढें निश्चित समजलें कीं, क्षोशिमस निघून जाण्यापूर्वी बराच वेळ थियोडोराची दासी मेरी हिच्याशीं एकांत करीत बसला होता.

त्यानंतर लॉर्ड मॅन्युअल तेथून सेनापतींच्या बंगल्यांत आले. तेथें प्रथम सर्वांना लढाईची सामान्य हकीगत सांगून, थियोडोराकडे वळून ते म्हणाले—" ताई, तुमची मेरी नांवाची एक दासी आहे ना?"

थियोडोरा चकित स्वरानें म्हणाली—" हो! कां बरें?"

लॉर्ड मॅन्युअल—" तिच्याकडे माझें थोडें काम आहे! तुमची कांहीं हरकत नसेल तर, तिला कांहीं माहिती विचारावयाची आहे! मी येथें तुमच्या देखतच विचारतों, म्हणजे तुम्हांलाही त्या हकीगतीचें स्वरूप व महत्व सहज समजेल!"

थियोडोरानें जवळच्या मेजावरील चांदीची घंटा जोरानें वाजविली, तेव्हां थोड्या वेळानें मेरी दिवाणखान्यांत आली. तिच्याकडे तीव्र दृष्टीनें पहात थियोडोरा म्हणाली—" मेरी, हे सरदारसाहेब तुला कांहीं माहिती विचारणार आहेत, ती सरळ सांग. ते विचारतील त्या प्रश्नांची खरीं उत्तरें दे. कांहीं लपवाछपवी किंवा उडवाउडवी बिलकुल करूं नको!"

मेरीनें आपल्या धनीणीला नम्रपणें प्रणाम करून आपली संमति दर्शविली, आणि ती चकित दृष्टीनें लॉर्ड मॅन्युअलकडे पाहूं लागली.

लॉर्ड मॅन्युअल सौम्य स्वरानें म्हणाले—" मेरी, काल संध्याकाळीं

झोरीमस वाड्यांतून बाहेर निघून गेला, त्यापूर्वीं तो तुझ्याशीं कांहीं वेळ बोलत बसला होता, हें खरें का ? "

मेरी—" होय साहेब ! पण त्यांत माझा अपराध झाला कीं, काय?"

मॅन्युअल—" तें मग पुढें पाहूं ! प्रथम हें सांग कीं, तुमचें हें संभाषण प्रधानसाहेबांच्या वाड्यांत झालें, कीं सेनापतींच्या बंगल्यांत झालें"?

मेरी—" तिकडे वाड्यांतच झालें. बाईसाहेबांनीं मला वाड्यांतून आपलें कांहीं सामान आणावयास पाठविलें होतें, तेथें गेल्यावर त्याची व माझी गांठ पडली, आणि आम्ही तेथेंच क्षणभर बोलत बसलों होतों !

मॅन्युअल—" तुम्ही तेथें किती वेळ बोलत बसलां होतां ? "

मेरी—" किती वेळ कुठलें, सरदारसाहेब ? त्यानें विचारलें, इकडे कशाला आली होतीस म्हणून, मीं त्याला आपलें काम सांगितलें. नंतर—आणखी—तो आणखी काय म्हणाला. तें कांहीं आतां नीटसें आठवत नाहीं ! नंतर मी आपलें काम करून, लागलीच इकडे परत आलें.

मॅन्युअल—" बरें, तुझ्याशीं बोलणें झाल्यावर झोरीमस कोठें गेला?"

मेरी—" तो तसाच बागेकडे गेला. "

मॅन्युअल—"बरें, त्या सुमारास रिचर्ड बस्टी तेथें तुला कोठें दिसला?"

मेरी—" होय सरदारसाहेब ! मी इकडे परत यावयास निघालें त्याच वेळीं रिचर्ड व बलारम हे एकमेकांशीं हळूहळू बोलत बागेकडून वाड्यांत आलेले दिसले ! "

मॅन्युअल—" यांचें त्यावेळीं कशासंबंधानें बोलणें चाललें होतें ? "

मेरी—" तें मला कांहीं ऐकूं आलें नाहीं, ' तळघर ' असा एक शब्द त्यांच्यापैकीं कोणाच्या तरी तोंडून माझ्या कानावर आला. मी तेथें न थांबतां, झटकन् इकडे निघून आलें ! "

मॅन्युअल—" ठीक आहे, जा, तुझें काम झालें. "

मेरी निघून गेल्यावर थियोडोरा चकित स्वरानें म्हणाली—" ही काय भानगड आहे, सरदारसाहेब ? माझ्या कांहींच लक्षांत आलें नाहीं ! "

तळघराचें रहस्य झोरीमसला कळलें असावें, व तें लियॉनार्डियसला सांगून आपला फायदा करून घेण्याकरितांच तो तुर्की छावणींत पळून गेला असावा, अशी लॉर्ड मॅन्युअलची बहुतेक खात्री झाली. कारण,

लियॉनाशियसची पापी दृष्टि थियोडोरावर असल्याचें त्यांना माहीत होतें. तथापि थियोडोराला ती हकीगत उघड सांगून, तिच्या मनाला काळजी व भीति उत्पन्न करणें योग्य नव्हे; असा विचार करून ते म्हणाले— कांहीं नाहीं, झोशीमस काल संध्याकाळीं एकदम तुर्की छावणींत पळून गेला, तेव्हां त्याला प्रधानसाहेबांच्या कांहीं गुप्त मसलती कळलेल्या आहेत कीं काय, आणि तो मेरीजवळ तसें कांहीं बोलला होता कीं काय, एवढेंच मला पहावयाचें होतें! पण तसें कांहीं लक्षण दिसत नाहीं! शहर शत्रूच्या स्वाधीन झाल्यावर त्यांच्या तावडींत सांपडण्यापेक्षां अगोदरच त्यांना मिळून त्यांच्या पक्षाचें व्हावें आणि साधल्यास आपलें कल्याण करून घ्यावें. एवढाच त्याचा हलकट व स्वार्थपर हेतु दिसतो! बरें, पुनः एकदां तटावर जाऊन युद्धाची परिस्थिति पाहून येतों!"

लॉर्ड मॅन्युअल तेथून बाहेर पडून तटाकडे निघाले. आपल्याला कळलेली बातमी, व त्यावरून झालेलें अनुमान सर एडवर्ड, रिचर्ड वर्स्टो व कोतवाल कॉनियॅटिस ह्यांना केव्हां एकदां सांगेन, अशी त्यांना उत्कंठा लागून राहिली होती. कारण, तळघराच्या सुरक्षिततेबद्दल त्यांना बळकट शंका वाटूं लागली होती, व त्यांत कांहीं तरी बदल करणें अवश्य आहे, अशी त्यांची कल्पना होती.

---

## प्रकरण २७ वें.

## विफल प्रयत्न.



दोन प्रहरीं बारा वाजण्याच्या सुमारास झोशीमसनें आपल्या तंबूतून एका नोकराबरोबर ड्यूक लियॉनाशियसकडे निरोप पाठविला कीं, आपल्याला युद्धाच्या बाबतींत एक महत्वाची गोष्ट सांगावयाची आहे. लियॉनशियस एका जहाजावर उभा राहून, कोणीकडून हल्ला करणें सोपें जाईल, हें सूक्ष्म दृष्टीनें पहात विचार करीत होता, कारण, शिड्या लावून तटावर चढण्याचे श्रम लवकर फलद्रूप होतील असा त्याला भरंवसा

वाटेना. इतक्यांत नोकरानें निरोप सांगितल्यावरून, त्यानें झोशीमसला जहाजावरच बोलावून घेतलें.

झोशीमस भीत भीत जहाजावर आल्यावर, लियॉनशियस त्याला म्हणाला—" काय, झोशीमस, तुला काय सांगावयाचें आहे ?"

झोशीमस—" धनीसाहेब, दुसरें कांहीं नाहीं, आपले लोक तटावर चढण्याच्या खटपटींत विनाकारण प्राणास मुकत आहेत, त्यापेक्षां फानार वेशीवरच आपण एकदम मारा कां करीत नाहीं ? ती वेश दिसण्यांत जरी मजबूत दिसते आहे, तरी तिच्यांत कांहीं अर्थ नाहीं ! ती शेंकडो वर्षांची जुनी असून, कित्येक ठिकाणीं मोडून, कुजून, अगदीं खिळखिळी होऊन गेली आहे ! ह्या बाजूनें शत्रूचा रिघाव होण्याचा संभव नसल्यामुळें, तिच्या दुरुस्तीकडे कोणी फारसें लक्षही दिलें नाहीं, पण आपल्या अचाट कल्पनेनें जहाजें खुष्कीच्या मार्गानें इकडे आणून, आपण सुवर्णशृंगाची बाजू खुली केली आहे, त्या अर्थी आतां फानार वेशीवर मारा करणें कांहीं कठिण नाहीं !"

लियॉनशियस—" खरेंच, झोशीमस, ही गोष्ट मला माहीत असून सुद्धां इतका वेळ माझ्या मुळींच लक्षांत आली नाहीं ! आतां त्या वेशीच्या समोर मोकळें मैदान मुळींच नसून समुद्रच आहे, एवढीच काय ती अडचण. तथापि ती अडचण दोन जहाजें सांगडून उभीं केलीं म्हणजे सहज दूर करितां येईल ! बरें, तूं हें काम करावयास तयार आहेस का ?"

झोशीमस—" छे छे, धनीसाहेब, माझ्यानें येथें क्षणभर नुसतें देखील उभें राहवणार नाहीं ! मला परत तंबूकडे जाण्याची परवानगी असावी."

लियॉनशियस—" बरें तर, जा तूं ! मी ताबडतोब सेनापति अहमदपाशांना ही गोष्ट कळवून, त्यांच्या परवानगीनें सर्व तजवीज करितों !"

झोशीमस निघून गेल्यावर लियॉनशियसनें अहमदपाशाची गांठ घेऊन त्याला सर्व हकीगत समजावून सांगून त्याची परवानगी मिळविली, नंतर फानार वेशीच्या समोर तीन जहाजें जवळ जवळ उभीं करून, तीं एकमेकांस मजबूत बांधण्याची त्यानें तजवीज केली. त्यानंतर त्या जहाजांवर मोठमोठे जाड तक्ते टाकून, मैदानासारखी साफ जागा तयार केली, आणि अहमदपाशाच्या तोफखान्यांतील एक मोठी तोफ त्या तक्तपोशी-

चून आणून, वेशीच्या दारांवर रोवून लावली. ही सर्व तयारी होण्यास जवळ जवळ दोन तास लागले. तोपर्यंत इकडे शिडयांवरून तटावर चढण्याचे प्रयत्न एकसारखे चाललेच होते, त्यामुळें लियॉनीडासच्या ह्या नवीन तजविजीकडे रोमन लोकांचें लक्ष मुळींच गेलें नाहीं व त्यांना तिकडे लक्ष देण्यास फुरसदही झाली नाहीं.

तटापलीकडील तोफेचा आवाज होऊन, फानार वेशीच्या जीर्ण दारा-वर जेव्हां धाडकन गोळा आपटला, तेव्हां रोमन लोक दचकून तिकडे पाहूं लागले, आणि तेथील भयंकर संकट तत्काळ त्यांच्या लक्षांत आलें. फानार वेस मजबूत नाहीं, ही गोष्ट सर एडवर्डच्या लक्षांत येऊन चुकली होती, व ती दुरुस्त करून घेण्याविषयीं त्यानें बादशहांना विनंति केली होती. त्याप्रमाणें बादशहांनीही एंजीनियर निसीफोरस ह्यास शक्य तितकी दुरुस्ती करण्याविषयीं तत्काळ सांगितलें होतें, पण निसिफोरस तरी एका दिवसांत काय दुरुस्ती करूं शकणार !

सर एडवर्डनीं आपल्या जवळच्या लोकांपैकीं कांहीं लोकांना तत्काळ फानारवेशीकडे आणिलें, आणि तोफेच्या गोलंदाज लोकांवर जोराचा मारा करून, तोफ बंद पाडण्याच्या खटपटीस आरंभ केला. इतक्यांत लॉर्ड मॅन्युअल गडबडीनें त्यांच्याकडे येत असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्याबरोबर त्यांना हाक मारून सर एडवर्ड म्हणाले—" सरदार साहेब, आपण सलेच बादशहांकडे जाऊन, एंजी-नियर निसिफोरसला मोठ्या तोफेसुद्धां ताबडतोब इकडे पाठविण्याविषयीं विनंति करा. तुर्की तोफ जर लवकर बंद पडली नाहीं, तर फानार वेस खांचित कोसळून पडेल, आणि मग आपलें कांहीं चालणार नाहीं. असें त्यांना स्पष्ट कळवा ! जा लवकर ! "

लॉर्ड मॅन्युअल—" ठीक आहे, मी निघालोंच, पण एक गोष्ट—"

" हे हे, " सर एडवर्ड सधैर्य म्हणाले—" ह्या वेळीं एक अक्षरही तुम्ही कांहीं बोलूं नका ! मला येथून हालतां येत नाहीं, आणि दुसऱ्या कोणाला पाठविण्यास सवड नाहीं. म्हणून अगोदर हें काम करा, मग आपण बाकीच्या गोष्टी बोलूं ! "

इतक्यांत पुनः तुर्कांची तोफ उडाली, व दुसरा गोळा फानार वेशी-

वर येऊन धडकला. त्याबरोबर वेस बरीच हादरली, तेव्हां सर एडवर्ड आपल्या लोकांना सूचना देण्याकरितां तिकडे धांवत गेले. त्यामुळें लॉर्ड मॅन्युअलचा नाइलाज होऊन, त्यांना आपल्या मनांतील विचार दाबून धरून गडबडीनें बादशहांकडे जाणें भाग पडलें.

सर एडवर्ड एंजीनियरची वाट पहात एकेक क्षण मोजीत होते. थोडयाच वेळांत एंजीनियर निसिफोरस आपल्या कामकरी लोकांसह तेथें धांवत आले. सर एडवर्डनीं त्यांना वेशीची परिस्थिति थोडक्यांत समजाऊन सांगितली. त्यांनीं एकवार वेशीचें निरीक्षण करून तावडतोब काय करितां येईल ह्याचा विचार केला, आणि तत्काळ ते कामाला लागले. जवळच्या एका बोंडीच्या जागीं खड्डा खणावयास त्यांनीं कांहीं लोक लावले, व जसजशी माती निघेल तसतशी वेशीच्या आंतील बाजूला नेऊन टाकावयाचें काम सुरू केलें. त्याचप्रमाणें शेजारच्या एका घराचा तट पाडून, त्याच मातीं धोंडयांनीं वेशीच्या तोंडाशीं एक भिंत बांधावयासही कांहीं लोक लावले. वेशीचीं जुनीं दारें लवकरच मोडून पडणार आणि इतक्यांत नवीन दारें तयार होणें शक्यच नव्हतें, त्या अर्थी वेस मोकळी झाली तरी शत्रूला एकदम आंत घुसतां येऊं नये, म्हणून त्यांनीं वेस चिणून टाकण्याची तजवीज चालविली. त्याशिवाय ह्या वेळीं दुसरा इलाजच नव्हता.

निसिफोरसनीं तयार केलेली नवी अवजड तोफ तेथून बऱ्याच अंतरावर असल्यामुळें, ती वेसीजवळ येऊन पोंचण्यास व सुरू होण्यास अद्यापि बराच विलंब होता; तोंपर्यंत सर एडवर्डनीं तुर्की गोलंदाजांवर गोळ्यांचा व बाणांचा वर्षाव चालविलाच होता. त्यायोगानें बरेच तुर्की गोलंदाज मृत्युमुखीं पडत होते, तथापि वरचेवर त्यांची जागा दुसरे लोक भरून काढीत असल्यामुळें, सर एडवर्डच्या प्रयत्नांचा फारसा उपयोग होईना, तथापि त्यांनीं न डगमगतां, आपलें काम एकसारखें चालविलेंच होतें.

वेस चिणून काढण्याच्या कामाची सर्व तजवीज बरोबर सुरू झाल्यावर तोफ कोठें उभी करावी, हें पाहण्याकरितां निसिफोरस एटावर आले, तेव्हां सर एडवर्डनीं त्यांना विचारलें—" सेंटरोमॅनसच्या बुरजाकडे

कशी काय स्थिति आहे ? ”

निसीफोरस---“ तिकडे ही म्हणण्यासारखी समाधानकारक स्थिति नाहीं ! तुर्कांच्या तोफांच्या माऱ्यानें बुरूज बराच ढांसळला आहे, आमचे लोक पराक्रमाची शिकस्त करीत आहेत, खुद्द बादशहा व सेनापति जस्टीनियन ह्यांचें तर देहभानच हरपलें आहे. तुर्की सैन्याची एकसारखी प्राणहानि होत आहे, परंतु ते पाऊलभरही मागें हटत नाहींत, ह्या भयंकर प्राणहानीला कचरून जर ते मागें हटले, तरच आपला निभाव लागण्याचा संभव आहे, नाहींपेक्षां तो बुरूज आतां फार वेळ टिकाव धरील असें वाटत नाहीं !

निसीफोरस तोफ लवकर आणविण्याकरितां निघून गेले. सर एडवर्ड आपल्याशींच विचार करीत स्तब्ध उभे राहिले. युद्धाचा परिणाम त्यांना स्पष्ट दिसूं लागला. आतां अधिक वाट पाहण्यांत अर्थ नाहीं, थियोडोराच्या बचावाची ठरलेली तजवीज ताबडतोब अमलांत आणिली पाहिजे, असें त्यांच्या मनांत आलें व तें काम कोणास सांगावें. असा विचार करीत ते इकडे तिकडे पाहूं लागले.

इतक्यांत लॉर्ड मॅन्युअल घाईघाईनें तेथें आले. व त्यांनीही एंजीनियर निसीफोरसप्रमाणेंच सेंटरोमॅनसकडील हकीगत सांगितली, तेव्हां सर एडवर्ड म्हणाले—“तर मग आतां विलंब करून उपयोग नाहीं. आपण घरीं जाऊन ठरल्याप्रमाणें बायकांना तळघरांत नेऊन बंदोबस्तानें ठेवा, आणि पुनः इकडे या, म्हणजे लढाईचें स्वरूप आणखी एकवार प्रत्यक्ष पाहून त्यांना कळवितां येईल !”

लॉर्ड मॅन्युअल—“ ठीक आहे, मी त्याप्रमाणें व्यवस्था करितों. पण मला त्यांत एक शंका आली आहे. झोशीमसला .........”

इतक्यांत तुर्की तोफेचा तिसरा गोळा धाडकन् आपटला. त्याबरोबर वेशीचें एक झडप कडकड मोडून पडलें. तें पाहतांच सर एडवर्ड तिकडे धांवत गेले. मॅन्युअलही त्यांच्या पाठोपाठ चालले. वेस बुजवण्याचें काम अर्धवट झालें होतें. पण तें पुरें होईपर्यंत दुसरें झडप तग धरील असा रंग दिसेना म्हणून सर एडवर्डनीं आपल्या लोकांपैकींच वीस निवडक लोकांची तुकडी तटाखालीं आणून कामकऱ्यांच्या संरक्षणाकरितां व

शत्रू आंत घुसूं लागल्यास त्यांच्या प्रतिकाराकरितां वेशीसमोर उभी केली.

सर एडवर्ड पुनः लगबगीनें तटावर निघाले, तेव्हां मॅन्युअल त्यांच्या जवळ जाऊन म्हणाले—" एक क्षणभर थांबा, माझा एक शब्द ऐकून घ्या आणि मग .........."

"छे छे आतां बोलावयास सवड नाहीं, आपण पुनः परत आल्यावर मग बोलूं !" असें म्हणतच सर एडवर्ड तटावर निघून गेले.

लॉर्ड मॅन्युअलचा नाइलाज झाला. सर एडवर्डना आतां ह्या गोष्टीचा विचार करावयास फुरसत होणें शक्य नाहीं अशी त्यांची खात्री झाली. आपली शंका जरी खरी असली, तरी ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं ठरलेली योजना बदलून नवीन कांहींतरी तजवीज आपल्याच जबाबदारी-वर करणें श्रेयस्कर नाहीं,हें उघडच दिसत होतें,त्याअर्थी कांहीं असलें तरी ठरलेली व्यवस्थाच तावडतोब अमलांत आणल्यावांचून गत्यंतर नाहीं, असा विचार करीत लॉर्ड मॅन्युअल खिन्न अंतःकरणानें सेनापतिच्या बंगल्याकडे परत आले.

---

## प्रकरण २४ वें.

## तळघरांत रवानगी.



कॉन्स्टांटिनोपल शहरांत ह्या प्रसंगीं विलक्षण देखावा दिसत होता. बहुतेक घरांच्या खिडक्या व दारें बंद झालेलीं होतीं. कांहीं लोक आपापल्या तळघरांतून लपून बसले होते, पण बरेच भोळे लोक जेनीझ-यसच्या बडबडीवर विश्वास ठेवून सेंटसोफायाच्या मंदिरांत भरले होते, त्यामुळें तेथें मात्र इतकी गर्दी व खेचाखेच उडाली कीं, मुंगीचादेखील रिघाव होण्यास जागा उरली नाहीं. शहराचा हा शून्य व उदास देखावा पाहून ह्या मृत राजधानीच्या स्मशानयात्रेसाठींच सर्व स्त्रीपुरुष सेंटसो-फायाच्या मंदिरात जमले आहेत कीं, काय असें कोणास वाटलें असतें.

लॉर्ड मॅन्युअल घरांत आले तों एकट्या बलारम शिवाय खालीं कोणी

नोकरचाकर त्यांना दिसले नाहींत. ते तसेंच तडक दिवाणख्या-न्यांत गेले तों तेथें युफ्राशिया, मेरियाबाई थियोडोरा ह्या तिघीही साचिंत व भयभीत होऊन बसलेल्या त्यांच्या दृष्टीस पडल्या, मॅन्युअलची खिन्न मुद्रा पाहून युफ्राशिया भीत भीत म्हणाली " काय झालें ? शहर तुर्कांच्या स्वाधीन झालें कीं काय ? "

मॅन्युअल—" नाहीं, अजूनपर्यंत तरी शहरांत तुर्कांचा शिरकाव झाला नाहीं, पण आतां आमच्या लोकांचा फार वेळ टिकाव लागेलसें दिसत नाहीं ! त्यांतल्या त्यांत सर एडवर्ड, कोतवाल, लॉर्ड फ्रांझा व रिचर्ड बस्टों हे चौघेही ईश्वरकृपेनें अद्यापपर्यंत सुरक्षित आहेत ! तथापि आतां केव्हां काय प्रसंग येईल ह्याचा भरंवसा नाहीं, म्हणून ठरल्या-प्रमाणें तुम्हांला तावडतोब तळघरांत नेऊन ठेवण्याविषयीं सर एडवर्डनीं सांगितलें आहे ! "

थियोडोरा—" घरांतले सगळे नोकरचाकर सेंट सोफायाच्या मंदि-राकडे चालते झाले. ते आम्हांलाही तिकडेच येण्याविषयीं आग्रह करीत होते. ईश्वर आयत्या वेळीं प्रगट होऊन आपला बचाव करणार, हें जेनेडियसचें सांगणें त्या बिचाऱ्यांना अजून खरें वाटत आहे. काय करावें हें आम्हांला सुचेना, आपल्यालाही जाऊन बराच वेळ झाला, म्हणून, आम्ही एकसारखी काळजी करीत बसलों आहों ! "

मॅन्युअल—" चला तर आतां ! तुमची तळघरांत सर्व व्यवस्था लावून मी पुनः लढाईकडे जाणार ! ईश्वरकृपेनें आमचा जय झाला तर, तळघरांत जाऊन बसल्यानें कांहीं बिघडत नाहीं, पण दुर्दैवानें अन्यता प्रसंग आला तर सर्वच घात होईल ! निष्काळजीपणापेक्षां फाजील काळजी अधिक श्रेयस्कर होते ! "

मॅन्युअल पुढें निघाले व त्या तिघीही मुकाट्यानें उठून त्यांच्या पाठोपाठ चालल्या. सर एडवर्डच्या आज्ञेप्रमाणें थियोडोरानें आपलें जवाहीरही आपल्या बरोबर छपवून घेतां येईल तसें घेतलें. बलारससह सर्व मंडळी फ्रांझांच्या वाड्यांत आली, तों तेथेंही सर्व शून्य झालें होतें. वाड्याचीं दारेंहीं कोणीं लावून घेतलीं नव्हतीं.

लॉर्ड मॅन्युअल आपल्या मंडळीसह एकदम बागेंतील तळघराकडे

आले. ह्या वेळीं तीन प्रहर दिवस उलटून गेला होता. बागेंतील सुवासिक फुलें फुललेलीं होतीं, पण दारूच्या धुरानें व दुर्गंधीनें त्यांचा मुळींच वास येत नव्हता. झाडांवरील पक्षीही भयभीत होऊन स्तब्ध बसले होते. धुरानें व धुराळ्यानें आकाश इतकें धुंद होऊन गेलें होतें कीं, अभ्रें नसूनही सूर्य आभ्राच्छादित झाल्यासारखा दिसत होता. तोफांचा गडगडाट व लोकांचा गोंगाट बागेंतही एकसारखा ऐकूं येत होता.

बलारमनें तळघराचें कुलूप काढून दार उघडल्यावर सर्व मंडळी तळघरांत उतरलीं. तेथें रिचर्डच्या सूचनेप्रमाणें बलारमनें खाद्य पेय पदार्थांची व कपडयालत्त्यांची सर्व तरतूद करून ठेवली होती. तिघींचीही तेथें कोणत्याही प्रकारची गैरसोय नाहीं, अशी खात्री झाल्यावर मॅन्युअल व बलारम तेथून परत निघाले.

बलारम डोळ्यांत अश्रू आणून कंपित स्वरानें थिओडोराला म्हणाला "ताईसाहेब, आज पन्नास वर्षें मी आपल्या घरचें अन्न खाल्लें आहे! ईश्वर तुमचें संरक्षण करो, अशी माझी त्याला प्रार्थना आहे. पण दुर्दैवानें तसा प्रसंग आलाच तर, आपल्या अन्नानें वाढलेला हा जीर्ण देह आपल्या संरक्षणाच्या कामीं समर्पण झाल्यास माझ्या जन्माचें सार्थक झालें, असें मी समजेन!"

थिओडोरा त्याचा हात धरून गद्गद स्वरानें म्हणाली—"बलारम, माझ्यावर तुझें अकृत्रिम प्रेम आहे, हें मला माहीत आहे, आणि माझ्याकरतां तूं आपले प्राण देखील अर्पण करशील अशी माझी खात्री आहे, पण ईश्वर तसा प्रसंग आणणार नाहीं, अशी मला अजून आशा आहे!"

बलारम—"रिचर्डच्या सूचनेप्रमाणें मीं दाराला आंतून कडी कोयंडा मारून ठेवला आहे. आम्ही बाहेर गेल्यावर दार आंतून बंद करून घ्या."

मॅन्युअल—"ठीक आहे, मी आतां रणक्षेत्राकडे जातों. विशेष कांहीं घडलें नाहीं तर तास दोन तासांनीं परत येऊन तुम्हांला खबर देतोंच. पण परिस्थिति बदलली, आणि मला इकडे यावयास सवड झालीच नाहीं तर तुम्ही घाबरूं नका. रात्रीं नेमलेल्या वेळीं आम्ही सर्वजण किंवा जे कोणी मोकळे असतील ते तरी येथें येऊन तुमची पुढील तजवीज करूं! निदान आम्ही कोणीच येऊं शकलों नाहीं तर बलारमला सर्व

व्यवस्था सांगून ठेवलेलीच आहे, तो त्याप्रमाणें करील! ह्या वेळीं धैर्य धरून, येईल त्या प्रसंगाला तोंड देण्यास तयार होऊन, ईश्वरावर भार ठेवून! स्वस्थ असा! बलारस बाहेरच्या बाजूला जवळपास छपून आहेच! येतों मी आतां!"

मॅन्युअल बाहेर निघाले, तोंच युफ्राशिया पुढें येऊन त्यांचा हात धरून म्हणाली—"प्रियकरा, माझी एक विनंति आहे, तेवढा आपला खंजीर माझ्याजवळ ठेवून जावें!"

मॅन्युअल चकित दृष्टीनें तिच्याकडे पहात म्हणाले—"तो कशाला? लाडके, तुझ्या मनांत कांहीं भलता सलता विचार आहे कीं काय?"

"छे छे," थियोडोरा पुढें येऊन म्हणाली—"मॅन्युअल, आत्मघाताचा भयंकर पातकी विचार आमच्या मनांत कधींच येणार नाहीं! आमचे प्राण आमच्या मालकीचे नसून, त्यांचा धनी ईश्वर आहे, तो आपल्या इच्छेप्रमाणें त्यांचें वाटेल तें करण्यास मुखत्यार आहे, हें आम्हांला माहीत आहे! तथापि ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं केव्हां कशी वेळ येईल ह्याचा नियम नाहीं, ह्याकरितां स्वसंरक्षणासाठीं म्हणून मीं देखील माझ्या प्रिय पतीचा खंजीर ठेवून घेतला आहे! हा पहा!"

युफ्राशिया—"प्रियकरा, मी वीरकन्या आहे, आणि वीरपत्नी होण्याचीही माझी महत्वाकांक्षा आहे! त्या अर्थीं आत्महत्येसारखें भेकडपणाचें नीच पातक माझ्या हातून कधींही होणार नाहीं! त्याबद्दल शंका बाळगूं नये! तथापि प्रसंग आलाच तर, वीर युवति शत्रूच्या अत्याचाराला मुकाट्यानें बळी पडत नसते, अशी शत्रूची खात्री करण्यासाठींच मला आपला खंजीर पाहिजे आहे!"

मॅन्युअल—"शाबास लाडके! कांहीं हरकत नाहीं! हा घे माझा खंजीर! ह्याचा तुझ्या हातून अपमान होणार नाहीं अशी माझी आतां खात्री झाली."

आपला खंजीर युफ्राशियाच्या स्वाधीन करून व त्या तिघींचाही निरोप घेऊन लॉर्ड मॅन्युअल तेथून बाहेर पडले. बलारसनें आंतून कडी घातल्याचा आवाज ऐकल्यावर, बाहेरून दार बंद करून कुलूप लावून घेतलें, व मॅन्युअल हे फानारवेशीकडे निघून गेले. व बलारस बागेंतील

एका दाट पालवीच्या झाडावर चढून छपून बसला, तेथून त्याला तळघर व बाहेरील रस्त्याचा भागही दिसत होता, तथापि तो मात्र एकाएकीं कोणाच्या दृष्टीस पडण्यासारखा नव्हता.

फानार वेशीचें एक झडप कोसळून पडलेलें पाहतांच तुर्की लोकांना अधिकच हुरूप येऊन, त्यांनीं विशेष उत्साहानें पुनः तोफेचा मारा सुरू केला. आतां शहर लवकरच ताब्यांत येणार, असें लियॉनशियसला वाटूं लागलें, आणि थियोडोरावर झडप घालण्याची त्याची उत्कंठा अनावर वाढली. त्यानें एका नोकराला झोशीमसला बोलावून आणावयास तंबूकडे पाठविलें. प्रत्यक्ष हाणामारीच्या आगींत जाणें झोशीमसच्या जिवावर आलें, पण हुकमापुढें त्याचा नाइलाज झाला. तो भीत भीत लियॉनशियसच्या जहाजावर आला. लियॉनशियस त्याला एकांतीं केबिनमध्यें घेऊन जाऊन म्हणाला—" झोशीमस, आतां फार वेळ शहराचा टिकाव लागणें शक्य नाहीं, तें बहुतेक आमच्या हातीं आल्यासारखेंच आहे ! फक्त आम्ही इकडून प्रथम आंत घुसतों, कीं उत्तरेकडील बाजूनें सुलतानसाहेब अगोदरच आंत शिरतात, एवढाच काय तो प्रश्न आहे ! तें कसेंही झालें तरी, आपल्या मुख्य कामाचा आतां आपल्याला विचार केला पाहिजे ! शहरांत जातां क्षणींच मला माझें काम सोडून लॉर्ड मॉझाच्या वाड्याकडे जातां येणार नाहीं. ह्यासाठीं तुझ्याबरोबर दहा बारा विश्वासू तुर्की शिपाई देतों, ते घेऊन तूं एकदम त्या तळघराकडे जा, आणि थियोडोराला आपल्या ताब्यांत घे, मला सवड होतांच मी तिकडे येईन ! आतां शहर हस्तगत होईपर्यंत तूं येथेंच माझ्याजवळ रहा ! "

झोशीमस—" पण धनीसाहेब, ह्या मारामारीच्या गर्दींत माझा गरीबाचा फुकट प्राण जाईल, अशी मला भीति वाटते ! "

लियॉनशियस—" चूप, मूर्खा, तुला येथें कोण कशाला मारावयास येईल ? आणि तूं तर मला माझ्या स्वतःच्या जिवापेक्षां देखील तुला अधिक जपलें पाहिजे ! भिऊं नको, स्वस्थ बसून रहा ! "

नंतर लियॉनशियस एका तुर्की नाइकाला हाक मारून म्हणाला—" वालीद, हा पहा तो ग्रीक मनुष्य ! तुला सांगितल्याप्रमाणें लोक

घेऊन त्याच्याबरोबर जावयाचें आणि तेवढें काम बिनबोभाट करावयाचें म्हणजे तुझें लुटीचें नुकसान मी तुला भरून देईन ! हा हलम शहर हस्तगत होईपर्यंत येथेंच आहे, त्याच्यावर लक्ष ठेव ! ”

वालीद नाईक सलाम करून म्हणाला—“ ठीक आहे धनीसाहेब, मी त्या तयारींतच राहतों! पण ती बाई सांपडल्यावर तिला कोठें न्यावयाचें ? ”

लिऑनशियस—“ तिला तेथेंच ठेवावयाचें. मी लवकरच तेथें येऊन तिची योग्य व्यवस्था करीन ! त्या तळघराच्या आसपास कोणी नोकर चाकर असला, आणि तो कांहीं गडबड करूं लागला तर, त्याला मात्र तत्काळ ठार करावयाचें ! ”

जो हुकूम, सरदारसाहेब ! ” असें म्हणून वालीद आपले लोक जमविण्याच्या तजविजीस लागला. व लिऑनशियसही आपल्या कामाला निघून गेला. असली नीच कामगिरी वालीदला मुळींच पसंत नव्हती, पण वरिष्ठाच्या हुकमापुढें त्याचा नाइलाज झाल्यामुळें, तो कुरकुरत व चडफडत आपल्या कामाला चालता झाला.

---

## प्रकरण ३२ वें,

## शेवटची धडपड.



लॉर्ड मॅन्युअल तळघरांतून बाहेर पडल्यावर प्रथम फानार वेशीकडे निघाले होते, पण वाटेंत त्यांना अशी बातमी समजली कीं, सेंट रोमेनसच्या बुरजाकडील तुर्क लोकांचा हल्ला मागें परतला. म्हणून ते अगोदर तिकडेच वळले. गडकडीनें तटावर चढून पाहतात, तों तुर्क सैन्य खरोखरच मागें सरकत असून, तटावरील रोमन सैनिक आनंदानें उड्या मारीत जयघोष करीत आहेत. असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तें पाहून त्यांना मोठा आनंद झाला व आश्चर्यही वाटलें.

बादशहा व सेनापति जस्टीनियन एके ठिकाणीं बोलत उभे होते, तेथें धांवत जाऊन लॉर्ड मॅन्युअल या दोघांना प्रणाम करून म्हणाले

" नमस्कार, सेनापतिसाहेब, ईश्वरकृपेनें आपला जय झाल्याबद्दल मी आपलें उभ्या मनानें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों ! "

बादशहा हंसून म्हणाले—" मॅन्युअल, तुम्हांलाही थेट कळलें की, काय ? जय कसला नव्हे, किंबहुना हा आमचा जयच नव्हे ! आमचा जय व्हावयास आम्हीं असा काय पराक्रम गाजविला आहे ? तुर्कांच्या नुसत्या प्रतिकार करण्यांतच आमचें सर्व सामर्थ्य खर्च होत आहे ! त्यांच्या लष्करांत प्राणहानि फार झाली आहे, ही गोष्ट खरी पण त्याची सुलतान महमदाला फारशी फिकीर वाटत असेल असें दिसत नाहीं ! दुसरा एखादा कच्च्या दिलाचा मनुष्य असता तर ही भयंकर प्राणहानि पाहून गांगरूनच गेला असता ! तुर्की सैन्य मागें हटत आहे, ह्यांत सुलतानाचा कांहीं तरी डाव असावा, असें माझें अनुमान आहे ! "

जस्टीनियन—" तटबंदी अगदीं खिळखिळी होऊन गेली आहे, आणि आमच्या अगोदरच मूठभर असलेल्या सैन्यांतील लोकही बरेच कमी झाले आहेत, हें प्रत्यक्ष दिसत असतां, तुर्क लोक कच खाऊन मागें सरतील, असा मुळींच संभव नाहीं ! दमलेलें लष्कर मागें घेऊन, राखून ठेवलेलें ताज्या दमाचें सैन्य पुढें घालण्याचा सुलतानाचा बेत असावा, असें मला वाटतें ! "

लॉर्ड मॅन्युअल—" मग हे लोक आनंदानें हुरळून जाऊन जयघोष कसला करीत आहेत ? "

बादशहा—" त्या बिचाऱ्यांना क्षणभर विश्रांति मिळत आहे, आणि जयाच्या आनंदानें त्यांना नवी हुरूप येत आहे, तिला आपण प्रतिबंध कशाला करावा, म्हणून आम्हीं तिकडे दुर्लक्ष केलें आहे ! "

थोडयाच वेळांत तटाजवळचें मैदान मोकळें होतांच, एका बगलेनें सुलतानाचें राखीव सैन्य पुढें सरसावलें. खुद्द सुलतान सैन्याच्या मध्यभागीं येऊन आपल्या हातांतील तरवार परजूं लागले, त्याबरोबर त्या सैन्यानें ' दीन दीन ' असा रणघोष करीत एकदम जोराचा हल्ला चढविला. पुनः तोफांचा मारा जोरानें सुरू झाला. धुरानें सर्व रणमैदान भरून गेलें. रोमन सैनिकही शत्रूचा प्रतिकार झटून करूं लागले. ह्याप्रमाणें पुनः हातघाईची चकमक सुरू झाली.

सुलतान ओरडून म्हणाले—" अल्लाचें निशाण घेऊन प्रथम जो कोणी तटावर जाईल, त्याला एक प्रांत जहागीर मिळेल !'

हसन नांवाचा एक लष्करी कामगार मोठ्यानें म्हणाला—" हा मी चाललों, जहापन्हा ! "

हसन आपल्या पंचवीस तीस निवडक लोकांसह सर्वांच्या पुढें सरसावला, आणि पडक्या बुरजावरून झपाट्यानें वर चढूं लागला. तें पाहून तटावरील रोमन शिपायांनीं त्यांच्यावर जोराचा मारा चालविला. त्या योगानें हसनच्या अनुयायांपैकीं दहा पंधरा इसम ठार व जखमी होऊन खालीं कोसळले. तथापि हसन न डगमगतां, मोठ्या साहसानें, उरलेल्या लोकांसह बुरजावर चढूं लागला. रोमन सैनिकांनीं त्यांच्यावर खूपच गर्दी केली, तथापि शेवटीं हसन आपल्या उरलेल्या दोघां अनुयायांसह तटावर येऊन उभा राहिला आणि आपल्या हातांतील निशाण उंच करून " लाइलाह इल्लिला महमद रसूलुल्ला " अशी त्यानें आरोळी ठोकली. तें पाहून तुर्की सैन्यांत मोठा जयघोष झाला. इतक्यांत सेनापति जस्टीनियन तेथें धांवत आले. त्यांनीं आपल्या तलवारीच्या एकाच फटकाऱ्यानें हसनचें मस्तक उडविलें, आणि तें तुर्की सैन्यांत फेंकून दिलें. बाकीच्या तुर्कांचीही रोमन सैनिकांनीं कत्तल उडवून त्यांचीं प्रेतें खंदकांत फेंकून दिलीं.

हें पाहून तुर्की सैन्यास अधिकच त्वेष आला. हसननें जें करून दाखविलें, तें आपल्यालाही कां करितां येणार नाहीं, अशी आणखी कित्येकांना उमेद आली, आणि शेंकडों धाडसी तुर्क लोक एकदम चोहोंकडून तटावर चढण्याचा प्रयत्न करूं लागले. तोंच दुसरीकडे तोफांच्या माऱ्यानें तट कोसळून एकदम मोठें भगदाड पडलें.

रोमन सैनिक सकाळपासून एकसारखे श्रम करून अगदीं थकून गेले होते, आणि तुर्की सैन्य ताजेंतवानें व नव्या दमाचें असून, शिवाय खुद्द सुलतानाच्या नजरेखालीं लढत होतें त्यामुळें रोमन सैनिकांचें कांहीं चालेनासें झालें होतें. इतक्यांत तट ढांसळल्याची बातमी लागतांच त्यांचें धैर्य अगदींच खचून गेलें. त्यामुळें त्यांच्यानें कांहींच होईना. तुर्क लोक भराभर तटावर चढून येऊं लागले व भगदाडांतूनही आंत घुसूं लागले.

हें पाहून जस्टीनियन, बादशहाकडे धांवत येऊन म्हणाले–" सरकार, चला चला, आतां येथें थांबण्यांत अर्थ नाहीं. जयाची आशा सोडून आतां किल्ल्याचा आश्रय केला पाहिजे! आपण सुरक्षित असलों तर आणखी कांहीं वेळ तरी लढाई चालेल, नाहीं तर सर्वच घोटाळा उडून जाईल! "

बादशहा त्यांना कांहीं उत्तर देणार इतक्यांत एका तुर्कानें मागून धांवत येऊन जस्टीनियनच्या मानेवर जोरानें वार केला, त्याबरोबर ते धाडकन खालीं पडले. तितक्यांत एका रोमन शिपायानें त्या तुर्कालाही यमसदनास पाठविलें. जस्टीनियनला उचलून नेण्याची तजवीज करावी, असें बादशहा मनांत आणितात तोंच मागून लोकांचा जो एकदम लोट आला, त्या सरसे बादशहा व लॉर्ड मॅन्युअल हे दोघेही तेथून पुढें लोटले गेले. त्या गर्दींतच लॉर्ड मॅन्युअल तटावरून खालीं आले. त्यांची व बादशहांची चुकामूक झाल्यामुळें, ते बादशहांचा तपास करूं लागले, पण बादशहा तटावरून खालीं आले आहेत एवढेंच त्यांना समजलें, त्यांची प्रत्यक्ष भेट झाली नाहीं.

त्यानंतर जी गर्दी उसळली तिचें वर्णन करितां येणें शक्यच नाहीं. त्या वेळच्या भयंकर परिस्थितीची कल्पना देखील होण्यासारखी नाहीं. लॉर्ड मॅन्युअल लोकांच्या प्रवाहाबरोबर लोटत लोटत जिकडे पाय नेतील तिकडे जाऊं लागले. त्यांचें डोके इतकें गुंग होऊन गेलें होतें कीं, आपण कोणीकडे लोटले जात आहोंत व ह्या गर्दींतून कसें बाहेर पडावयाचें हें त्यांना कांहींच सुचेना.

लॉर्ड मॅन्युअलना घराकडे पाठवून देऊन सर एडवर्ड फानार वेशी बाहेरील तोफेच्या गोलंदाजांवर पुनः जोराचा मारा करूं लागले. परंतु थोड्याच वेळांत आणखी गोळे लागून वेशीचें दुसरें झडपही कोसळून पडलें. त्याबरोबर तुर्कांनीं मोठा जयघोष केला, आणि तोफ बंद करून, ते वेशींतून शहरांत घुसण्याचा प्रयत्न करूं लागले. तेव्हां सर एडवर्डही तटावरील उरलेल्या लोकांसह खालीं येऊन शत्रूला तोंड देण्याकरितां वेशीच्या तोंडाशीं उभे राहिले.

प्रथम पुढें आलेली तुर्की टोळी सर एडवर्डच्या लोकांनीं सगळीच्या

सगळी कापून काढली. तिच्या मागून दुसरी आली तिचीही तीच अवस्था झाली. तें पाहून अहमदपाशानें पुनः तोफ सुरू करावयास हुकूम दिला. तोफ उडणार हें दृष्टीस पडतांच रोमन शिपाई तटाच्या आश्रयाला आड उभे राहिले. तोफेचा गोळा येतांच नवीन बांधलेला तटही कोसळला, तेव्हां मात्र रोमन शिपायांना आश्रय उरला नाहीं. तथापि ते न डगमगतां आपली जागा धरून होते, पुनः हातघाईची झटापट सुरू झाली. इतक्यांत " उत्तरेकडील तट कोसळला, जस्टीनियन पडले, तुर्क शहरांत घुसले, बादशहांचा पत्ताच नाहीं, " इत्यादि भयंकर बातम्या आल्या आणि जिकडे तिकडे धांदल व पळापळ सुरू झाली तेव्हां मात्र रोमन शिपायांचा धीर सुटला. सर एडवर्डनीं कितीही प्रयत्न केला तरी त्यांच्याकडे लक्षही न देतां सर्व लोक सैरावैरा धांवू लागले.

काय करावें, हें सर एडवर्डना सुचेना, ते स्तब्ध होऊन एका बाजूला उभे राहिले. इतक्यांत मागून येणाऱ्या गर्दीतून लॉर्ड मॅन्युअल अकस्मात् तेथें येऊन पोंचले. सर एडवर्डना पहातांच ते चटकन त्यांच्या जवळ जाऊन त्यांचा हात धरून म्हणाले—" सर एडवर्ड, असे काय उभे राहिलां ? चला चला, आपल्या जिवाचें संरक्षण करा ! आतां येथें उभे राहण्यांत हशील नाहीं ! "

सर एडवर्ड—" लॉर्ड मॅन्युअल, तुम्हीं ती व्यवस्था केली कां ? आणखी बादशहाकडील काय हकीगत आहे ? "

मॅन्युअल—" मी ती सर्व तजवीज करून परत आलों व बादशहाच्या कडे गेलों, पण तुर्क लोक तटाच्या खिडींतून आंत घुसले, त्या गर्दींत बादशहांची व माझी चुकामूक झाली. ते तटावरून खालीं आल्याचें मात्र समजलें. पण पुढें कांहींच पत्ता लागला नाहीं. मी गर्दीबरोबर लोटत लोटत येथवर आलों ! "

सर एडवर्ड—" चला तर आतां तळघराकडेच जाऊं ! कदाचित् कोतवाल व रिचर्ड बस्टों जिवंत असले तर तेथेंच येतील ! ,,

दोघेही त्या गर्दीतून मोठ्या कष्टानें मार्ग काढीत काढीत राजवाड्याकडे जाऊं लागले. पण रस्त्यांत तुर्क व रोमन लोकांची इतकी गर्दी व

धांवपळ चालली होती कीं, राजवाड्यांत यावयास त्यांना तासभर लागला. त्यावेळीं संध्याकाळ झाली होती.

फानारवेस मोकळी होतांच लिपानशियसनें वालीदच्या टोळीबरोबर झोशीमसला आपल्या कामगिरीवर अगोदर पाठविलें. ते एकदम वेशींतून आंत घुसून थेट राजवाड्याकडे आले. देवडीवर पहारेवाले कोणीच हजर नसल्यामुळें त्यांना लॉर्ड कांझाच्या वाड्यापर्यंत जावयास मुळींच प्रतिबंध झाला नाहीं. रस्त्यांत गर्दी व गोंधळ माजण्यापूर्वींच ते वाड्याकडे आले असल्यामुळें अर्थातच सर एडवर्ड व लॉर्ड मॅन्युअल ह्यांच्या अगोदरच ते वाड्यांत येऊन पोंचले.

---

## प्रकरण ४० वें.

## बादशहाचा शेवट व झोशीमसचा परिणाम.



लॉर्ड मन्युअल तळघरांतून निघून गेल्यावर, तेथें असलेल्या तिघीही स्त्रिया अस्वथ व उत्कंठीत चित्तानें युद्धाचा गोंगाट ऐकत बसल्या होत्या. बराच वेळ त्यांना त्यांत कांहीं बदल ऐकूं आला नाहीं. तोफांचा दणदणाट लोकांचा दंगा व रणवाद्यांचा गजर एकसारखा चाललेला त्यांच्या कानांवर येत होता.

कांहीं वेळानें युद्धाचा गोंगाट मंद व अस्पष्ट ऐकूं येऊं लागला तेव्हां थियोडोरा म्हणाली—"मेरियाबाई, युद्धाचा ध्वनि मंदावल्यासारखा दिसतो! ह्याचें कारण काय असावें बरें ?"

मेरियाबाई—"हो, मंदावल्यासारखा ऐकूं येतो खरा ! ईश्वर करो आणि हें अनुकूल परिस्थितीचें सुचिन्ह ठरो !

युफ्राशिया—"कांहीं झालें तरी आपले प्रियजन ईश्वरकृपेनें सुरक्षित असोत ! आमच्या बादशहांसारख्या न्यायी, दयाळू व धर्माभिमानी बादशहाची ईश्वर उपेक्षा करणार नाहीं, अशी मला आशा वाटते !

थियोडोरा—"ऐका ऐका ! आतां तर तोफांचे आवाज अगदींच

बंद झालेले दिसतात ! लोकांचा गोंगाट मात्र वाढलेला ऐकूं येत आहे !

थुकाशिया—" अरेच, काय चाललें आहे, कांहीं कळत नाहीं ! लॉर्ड सॅम्युअल अजून कसे परत आले नाहीं कोण जाणें !

थियोडोरा—" बलारसला अंमळ पुढें होऊन बातमी घेऊन यावयास तरी सांगूं या ! काय तें कळल्याशिवाय चैन पडणार नाहीं !

मेरियाबाई उठून तळघराच्या दाराशीं आल्या, आणि त्यांनीं दार उघडून हळूच बलारसला हाक मारली. तो झाडावरून उतरून दाराजवळ आला, तेव्हां त्यांनीं राजवाड्याच्या बाहेरील देवडीपर्यंत जाऊन लढाईची बातमी विचारून यावयास त्याला सांगितलें. बलारस निघून गेल्यावर त्यांनीं पुनः दार बंद करून घेतलें.

थोड्या वेळानें बलारसनें दाराशीं परत येऊन मेरियाबाईंना हळूच हाक मारली. आवाज ऐकतांच तिघीही दाराकडे धांवत आल्या. तुर्क मागें हटत आहेत व आपले लोक जयघोष करित अशी बलारसनें बातमी आणली, ती ऐकून त्या तिघींचेही डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. त्यांनीं तत्काल ईश्वराची प्रार्थना करून त्याचे अनंत आभार मानले. नंतर बलारसच्या आग्रहावरून त्यांनीं पुनः दार बंद करून घेतलें, व बलारस आपल्या जागीं जाऊन बसला.

आणखी थोड्या वेळानें शहराच्या बाजूला पुनः तोफांचा भडिमार अधिक जोरानें ऐकूं येऊं लागला, व तट धडाधड ढांसळल्याचाही शब्द कानांवर आला, तेव्हां पुनः त्या तिघीही घाबरल्या. मेरियाबाई दाराजवळ येऊन बलारसला हाका मारूं लागली. परंतु बराच वेळ त्याच्याकडून जबाब आला नाहीं. तेव्हां त्यांना अधिकच काळजी पडली. तिघीही दाराजवळ येऊन दार न उघडून कानोसा घेत उभ्या राहिल्या.

कांहीं वेळानें बलारस घाबऱ्या घाबऱ्या दाराजवळ धांवत येऊन घोगऱ्या स्वरानें हळूच म्हणाला "बाईसाहेब दार उघडूं नका, सावध असा ! तुर्क लोक तट पाडून शहरांत शिरल्याची बातमी आली आहे !"

ही दुःखकारक बातमी कानांवर येतांच तिघीही तळघरांत परत येऊन एकमेकींच्या गळ्यांना मिठ्या घालून रडूं लागल्या. मन मोकळें करून मोठ्यानें रडण्याचेंही त्यांना धैर्य होईना. बलारस पुनः आपल्या गुप्त

ठिकाणीं जाऊन सावधपणानें बसला.

झोशीमस व वालीद आपल्या टोळीसह लॉर्ड फ्रांझाच्या वाडयाजवळ आल्यावर, झोशीमस एकदम आंत जाण्यास भिऊं लागला. दुसरें कोणी नोकर तेथें नसले तरी, थलारस आसपास कोठें तरी खास असेल, अशी त्याची खात्री होती, व आपण त्याच्या तावडींत सांपडलों तर तो आपल्याला तत्काळ ठार केल्याशिवाय राहणार नाहीं, अशी त्याला पक्की धास्ती होती.

झोशीमस पुढें जाण्यास कचरत असलेला पाहून वालीद त्याच्या अंगावर ओरडून म्हणाला—" चल, पुढें हो, आणि आम्हांला तें तळघर दाखीव ! "

झोशीमस रडक्या स्वरानें म्हणाला—" दाखवितों साहेब ! पण जरा नाव संभाळा ! माझा जीव गेला तर आपल्याला कोण माहिती सांगणार ? "

वालीद—" चल, भिऊं नको ! तुझ्यासारख्या हलकट, नामर्दांचा जीव घेण्याचें कोणाला काय भूषण वाटणार आहे ? चल, हो पुढें ! "

झोशीमस समोरच्या दरवाजाशीं आला, तों तेथें तुर्की व रोमन लोकांची बरीच गर्दी व धावाधावी चाललेली होती. तेथून जाण्याची त्याची छाती होईना. म्हणून तो वालीदला म्हणाला—" नाईकसाहेब, चला, मी तुम्हांला दुसऱ्या एका बाजूच्या चोरदारानें आंत नेतों, म्हणजे तिकडून आपल्याला कांहीं धोका नाहीं ! "

झोशीमस लॉर्ड फ्रांझांच्या बागेच्या तटाकडे वळला, तेव्हां वालीद आपल्या लोकांसह त्याच्या पाठोपाठ तिकडे निघाला. झोशीमसनें त्यांना एका चोरदाराजवळ उभें केलें. दार आंतून बंद असल्यामुळें त्याला बाहेरून उघडतां येईना. तेव्हां तो शेजारच्या एका उंच झाडावर चढून त्याच्या खांदीवरून सटाकन उतरला आणि तेथून त्यानें बागेंत उडी टाकून दार उघडलें. इतक्यांत वाड्याच्या एका खिडकींत पिस्तुलाचा बार झाला, आणि गोळी झोशीमसच्या बरगडींत शिरून तो तत्काळ उताणा पडला. त्याची नजर खिडकीकडे जातांच, " रिचर्ड वस्टों ! " असे उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडले व त्यानें तत्काळ प्राण सोडला.

रिचर्ड नुकताच येऊन वाड्यांत छपून बसला होता. झोशीमसच्या

उडीचा आवाज ऐकतांच त्यानें हळूच खिडकीचें दार उघडून बाहेर डोकावून पाहिलें, तों झोसीमस दार उघडीत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर त्याचा दुष्टाचा उद्देश रिचर्डच्या लक्षांत येऊन, त्यानें तत्काळ पिस्तुल झाडलें.

वालीद नाईक आपल्या टोळीसह दारांतून आंत शिरला. झोसीमस तेथें मरून पडलेला त्याला दिसला, व समोरच्या खिडकींत उभा असलेला रिचर्ड बर्टोंही त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर त्यानें आपल्या लोकांसह रिचर्डवर चाल केली. पण रिचर्डनें तत्काळ खिडकी बंद करून घेतली. त्यामुळें वालीदला वाड्याचा मुख्य दरवाजा फोडून आंत जावें लागलें. त्यांत त्या लोकांचा बराच वेळ गेला. त्यानंतर वाड्यांत इकडे तिकडे फिरून रिचर्डला हुडकण्यासही पुष्कळ श्रम पडले, तथापि शेवटीं रिचर्ड त्यांना सांपडला नाहीं.

वालीद आपल्या सर्व लोकांना एकत्र जमवून म्हणाला—“ दोस्त हो, हें फार वाईट झालें! झोसीमस मेल्यामुळें आपल्याला आतां तें गुप्त तळघर सांपडण्याचा संभव नाहीं, आणि ज्यानें झोसीमसला गोळी घालून ठार केलें, तो इसमही सांपडला नाहीं! आमच्या कटाचा फायदाही बुडाला, आणि लियॉनशियस पाद्र्यांची कामगिरी अशी फसल्यामुळें, त्यांच्याकडून मिळणारें बक्षिसही बुडालें! तथापि आणखी एक प्रयत्न करून पाहूं या. लियॉनशियस पाद्र्याकडे जाऊन, त्यांना झालेली हकीगत कळवूं, आणि त्यांना त्या गुप्त ठिकाणची कांहीं माहिती असल्यास विचारूं! ”

वालीदची ही सल्ला इतरांना पसंत पडली, आणि ते सर्वजण ड्यूक लियॉनशियसचा तपास करण्याकरितां निघाले.

\+ + + + +

सायंकाळीं सूर्यास्ताच्या सुमारास कॉन्स्टांटिनोपलच्या किल्ल्यावर मुसलमानांचें चंद्रांकित विजयी निशाण डौलानें फडकूं लागलें. शहरच्या सर्व वेशी खुल्या होऊन त्या ठिकाणीं तुर्की लोकांचे पहारे बसले. सुलतान-महमदांनीं आपले मुख्य सरदार, मानकरी व मौलवी ह्यांच्यासह अल्लाच्या व खलीफाच्या जयघोषांत मोठ्या समारंभानें शहरांत प्रवेश केला. त्यांच्याबरोबर लॉर्ड कांझा, कोतवाल कॉनियॉटस व आणखी बरेच रोमन

कामगार लष्करी कैदी म्हणून होते. सुलतानांनीं मुख्य चौकांत आल्या-वर तेथील सर्व रोमन लोकांस उद्देशून एक फर्मानसें भाषण केलें, आणि शहरवासी लोकांच्या जीवितास, संपत्तीस किंवा अब्रूस आपल्या लोकां-कडून बिलकुल धोका पोंचणार नाहीं, किंवा कोणावर विनाकारण जुलूम जबरदस्ती अगर अन्याय अत्याचार होणार नाहीं, असें जाहीर केलें. त्यामुळें नागरिक लोकांना बराच धीर आला.

इतक्यांत रोमन बादशहांचें प्रेत सांपडलें, अशी एका सरदारानें सुलतानांस खबर दिली. तेव्हां त्यांनीं तें प्रेत तत्काळ आपल्या समोर आणण्याचा हुकूम केला. थोड्याच वेळानें चार तुर्की शिपायांनीं लष्करी तटकीवरून एक प्रेत सुलतानांच्या समोर आणून ठेवलें. सुलतानांनीं लॉर्ड फ्रांझा व कॉनियॅटिस ह्यांना तें प्रेत ओळखण्यास सांगितलें. त्यांनीं जवळ जाऊन पाहतांच तें कान्स्टांटाइन बादशहांचेंच असल्याविषयीं तत्काळ ओळखून सांगितलें, आणि प्रेताच्या दोहों बाजूस बसून ते दोघेही शोक करूं लागले.

सुलतान चटकन् घोड्यावरून खालीं उतरून प्रेताजवळ आले. बाद-शहांचा भव्य व शांत चेहरा पाहून त्यांना मोठें कौतुक वाटलें. त्यांच्या अंगावर बऱ्याच ठिकाणीं जखमा झालेल्या होत्या, त्यावरून कोणाशीं तरी द्वंद्व युद्ध करीत असतां ते पडले असावे, असें उघड दिसत होतें.

सुलतान गंभीर स्वरानें म्हणाले—" शाबास ! ह्या बादशहानें आपलें कर्तव्य अखेरपर्यंत बरोबर बजावलें ! त्याची कीर्ति अजरामर होईल, आणि ईश्वर त्याला अक्षय सद्गति देईल ! "

नंतर ते एका पाशाकडे वळून म्हणाले—" हें प्रेत राजवाड्यांत नेऊन, बादशहाच्या खास महालांत व्यवस्थेनें ठेवा ! त्याचा कोणीं अपमान केलेला आम्हांला बिलकुल खपणार नाहीं ! उद्यां त्यांच्या शौर्यास व योग्यतेस साजेल अशा इतमामानें, आणि त्यांच्या धर्माप्रमाणें, त्याचा स्मशानविधि करण्याची आपण व्यवस्था करूं ! शत्रु असला तरी तो खरा वीर पुरुष होता. "

सेंट सोफायाच्या मंदिरांत शहरांतील स्त्रीपुरुषांची अतोनात गर्दी जमली होती. जेनेडियसचें सांगणें खरें वाटून, अद्यापिही ईश्वर आपला

बचाव करील, अशीच त्या भोळ्या लोकांची समजूत होती. पण तुर्क लोक मंदिराच्या दाराशीं आले तरी ईश्वरी मदतीचें कांहींच लक्षण दिसेना. लोकांनीं दरवाजा बंद करून घेतला, पण तुर्कांनीं तो थोड्याच वेळांत फोडला. तें पाहून जेनेडियस व त्याचे धर्माधिकारी मंदिरांतील मूर्ति घेऊन चोरदारानें पळून गेले. तुर्क लोक मंदिरांत शिरलेले पाहतांच आंतील सर्व माणसें घाबरून आरडाओरड करूं लागलीं आणि एकमेकांस ढकलीत व तुडवीत सैरावैरा धांवूं लागलीं.

लियॉनशियसची पत्नी ॲनाही त्या मंदिरांतच होती. ती एकदम पुढें येऊन तुर्की कामगारास म्हणाली—“ पाशासाहेब, मी ड्यूक लियॉनशियस यांची पत्नी आहे ! हे गरीब स्त्रीपुरुष ईश्वरप्रार्थनेकरितां येथें जमले आहेत, ह्या बिनहत्यारी लोकांवर जर तुम्ही अत्याचार कराल, तर मी सुलतानसाहेबांना कळवीन ! माझ्या पतीवर सुलतानसाहेबांची बहाल मर्जी आहे, हें तुम्हांला माहीतच आहे ! ”

तुर्की पाशा—“ बाई, तुम्ही कोणी असा ! हें मंदिर ताब्यांत घेण्याविषयीं आम्हांला सुलतानसाहेबांचा हुकूम आहे ! येथून सर्व लोक जर मुकाट्यानें आपापल्या घरीं निघून जातील, तर कोणाला विनाकारण त्रास देण्याची आमची बिलकुल इच्छा नाहीं ! ”

ही बातमी लोकांना समजतांच, जो तो मंदिरांतून अगोदर बाहेर पडण्यासाठीं धडपड करूं लागला. त्या गर्दीत कित्येक दुबळीं माणसें चेंगरून जाऊन प्राणांस मुकलीं. पण थोड्याच वेळांत मंदिर रिकामें होऊन तुर्कांच्या ताब्यांत आलें. सूर्यास्ताबरोबर मुख्य मौलवी मंदिरांतील व्यासपीठावर उभे राहून ‘ ला इलाह इल्लिला महमद रसूलुल्ला ’ अशी गंभीर गर्जना करूं लागले, आणि थोड्याच वेळांत सुलतानसाहेब आपल्या प्रमुख सरदारांसह सायंकाळच्या नमाजाकरितां मंदिरांत आले.

# प्रकरण ४१ वें.

## शेवट.



सर एडवर्ड व लॉर्ड मॅन्युअल वाड्याकडे येत असतां, बादशहा मरण पावल्याची बातमी त्यांच्या कानांवर आली. ती ऐकून त्यांना अत्यंत दुःख झालें. एकवार बादशहांचें शेवटचें दर्शन तरी घ्यावें, असें त्यांच्या मनांत फार होतें, पण बादशहांचें प्रेत कोठें आहे हें त्यांना समजेना व गर्दीतून तपास करीत जातांही येईना. त्यामुळें नाइलाज होऊन ते लॉर्ड फ्रांझाच्या वाड्याकडे आले. समोरच्या दरवाज्यांतून जाणें सुरक्षित नाहीं असा विचार करून, ते मागच्या चोरदाराकडे आले. पण दार उघडें दिसतांच ते एकदम दचकले. कांहीं तरी दगा झाला असावा, असें त्यांना वाटूं लागलें. ते गडबडीनें दारांतून आंत येतात तों, झोशी-मसचें प्रेत पडलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. ते चकित दृष्टीनें आसपास पाहूं लागले. काय प्रकार झाला असावा, हें त्यांना कांहींच कळेना. इतक्यांत त्यांना पाहून बलारम व रिचर्ड बर्टो दोहोंकडून पुढें आले. त्यांनीं तेथें घडलेलें सर्व वर्तमान त्यांना सांगितलें. लॉर्ड फ्रांझा व कोतवाल कॉन्-स्टंटिस कैद झाल्याची बातमीही रिचर्डकडून त्यांना कळली.

नंतर रिचर्ड म्हणाला—"धनीसाहेब, आपण उभयतां तळघरांत जाऊन, आंतील मंडळींना भेटा, आणि त्यांना धीर द्या, तोंपर्यंत आम्ही बाहेरचा बंदोबस्त ठेवतों! कांहीं वेळानें रात्र झाल्यावर व चोहों-कडे शांतता झाल्यावर, आपण पुढील तजविजीला लागूं! चला, चला लवकर, बाहेर उभे राहूं नका!"

सर एडवर्ड व लॉर्ड मॅन्युअल तळघराकडे गेले, आणि रिचर्ड व बलारम पुनः आपापल्या गुप्त ठिकाणीं जाऊन बसले.

तळघराच्या दाराजवळ जाऊन सर एडवर्ड हळूच म्हणाले—"थियोडोरा थियोडोरा, दार उघड! मी व लॉर्ड मॅन्युअल आलों आहों!"

थियोडोरा, युफ्राशिया व मेरियाबाई धांवतच दाराजवळ आल्या, व

त्यांनीं तत्काळ दार उघडलें. लॉर्ड मॅन्युअल व सर एडवर्ड ह्यांनीं एकदम आंत शिरून दार बंद करून घेतलें. त्यांचे खिन्न व निस्तेज चेहरे पाहून, युद्धाच्या परिणामाविषयीं त्या तिघींचीही खात्री झाली. तथापि ते दोघे सुरक्षित परत आलेले पाहून त्यांना बरेंच समाधान वाटलें. त्यांना हकीगत विचारण्याची त्या तिघींपैकीं कोणाचीही छाती होईना. मेरियाबाई खिन्न दृष्टीनें सर एडवर्डकडे पाहूं लागल्या. त्यांचा हेतु लक्षांत येऊन, सर एडवर्ड म्हणाले—" घाबरूं नका, लॉर्ड फ्रांझा व कोतवाल कॉनियॅटिस हे दोघेही कैद झाले आहेत, तथापि आतां त्यांच्या जीविताबद्दल भीति बाळगण्याचें कारण नाहीं !" नंतर त्यांनीं युद्धाची सर्व हकीगत हळूहळू थोडक्यांत सांगितली. आणि शेवटीं लियॉनरियसचा दुष्ट उद्देश सिद्धीस नेण्याकरितां झोशीमस कसा प्रयत्न करीत होता, आणि रिचर्ड बरटॉनें त्याला कसें योग्य शासन केलें, हेंही कळलें.

त्या तळघरांत देखील शहरांतील लोकांचा आरडाओरड व गोंगाट ऐकूं येत होता. तो कांहीं वेळानें मंद व अस्पष्ट होत होत दिवस मावळल्यावर मात्र बहुतेक शांत झाला. त्यावरून शहरांत स्वस्थता झाली असावी, असें त्या तळघरांतील मंडळींनीं अनुमान केलें.

कांहीं वेळानें थियोडोरा म्हणाली—"बरें, आतां पुढें काय करावयाचें ?"

सर एडवर्ड—" आतां लवकरच सुलतान राजवाड्यांत येऊन तो आपल्या ताब्यांत घेईल असें वाटतें ! मग वाड्यासभोंवतीं मुसलमानांचे पहारे बसतील, आणि आपल्याला येथून मग निसटून जातां येणें अशक्य होईल ! ह्यासाठीं पूर्वीं ठरल्याप्रमाणें ताबडतोब येथून गुप्तपणें निघून जाण्याची कांहीं तरी तजवीज केली पाहिजे, त्यावांचून गत्यंतर नाहीं ! नाहींपेक्षां मुकाट्यानें सुलतानाच्या स्वाधीन व्हावें लागेल !"

" पण बाबा ? " थियोडोरा व युफ्रासिया एकदम उद्गारल्या—" त्यांची वाट काय ? त्यांना मागें शत्रूच्या कैदेंत सोडून कसें जावयाचें ?"

लॉर्ड मॅन्युअल—" त्यांच्याबद्दल आतां फारशी काळजी नाहीं, युद्ध समाप्त झालें असल्यामुळें, लष्करी कैद्यांच्या जीवाला आतां धोका नाहीं ! पण तुमची मात्र स्थिति तशी नाहीं. लियॉनरियसनें आपल्या राष्ट्राशीं निमकहरामी करून, सुलतानाची महत्वाची कामगिरी केली आहे, आणि

त्याचा थियोडोरा ताईवर फार डोळा आहे, त्या अर्थी तो हरप्रयत्नानें तिच्यावर झडप घातल्यावांचून राहणार नाहीं; आणि युफ्राशिया, तूं सुलतानाच्या कैदेंतून पळून आली आहेस, त्यामुळें तुजवर त्याचा राग असणें साहजिक आहे! ह्यासाठीं तुम्हीं येथें क्षणभर देखील राहणें सुरक्षित नाहीं!"

मेरियाबाई—"खरेंच, मुलींनो! तुम्हां दोघींवरही अत्याचार होण्याचा फार संभव आहे, ह्याकरितां तुम्हीं दोघींनींही एकदम निघून जाणेंच श्रेयस्कर आहे! माझी गोष्ट तशी नाहीं. मी वृद्ध वयस्यामुळें, मजवर भलताच अत्याचार होण्याची भीति नाहीं. म्हणून मी मागें राहून, बलारमच्या मदतीनें माझ्या पतींची व लॉर्ड ऋांझांची लवकर मुक्तता करण्याची खटपट करीन. तुम्हीं त्याबद्दल काळजी करूं नका!"

थियोडोरा—"पण येथून तरी सुरक्षितपणें बाहेर कसें जावयाचें? कोठें जावयाचें? आणि आमच्या बरोबर कोण कोण येणार?"

सर एडवर्ड—"मला आतां येथें राहण्याचें कांहींच कारण नाहीं! कॉन्स्टां-टाईन बादशहांची मी शेवटपर्यंत शक्य तितकी इमानेंइतबारें सेवा केली. आतां त्यांच्या पश्चात् ह्या मुसलमान सुलतानाची सेवा मी क्षणभरही करणार नाहीं; आणि येथें राहिलें तर तो प्रसंग आल्यावांचून राहणार नाहीं! ह्याकरितां मी तुमच्या बरोबरच येणार आहें. शिवाय लॉर्ड मॅन्युअलनींही सध्यां सुलतानाच्या हातीं लागणें सुरक्षित नाहीं; आणि रिचर्ड बर्स्टो तर तेथें राहिला असतां प्राणासच मुकेल! म्हणून आम्ही तिघेही तुमच्याबरोबर निघतों! ठरल्या-प्रमाणें जमलें तर इंग्लंडास जावयाचें, तसें नच जमलें तर, तूर्त जेथवर जातां येईल तेथवर जाऊं! प्रथम रिचर्डला बंदराकडे पाठवून काय काय सोय होण्यासारखी आहे, ह्याचा तपास आणवूं, आणि मग चोर दारानें बाहेर पडून चालते होऊं. तोंपर्यंत रात्र होतेच आहे."

सर एडवर्ड तळघराच्या दाराजवळ परत येऊन बाहेरील कानोसा घेऊं लागले. कांहीं वेळानें बाहेर कोणाची तरी चाहूल ऐकूं येऊं लागली, त्यामुळें ते तसेच स्तब्ध उभे राहिले. इतक्यांत रिचर्ड दाराशीं येऊन हळूच हाका मारूं लागला—"धनीसाहेब, धनीसाहेब, दार उघडा!"

रिचर्डचा आवाज ओळखून सर एडवर्डनीं तत्काळ दार उघडून

त्याला आंत घेतलें आणि पुनः दार बंद केलें. रिचर्डच्या अंगावर दरवेशाचा पोषाख पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें.

रिचर्ड तळघरांत येतांच आपल्या बरोबर आणलेलें एक बोचकें सोडीत म्हणाला—" हं, आटपा धनीसाहेब, आतां एक क्षणक्षर देखील विलंब करण्याची सोय नाहीं ! ह्यांत दोन पुरुषांचे व दोन स्त्रियांचे असे चार मुसलमानी पोषाख आहेत, ते अंगावर घालून झटकन् माझ्या मागून बाहेर चला ! जिनोवाचीं आणि व्हेनिसची कांहीं व्यापारी जहाजें इतक्यांत निघणार आहेत. शहरांतील शेंकडों स्त्रीपुरुष त्या जहाजां-वरून जाण्यासाठीं एकसारखी धडपड करीत आहेत ! मीं त्यांतल्या त्यांत एका कप्तानाला भाड्याशिवाय आणखी शंभर मोहोरा बक्षीस देण्याचें कबूल करून, त्याच्या जहाजावर जागा मिळविली आहे ! आपण तळघरांत आल्यावर माझ्या मनांत पुढील कल्पना येऊन, मीं बंदरावर जाऊन हें काम करून आलों ! "

सर एडवर्ड व लॉर्ड मॅन्युअल यांनीं रिचर्डच्या धोरणाची व हुषारीची तारीफ करून त्याचे फार आभार मानले व ते आपल्या वेषांतराच्या तयारीला लागले. थियोडोरा व युफ्राशिया ह्याही एकेक पोषाख उचलून घेऊन बाजूला गेल्या. मेरियाबाई स्वस्थ उभ्या राहिलेल्या पाहून, रिचर्ड आपल्या अंगावरील कफनी काढीत म्हणाला—" मेरियाबाई, मला आयत्या वेळीं तिसरा स्त्रीवेष मिळाला नाहीं. तुम्ही कृपा करून हा माझाच पुरुष वेष अंगावर घाला ! "

मेरियाबाई हंसून म्हणाल्या—" नको नको, मला वेषांतर करण्याचें कारण नाहीं ! मी व बलाग्स येथेंच राहणार आहों ! "

सर एडवर्डनीं तो सर्व बेत रिचर्डला थोडक्यांत सांगितला. तेव्हां रिचर्ड कृतज्ञतेनें म्हणाला—" धनीसाहेब, माझ्या जिवाची मी मुळींच पर्वा करीत नाहीं ! आपण सर्व सुरक्षितपणें मुक्त झालां म्हणजे माझें काम झालें ! मग माझें येथें कांहींही होवो ! बरें, जहाजाचें भाडें द्यावयास कांहीं साधन आहे का ? हे जिनोवाचे जहाजवाले मोठे द्रव्यलोभी असतात, आणि आज तर त्यांनीं भाड्याचे दर भलतेच वाढविले असतील, शिवाय रक्कम अगोदर त्यांना द्यावी लागेल ! "

सर एडवर्ड—"त्याबद्दल काळजी नाहीं! माझ्या पत्नीनें आपलें सर्व दागदागिने व जडजवाहीर बरोबर घेतलें आहे!"

सर्वांचें वेषांतर झाल्यावर रिचर्ड म्हणाला—"आतां माझ्या पाठोपाठ मुकाट्यानें चला, एक अक्षर देखील बोलूं नका. कोणी कांहीं विचारलें तरी माझ्याकडे बोट दाखवा, मी सर्व तजवीज करितों! हं, उघडा दार!"

सर एडवर्डनीं दार उघडलें, व सर्व मंडळी मुकाट्यानें तळघरांतून बाहेर पडली, क्लारमही आपल्या गुप्त ठिकाणाहून पुढें आला. मेरिया-बाईनीं त्याला सर्व हकीगत थोडक्यांत सांगितली. नंतर त्यानें व मेरिया-बाईनीं सर्वांचे निरोप घेतले व उभयतां लॉर्ड फ्रांझांच्या वाड्यांत जाऊन बसले, आणि बाकीची मंडळी बागेंतून चोरदाराकडे वळली.

पुढें रिचर्ड बर्स्टो, त्याच्या मागून थियोडोरा व युफ्राशिया आणि त्यांच्या पाठोपाठ लॉर्ड मॅन्युअल व सर एडवर्ड, अशा क्रमानें ते बागेच्या चोरदारांतून बाहेर पडले, त्याच सुमारास राजवाड्याच्या मुख्य दरवाज्या-जवळ अल्लाच्या व सुलतानाच्या नांवांचा मोठा जयघोष झालेला त्यांच्या कानींवर आला. त्यावरून रोमन बादशहाच्या राजवाड्यांत खलीफ सुलतानमहमद यांचा प्रवेश झाला, हें त्यांना कळून आलें व तेणें-करून त्यांच्या मनाला अत्यंत दुःख झालें. रात्र झाल्यामुळें शहरांत बऱ्याच ठिकाणीं मशालींचा व दिव्यांचा प्रकाश पडला होता, तथापि रस्त्याला फारशी रहदारी नव्हती. शहरांत बहुतेक शांतता दिसत होती, तरी कित्येक इमारती बंद व कित्येक ओसाड पडलेल्या दिसत होत्या. ठिक-ठिकाणच्या चौक्यांवरून तुर्की शिपायांचा हास्यविनोद मात्र मोठ-मोठ्यानें चालला होता.

रिचर्ड व त्याच्या बरोबरची मंडळी सुवर्णश्रृंग बंदराजवळ सुरक्षित येऊन पोंचली, तेथवर येईपर्यंत त्यांना वाटेंत कोठेंही हरकत झाली नाहीं. बंदरावर तुर्की शिपायांची चौकी होती. ती दृष्टीस पडतांच रिचर्ड मागें वळून आपल्या मंडळीस हळूच म्हणाला "आतां मात्र सावध असा. बोलण्याचें सर्व काम माझ्याकडे सोंपवा. कांहीं झालें तरी तोंडां-तून एक अक्षर देखील काढूं नका. मी सर्व भागवितों! थोडें हुषारीनें वागलं म्हणजे भिण्याचें कांहीं कारण नाहीं!

चौकीजवळ जातांच पाहरेवाल्यानें, "कोन है?" असें विचारलें.

रिचर्ड धीटपणानें पुढें होऊन गंभीर स्वरानें तुर्की भाषेंत म्हणाला, "इन्षाल्ला! पैगंबराच्या सेवकांचा विजय असो! केवढा हा भाग्याचा दिवस! प्राचीन विख्यात रोमन बादशहांच्या सिंहासनावर आज सद्धर्म-पालक सुलतान खलीफाची स्वारी बसली! तें सिंहासन आज खरोखर पवित्र झालें! कॉन्स्टांटिनोपलच्या बुरजावर अल्लाचें चंद्रांकित विजयी निशाण फडकूं लागलें! पैगंबराचें भविष्य खरें झालें! सत्य धर्माचा विजय झाला! आम्ही किती तरी दिवसांपासून ह्या सोन्याच्या दिव. साची एकसारखी वाट पहात होतों! शेवटीं आज आमच्या प्रार्थनेचें सार्थक झालें! आतां आमच्यासारख्या अल्लाच्या व खलीफाच्या सेव-कांना काय कमी आहे! आम्ही काय काफर म्हणून आम्हांला तुम्ही आडविणार? आतां आम्ही वाटेल तेव्हां पाहिजे तिकडे जाऊं!"

चौकीवरील नाईक त्या वेषधारी दरवेशाचें भाषण ऐकून पहारे-वाल्याला म्हणाला—"हसन, जाऊं दे त्यांना! त्या बिचाऱ्यांना कशाला आडवितोस? काल खरोखरच ह्या दरवेशी लोकांनीं छावणींत फिरून लोकांचीं मनें युद्धाला प्रवृत्त करण्याची चांगली कामगिरी केली, म्हणून आमचा आज जय झाला! चला साहेब.तुम्ही खुशाल वाटेल तिकडे फिरा!"

रिचर्ड तत्काळ पहारेवाल्याला व नाइकाला आशीर्वाद देऊन, चौकी ओलांडून गेला. त्याच्या पाठोपाठ बाकीची मंडळीही पुढें निघून गेली. सुवर्णशृंग बंदरावरील सकाळच्या व आतांच्या देखाव्यांत जमीनअस्मा-नाचें अंतर होतें. बंदरावर कोणीही माणसें नव्हती, पण समुद्रांत दूर उभ्या असलेल्या जिनोवी व व्हेनीशियन जहाजांवर मात्र लोकांची अगदीं खेंच उडाली होती. त्यांचा गलबा बंदरावरही स्पष्ट ऐकूं येत होता. शहर तुर्कांच्या स्वाधीन होण्याच्या पूर्वींच हे लोक आपापले प्राण व बायकांची अब्रू बचावण्याकरितां जहाजांवर जाऊन बसले होते.

किनाऱ्यावर आल्यावर सर एडवर्ड म्हणाले—"रिचर्ड, कोणत्या जहा-जावर आपली सोय केली आहेस?"

रिचर्ड—"त्या पलीकडच्या जहाजावर जावयाचें, थांबा, मी होडी-वाल्याला बोलावून आणितो! आपल्याला होडींतून तेथवर चटकन जातां

आलें पाहिजे, म्हणजे निभावलें ! "

रिचर्डनें चोहोंकडे फिरून पाहिलें, तों फक्त दोनच होड्या त्याला दिसल्या. त्यांपैकीं एका होडीवाल्यानें रात्रीं होडी समुद्रांत घालण्याचें मुळींच नाकारलें, पण दुसरा मात्र शंभर मोहोरा भाडें अगाऊ मिळाल्यास होडी घेऊन येण्यास तयार झाला. रिचर्डनें प्रसंगाकडे लक्ष देऊन, मुकाट्यानें तितकें भाडें कबूल केलें, तेव्हां त्या होडीवाल्यानें ती मंडळी उभी होती तेथें होडी आणिली.

इतक्यांत तुर्की सशस्त्र शिपायांची एक टोळी चौकी ओलांडून आपल्याकडेच झपाट्यानें येत असलेली त्या मंडळीच्या दृष्टीस पडली. त्यांचा पु-ारी तुर्की वेषांत होता, तरी तो लियॉनशियस आहे हें रिचर्डनें तत्काळ ओळखलें. तो सर एडवर्डना हळुच म्हणाला " हं, धनीसाहेब, चला चला, अगोदर होडीवर चढा ! "

थियोडोरा व युफ्राशिया होडीवर चढल्या, इतक्यांत लियॉनशियस ओरडून म्हणाला-" कोण होडी हाकारीत आहे ? "

आवाजावरून तत्काळ सर्वांनीं त्याला ओळखलें. थियोडोरा व युफ्राशिया भीतीनें घाबरून गेल्यामुळें, त्यांना अवधान न राहून त्या-" अरे देवा ! तो सैतान लियॉनशियस ! " असें ओरडल्या.

ते उद्गार ऐकतांच लियॉनशियस आपल्या लोकांना म्हणाला " पकडा ह्या सर्वांना, एकदम कैद करा ! ते खरे दरवेशी नसून, पळपुटे चोर आहेत ! ते दंगा करतील तर बेलाशक ठार करा ! "

तुर्क शिपाई तत्काळ त्या होडीकडे धांवले. सर एडवर्ड, लॉर्ड मॅन्युअल व रिचर्ड बर्टों ह्यांनीं आपापल्या तरवारी उपसून त्यांना प्रतिबंध केला. वालीदचे शिपाई, वालीद नाईक व लियॉनशियस असे वारा असामी अंगावर चालून आले असतांही ह्या तिघां वीरांनीं न डगमगतां मोठ्या शौर्यानें त्यांच्याशीं लढण्यास आरंभ केला. हातघाईची झटापट सुरू झाली. पण इतक्या तुर्कांपुढें आपला निभाव लागणें शक्य नाहीं, हें रिचर्डला दिसून आल्यावरून त्यानें सर एडवर्ड व लॉर्ड मॅन्युअल ह्यांना मागें हटत जाऊन एकदम होडींत उड्या टाकून होडी हाकारावी अशी मसलत दिली. ती त्यांनाही पसंत पडल्यामुळें त्या

तिघांनींही संधि साधून होडींत उड्या टाकल्या व होडी हाकारली.

हें पाहतांच लियॉनशियस ओरडला—" दुसरी होडी घेऊन त्यांचा पाठलाग करा, सोडूं नका ! तुम्हांला दहा हजार मोहरा बक्षीस देईन ! "

तुर्की शिपायांनीं तत्काळ दुसऱ्या होडीवाल्याला धक्के मारून व ठार मारण्याची धमकी देऊन, ती होडी आणली, आणि सर्वजण त्यांत बसून पुढील होडीचा पाठलाग करूं लागले.

रिचर्ड वर्स्टॉनें मोठ्या शिकस्तीनें होडी 'पर्ल' जहाजाजवळ नेली. नंतर तो जहाजाच्या दोरखंडाला धरून जहाजावर चढला, आणि त्यानें थिओडोराला हात देऊन प्रथम वर घेतलें. तिला पोंचवून तो युफ्राशियाला नेण्यासाठीं परत येतो तों तुर्की होडीनें सर एडवर्डच्या होडीला गाठून त्यांच्यावर पुनः हल्ला केला. लॉर्ड मॅन्युअल अशक्तपणामुळें अगदींच थकून गेल्यामुळें त्यांच्या अंगीं लढण्याचें सामर्थ्य मुळींच उरलें नव्हतें. मग एकटे सर एडवर्ड काय करणार ! तथापि त्यांनीं लियॉनशियसशीं द्वंद्व युद्ध सुरू केलें. एकट्या लियॉनशियसशींच लढावयाचें असतें तर त्यांनीं लियॉनशियसला मुळींच दाद दिली नसती. परंतु त्यांच्या तलवा- रीचा एकवार लियॉनशियसला लागतांच सर्व तुर्की लोकांनीं त्यांच्यावर एकदम मारा केला. त्यामुळें त्यांचें शरीर छिन्नविच्छिन्न होऊन ते गतप्रा- ण होऊन तत्काळ होडींत पडले. हा भयंकर देखावा पाहून होडींत बसलेली युफ्राशिया व जहाजावरून पहाणारी थियोडोरा ह्या दोघीही बेशुद्ध होऊन पडल्या.

लियानशियसही जखमी झाला होता. त्यामुळें होडींत असलली स्त्रीच थियोडोरा असावी असा त्याला भ्रम होऊन त्यानें दोन्ही होड्या एकदम किनाऱ्यास न्यावयास हुकूम केला.

दोन्ही होड्या किनाऱ्याकडे वळतांच, पर्ल जहाजाच्या कप्तानानेंही आपलें जहाज हाकारलें.

किनाऱ्यावर उतरल्यानंतर लियॉनशियसला आपली चूक कळून येऊन फार वाईट वाटलें. परंतु आतां नाइलाज झाल्यामुळें त्याला मुकाट्यानें लॉर्ड मॅन्यूअल व युफ्राशिया ह्यांना कैद करून सुलतानाकडे हजर करणें भाग पडलें.

## प्रकरण ४२ वें.

## उपसंहार.



खलीफ सुलतान महमदांनीं राजवाड्यांत मोठा दरबार भरवून आपल्या सरदारांच्या पराक्रमाची तारीफ केली, आणि ज्याच्याल्याच्या योग्यतेप्रमाणें व कामगिरीच्या मानानें, सर्वांना इनामें व बक्षिसें दिलीं. त्याचप्रमाणें आपल्या लष्करांतील शिपायांपासून अंमलदारांपर्यंत सर्वांचा परामर्ष घेतला. नंतर त्यांनीं आपल्या मंत्रीमंडळाच्या सल्ल्यानें शांततेचा व राज्यव्यवस्थेचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. रोमन लष्करांतील व इतर सरकारी खात्यांतील जे लोक राजनिष्ठेच्या शपथा घेऊन नोकऱ्या करण्यास तयार झाले, त्यांना नोकऱ्याही दिल्या.

ह्याप्रमाणें राज्यकारभाराचें मुख्य काम झाल्यानंतर सुलतानांनीं लियॉनशियसला बोलावून आणविलें. आपल्याला कांहींतरी विशेष महत्वाचें बक्षीस मिळेल, अशी लियॉनशियसला मोठी आशा होती, परंतु दरबारांत आल्यावर सुलतानांची क्रुद्ध मुद्रा पाहतांच तो दचकला, व मुखस्तंभ करून स्तब्ध उभा राहिला.

सुलतान त्याच्याकडे तीव्र दृष्टीनें अवलोकन करीत रागानें म्हणाले— " लियॉनशियस, तूं आपल्या देशाशीं व आपल्या धन्याशीं निमकहरामी करून, आमच्याकडे पळून आलास! आम्हीं त्या वेळीं तुला आश्रय दिला, आणि तूंही आमची कामगिरी विश्वासानें बजावलीस; पण त्यांत तुझा स्वतःचा नीच हेतु प्रथमपासूनच होता. तथापि ईश्वरकृपेनें तो तुझा हलकट उद्देश अखेरीस साधला नाहीं, हें पाहून आम्हांला खरोखर समाधान वाटत आहे! तुझी एकंदर वर्तणूक जरी बेइमानी होती, तरी आम्हांला तुझा बराच उपयोग झाला असल्यामुळें, आम्ही तुला कांहीं तरी बक्षीस देणार होतों! परंतु काल तूं जें घोर कर्म केलेंस, त्यामुळें तुला बक्षीस न देतां उलट शासन करणेंच अवश्य झालें आहे! युद्ध बंद झाल्यानंतर तूं सर एडवर्ड नांवाच्या सरदाराचा प्राण घेतलास! ह्या

कृत्याचा युद्धाशीं यत्किंचित्‌ही संबंध नसून, केवळ खासगी द्वेषामुळें तूं हा बेकायदेशीर व धर्मबाह्य खून केला आहेस! ह्या अपराधाबद्दल तुला देहांत शासन करणेंच योग्य होतें, तथापि तुजवर दया करून, तुला आम्हीं जीवदान दिलें आहे! मात्र तुला कॉन्स्टांटिनोपल शहरांतून हद्दपार करण्यांत येत असून, तुझी जहागीर जप्त करण्यांत आली आहे!"

सुलतानाचा हा भयंकर हुकूम ऐकतांच लियॉनशियसला फार दुःख झालें, त्याचें तोंड काळें ठिक्कर पडलें, आणि त्याला आपल्या विश्वासघातकी, देशद्रोही व पातकी वर्तनाचा पश्चात्ताप झाला. तो कांहीं बोलण्याच्या बेतांत होता, पण सुलतानांची संतप्त मुद्रा अवलोकन करितांच तो इतका भेदरून गेला कीं, त्याच्या तोंडून एक शब्दही निघेना. तो खालीं मान घालून उभा राहिला.

सुलतानांनीं खूण करितांच एका कामगारानें लियॉनशियसची तलवार व हुद्दा काढून घेऊन, त्याला दरबारांतून बाहेर हांकून दिलें. नंतर सुलतानानीं दरबार बरखास्त केला.

सुलतानांच्या हुकमानें संध्याकाळीं कॉन्स्टांटाईन बादशहा व सेनापति सर एडवर्ड डी रस्टन यांचे प्रेतसंस्कार मोठया इतमामानें व लष्करी थाटानें करण्यांत आले. त्या वेळीं लॉर्ड फ्रांझा, लॉर्ड मॅन्युअल, जस्टीनियन, कॉनिस्टॅटिस वगैरे रोमन कैद्यांनाही त्या स्मशान यात्रेस जाण्याची परवानगी होती. त्यांचे प्रेतसंस्कार त्यांच्या धर्माप्रमाणें यथाविधि झाले.

कॉन्स्टांटिनोपल शहरच्या दोन भागांतील दोन ख्रिस्ती प्रार्थनामंदिरें सुलतानांनीं ख्रिस्ती लोकांच्या उपासनेकरितां कायम ठेवून, त्यांजवर जोसफ व जेनोडियस ह्या धर्माधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या. बाकी सर्व प्रार्थनामंदिरांच्या मशीदी करून, त्या ठिकाणीं मुसलमान विद्वान् मौलवी नेमून पाठशाळा सुरू केल्या.

याप्रमाणें मुसलमानांचा विजय होऊन खिलापतीची अर्थात् खलीफची गादी ग्रीक लोकांच्या राज्यांत म्हणजे तुर्कस्थानांत यावेळी स्थापन झाली व तेव्हापासून आजपर्यंत ती तुर्कस्थानांत एकछत्री व एकतंत्री मुसलमान शासनपद्धतीनें नांदून तिचा विनाश या जर्मन युद्धामुळें झाला.

× × × × ×

पर्ल नांवाच्या जहाजांतून थियोडोरा व रिचर्ड बर्स्टो हे पुढें रवाना झाले, ते बरेच दिवसांनीं इंग्लंडला जाऊन पोंचले. बिचारी थियोडोरा प्रथम कांहीं दिवस अर्धवट बेशुद्ध स्थितींतच होती. पतिवियोग दुःखानें ती अत्यंत वेडावून गेली होती, तिला सर्व जग शून्य भासूं लागलें. त्यामुळें तिला आपला प्राणही नकोसा झाला. परंतु रिचर्ड व जहाजावरील डॉक्टर यांच्या शुश्रूषेनें व नित्य उपदेशानें तिचें दुःख थोडथोडें कमी होत चाललें.

सर एडवर्डनीं आपल्या विवाहाचा दाखला व इतर महत्वाचे कागद आपल्या पत्रासह आपल्या वडिलांकडे पोंचविण्यासाठीं ह्याच जहाजाच्या कप्तानाजवळ देऊन ठेविलेले होते, ते त्या कप्तानानें रिचर्डच्या स्वाधीन केले.

सर एडवर्डचे वृद्ध वडील लॉर्ड रस्टन यांना आपल्या प्रिय पुत्राच्या मृत्यूची हकीगत ऐकून फार दुःख झालें. त्यांनीं थियोडोराचें प्रेमपूर्वक स्वागत केलें, आणि रिचर्डलाही आपल्या जवळ ठेवून घेतलें. आपल्या पुत्राच्या पराक्रमाच्या गोष्टी रिचर्डच्या तोंडून ते अत्यंत उत्सुकतेनें वारंवार ऐकत, आणि त्या ऐकून त्यांचें अंतःकरण आनंदानें, अभिमानानें व दुखानेंही भरून जाई. त्यानंतर योग्य वेळीं थियोडोरा प्रसूत होऊन, तिला पुत्र झाला. त्याचें नांवही 'एडवर्ड' असेंच ठेवण्यांत आलें. त्या बालकाकडे पाहून, थियोडोरा व लॉर्ड रस्टन ह्या उभयतांना आपल्या दुःखाचा बराच विसर पडला. रिचर्ड बर्स्टो तर त्या मुलाला आपला धनीच मानूं लागला.

पुढें कांहीं दिवसांनीं लॉर्ड फ्रांझा यांजकडून लॉर्ड रस्टन ह्यांना एक पत्र आलें त्यांत पुढील मजकूर होता!—तारीख ६ मे सन १४५४.

'लॉर्ड रस्टन, मुक्काम—इंग्लंड यांस; जॉर्ज फ्रांझा, माजी रोमन प्रधान हल्लीं मुक्काम आड्रियानोपल याची प्रणामपूर्वक विनंति. सुलतानसाहेबांनीं कृपा करून मला बंधमुक्त केलें, इतकेंच नव्हे, तर कोतवाल कॉनियाटिस, लॉर्ड मॅन्युअल व युफ्राशिया ह्यांनाही स्वातंत्र्य दिलें. पुढें सुलतानसाहेबांच्याच संमतीनें लॉर्ड मॅन्युअल व युफ्राशिया यांचा विवाह झाला. लॉर्ड मॅन्युअल ह्यांनीं सुलतानसाहेबांची नोकरी करण्याचें नाका-

त्यामुळें, त्यांच्या जहागिरीपैकीं निमी जहागीर नौकरीऐवजीं वजा होऊन बाकीची निमी जहागीर त्यांजकडे राहिली. कोतवाल व मेरियाबाई यांचा सिलिव्हरी येथील वाडा व खासगी उत्पन्न त्यांचें त्यांस परत मिळालें. सेनापति जस्टीनियन ह्यांना जिनोवाला परत जाण्यास परवानगी मिळाल्यामुळें, ते आपल्या उरलेल्या लोकांसह स्वदेशीं निघून गेले. मला कॉन्स्टांटिनोपल येथें राहणें आतां योग्य वाटत नसल्यामुळें, मी सुलतानसाहेबांच्या परवानगीनें आड्रियानोपल जवळच एका शांत व एकांत स्थळीं राहिलों आहें ! आमचे परमपूज्य बादशहा कॉन्स्टंटाईन ज्यामुळें त्यांच्या राजधानीला कॉन्टाण्टिनोपल हें नांव प्राप्त झालें व ज्याला तुर्की लोक—इस्तंबूल म्हणूं लागले. यांच्या कारकीर्दीचा व कॉन्स्टांटिनोपलच्या ह्या शेवटच्या महायुद्धाचा साद्यंत इतिहास लिहून काढण्याचा माझा विचार आहे, तेवढें काम पूर्ण झाल्यावर, मी ह्याच एकांत ठिकाणीं ईश्वरोपासनेंत उरलेलें आयुष्य घालविणार ! माझी प्रिय कन्या थियोडोराही आतां आपलीच झाली असल्यामुळें, तिच्याबद्दल मला यत्किंचित् देखील काळजी उरली नाहीं ! तिला व छोट्या एडवर्डला माझा पूर्ण आशीर्वाद आहे. परमेश्वर तुम्हां सर्वांचें सदैव कल्याण करो ! ”

